# मुक्तेश्वरकृत स्फुटकाव्यें.

## १. महाभारतांतील प्रकरणें.

### १. मूर्खांचीं[1] लक्षणें.

(ओव्या.)

सर्वेही[2] एकापासुनी झालें। सर्वेही एकासीच पावलें। परी तेणें कांहीं नाहीं केलें। हें ज्या न कळे तो एक मूर्ख. ॥ १ ॥ हरिहरांतें[3] मानी भेद। साधुसज्जनांतें देखोनी पावे[4] खेद। नेणोनि[5] करी वितंडवाद। तो द्वितीय मूर्ख जाणावा.

---

१. महाभारत—उद्योगपर्व—अध्याय ३३ यांत विदुरानें धृतराष्ट्रास पंडितांचीं व मूढांचीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्यांपैकीं 'मूढलक्षणें' या भागाच्या आधारानें मुक्तेश्वरानें हें प्रकरण रचिलें असावें असें वाटतें. पंतांनीं 'मूर्खांचीं लक्षणें' आपल्या उद्योगपर्वाच्या तिसऱ्या अध्यायांत थोड-क्यांत सांगितलीं आहेत तीं व रामदासस्वामींनीं आपल्या 'दासबोधां'त 'मूर्खांचीं व पढतमूर्खांचीं लक्षणें' सांगितलीं आहेत तीं जिज्ञासु वाचकांनीं अवश्य पहावीं अशी शिफारस आहे. २. दृश्यमात्र एका ब्रह्मापासून झालें—असा चरणाचा अर्थ. आमच्या जवळ असलेल्या हस्तलिखित प्रतींत ह्या प्रकरणाच्या आरंभीं पुढील ओंवी आढळते, परंतु 'काव्येतिहाससंग्रह'कारांस मिळालेल्या पोथ्यांत ती नसल्यामुळें आम्ही तिची योजना टीपांत करीत आहों; कारण ती प्रक्षिप्त असावी अशी आमची समजूत आहे:—'ॐ नमो जी विश्वंभरा स्वामी। तुझिये स्वरूपपरब्रह्मीं। पंचायतन पंच नामीं। नमन माझें सर्वस्वें. ॥' हीच ओंवी मुक्तेश्वरकृत आदिपर्वाच्या आरंभीं आहे. ३. विष्णु आणि शिव यांचे ठिकाणीं भेद मानूं नये, कारण भेद मानणाऱ्यास पाप लागतें—अशी शास्त्राज्ञा आहे. शिवविष्णूंचा अभेद अनेक ठिकाणीं वर्णिलेला आढळतो:—(१) विष्णुभक्त मी निर्दोष। म्हणोनि करी शिवाचा द्वेष। त्यातें म्हणे हृषीकेश। मुख्य वैरी तो माझा ॥ [मुक्तेश्वर—सभापर्व—अध्याय ६ ओंवी १४३], (२) विष्णुस्मरण शिवस्मरण। दोघीं वसविलें ज्याचें वदन। तोचि तीर्थवासी जाण। तीर्थें चरण वंदिती. ॥ [मुक्तेश्वर—वनपर्व—अध्याय ९ ओंवी ११], (३) शिव थोर विष्णु लहान। हरि विशेष हर गौण। ऐसें म्हणती त्यांलागून। आणून नरकीं घालावे ॥ [श्रीधरस्वामी—शिवलीलामृत], (४) शिव म्हणतां विष्णु जाण। विष्णु म्हणतां तूं महेश पूर्ण। नोळखोनी मूढ श्वान। भेदवादें भुंकती ॥ [मुक्तेश्वर—वनपर्व—अध्याय ४ ओंवी १३७ पहा]. ४. 'पाववी' असाही पाठभेद आहे. ५. न जाणतां, नीटपणें न समजतां, अर्थ न समजतां नुसतें पाठ करणारांवर हा तडाका आहे.

॥ २ ॥ नाहीं अर्थाचें [1]अनुसंधान । [2]पाठमात्रें [3]ज्ञानअभिमान । गर्वें जगासि माने न्यून । तो तृतीय मूर्ख जाणावा. ॥ ३ ॥ अर्थ नेणोनी भाषा दूषी । सिद्धांत नेणोनी [4]मतांची राशी । ईश्वर नेणोनि भूतांचा द्वेषी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४ ॥ [5]वेदशास्त्रपुराणज्ञानी । पाप म्हणोनि निंदिती जनीं । बळेंच आचरे तो करणी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५ ॥ आपुले अवगुण नाठवी । पुढिलांचे [6]अपराध माजवी । निर्दोषियां दोष लावी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६ ॥ [7]शरीरसंपत्तिवयसा जाणा । [8]हे साचार मानी मना । गर्वें जगासी [9]चाले उताणा । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७ ॥ ईश्वर [10]काळ आणि पापाचें । वेद वडील लोकनिंदेचें । भय नाहीं [11]जैया साचें । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८ ॥ चंचळ [12]आंवरावया मन । शक्ति नाहीं अर्ध क्षण । मेरुतुल्य [13]शब्दज्ञान । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९ ॥ [14]पुढिलां उपदेशी [15]अमाप । आपण झांकून करी पाप । [16]करूनि म्हणे मी [17]निःपाप । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १० ॥ [18]विरक्त [19]आणि इच्छावंत । [20]योगी आणि [21]इंद्रियासक्त । वादी क्रोधी शास्त्रज्ञ पंडित । [22]ते हे तिघे मूर्ख जाणावे. ॥ ११ ॥ ब्रह्मनिष्ट आणि अहंकारी । तपस्वी [23]कोपें अपस्मारी ।

---

१. 'अनुष्ठान' असाही पाठ आहे. २. नुसतें पाठ (अर्थ न समजतां) केल्यानें. 'आपण मात्रें' असा अन्यपाठ आढळतो. ३. आपल्या ज्ञानाचा गर्व. येथें संधी कर्तव्य असून केला नाहीं. असे प्रकार मुक्तेश्वराच्या कवितेंत बरेच आढळतात. ४. 'मताचेरसी (?)' असाही पाठ आढळतो. ५. आमच्या जवळील हस्तलिखित प्रतींत ही ओवी आढळत नाहीं. ६. 'परछिद्रीं दृष्टी ठेवी' असाही पाठ आहे. ७. शरीर, संपत्ति आणि वय ह्या तीन गोष्टींना. ८. 'हें साच मानुनियां मना' असाही पाठ आहे. ९. उताणा चाले=गर्वानें छाती काढून चाले. १०. सर्व प्राणिमात्राचें जो आकलन करितो तो काळ. 'कलनात् सर्वभूतानां स कालः परिकीर्तितः' इति वृद्धः. ११. 'आयासाचें' असाही पाठ आढळतो. १२. चंचळ मन आंवराया अर्धक्षण (अल्पकाळ देखील) शक्ति नाहीं [परंतु ज्याचें] शब्दज्ञान मेरुतुल्य—असा अन्वय. १३. शब्दज्ञान=कोरडी बडबड. 'शब्द जाण' असा अन्य पाठ आहे. १४. पुढील पिढीच्या लोकांस, आपल्यापेक्षां लहानांस. १५. पुष्कळ. अमाप=मापल्याशिवाय, मोजण्यास अतिशय—असा या शब्दाचा अर्थ दिसतो. 'अमूप' 'उमोप' 'अमाप' 'मोप'—हे कुळंबाऊ शब्द 'अतिशय' किंवा 'पुष्कळ' या अर्थाचे द्योतक होत. 'निष्पाप' असाही पाठ आहे. १६. पाप करूनि—असा भावार्थ. १७. पापरहित, पवित्र. १८. ज्याला इहलोकच्या कोणत्याही वस्तूंसंबंधीं वासना राहिली नाहीं अशा ईशभक्तिपरायण पुरुषास 'विरक्त' असें म्हणतात. १९. 'मनीं' असाही पाठ आहे. २०. योगी=ज्याला मातीचें ढेंकूळ, धोंडा आणि सुवर्ण हीं सारखींच वाटतात असा पुरुष. [भगवद्गीता—अध्याय ६ श्लोक ८ पहा]. २१. 'विषयासक्त' असाही पाठ आहे. २२. 'तो एक मूर्ख जाणावा' असाही पाठ आढळतो. २३. कोपामुळें ज्याला अपस्मार होतो तो, फार रागीट. 'कोपी' असाही पाठ आहे.

शिष्टं अंतरीं अनाचारी । हे तिघे मूर्ख जाणावे. ॥ १२ ॥ [1]ज्ञान आणि वैराग्य-हीन । भक्ति करी विश्वासावीण । [2]कुटुंबसंग्रहीं निर्धन । हे तिघे मूर्ख जाणावे. ॥ १३ ॥ आतां सर्व साधारणें । अनेक मूर्खांचीं लक्षणें । सांगीजेतील सज्ञानें । [3]त्यागार्थ बुद्धी परिसावीं. ॥ १४ ॥ [4]वारिया देऊनि पाठी । [5]वापीकूपीं घाली [6]दिठी । चालतां तृण तोडी बोटीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १५ ॥ प्रकाशाचिये तोंडीं । उभा राहूनि वस्त्र [7]फेडी । [8]सांडव्यावरून धांवे तांतडी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १६ ॥ नीच बैसोनि उंचीं मुते । नाकींचा मळ काढी हातें । [9]बोटींचें नख तोडी दांतें । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १७ ॥ बैसोनियां सभा-स्थानीं । खाकरे [10]शिंकरे प्रतिक्षणीं । पिंका टाकी पवित्र [11]भवनीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १८ ॥ समर्थें करितां विनोद । [12]आपण परतोनि दे शब्द । [13]बळ-वंताशी चालवी [14]द्वंद्व । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १९ ॥ [15]श्मश्रूकर्म करितां निकटी । चिरकाळ बैसोनि सांगे गोष्टी । [16]समर्थवनिता न्याहाळी दृष्टी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २० ॥ [17]एकला एकट चाले पंथीं । [18]हाटचोहटा करी वस्ती । वर्ते कुसंगाचिया संगती । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २१ ॥ उदक-पात्रावीण भोजनीं । [19]चूर्णावीण [20]फोडणी घाली वदनीं । परवस्त्र मागे स्नान करूनी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २२ ॥ [21]अर्थ दे लोभियाचे करीं । पुस्तकें ठेवी पंडिताचे घरीं । स्त्री ठेवी जारशेजारीं । तो एक मूर्ख [22]जाणावा. ॥ २३ ॥

---

१. 'ज्ञानी' असाही पाठ आहे. २. कुटुंबाकरितां करण्याच्या संग्रहासंबधानें. ३. सोडण्याच्या हेतूनें. 'कौतुकार्थ' असाही पाठ आहे. ४. वाऱ्याकडे पाठ करून. ५. तळ्यांत किंवा विहिरींत. ६. 'दृष्टी' असाही पाठभेद आढळतो. ७. फेडी=सोडी. 'वस्त्रें वेढी' असाही पाठ आहे. वेढणें=गुंडा-ळणें, नेसणें. ८. सांडवा=नदींत किंवा ओढ्यांत पाय न भिजवितां जातां यावें म्हणून जो बांध घा-लितात तो. पावसाळ्यांत ह्या बांधावरून पाणी जातें. 'संग्रामीं' असा अन्यपाठ आहे. ९. 'बोटींचीं नखें' असाही पाठभेद आहे. १०. 'शिंके' असाही पाठ आढळतो. ११. भवन=घर; पवित्र भवनीं= देवालयादि पवित्र ठिकाणीं. येथें 'पवित्र भुवनीं' असाही पाठ आहे. या पाठाचा स्वीकार केल्यास, भुवन=पाणी, उदक; पवित्र भुवनीं=तीर्थादि पवित्र जलाशयांत—असा अर्थ करावा. १२. 'आपण दे प्रतिशब्द' असाही पाठ आहे. प्रतिशब्द=प्रत्युत्तर, उलट जबाब. १३. 'अहो दुरंता बलवद्विरोधिता'= बलवानाशीं विरोध करण्यापासून किती वाईट परिणाम होतो—असें 'किरातार्जुनीय' काव्यांत एके ठिकाणीं म्हटलें आहे, तें मुक्तेश्वराच्या येथील उक्तीशीं बरेंच समानार्थक आहे. १४. सामना, झगडा, भांडण. १५. हजामत. १६. थोरामोठ्यांचीं बायको. १७. एकला एकट=अगदीं एकटा. 'एकटिया' असाही पाठ आहे. १८. बाजारांतल्या चव्हाट्यावर. १९. चुन्याशिवाय. २०. विडा. २१. अर्थ=द्रव्य, धन. २२. या ओंवीचा अन्यपाठ असा आहे:—'अर्थलोभियाचे घरीं । पुस्तकपं-डिताचे घरीं । स्त्रीजाराचे शेजारीं । वसे तो एक मूर्ख. ॥ २३ ॥'

उधार देऊनि थोटा[1] । मग व्यवहार सांगे चोहटा[2] । नसती[3] करी खटपटा ।[4] तो एक मूर्ख जाणावा. ॥ २४ ॥ दुर्जयाचे घरा जाणें । अपमानाचेनि दुःखें शिणणें । क्षेत्रीं सोंवळें[5] ओंवळें म्हणे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २५ ॥ उधार देऊनि मित्रा[6] मागे । गुह्य[7] स्त्रियेपाशीं सांगे । आपला गुण आपण श्लाघे[8] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २६ ॥ नीचाचे[9] तोंडीं लागे । शिकवी तयाची बुद्धि नलगे । अहंपणें सर्वदा वागे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २७ ॥ अल्पभोजी[10] शीघ्रभोजी[11] । अथवा समर्थप्रभु[12] शेजीं । भोजनीं बैसे तया शेजीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २८ ॥ संबंधेंवीण वार्ता पुसे । उगाचि[13] लोकांशीं रुसे । तापियाकोपियांसि[14] हांसे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ २९ ॥ बहुत हानीतें नाठवी । स्वल्पासाठीं कलह वाढवी । वेळ[15] न पहातां आडवी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३० ॥ भोजनकाळीं परगृहा जाय । स्त्रीपुरुषांचा एकांत पाहे । हाटचोहटा[16] खाय कीं गाय । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३१ ॥ दासी[17] तरुणी रूपवंता । राहे कुटुंबिनी विरक्ता । गृहीं ठेऊनि निभ्रांता[18] (?) । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३२ ॥ दरिद्री आणि गोड खाय अंगें । घरींचा सुरवाड[19] पंथीं मागे । अभाग्यकाळीं भाग्य सांगे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३३ ॥ करूनि अनुचित करणी ।

---

१. दरिद्री असून कर्जेदलाल अशा लोकांस. २. चव्हाट्यावर, भररस्त्यावर. ३. 'नास्ती काळीं' असाही पाठ आढळतो. ४. आमच्याजवळील पोथींत ही ओंवी आढळत नाहीं. ५. प्राचीनकाळापासून क्षेत्राच्या ठिकाणीं सोंवळ्या ओंवळ्याचा विशेष विधिनिषेध नसावा, असें दिसतें. ६. (मित्राला) उधार देऊनि मागे–असा अन्वय. ७. गुप्त गोष्ट. ८. वाखाणी, स्तुति करी. ९. ह्या ओंवीचा अन्य पाठ असा आहे:–'नीचाचिये तोंडीं लागे । नेदी तया बळें मागे । झकवी त्याचे बुद्धीं वागे । तो एक मूर्ख जाणिजे. ॥' झकवी=फसवी, ठकवी. १०. थोडें जेवणारा. ११. जलद जेवणारा. १२. [जेव्हां] समर्थ प्रभु शेजीं (बिछान्यावर) अथवा भोजनीं (जेवण्याकरितां, भोजनास) बैसे, [तेव्हां] तया शेजीं (त्याच्याजवळ, त्या समर्थ प्रभुजवळ) [जो बैसे] तो मूर्ख–असा अन्वय. १३. 'उगलाचि लोकांवरी रुसे' असाही पाठ आहे. १४. तापट आणि रागीट यांस. 'तपी कोपी यांसि' असाही पाठभेद आहे. १५. 'समय लक्षुनि आडवी' असाही पाठ आहे. १६. 'हाटबिदी' असा अन्यपाठ आहे. बिदी=गल्ली. १७. रूपवंता (सौंदर्ययुक्त) तरुणी (तरुण) दासी गृहीं निभ्रांत (निर्भयपणें) ठेऊनि (ठेविल्यामुळें) [ज्याची] कुटुंबिनी (भार्या, स्त्री) विरक्त (विरक्तपणें) राहे (राहते) तो मूर्ख–असा सरलार्थ. १८. 'दासी तरुणी रूपवंत । आपण भगवद्भक्त विरक्त । गृहीं ठेवितो निभ्रांत'–असाही पाठ आढळतो. १९. सुरवाड=सुख, सौख्य. 'सुरवाड मार्गीं मागे' असाही पाठ आहे.

पश्चात्ताप न[1] मनी मनीं । छळूनि करी बुझावणी[2] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३४ ॥ मळमूत्रविसर्जना । अथवा भुंकेलिया[3] भोजना । जातया गोंवी[4] त्वरें वचना । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३५ ॥ भोजनीं बैसे विषमासनीं[5] । उदक प्राशी खट्वासनीं[6] । प्रभुशेजे[7] उंचासनीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३६ ॥ वर्जितां अन्याय[8] राहाटणें[9] । अपाय लागल्यावर शिणणें[10] । माझें प्रारब्ध ऐसें म्हणणें[11] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३७ ॥ फिटेल कैसें हें न विचारी । रीण[12] घेऊनि घाली उदरीं । मग भंडमा[13] भोगी अपारीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३८ ॥ मित्रदारा मित्रवैरी । यांशीं एकांतीं मैत्री करी । धंणी[14] नसतां रिघे घरीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ३९ ॥ परहातें[15] संपादूनी । यशलाभाचा भरंवसा मानी । ईश्वरभजन न ऐके कानीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४० ॥ जाग-[16]तया पुढें निजणें । कीं निद्रिस्थापुढें बैसणें । स्त्रीसमाजीं आवडे बसणें । तो एक मूर्ख जाणावा[17]. ॥ ४१ ॥ निद्रा करी समर्थशयनीं[18] । जाऊनि बैसे समर्थासनीं । आरुढे जो समर्थवहनीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४२ ॥ विसांविया उतरे वाटे[19] । अस्तमानीं चढे घांट[20] । ओस पंथीं चाले पहांटे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४३ ॥ निद्रा करी मोडके[21] घरीं । स्वल्प[22] मानूनि रिघे[23] पूरीं । समीप म्हणोन न ये घरीं[24] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४४ ॥ कुटुंबेंसीं परतीरा जाय । अपत्य घेऊनि अवघडीं[25] धांवे । एकदांचि अवघीं बैसवी नावे । तो एक मूर्ख

---

१. न मनी=मानीत नाहीं. २. बुझावणी=समजूत. [बुझावणें=कोणतीही गोष्ट मनांत भरवून देणें, समजाविणें, समजूत करणें]. ३. 'मुखें करीं' असाही पाठ आढळतो. ४. गुंतवी. ५. उंचसखल आसनावर. ६. खाटेवर बसून. 'उभा राहुनी' असाही पाठ आढळतो. ७. 'प्रभुसन्मुख बैसे उंचासनीं' असाही पाठ आहे. ८. 'अन्यायीं' असा पाठभेद आढळतो. ९. राहाटणें=वागणें. १०. दुःख करणें. ११. 'म्हणे' असें पाठांतर आहे. १२. 'रिण घेवोनि संसार करी' असाही पाठ आढळतो. १३. हाल अपेष्टा, धिंडवडे, जगाच्या उपहासास पात्र होणें. १४. 'गृहस्वामी नसतां प्रवेशे घरीं' असाही पाठभेद आहे. १५. या ओंवीचा अन्य पाठ असा आहे:—'संग्राम उदीम दोन्ही । परहस्तें संपादूनी । यशलाभाचा भरंवसा मानी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४० ॥'. १६. समर्थही असेंच म्हणतात:—'बहुत जागते जन । तयांमध्यें करी शयन । ......... । तो एक मूर्ख. ॥.' १७. या ओंवीचा अन्य पाठ असा आहे:—'जागतियापुढें निद्रा करणें । निद्रिस्ता समीप बैसणें । परस्त्रियां संबंधीं बैसणें । तो एक मूर्ख जाणावा. ॥४१॥' १८. समर्थाच्या बिछान्यावर. १९. रस्त्यावर, रस्त्यांत. २०. पर्वतावरून किंवा डोंगरावरून जाणारा रस्ता. २१. 'भंगले' असाही पाठ आहे. २२. नदीचा पूर मोठा नाहीं असें समजून. २३. 'निघे' असें पाठांतर आढळतें. २४. 'चाले रात्रीं' असा अन्यपाठ आहे. २५. जाण्यास कठीण अशा ठिकाणीं.

जाणावा. ॥ ४५ ॥ माध्यान्हीं उष्णकाळीं । सकुटुंबी चाले वाट निर्जळीं । दाटीमाजी [1]रिंघे [2]देउळीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४६ ॥ [3]बोलें न खंडितां दुजयाचा । आपण असत्य करी [4]वांचा । आपण मध्येंच [5]संचरी [6]वाचा । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४७ ॥ न बोलवितां परगृहा जाणें । [7]न पुसतां [8]मात सांगणें । समर्थ प्रभु [9]सोयरा म्हणे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४८ ॥ आपण नेणे सारासार । नायके श्रेष्ठाचा विचार । बोले [10]तांतडीभरें थोर । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ४९ ॥ [11]घडला जरी उपकार नाठवी । अपकार तो जीवीं आठवी । आपुलें केलें तें मुखीं रूढवी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५० ॥ [12]पंक्तिभेद करूनि [13]कदन्न वाढी । आपण एकला मिष्टान्न झोडी । मज न साहे हे [14]संपादी प्रौढी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५१ ॥ मळीण वस्त्र अंग मळीण । न करी [15]करपाददंतधावन । भक्ष्य भक्षी [16]स्नानावीण । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५२ ॥ [17]समर्थशेजे बांधी घर । बळवंताशीं [18]अर्थव्यवहार । [19]राजपुरोहिताशीं [20]मत्सर । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५३ ॥ पुढें स्तुति, मागें निंदा । स्वल्प अपराधें चढे क्रोधा; । समर्थीं जो न मिळे संवादा । तो एक मूर्ख

१. शिरे, जाई. २. 'देउळ' हा 'देवालय'शब्दाचा अपभ्रंश. ३. दुसऱ्याचें म्हणणें खोडून न काढतां, दुसऱ्याची चुकी त्याच्या पदरांत न घालतां. ४. सप्रमाण खंडण केल्याशिवाय जो दुसऱ्याचें बोलणें खोटें असें म्हणतो—असा अर्थ. असत्य करी=असत्यपण प्रत्ययास आणूं पाही. ५. मध्येंच संचरी वाचा=मध्येंच बोले. ६. 'शब्द न खंडितां दुजियाचा । आपण मध्यें संचरी वाचा । आग्रहें संग्रह करी पापाचा ।' असाही पाठ आढळतो. ७. न विचारतां, विचारल्याशिवाय. ८. वर्तमान, बातमी. ९. अमुक मोठा मनुष्य माझा नातेवाईक आहे—असें म्हणणारा. १०. जो विचार न करितां भराभर पुष्कळसें बोलत सुटतो तो. 'स्वमुखें म्हणे मी थोर' असाही पाठ आहे. ११. या ओंवीचा अन्यपाठ असा आहे:—'केले अपकार नाठवी । अपकार सर्वदा आठवी । केला स्वधर्म तो रूढवी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५० ॥'. १२. पंक्तिभेद=पंक्तिप्रपंच, पंक्तींतील सर्वांस सारखें न वाढणें, कांहीं लोकांना मिष्टान्न व कांहीं लोकांना कदन्न वाढणें. १३. वाईट अन्न, निकृष्ट धान्याचें अन्न. तत्पुरुषसमासामध्यें अजादि उत्तरपद असेल तर 'कोः कत्तत्पुरुषेऽचि' ह्या सूत्रानें 'कु'शब्दाला 'कत्'आदेश होतो; जसें:—कदश्व (वाईट घोडा). १४. अमुक पदार्थ मला सोसत नाहीं अशी ऐट मारी. १५. कर+पाद+दंत+धावन=हात+पाय+दांत+धुणें=जो हातपाय धुवीत नाहीं व दांत घांशीत नाहीं तो. १६. 'स्नातेवीण' असा अन्य पाठ आहे. १७. समर्थाच्या शेजारीं. १८. 'बलिष्ठासीं द्रव्यव्यवहार' असाही पाठ आहे. १९. राजोपाध्यायाशीं, राजाच्या कुलगुरूजवळ. २०. येथें 'करी' हें क्रियापद अध्याहृत आहे असें समजावें.

जाणावा. ॥ ५४ ॥ एकांत करितां दोघेजण । [1]समीप जाऊनि लावी कान । श्रेष्ठा [2]आधीं इच्छी मान । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५५ ॥ [3]अकारणें हांसे बहु [4]हांसणें । हांसतचि गोष्टी सांगणें । कोण्ही न हांसतां बहु हांसणें । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५६ ॥ प्रभु हांसतां आपण न हांसे । [5]जेठां घालूनि सभे बैसे । प्रभु [6]रूदतां आपण हांसे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५७ ॥ मळमूत्र सारी [7]जनाचिये दृष्टी । [8]जपतप नाहीं लोकांचे दृष्टि । सभेंत फळ तांबूल सेवी [9]एकटीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५८ ॥ [10]बहु व्यवसायी ऋणग्रस्त । [11]द्विभार्यापति व्याधिग्रस्त । यांचिया वचनीं विश्वासत । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ५९ ॥ परगुणपरीक्षा [12]परवेदना । हे दोन्ही नकळे ज्याचिया मना । [13]त्यां-चिया संगती मुखवासना । इच्छी तो एक मूर्ख. ॥ ६० ॥ [14]अल्प पडदणी अल्प वसन । अल्प पात्रीं बहु भोजन । अल्प स्त्रीस दाखवी मन । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६१ ॥ गृह त्यागूनि मठाची माया । [15]शिष्यिणी करूनि त्यागी [16]जाया । सुहृद त्यागूनि धरी शिष्यसमुदाया । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६२ ॥ [17]परोपदेशीं कुशळ भारी, । आपण अधर्म अकर्म करी, । त्याच्या वचनाचा विश्वास धरी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६३ ॥ तोंडें म्हणे सर्व

---

१. 'आपण' असा अन्य पाठ आहे. २. 'श्रेष्ठत्व आधीं इच्छी मन' असाही पाठ आहे. ३. कारणाशिवाय. 'अपकारण' असें पाठांतर आहे. ४. 'हांसणें हांसे' हें इंग्रजींत ज्याला Cognate Object म्हणतात त्याचें उदाहरण आहे. अशा प्रकारच्या कर्माला मराठींत निराळें नांव नाहीं, तरी असले प्रयोग कधीं कधीं आढळतातः—(१) तीतें देखोनि वैश्यीं सकळीं । नाना तर्कीं तर्किलें ॥ १७२ ॥ [मुक्तेश्वर–वनपर्व–अध्याय७], (२) तो आठवूनि मनें । शोक करी अपार ॥ २८ ॥ [मुक्तेश्वर–वनपर्व–अध्याय८], (३) पांच कोटी पेरोज-वृष्टी । मेघप्राय वर्षला ॥ २६ ॥ [मुक्तेश्वर–सभापर्व–अध्याय ८], (४) तिनें गीत गाइलें, (५) त्यानें खाऊ खाल्ला–इत्यादि. ५. आसनमांडी. 'गेंठा' असाही पाठ आहे. गेंठा=कंबर व गुडघे यांस धोतर गुंडाळून बसणें. ६. 'देखतां' असाही पाठ आहे. ७. 'लोकदृष्टी' असाही पाठ आहे. ८. 'जपतप मांडी हाटचोहटीं' असाही पाठ आहे. ९. एकट्यानें, एकटा. 'एक दिठी' असाही पाठ आढळतो. १०. अनेक व्यवसाय (उद्योग) करणारा. ११. ज्याला दोन बायका आहेत असा, दोन बायकांचा दादला. १२. दुसऱ्याचें दुःख. १३. 'त्याचे संगतीची धरी वासना' असाही पाठ आहे. १४. अल्प=लहान, थोडें, क्षुल्लक. १५. भारतकाळींही भोळ्या बाय-कांना गुरूपदेश देण्याच्या मिषानें कुमार्गास लावणारे ढोंगी साधू होते असें दिसतें !!! १६. भार्या, विवाहित स्त्री. १७. दुसऱ्याला उपदेश करण्यांत पटाईत. 'परोपदेशवेलायां शिष्टाः सर्वे भवंति वै', 'परोपदेशे पांडित्यं सर्वेषां सुकरं नृणाम्' हीं सुभाषितें प्रसिद्धच आहेत.

ही ब्रह्म[1] । आचरे वेदविरुद्ध कर्म । त्याचा शिष्य होय तो परम अधम । महा-[2]
मूर्ख या नांवें.[3] ॥ ६४ ॥ स्त्रियेचें वचन घेऊनि कानीं । दुरावी[4] पिता बंधू
जननी[5] । वेगळा[6] राहे सुहृदांतुनी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६५ ॥ अर्थ
अथवा वृत्ति स्वार्थ[7] । व्यवहारा बोलावी[8] बापभावांत[9] । अपाय चिंती आप्तांत[10] ।
तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६६ ॥ मायबापाची हेळणा[11] करी । आर्जवें आदरें
उचित करी[12] । विश्वीं वर्ते मिथ्याचारी[13] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६७ ॥
कुरूप[14] म्हणोनि स्वस्त्री त्यागी । दासीवेश्यापरस्त्रीसंगीं[15] । लज्जाविरहित कुमार्गी ।
वर्ते तो एक मूर्ख. ॥ ६८ ॥ वडिल सुहृद निद्रिस्थ घरीं । अबला अभुक्त[16]
रुदितस्वरीं । बळात्कारें संग करी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ६९ ॥ परगृहीं
गोड तें म्हणे 'वाढीं,' । स्वगृहीं[18] 'घाल तें' पुसी न रूढि । जेवितया[17] आधीं हात
आंखडी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७० ॥ भोजनाभ्यंगीं[19] मळ[20] सर्गी[21] ।
रहस्य बोलता[22] राजवर्गी । निद्रिस्थ प्रभुस्त्रियांसंगीं । तो एक मूर्ख जाणावा.
॥ ७१ ॥ झोंपीं जातया कां ध्यानस्था[23] । दाटूनि[24] बोलवी आग्रहता । प्रभूतें पुसे

---

१. 'खल्विदं ब्रह्म' असाही पाठ आहे. २. 'मूर्खांहुनी मूर्ख जाणावा' असें पाठांतर आढळतें. ३. ह्या ओंवीशीं समानार्थक ओंवी:—[नारद धर्मास विचारितो] 'तोंडें बोलोनियां ब्रह्म । भंगिती सदाचार धर्म । प्रशंसिती अविचारकर्म । ते संसर्गी त्यजिले कीं ॥ १४१ ॥' [मुक्तेश्वर—सभापर्व—अध्याय ३ पद्य]. ४. दूर करी, त्यागी. ५. समर्थांचेंही असेंच वचन आहे:—'जन्मला जयांचे उदरीं । तयांशीं जो विरोध करी । सखी मानिली अंतुरी । तो एक मूर्ख ॥.' ६. 'नांदों लागे श्वशुरसदनीं' असाही पाठ आहे. ७. 'स्वार्थें' असाही पाठ आहे. ८. 'बोलावीं' हा अपपाठ असावा. या ठिकाणीं 'जो लावी' असा पाठ मानिल्यास अर्थ नीट लागतो. जो स्वार्थवृत्ति व द्रव्यव्यवहार बापभावांत करितो तो—असा अर्थ. ९. 'दायादांतें' असाही अन्यपाठ आहे. १०. 'आप्तांतें' असें पाठांतर आहे. ११. तिरस्कार, हेळसांड. १२. 'सारीं' असाही पाठ आहे. १३. 'मित्राचारीं' असाही पाठ आहे. १४. सौंदर्यरहित. १५. ही ओंवी आमच्याजवळील पोथींत अशी आढळते:—'कुरूप म्हणोनि स्वस्त्रिये त्यागी । दासी, वेश्या, परस्त्री, भोगी । निर्लज्ज राहाटे कुमार्गी । तो एक मूर्ख जाणावा. ॥६८॥.' १६. उपभोग न घेतलेली, बाला, अल्पवयी स्त्री. [मुक्तेश्वर आदि०—अ० १३ ओंवी १०२ हींत हेच शब्द आहेत]. १७. आपल्या घरीं परका मनुष्य जेवावयास आला असतां त्यास 'तें घाल=अमुक पदार्थ वाढ'—असें रूढीप्रमाणें न विचारी. १८. 'स्वगृहींची सांगे प्रौढी' असाही पाठ आहे. प्रौढी=बढाई. १९. अभ्यंग सुवासिक तैलादि आंगाला लावून स्नान करणें. २०. मळ सर्गी=मलोत्सर्ग करी. मळ=विष्ठा. २१. 'मलोत्सर्गी' असाही पाठ आहे. २२. राजवर्गी (राजाच्या सेवकांना) रहस्य (गुप्त गोष्ट) बोलता (सांगणारा)···मूर्ख—हा इत्यर्थ. २३. ध्यान= सर्व ऐहिक विषय वर्ज्य करून ईश्वराच्या ठिकाणीं एकाग्रतेनें मन लावून चिंतन करणें. ध्यान

राजवार्ता । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७२ ॥ [1]प्रज्ञा असोनि अभ्यास न करी । तरुणपणीं [2]प्रवास करी । समर्थाश्रयें [3]अनुपकारी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७३ ॥ ज्ञाता आणि ईश्वर न भजे । भाग्यकाळीं मित्रास [4]माजे । उपदेश घेउनी गुरुसी लाजे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७४ ॥ कृपणपणें हेम [5]सांची । उदारपणें कांहींच न [6]वेंची । [7]हा विचारू नेणे आपणची । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७५ ॥ ब्रह्म ईश्वर भविष्यार्थु । [8]जाणोनि म्हणे सुवर्ण धातु । त्याचिया वचनीं विश्वासितु । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७६ ॥ प्रपंचकृत्या लगबग करी । [9]धर्मकृत्या लगबग न करी । न्यायें बोले तयातें वारी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ७७ ॥ [10]इहलोक परलोक जोडणें । तेथ [11]कपर्दिक न वेंची म्हणे । [12]अकीर्ति अंगें करी जीवें प्राणें । सर्व वेंची तो मूर्ख. ॥ ७८ ॥ [13]सांप्रदायमताभिमानी । श्रेष्ठ [14]अश्रेष्ठ मानी [15]मनीं । अयोग्य योग्यत्वें [16]पूजणें । तो एक मूर्ख. ॥ ७९ ॥ केलें पाप हें झांकिलें[17] । [18]या न्यायें तें संपादेल । विष भक्षिलें तें जिरेल । [19]अंगीं मानी तो मूर्ख. ॥ ८० ॥ अविश्वासिया अतिविश्वास । विश्वासस्थळीं अति अविश्वास । [20]स्वहितकर्ता त्यासी अविश्वास । तो एक मूर्ख

---

हें योगाच्या आठ अंगांपैकीं एक. योगाचीं आठ अंगें आहेत तीं:—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा आणि समाधि. २४. मुद्दाम, हट्टानें, जाणूनबुजून.

१. बुद्धि. २. मुक्तेश्वराच्या वेळीं प्रवास करणें फार धोक्याचें होतें म्हणून तरुणपणीं प्रवास करणाऱ्यास त्यानें मूर्खांच्या माळिकेंत गोंविलें आहे. परंतु आजकाल इंग्लंड वगैरे युरोपांतील देशांत विद्यार्थ्यांचें अध्ययन संपतांच, संसारांत पडण्यापूर्वीं, त्यांच्याकडून प्रवास करविण्याची चाल पडली आहे. ३. समर्थाचा आश्रय प्राप्त झाला असून लोकांवर उपकार न करणारा. 'आज्ञा कीर्तिः पालनं ब्राह्मणानां दानं भोगो मित्रसंरक्षणं च । येषामेते षड्गुणा न प्रवृत्ताः कोऽर्थस्तेषां पार्थिवोपाश्रयेण ॥'. [भर्तृहरि—नीतिशतक ४८]. ४. उन्मत्त होई, अवमान करी. ५. सांठवी, जमवी. ६. खर्च करी. ७. 'हा विचार न करी मन ज्याचें' असाही पाठ आहे. ८. 'जाणोनि म्हणे मिथ्या उद्धत' असा अन्य पाठ आहे. ९. 'धर्मकृत्या विलंबें वारी । न्याय बोलतयातें सारी' असाही पाठभेद आढळतो. १०. 'इह परत्र जोडे जेणें' असाही पाठ आहे. ११. कवडी. १२. 'कुमार्गीं वेंची जीवें प्राणें । तो एक मूर्ख जाणावा' असाही पाठ आढळतो. १३. आपल्या सांप्रदायाच्या (पंथाच्या) मतांविषयीं अभिमान बाळगणारा. 'शुद्ध सांप्रदाय' असाही पाठ आहे. १४. अश्रेष्ठ (नीचाला) श्रेष्ठ (थोर, वंद्य) मानी—असा अन्वय. १५. 'वंद्य तें निंद्य मानी मनें' असाही पाठ आहे. १६. अयोग्य मनुष्याला योग्य मनुष्याप्रमाणें मान देणें. 'पुसणें' असाही पाठ आहे. १७. 'आच्छादेल' असाही पाठ आहे. १८. 'अन्याय तो संपादेल' असा अन्य पाठ आढळतो. १९. 'म्हणे तो एक मूर्ख' असाही पाठ आहे. २०. 'स्वहितकर्त्यांशीं उदास' असाही पाठ आहे.

जाणावा. ॥ ८१ ॥ सभेमाजी खेळवी बाळ । स्त्रियेशीं कटकट करी सर्व काळ । आळसनिद्राकुसंगीं[1] सारा वेळ । क्रमी तो एक मूर्ख. ॥ ८२ ॥ साली[2] अथवा मेहुणी[3] । रूपवंत कुशल तरुणी । स्त्रियेच्या बाळंतपणा आणी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८३ ॥ ब्रह्मद्वेषी[4] वेदआज्ञा लोपी । कर्मभ्रंशी वेदविकल्पी[5] । भोगीं लोलुपता[6] आसक्ति । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८४ ॥ खाटीक तस्कर[7] मत्स्यविक्रेता । यांसि द्रव्य व्यवहारिता[8] । परांगनेशीं[9] मैत्री कर्ता । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८५ ॥ गृहदासीसी[10] दे हात । पलांडु[11] सेवी श्रोत्रियांत[12] । अविंधी[13] राहाटी श्रेष्ठांत । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८६ ॥ बाळविधवा वरी घरीं राहत[14] । नपुंसकाहातें पढवी[15] सुत । शूद्राहातीं अभ्यास[16] करवीत । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८७ ॥ बहुत काम बहुत कोप । बहुत निद्रा बहुत जल्प[17] । बहु आहार बहुत विकल्प[18] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८८ ॥ उत्तर[19] वयीं करी लग्न । जीविकेवीण[20] बांधे सदन । प्राणत्यागीं न वेंची धन । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८९ ॥ बोल बोलुनी सांडी । मध्येंच व्रतनेम खंडी[21] । स्वदत्त परदत्त विखंडी[22] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९० ॥ अनुचित[23] कर्मारंभ करी । स्वजनासी विरोधें[24] करी । स्त्री-

---

१. कुसंग=वाईट लोकांची संगत, दुर्जनांची संगत. २. साली=साल्याची बायको (साला=बायकोचा भाऊ). ३. मेहुणी=बायकोची बहीण. 'कमनीय रूप मेहुणी । सभाग्य आणि तरुणी' असाही पाठ आहे. ४. ब्राह्मणांचा द्वेष करणारा. ५. 'कर्मभ्रष्ट अतिविकल्पी' असाही पाठ आहे. ६. लोलुपता=लोभ 'भोगी लोल्यंग वागजल्पी' असाही पाठ आहे. ७. तस्कर=चोर. आमच्या जवळील पोथींत ही ओंवी अशी आढळते:—'हिंसक तस्कर मद्यविक्रित । तयाशीं व्यवहार करीत । पण्यांगनेसीं प्रीति धरीत । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ८५ ॥.' ८. व्यवहार करणारा. ९. परस्त्रीशीं, दुसऱ्याच्या बायकोशीं. १०. 'गृहदासीस घाली हात । पलांडु सेवी पिशितांत । अविहित आचरणीं तृप्त । तो एक मूर्ख जाणावा ॥' असा ह्या ओंवीचा अन्य पाठ आढळतो. पिशित=मांस. ११. कांदा. १२. श्रोत्रिय=वेदशास्त्रज्ञ. १३. अविंधी राहाटी=म्लेंच्छासारखी वागणूक. १४. 'बाळविधवेशीं घरवात' असाही पाठ आहे. घरवात=हा संस्कृतांतील 'गृहवार्ता' ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा असें वाटतें. गृहवार्ता=प्रपंच. १५. 'नपुंसकापाशीं पाठवी' असाही पाठ आहे. १६. 'अभ्यासित' असाही पाठ आहे. १७. बडबड. १८. विकल्प=संशय. १९. उतारवयांत. हा चरण विशेष लक्षांत घेण्यासारखा आहे. 'उत्तर काळीं' असाही पाठ आहे. २०. जीविका=उपजीविकेचें साधन नसतां. २१. 'अन्यायीं उभारी दिंडी' असाही पाठ आहे. २२. तोडी, बंद करी. २३. 'अनुचितकर्मारंभः स्वजनविरोधो बलीयसि स्पर्धा' इत्यादि सुभाषित प्रसिद्धच आहे. २४. 'विरोधाचारी' असाही पाठ आहे.

जेनासी[1] विश्वास धरी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९१ ॥ आपण नेणे[2] शिकविलें न करी । विद्याधनावीण अहंकारी । जैनीं[3] बळें पाखांड[4] करी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९२ ॥ जेठियांशीं[5] झोंबी घेणें । व्युत्पन्नाशीं[6] वाद सांगणें । धन्वंतरीशीं[7] होडं[8] बांधणें । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९३ ॥ झोंपीं जाय घोड्यावरी । ओडसांगडीं[9] निघे पूरीं । रोगपरीक्षेवीण औषध करी । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९४ ॥ राजगृहीं पैशून्य[10] बोले । परनाश देखूनि हरिखें[11] डोले । स्तुति[12] ऐके तंव तंव खुले । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९५ ॥ विजया[13] भक्षुनि लावी ध्यान[14] । ममता[15] अंगीं आणि कथी ज्ञान । बोले एक करी आन[16] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९६ ॥ सापत्नमाता कन्या भगिनी । स्नुषा[17] दासी परस्त्री तरुणी । एकटगृहीं एक शयनीं । समीप धांवे तो एक मूर्ख[18]. ॥ ९७ ॥ भाग्यें माजे दरिद्रें शिजे[19] । परकीर्ति ऐकूनि मत्सर भजे[20] । निंदितयातें निवेद नेवाजे[21] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९८ ॥ गर्व[22] करी संतभजनीं । विश्वासुनी महंतसंतवचनीं । दोषारोपी साधूचिये गुणीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ९९ ॥ निंदूनि स्वहितधर्मा[23] । स्तवी अविहित परधर्मा । तोचि[24] आचरे परधर्मा । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १०० ॥ विलंबे धन प्राप्त संकटीं । त्याची दुराशा धरूनि पोटीं । प्रयत्नालागीं होय हिंपुटी[25] । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १०१ ॥ उपजोनियां संसारीं ।

---

१. मागें ओंवी २६ पहा. 'योषितांचा' असाही पाठ आहे. २. आपणाला कांहीं समजत नाहीं आणि दुसऱ्यानें शिकविल्याप्रमाणें करावयाचें नाहीं. ३. 'पंडितेसीं' असाही पाठ आढळतो. ४. वितंडवाद. ५. बळवंतांसीं. ६. ज्ञात्याजवळ, पंडितापाशीं. ७. वैद्य. ८. पैज. ९. सांगडीवांचून. सांगड=पाण्यांतून पोंहून जाण्याकरितां सुकलेल्या भोंपळ्याची करितात ती. १०. चाहाडी. ११. आनंदानें. १२. 'स्वशक्ति ऐसें मित दर (?) बोले' असाही पाठ आहे. १३. भांग. 'बीजा' असाही पाठ आहे. १४. 'ज्ञान' असाही पाठ आहे. १५. 'बोल आणि करणें वीण' असाही पाठ आढळतो. १६. अन्य, भलतेंच, दुसरें. १७. सून. १८. ह्या ओंवीपुढें आमच्या जवळील पोथींत पुढील ओवी आढळते:—'स्वगुणदोष जाणणें । परदोष न देखणें । हेंचि चातुर्य ऐसें नेणणें । तो एक मूर्ख जाणावा.॥' १९. संतापे. 'क्षिजे' असाही पाठ आहे. २०. मत्सर करी. 'परकीर्ति ऐकूनी उभजे' असाही पाठ आहे. उभजे=त्रासतो, मत्सर करितो. ['उभजे' हा शब्द ज्ञानेश्वरींत आढळतो. अध्याय १४ ओंवी ३२९ पहा.] २१. नवाजे=स्तुति करी. या ठिकाणीं 'निर्वेध नवाजे' असा पाठ असेल काय? २२. या ओंवीचा अन्यपाठ असा आहे:—'गर्व करीत साधुभजनीं । विश्वास न मानी वेदवचनीं । दोषारोपं विद्वज्जनीं । तो एक मूर्ख जाणावा ॥.' २३. 'विहित स्वधर्मा' असाही पाठ आहे. २४. 'तेंचि आचरे तो अधम' असाही पाठ आहे. २५. दुःखी, कष्टी.

आयुष्य वेंची विषयावरी[1] । आत्मप्राप्ति[2] नव्हे पुरी । हें नेणे तो मूर्ख. ॥ १०२ ॥ आत्मप्राप्तीचें साधन । एक मनोनिग्रह[3] हाचि जाण । यासि वैराग्य[4] मुख्य कारण । हेंचि नेणें तो मूर्ख. ॥ १०३ ॥ हरिहर[5]नामापरतें आन । नाहीं प्रायश्चित्त[6] गहन[7] । हें विश्वासें न मनी ज्याचें मन । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १०४ ॥ काशी[8] मरणें विष्णुस्मरणें । मोक्षप्राप्ती वेदवचनें । यातें अर्थवाद[9] म्हणे । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १०५ ॥ सर्वभूतीं भगवंत परिपूर्ण । सर्व[10] दया हें ज्ञानभूषण । हें विश्वास[11] न मनी जयाचें मन । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १०६ ॥ संन्यासी[12] आणि सालंबी[13] । गृहस्थ आणि निरालंबी[14] । सत्यशील आणि[15] दंभी । हे तिघे मूर्ख जाणावे. ॥ १०७ ॥ पुण्य बंधु पाप वैरी । लोभ तो क्षयरोग

---

१. 'विषयाचारीं' असाही पाठ आहे. २. 'आत्मप्राप्ती न साधी पुरी । तो एक मूर्ख जाणावा ॥' असाही पाठ आहे. ३. मनास ताब्यांत ठेवणें. आत्मप्राप्ति होण्याला मनोनिग्रह आणि वैराग्य हींच मुख्य साधनें आहेत. परंतु मनोनिग्रह करणें फार कठिण आहे, कारण मन फार चंचल आहे, व त्याचें आकलन करणें वायूप्रमाणें दुष्कर आहे. 'पंचदशी' नामक ग्रंथांत सांगितलें आहे:—'अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि । अपि वन्ह्यशनात्साधो विषयश्चित्तनिग्रहः ॥' [तृप्तिदीप, सप्तम प्रकरण श्लोक १२१] याचा भावार्थः—समुद्राचें पान करवेल, मेरूपर्वत उलंघितां येईल, विस्तव खातां येईल, पण या सर्वांहून चित्तनिग्रह (मनोनिग्रह) करणें फार कठीण आहे. ४. उदासीनपणा, संसाराच्या ठिकाणीं आसक्ति नसणें. ५. विष्णु आणि शिव यांच्या नामाशिवाय दुसरें. ईश्वराच्या नुसत्या नामस्मरणानेंच सर्व पातकें जळून भस्म होतात—असा भाव. नामाचें माहात्म्य केवढें आहे तें पहाः—'नामें समस्त दुरितें हरिती क्षणानें, नामें महाभय हरे बरवेपणानें । नामीं असे अजि असा महिमा स्वभावें, यालागिं नामगुणकीर्तन नित्य गावें. ॥' [आनंदतनय—काव्यसंग्रहग्रंथमाला—गणिकोद्धार—पृ० ५५ पहा.] नामाचें माहात्म्य केवढें आहे व नामस्मरणानें अजामिलपिंगलादि महापातकी जनांचा उद्धार कसा झाला हें जाणण्याची इच्छा असल्यास मोरोपंतकृत 'नाममाहात्म्य' व वामनपंडितकृत 'नामसुधा' हीं प्रकरणें पाहावीं. ६. पापक्षालनार्थ जो विधि करितात तो. ७. दुष्कर, कठीण. ८. काशीक्षेत्रांत. [आदिपर्व—अध्याय ५ ओवी ४३ पहा.] ९. 'अर्थ दुजे' असाही पाठ आहे. १०. सर्वांवर दया करणें हें ज्ञानाचें भूषण आहे. ११. 'वर्म' असाही पाठ आहे. १२. ज्यानें काम्यकर्माचा त्याग केला आहे असा पुरुष. संन्यासी कोणाला म्हणावें हें प्रसिद्ध रामदासपंचायतनांतील साधु केशवस्वामी यांनीं आपल्या एका पदांत सविस्तरपणें सांगितलें आहे तें इष्ट तर पाहावें. [काव्यसंग्रहग्रंथमाला—पदसंग्रह भाग १, पद ३४५, पृष्ठ १४८ पहा.] १३. साश्रय, आसक्त. १४. निराश्रय, विरक्त. १५. येथें 'आणि' या शब्दाचा अर्थ 'असून' असा समजावा.

शरीरीं । आपदीं धैर्यचि [1]साहकारी । हें नेणे तो एक मूर्ख. ॥ १०८ ॥ दरिद्री तपातें नाचरे । धनिक [2]अदाता निर्धारें । हे दोघे [3]मूर्खचि [4]महाधुरे । हे महा मूर्ख जाणावे. ॥ १०९ ॥ झालिया विश्वेश्वरकृपा । [5]हें मत न बांधी या [6]संकल्पा । धरुनी आचरे जो पापा । तो एक मूर्ख जाणावा. ॥ ११० ॥ बहु [7]याचक [8]राज्यधर । यांसीं करूनि उचित [9]पाचार । प्रसन्न करूं म्हणे जो नर । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १११ ॥ [10]देहीं अहंकार गळाला । [11]भूतीं मत्सरु नाहीं [12]झाला । तो आत्मानुभवें भला । हेंचि जो नेणे तो [13]मूर्ख. ॥ ११२ ॥ एकशत बारोत्तरें । ओंव्या लिहिल्या मुक्तेश्वरें । हें परिसोनियां चतुरें । मूर्खलक्षणें [14]सांडावीं. ॥ ११३ ॥

---

१. साह्यकर्ता, साहाय्य कराणारा. २. दानधर्म न करणारा. 'कृपण' असाही पाठ आहे. ३. 'गुरुशी न भजे अव्यभिचारें' असाही पाठ आहे. ४. महाधुरे=महाश्रेष्ठ. ५. हें मत न बांधी= अमुक मताप्रमाणें मी वागलोंच पाहिजे, असा बांधला गेलों नाहीं. ६. 'झालिया ईश्वराची कृपा । हे मज न बाधी' असाही पाठ आहे. ७. भिक्षुक, याचना करणारे. ८. राजे. ९. आमंत्रण. १०. आमच्या जवळील पोथींत ही ओंवी अशी आढळते:—'देहीं विदेहत्व पावला । भूतीं भेदाभेद गळाला । तो आत्मा अनुभविला । त्यातें नेणे तो एक मूर्ख जाणिजे॥.' ११. प्राणिमात्राच्या ठिकाणीं. १२. नाहीं झाला=नाहींसा झाला. १३. ह्या ओंवीनंतर आमच्या जवळील पोथींत पुढील ओंव्या आहेत:—'बहुतां जन्मांच्या अंतीं । नरदेहनिधानप्राप्ति । तें वेंचिलें विषयभ्रांतीं । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १०९ ॥ स्ववर्णाश्रमीं स्वधर्मे । वेदविहित सत्कर्मे । निस्पृह निरहंकृति वर्मे । नेणें तो एक मूर्ख जाणावा. ॥ ११० ॥ ब्रह्मार्पणबुद्धी हरिगुरुभजनें । वयव्यय करावा आत्मज्ञानें । हें न मानिजे ज्याचिये मनें । तो एक मूर्ख जाणावा. ॥ १११ ॥.' 'काव्येतिहाससंग्रहां'तील छापील प्रतींतील ओंव्या ५, २५ व ६९ ह्या आमच्याजवळील पोथींत नाहींत. त्या ओंव्या गाळून वर दिलेल्या ओंव्या धरल्या तर मुक्तेश्वरानें सांगितल्याप्रमाणें ११२ ओंव्याची भरती होते. परंतु त्यांपैकीं मुक्तेश्वराच्या ओंव्या कोणत्या आणि प्रक्षिप्त ओंव्या कोणत्या हा एक मोठा महत्वाचा व विचारणीय प्रश्न आहे. १४. टाकावीं, सोडावीं. 'सोडणें' 'टाकणें' या अर्थी 'सांडणें' ह्या क्रियापदाचा उपयोग मुक्तेश्वरानें आपल्या कवितेंत पुष्कळ ठिकाणीं केला आहे:—(१) पांडव एकटे वनवासीं । रात्रीं मारूनी सांडावे. ॥ [वनपर्व—अध्याय १ ओंवी ११०], (२) माझे पितामह पांडव । सांडोनि राज्यसंपदा सर्व । वना गेलिया महानुभाव । काय कैसें वर्तलें? ॥ [वनपर्व—अध्याय १—ओंवी २]. सध्याच्या आपल्या भाषेंत 'सांडणें' याचा अर्थ 'हरवणें' 'गमावणें' 'न सांपडणें' असा होतो.

# २. भगवद्गीता.

(ओव्या).

## कर्मकांड.

## अध्याय पहिला.

धृतराष्ट्र म्हणे, 'संजया! । धर्मक्षेत्र कुरुक्षेत्राच्या ठायां । कौरव पांडव मिळोनियां । तेथें काय करिताती?' ॥ १ ॥ संजय म्हणे रायासी, । 'पांडवसैन्य पैरियेसी, । राजा सांगे द्रोणापाशीं । तयाजवळी येऊनी. ॥ २ ॥ 'आचार्या! पांडवसैन्य पाहें । द्रुपदपुत्रें रचना केली आहे । तुझाच शिष्य होय । बुद्धिबळें अधीक. ॥ ३ ॥ पांडवसेनेंत वीर जाण । युद्ध करणार भीमार्जुन । यांसम विराट युयुधान । द्रुपद ऐसे महारथी. ॥ ४ ॥ धृष्टकेतु

---

१. भीष्मपर्वांत 'भगवद्गीतापर्व' म्हणून एक पोटपर्व आहे. भगवंतांनीं सकलशास्त्रमथितार्थरूप जो बोध अर्जुनाला केला तो व्यासांनीं सदरहू पोटपर्वाच्या १८ व्या अध्यायांत समाविष्ट केला आहे व त्या प्रकरणाला **श्रीमद्भगवद्गीता** अशी संज्ञा आहे. श्रीमद्भगवद्गीताग्रंथांतील प्रमुख सिद्धांतांचें वर्णन कै. वा. रा. भि. गुंजीकर यांच्या 'सुबोधचंद्रिका' नामक मराठी टीकेच्या प्रस्तावनेंत दिलें आहे [सुबोधचंद्रिका–पंचमावृत्ति–पृष्ठें ७-१०] तें इष्ट तर पाहावें. तसेंच ज्यांस वेळ आणि द्रव्य यांची अनुकूलता असेल त्यांनीं प्रो० भानु यांची 'श्रीमद्भगवद्गीता' अवश्य पाहावी अशी शिफारस आहे. २. धृतराष्ट्राची समरवृत्तश्रवणेच्छा जाणून व्यासांनीं संजयास वर दिला कीं 'तुला गुप्तागुप्त वृत्त, दिवसा अथवा रात्रीं घडलेली हकिकत, दुसऱ्याच्या मनांत आलेली गोष्ट, या सर्वांचें ज्ञान प्राप्त होईल. तसेंच तुला शस्त्रें छिन्नभिन्न करणार नाहींत, व श्रमाची बाधा होणार नाहीं. तूं या युद्धापासून जीवास अपाय न होतां मुक्त होशील.' [भीष्मपर्व–अध्याय २ श्लोक ८-२१ पहा]. तसेंच व्यासांच्या प्रसादानें यास दिव्यज्ञान, अतींद्रियदृष्टि, दुरून श्रवणशक्ति, भूतभविष्याचें ज्ञान, आकाशाच्या ठायीं गति, युद्धांत अंगाला शस्त्रांचा अस्पर्श ह्या सर्व विद्या प्राप्त झाल्या होत्या. [भीष्मपर्व–अध्याय १५ श्लोक ७-९ पहा]. ह्या वराच्या योगानें संजयास भारती युद्धाचा वृत्तांत धृतराष्ट्रास सांगतां आला. प्रस्तुत 'गीता' वृत्तांतही संजयच धृतराष्ट्रास निवेदन करीत आहे. ३. कुरुक्षेत्र हें दिल्लीजवळ यमुना व सरस्वती या दोन नद्यांच्या मध्यें कोठें तरी असावें असा अजमास आहे. याच क्षेत्राला 'स्यमंतपंचक' असेंही म्हणत असत. [विशेष माहितीकरितां मुक्तेश्वर–वनपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० १२ टीप ६ पहा]. ४. धृतराष्ट्रास. ५. ऐक. ६. दुर्योधन. ७. धृष्टद्युम्नानें. ८. 'तुझाच शिष्य बुद्धिबळें अधिक होय' असें द्रोणाचार्यांस सांगण्यांत दुर्योधनाचा काय हेतू असेल तो नकळे, पण 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' या न्यायानें आचार्यांस मात्र खरोखर आनंदाश्रु आले असतील! ९. महारथ अथवा महारथी कोणास म्हणावें हें पुढील श्लोकांत सांगितलें आहे:—'एकादशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् । शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः ॥' म्हणजे:–दहाहजार धनुर्धाऱ्यांबरोबर एकदम युद्ध करणारा व धनुर्विद्येंत प्रवीण असणारा त्यास 'महारथ' म्हणतात.

**चे**कितान । **का**शीराज **वी**र्यवान । **पु**रुजित् [1]अतितीक्ष्ण । **कौं**ति **शै**ब्य [2]नराधिप. ॥ ५ ॥ **यु**धामन्यु पराक्रमी बहुत । **उ**त्तमौजा [3]वीर्यवंत । [4]**सौ**भद्रेय आणि **द्रौ**पदीचे सुत । हे सर्वही महारथी. ॥ ६ ॥ आम्हांमध्यें जे [5]विशिष्टा । ते तूं ऐक गा! [6]द्विजश्रेष्ठा! । माझिया सैन्यांत [7]सुभटा । ते तुजलागीं सांगतों. ॥ ७ ॥ तूं आणि **भी**ष्म **क**र्ण । **कृ**पाचार्य नीतिसंपूर्ण । **अ**श्वत्थामा **वि**कर्ण । **सो**मदत्ती ऐसे हे. ॥ ८ ॥ आणीक ही बहुत वीर । [8]माझ्यानिमित्तें मरणार । [9]नाना शस्त्रांचे प्रेरणार । सकल कुशल युद्धासी. ॥ ९ ॥ आमुची सेना असे [10]गांढी । **भी**ष्म रक्षिताहे [11]प्रौढी । त्यांची सेना बलहीन थोडी । **भीम** राखी बलानें. ॥ १० ॥ ठायीं ठायीं रणभूमीसी । जतन करावें **भी**ष्मासी । तो तुम्हां समस्तांसी । रक्षील जाणा [12]प्रतापें.' ॥ ११ ॥ वडील **भी**ष्म प्रतापिया । **दु**र्योधना हर्ष उपजावया । [13]सिंहनाद करूनियां । प्रतापें [13]शंख वाजवी. ॥ १२ ॥ मग शंख आणि भेरी । [14]पणवानकें घेऊनि करीं । [15]गोमुखादि गर्जिलीं [16]एकसरीं । थोर नाद जाहला. ॥ १३ ॥ श्वेतवर्ण घोडे महारथीं । [17]वरी **पां**डव **श्री**पती । दिव्य शंख घेऊनि हातीं । वाजवीते जाहले. ॥ १४ ॥ [18]**पां**चजन्य घेतला **कृ**ष्णें, । **दे**[19]वदत्त तो वीर **अ**र्जुनें, । **भीम** [20]वृकोदर तेणें । **पौं**ड्रशंख वाजविला. ॥ १५ ॥ **अ**नंतविजय गजरें । वाजविला **यु**धिष्ठिरें । **न**कुलें **स**हदेववीरें । [21]**म**णिपुष्पक वाजवीले. ॥ १६ ॥ **का**शीराज धनुर्धर ।

---

१. अति चलाख. २. नरपति, नरश्रेष्ठ. ३. पराक्रमी, बळवान्. ४. सुभद्रासुत (अभिमन्यु). ५. मोठमोठे, नांव घेण्यासारखे. ६. द्रोणाचार्या! ७. उत्तम योद्धे. भट=योद्धे. ८. माझ्याकरितां मरावयास तयार असे, माझ्या जीवास जीव देणारे. 'माझ्यानिमित्तें मरणार' हा शब्दसमूह लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. ९. 'नाना शस्त्रां हाणणार' असा पाठ **ना**दलेकरांच्या प्रतींत आहे. १०. बळवान्, मोठी. ११. बळानें, पराक्रमानें. १२. ह्या ओंवीचें उत्तरार्ध **मु**क्तेश्वराच्या पदरचेंच आहे. ह्यास मुळांत आधार नाहीं. १३. सिंहनाद (मोठी गर्जना) करणें आणि शंख वाजविणें ह्या प्राचीन युद्धांतील चाली होत. 'प्रतापी शंख' असा अन्यपाठ. १४. पणव+आनक=झांज+मृदुंग, मृदंग. १५. शिंगें वगैरे. १६. एकदम. १७. त्या रथावर. १८. पांचजन्य–पंचजननामक दैत्यापासून कृष्णास हा शंख मिळाला यावरून या शंखास हें नांव पडलें. हा शंख सदरहू दैत्याच्या अस्थींपासून निर्माण केला होता–अशी कथा आहे. १९. देवानें (इंद्रानें) दिलेला तो देवदत्त. या स्थळीं देव या शब्दानें इंद्रदेवाचें ग्रहण केलें पाहिजे. अर्जुनानें एका प्रसंगीं दानवयुद्धांत इंद्रास साहाय्य केलें तेव्हां इंद्रानें प्रसन्न होऊन हा शंख अर्जुनास दिला. [महाभारत–वनपर्व–अध्याय १६८ श्लोक ८४-८५ पहा]. २०. वृक (लांडग्यासारखें) ज्याचें उदर (पोट) तो, खादाड व पुष्कळ अन्न पचविणारा भीम. २१. 'सुघोष मणिपुष्पक' असा पाठ येथें असावयास पाहिजे होता. नकुळाच्या शंखाचें नांव सुघोष आणि सहदेवाच्या शंखाचें नांव मणिपुष्पक.

शिखंडी महारथी वीर । धृष्टद्युम्न विराट थोर । सात्यकी अपराजित[1]. ॥ १७ ॥ द्रुपद आणि द्रौपदीसुत[2] । सुभद्रापुत्र विख्यात । हेही मिळोनी समस्त । वेगळाले[3] शंख वाजवीले. ॥ १८ ॥ तया नादाचेनि गजरें । दुमदुमलीं पाताळशिखरें[4] । दुर्योधनासि दुःखानळ भरे । हृदय फुटे खेदानें. ॥ १९ ॥ सिद्ध झाले दळभार[5] । ते अवसरीं कपिध्वजवीर[6] । देखोनि शस्त्र[7] बडिवार । धनुष्य घे हातीं वहिलें. ॥ २० ॥ अगा राया[8] भूपती! । अर्जुन बोले अच्युताप्रती, । 'दों सैन्यांत निगुती[9] । रथ माझा नेइजे. ॥ २१ ॥ मी पाहेन सर्वांशी । युद्धउत्कंठा[10] कवणाशी । ममहातें[11] कां मारविशी । या रणामध्यें केशवा! ॥ २२ ॥ दुर्बुद्धि कौरवपती । ईष्ट[12] इच्छूं आले भूपती । कोण कोण ते निगुती । पाहेन दृष्टीं रणीं मीं.' ॥ २३ ॥ अगा! ये धृतराष्ट्रराया[13]! । ऐसें अर्जुन बोलोनियां । कृष्णें रथ नेऊनियां । दों सैन्यांत स्थापिला. ॥ २४ ॥ भीष्म मुख्य करूनि । पृथ्वीचे राजे मिळोनी । कौरव मिळाले देखोनी । अर्जुन पाहे तयांतें. ॥ २५ ॥ पार्थ सकळही देखे । पितृव्य[14] पितामह[15] विशेषें । आचार्य भ्रातृपुत्र अनेक । पुत्र सखे अवघेची. ॥ २६ ॥ श्वशुर सोयरे दों सैन्यीं । बंधुवर्गातें जाणोनी । कृपा उपजली मनीं । कौंतेय बोलों लागला. ॥ २७ ॥ 'पाहें परम कृपेंकरून । विषाद[16] पावलेंसें मन । युद्ध करूं इच्छिती स्वजन । पाहें पां श्रीकृष्णदेवा! ॥ २८ ॥ दुःख होतसे गात्रांसी । मुख शोषतें हृषीकेशी! । कंप रोमांच अंगासी । अशी स्थिती जाहली. ॥ २९ ॥ धनुष्य पडे हातींहून । त्वचा[17] जळे संतापान । भ्रमतसे माझें मन । उभें राहूं[18] शकेना. ॥ ३० ॥ आपले स्वजन म्यां मारुनी । मज सुख व्हावें, नुपजे[19] मनीं; । विपरीत चिन्हें[20] दिसती नयनीं । केशवराया!

---

१. ज्याचा पराजय झाला नाहीं असा, विजयशाली. २. द्रौपदीच्या मुलांचीं नांवें:—'प्रतिविंध्यः सुतसोमः श्रुतकीर्तिस्तथापरः । नाकुलिस्तु शतानीकः श्रुतसेनश्च वीर्यवान् ॥' [आदिपर्व—अध्याय ६७ श्लोक २८]. ३. प्रत्येक वीराच्या शंखास व धनुष्यास निरनिराळें नांव होतें असें दिसतें. ४. आकाशपाताळ. येथें चमत्कृतिजनक विरोधाभास आहे. पाताळ=खालीं. शिखर=वर. ५. सैन्य. ६. कपि (मारुति) आहे ध्वजावर ज्याच्या असा (अर्जुन). ७. 'शस्त्रभडिभार' असा पाठभेद आहे. ८. धृतराष्ट्र. ९. निभ्रांतपणें. १०. युद्धाविषयीं उत्सुकता. ११. माझ्या हातानें, माझ्याकडून. 'मज हातें' असें पाठांतर. १२. आवडणारें, हितकारक. १३. हें संजयाचें धृतराष्ट्राप्रत भाषण आहे. १४. चुलते, काका. १५. आजोबा. १६. खेद, पश्चात्ताप. १७. अंगाची कातडी. १८. 'मी उभा राहूं शकेना' असा पाठ असावयास पाहिजे होता. मूळांत 'न च शक्नोम्यवस्थातुम्' असें आहे. १९. [अशी इच्छा] उत्पन्न होत नाहीं. 'नुमजे' असा अन्यपाठ. २०. शकुन.

पैं मज. ॥ ३१ ॥ कृष्णा! विजयाची चाड[1] नाहीं। राज्यसुखाची गोडी नाहीं। राज्यभोग सकळही। नलगे मज स्वामिया! ॥ ३२ ॥ ज्यांकारणें[2] भोग बहुत। आपण होतों जी! इच्छित। प्राणधन[3] टाकूनि समस्त। युद्धा आले सर्वेही. ॥ ३३ ॥ पितृपुत्रपक्षींचे[4]। वडील भीष्म आमुचे। द्रोण गुरू बोलिजे वाचे। मामे मेहुणे अवघेची. ॥ ३४ ॥ हे मज मारिती जरी। परी मीं न यांतें मारीं। त्रैलोक्यराज्य झालें जरी। पृथ्वीचा कोण कैंवा[5]? ॥ ३५ ॥ धृतराष्ट्रपुत्र मारुनी। सुख न वाटे माझे मनीं। शस्त्रें मारितां पाप जाऊनि। हें[6] केंवी घडे? श्रीहरी! ॥ ३६ ॥ म्हणोनियां नारायणा!। न मारीं बंधूंतें जाणा। यांचिया आपण वधूनि प्राणा। सुख कैंचें मज? माधवा! ॥ ३७ ॥ जया वंशीं कुळक्षय जाहला। तयाचा कुळाचार बुडाला। हा विचार त्यांहीं सोडिला। मित्रद्रोहेंच पातक. ॥ ३८ ॥ पापापासाव[7] परतिजे[8]। ऐसें आम्हीं काय नेणिजे?। कुलक्षय करितां दोष आणिजे। ऐसें आहे केशवा! ॥ ३९ ॥ ज्या वंशीं कुळक्षय झाला। त्याचा कुळधर्म[9] बुडाला। धर्म गेलियावरी कुळा। पाप अवश्य होतसे. ॥ ४० ॥ कृष्णा! अधर्म झालियावरी। दुष्ट[10] होती कुळाच्या नारी[11]। अधर्म चाललियावरी। वर्णसंकर[12] होतसे. ॥ ४१ ॥ वर्णसंकर झालियावरी। कुळ बुडे पैं अघोरीं[13]। पिंडोदकक्रिया[14] अवधारीं। नाहीं करावयासी. ॥ ४२ ॥ म्हणोनि कुलघ्नांचे[15] दोष थोर। तेणें होय वर्णसंकर। बुडे कुळधर्म आचार। जातिधर्म तेही. ॥ ४३ ॥ अधर्म झालियावरी। नरकीं वास अघोरीं। हे आयकें श्रीहरी!। स्वामी जनार्दना[16]! ॥ ४४ ॥

---

१. गोडी, आवड. २. ज्यांच्याकरितां. ३. प्राणरूपी धन. ४. पितृव्यपुत्रपक्षींचे, कौरवांच्या पक्षाचे. कौरव हे पांडवांचे चुलतभाऊ होत. ५. कथा, पाड, पर्वा. ६. सुख. ७. पापापासून. ८. परतावें, मागें सरावें. ९. कुळाचार, मूळ पुरुषापासून चालत आलेले कुळाचे धर्म. १०. अधर्म करणाऱ्या, व्यभिचारी. ११. स्त्रिया. १२. जातीची भेसळ, कालवाकालवी. मनु म्हणतो:—'व्यभिचारेण वर्णानामवेद्यावेदनेन च। स्वकर्मणां च त्यागेन जायंते वर्णसंकराः ॥' [मनुस्मृति—अध्याय १० श्लोक २४] याचा अर्थ:—ब्राह्मणादि वर्णामध्यें व्यभिचार (अन्योन्य स्त्रीगमन) करणें, विवाहसंबंधाला जो अयोग्य त्याच्याशीं विवाहसंबंध करणें, स्वकर्माचा त्याग करणें, यांहीं करून वर्णसंकर होतो. १३. अघोर नरकांत. १४. मेलेल्या पितरांचें श्राद्ध करणें, तर्पण करणें, पिंडदान करणें ह्या क्रिया. पिंडोदकादिक्रिया लुप्त झाल्या असतां पूर्वज नरकांत पडतात असें वर्णन अन्यत्रही आढळतें. १५. कुलक्षय करणाऱ्यांचे. १६. पापी पुरुषांस दंड करणाऱ्या व शत्रूंस त्रास देणाऱ्या कृष्णा! कुलक्षय झाला असतां मोठी अनर्थपरंपरा उद्भवते, असें श्लोक ४०-४४ या पांच श्लोकांत वर्णिलें आहे.

हें तंव आश्चर्य थोर । राज्यलोभें दोषकर । स्वजन मारूनि सुखकर । इच्छितों जी श्रीकृष्णा ! ॥ ४५ ॥ जरी निःशस्त्र मी [3]उगला । रणीं मारो कोणी मला । मी न मारीं धार्तराष्ट्रांला । हो कां मज हें क्षेमें.' ॥ ४६ ॥ संजय म्हणे, 'राया ! । ऐसें अर्जुन बोलोनियां । धनुष्यबाण टाकोनियां । दुःखें बैसला असे.' ॥ ४७ ॥

---

## अध्याय दुसरा.

संजय म्हणे धृतराष्ट्रातें । अर्जुन वेष्टिला मोहें बहुतें । अश्रुपात आले नेत्रांतें । देखोनि बोलिला श्रीकृष्ण. ॥ १ ॥ 'अर्जुना ! कश्मल कोठूनी । उदेलें विषमकाळीं मनीं ? । हें स्वर्गातें नासोनी । अपकीर्तीतें देईल. ॥ २ ॥ नपुंसकपण न धरीं मनीं । तुज योग्य नव्हे जाणोनी । क्षुद्र टाकीं हृदयींहुनी । ऊठ त्वरित युद्धासी.' ॥ ३ ॥ पार्थ म्हणे, 'मधुसूदना ! । भीष्मद्रोणांकडे वडीलपणा, । पूजावया योग्य जाणा । बाणीं केंवी मारूं तयां ? ॥ ४ ॥ गुरू वधोनि राज्य करणें । त्याहून बरें भिक्षा मागणें । वडील वधोनि भोग भोगणें । ते [11]रुधिराक्त (?) भोग जाण पां. ॥ ५ ॥ [12]अधिकउणें होईल कोणा ? । जयो त्यां कीं आपणां । कौरव मारूनियां जाणा । काय जीवित्व आमुचें. ॥६॥ मज देहीं असे भ्रम । म्हणोनि तुम्हां पुसें धर्म । मज मूर्खाचा [13]असंभ्रम । श्रेयें तें मज सांगिजे. ॥ ७ ॥ न दिसे जें ऐसें शोकनाशी । शोकें तो शोषक इंद्रियांसी । पावलिया [16]त्रिदशेंद्रलक्ष्मीसी । तरी सुख न पवें मी.' ॥ ८ ॥ संजय म्हणे धृतराष्ट्रासी. । 'ऐसें अर्जुन बोलला श्रीकृष्णासी । युद्ध न करीं मीं तयांसी । म्हणूनि

---

१. हें 'राज्या'चें विशेषण. 'सुख फार' असा पाठभेद. २. उगाच, रिकामा, उलट शस्त्र उगारणारा, सूड न घेणारा असा. ३. कल्याण, हितकारक. ४. या अध्यायास 'अर्जुनविषादयोग' असें नांव आहे. ५. कृष्णवर्ण पातक किंवा मोह. ६. आणीबाणीच्या प्रसंगीं. ७. वीरास न शोभणारें कृत्य, भित्रेपणा. ८. कमीपणा आणणारी गोष्ट. येथें 'क्षुद्र दुर्बलता' किंवा 'क्षुद्रपणा' अशा अर्थाचा पाठ अर्थानुरोधानें असावयास पाहिजे होता. ९. वडील व पूज्य अशा भीष्मद्रोणांची पुष्पादिकांनीं पूजा करावयाची सोडून त्यांच्यावर शरवृष्टि करणें अनुचित होय—हा भाव. १०. क्षत्रियांस निषिद्ध अशी भिक्षावृत्ति स्वीकारण्याची पाळी आल्यास कांहीं हरकत नाहीं, परंतु गुरुजनांस मारून राज्यप्राप्ति नको—हा भाव. ११. रक्तानें माखलेले (?). येथें 'रुधिरयुक्त' असा पाठ असावा असें वाटतें. मूळांत 'रुधिरप्रदिग्ध' असें पद आहे. १२. कमजास्त, बरेंवाईट. १३. माझा 'असंभ्रम' (भ्रमराहित्य, निश्चय) होईल अशा रीतीनें. १४. श्रेयस्कर, हितकारक. १५. गुरु, आप्त, बंधु, पुत्र इत्यादि सर्व युद्धांत मारल्यामुळें होणारें दुःख. १६. त्रिदश+इंद्र+लक्ष्मी=देव+श्रेष्ठ+संपत्ति=इंद्राची धनदौलत.

उगाच राहिला. ॥ ९ ॥ हांसोनियां **देव** । **अर्जुनास** सांगे भाव । विषाद सांडाया [1]हांव । उपदेश [2]करी. ॥ १० ॥ ‘[3]अशोच्यांतें [4]शोचणें । [5]जाणिवेचें बहु बोलणें । गेलिया मेलियांचें दुःख करणें । न करितीच [6]पंडित. ॥ ११ ॥ मज तुज रायांसी । गणित नाहीं जन्ममरणांसी । आणि पुढें सर्वांसी । [7]असंख्यात जाण पां. ॥ १२ ॥ जीव असतां देहीं । बाळतरुणवृद्ध हो कांहीं । जीव देह-धारी पाहीं । [8]सत्वधीर मोह न पावती. ॥ १३ ॥ [9]मात्रा तीं इंद्रियें जाण । [10]विषयें असती त्यांचे [11]प्राणि । देती सुखदुःख शीतउष्ण । म्हणोनि [12]असत्य जाण पां. ॥ १४ ॥ सुखदुःख तुल्य मानिती । जे सुखदुःखा न धरिती । ते उत्तम-पुरुष होती । तयां [13]मोक्ष असे. ॥ १५ ॥ ‘नाहीं’ तें [14]नुपजे काहीं । ‘आहे’ त्यासि [15]अभाव नाहीं । दोन्हींत [16]दोन्हीपण पाहीं । [17]तत्त्वज्ञानी पाहती. ॥ १६ ॥ आत्मा अविनाश तुवां जाणिजे । सर्व व्यापक असे सहजें । तया नाश करूं न

---

१. अर्जुनानें **विषादाचा** त्याग करावा अशी कृष्णाची हांव (उत्कटेच्छा) होती. २. ‘तो श्रीकृष्ण’ हा अध्याहृत कर्ता. अध्याय पहिला व दुसऱ्या अध्यायाचे दहा श्लोक हे केवळ उपोद्घातात्मक आहेत. येथें संगति लावण्याकरितां जोडलेला उपोद्घात संपतो आणि अकराव्या श्लोकापासून ‘**गीते**’स (गीतेंतील मुख्य सिद्धांतांच्या प्रतिपादनास) सुरवात होते. ३. शोक करण्यास योग्य नाहींत असे जे त्यांविषयीं. ४. शोक करणें. ५. ज्ञानाच्या, पांडित्याच्या पोकळ गोष्टी. (पहा अध्याय १ श्लोक ३६–४५). ६. पंडा म्हणजे आत्मज्ञानविषयक बुद्धि; ही ज्यांस आहे ते पंडित–असा ‘पंडित’शब्दाचा अर्थ आहे. ७. ‘असंख्यात’ हें ‘जन्ममरणां’चें विशेषण. ८. शहाणा माणूस. धीरशब्दाची व्याख्याः–‘धियमीरयतीति स धीरः धीप्रेरकः’=बुद्धिशक्तीला प्रेरणा करणारा तो धीर. ९. ज्यांच्या योगानें आपण शब्दादि विषय जाणतों त्या मात्रा (इंद्रियें) होत. १०. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध–हे पांच विषय. ११. इंद्रियें आणि विषय यांच्या संयोगानें आपणास सुखदुःखादि भावना होतात–हा भावार्थ. १२. येथें अर्थानुरोधानें ‘अनित्य’ असा पाठ असावयास पाहिजे. ‘शीत उष्ण सुखदुःख देती’ परंतु तें ‘अनित्य’ असतें म्हणजे थंडी किंवा उन्ह यांपासून आपणास नेहमींच सुख किंवा दुःख होतें असें नाहीं–हा भावार्थ. १३. मोक्षाचें थोडक्यांत लक्षण पहाः–‘स्वस्वरूपभूतब्रह्मात्म्यैक्यज्ञानेन सर्वदुःखोपादानतदज्ञाननिवृत्त्युपलक्षितो निखिलद्वैतानुपरक्तस्वप्रकाशपरमानंदरूपः।’=आपल्या स्वस्वरूपाच्या अनुभवानें ब्रह्म आणि आत्मा एकच आहे असें ज्ञान झाल्यामुळें सर्व अज्ञान आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या दुःखांचा जेथें लय होतो आणि द्वैतभावाचा विकार पूर्णपणानें नाहींसा झाल्यामुळें स्वस्वरूपज्ञानाच्या श्रेष्ठ आणि नित्य अशा आनंदाचें रूपच होऊन बसतो तो मोक्ष होय.’ [प्रो० भानु यांची भगवद्गीता–प्रथम षडाध्यायी–भाग पहिला. पृ० ५९ पहा]. १४. उत्पन्न होत नाहीं. १५. नाहींपणा, नास्तिक्य. १६. भाव (असणेंपणा, अस्तित्व) आणि अभाव (नाहींपणा, नास्तिक्य). १७. सत्यच पाहणारे, ब्रह्मज्ञानी.

शके दुजें। हें ज्ञान धरूनि शोक न करीं. ॥ १७ ॥ देह तंत्र नाशवंत[1]। आत्मा नाशरहित[2]। ज्यासि अज्ञान म्हणिजेत। **पार्था!** ऊठ युद्धासी. ॥ १८ ॥ ऐसें[3] म्हणती 'हा[4] मारितो',। दुसरा म्हणे 'हा मारवितो'। दोघे[5] नेणती कोण मारितो। मारणें मरणें असेना[6]. ॥ १९ ॥ आत्मा नाशरहित। उपजों[7] न लाहे निश्चित। हा अज[8] नित्य[9] पुराण[10] शाश्वत[11]। यास नाश नाहीं सर्वथा. ॥ २० ॥ आत्मा जाण अविनाश। अव्यय[12] म्हणती तयास। **अर्जुना!** ऐशिया जीवास। कवण मारूं शके[13]? ॥ २१ ॥ [वस्त्रें] जीर्ण झालियावरी। परिधान नवीं करी। कलेवर[14] त्यजुनी धरी। देही[15] अन्य[16]. ॥ २२ ॥ शस्त्रीं[17] न तुटे कांहीं। अग्नी न जाळी पाहीं। जळ बुडविणार[18] नाहीं। वायूच्यानें न शोषवे. ॥ २३ ॥ बुडे न[19] तुटे शोषे। जीव व्यापूनि असे। स्थाणुवत्[20] अचळ[21] दिसे। परिपूर्ण भरला. ॥ २४ ॥ नकळे[22] चित्तीं, न ये अव्यक्तीं[23]। तयासि अविकार्य[24] म्हणती। ऐसें जाणोनि तूं किती। वृथा शोक करितोसी? ॥ २५ ॥ जीव न उपजे न नासे। हें तुला ज्ञान[25] असे। **अर्जुना!** जाणोनि ऐसें।

---

१. चिरकाल न टिकणारा. २. कधींही नाश न पावणारा, अमर, विकारशून्य. 'आत्मा अमर आहे' असेंच मत प्राचीन ग्रीक आणि रोमन तत्त्ववेत्ते आणि आधुनिक आंग्लतत्त्ववेत्ते यांचेंही आहे. ३. खरा पाठ 'एक' असा असावा. ४. आत्मा. ५. आत्मा मारितो व आत्मा मारवितो—असें म्हणणारे. ६. आत्मा कोणाला मारीतही नाहीं व स्वतः मरत नाहीं—हा इत्यर्थ. ७. आत्म्याला जन्म प्राप्त होत नाहीं, तो कधीं जन्मतो असें नाहीं. ८. न जन्मलेला. ९. सनातन असणारा. १०. जुना, अनादि. 'पुराण'शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे:—'पुराणि (देहान्) अणति प्राप्नोतीति पुराणः।' म्हणजे ज्याला अनेक देह मिळतात तो पुराण होय. ११. कोणत्याही प्रकारें कमी न होणारा. १२. कोणत्याही प्रकारचे विकार न पावणारा. १३. येथील वाक्य प्रश्नासारखें दिसत आहे. परंतु येथें 'नाहीं' असेंच उत्तर अपेक्षित आहे. १४. शरीर, देह. १५. देह धारण करणारा, पुरुष. १६. देही [जीर्ण] कलेवर त्यजुनी, अन्य (दुसरें, नवीन) [कलेवर] धरी (धारण करी)—असा अन्वयार्थ. १७. शस्त्रांनीं. १८. मूळांत 'न क्लेदयन्ति' म्हणजे ओलें करीत नाहीं, भिजवीत नाहीं—असें आहे. १९. ह्या 'न'चा उपयोग काकाक्षिगोलकन्यायानें बुडे, तुटे, शोषे ह्या तिन्हीं क्रियापदांशीं केला पाहिजे. २०. स्तंभासारखा. २१. स्थिर, गतिशून्य. २२. चित्तीं न कळे=आत्मा अचिंत्य, कल्पनातीत, मनानें आकलन न करितां येण्यासारखा आहे. २३. हा शब्द संदर्भाच्या उलट आहे. 'व्यक्तीं' असा पाठ ज्यास्त सरळ होईल. २४. ज्याच्यावर कोणत्याही विकाराचा परिणाम घडूं शकत नाहीं असा. २५. आत्मा जन्मही घेत नाहीं आणि मृत्युही पावत नाहीं (श्लोक २०), असें माहीत असून तूं शोक कां करितोस?—असा मथितार्थ. ह्या ओवींत आणि मूळ भगवद्गीतेच्या २६ व्या श्लोकांत फारच फरक आहे. असा फरक असण्यास कोणती

शोकासि काय कारण? ॥ २६ ॥ उपजलियास मृत्यू । मेलियास जन्म सत्यू । हा ऐसा अपरिहार्यू । शोक न करीं मानसीं. ॥ २७ ॥ प्रकृतिपासोनि होती । मरणपर्यंत दीसती । मागुतीं प्रकृतीं सौमावती । हा शोक तुज अयोग्य. ॥ २८ ॥ आश्चर्यरूप कोणी देखती । आश्चर्य कोणी बोलती ऐकती । आइकोनि विसरती । आश्चर्य थोर. ॥ २९ ॥ देहीं नित्यवंत पाहीं । जीव वधिला न वेचे कांहीं । हा सर्व भूतांचे ठांयीं । वृथा शोक करूं नको. ॥ ३० ॥ स्वधर्म जाणशी जरी । भेयासि नव्हसी अधिकारी । धर्मयुद्धाहुनी श्रेयें तरी । क्षत्रियां अधिक नसे.' ॥ ३१ ॥ देव म्हणे पार्थासी,। 'दैवें आणिला रणासी । मुक्त स्वर्गद्वारासी । युद्धीं क्षत्रियां लैभू. ॥ ३२ ॥ आपला स्वधर्म सांडोनी । संग्राम न करिसी रणीं । उत्तम श्रेय हारवूनी । पावसी पापातें. ॥ ३३ ॥ अधर्म अपकीर्ति । लोक निंदा बोलती । तुझे शत्रू हांसती । तेणें मरणातुल्य. ॥ ३४ ॥ भयें करूनि परतसी । हें कळेल रथियांसी। शूरीं थोरपण पावलासी । तेथें पावसी अपमान. ॥ ३५ ॥ बोलों नये तें बोलती । तव सामर्थ्य वैरी निंदिती । लौंज होईल क्षितीं । हें मोठें दुःख. ॥ ३६ ॥ मेलिया स्वर्गप्राप्ती । वांचल्या होसील पृथ्वीपती । हें धरूनियां चित्तीं । युद्धालागीं ऊठीं गा!

---

कारणें असावींत हा एक महत्वाचा प्रश्न आहे. कदाचित् मुक्तेश्वराजवळील भगवद्गीतेच्या पोथींत ह्या श्लोकाचा निराळाच पाठ असावा, असा तर्क आहे.

१. 'पुनरपि जननं पुनरपि मरणम्' असें हें राहाटगाडगें निरंतर चालावयाचेंच. २. न टाळतां येणारा, स्वाभाविक. 'अपरिहार अर्थू' असा अन्य पाठ. ३. प्रकृतीमध्येंच. ४. मिळून जातात. ५. आश्चर्यकारक ज्याचें रूप आहे असा (आत्मा). ६. आत्मा ही आश्चर्यकारक गोष्ट आहे, असें सर्व लोक पाहातात, बोलतात, ऐकतात, पण इतकें करूनही अखेरीस त्याला विसरतात (आत्म्याला जाणत नाहींत), हें मोठें आश्चर्य! सारांश आत्मज्ञान होणें फार दुर्लभ होय. भगवंतांनीं हाच अभिप्राय पुढें अध्याय ७ श्लोक ३ यांत दृढ केला आहे. ७. देहाचे ठिकाणीं, देहांतर्यामीं. ८. नेहमीं राहणारा. ९. येथें 'नवजे' असा पाठ असावा असें वाटतें. वधिला नवजे=वधिला जात नाहीं, अवध्य. १०. 'पायीं' असें पाठांतर आहे. ११. आपला धर्म, क्षत्रियाचा धर्म. १२. भीष्मादिकांस मारल्यास पाप लागेल ही भीती. १३. न होसी, होणार नाहींस. १४. कल्याण. १५. देव म्हणेः–दैवें (सुदैवानें) मुक्त स्वर्गद्वारासी रणासी (ज्याच्या योगानें स्वर्गाचे दरवाजे उघडतात अशा युद्धासाठीं) पार्थासी आणिला– असा अन्वय. १६. युद्धांत जय आल्यास पृथ्वीचें राज्य, मरण आल्यास स्वर्गप्राप्ति–हे लाभ. १७. स्वधर्माप्रमाणें न वागल्यामुळें किंवा रणांगणांतून पळाल्यामुळें लागणारें पाप. १८. 'तें' असें पाठांतर. १९. योद्ध्यांसी. २०. शंकरादि मोठमोठ्या वीरांशीं युद्ध करून मोठेपणा मिळविलास. २१. अपकीर्ति.

॥ ३७ ॥ सुखदुःख सम करूनी । लाभ अलाभ न धरीं मनीं । अजयो जयो सांडुनी । युद्ध करितां पाप[1] नाहीं. ॥ ३८ ॥ बुद्धी सांख्यमतीची[2] । सांगेन तुला मुळींची । तेणें तुटतील भवबंधाचीं । कर्मबंधनें. ॥ ३९ ॥ निष्काम[3] कर्में करणें । प्रत्यवाय[4] नव्हे बोलणें । थोडिया धर्मातेंनि[5] करणें । महाभयें[6] तरशील. ॥ ४० ॥ बुद्धि निश्चयात्मिक[7] । यालागीं बुद्धि एक । बहुभाष्य[8] बुद्धि देख । कामुकाचिया[9]. ॥ ४१ ॥ वेदवाचा[10] पुष्पित[11] । स्वर्गफूल[12] त्यजावें सांगत । ऐशिया[13] वसे निश्चित । फल टाकूनि कर्म करी. ॥ ४२ ॥ सकामबुद्धि आचरती[14] । स्वर्गसुखातें पावती । पुण्य सरलिया अंतीं । पुनरपि भोगिती भोग. ॥ ४३ ॥ भोगभोग्यांत आनंद । कामनाहत[15] स्वरूपानंद । एकाग्रता समाध[16] । तयाची हे न बुद्धी. ॥ ४४ ॥ त्रिगुणात्मक[17] वेद जाण । अर्जुना ! होय तूं निर्गुण[18] । सत्वें[19] राहें द्वंद्वं[20] त्यजून । आत्मत्वीं असोनियां. ॥ ४५ ॥ स्वल्प उदकीं घडे जें कांहीं । तें सर्व संपादिती ऱ्हदाचे[21] ठायीं । वेदशास्त्रज्ञासही[22] । तें सुख ब्रह्मीं मिळे. ॥ ४६ ॥ कर्माधिकारी होऊनी । तें फळ[23] न धरीं मनीं[24] । फळाविरहित[25] होऊनी । कर्म करावें[26]. ॥ ४७ ॥ योगें[27] आचरोनी । कर्मफळसंग[28]

---

१. पातक. २. परमार्थशास्त्रांतील. ३. फलाची इच्छा न धरितां केलेलीं. ४. अडचण, विघ्न. ५. निष्काम अशा विहितकर्मरूपी धर्मातें. ६. मोठ्या संकटांपासून. ७. निश्चयच आहे स्वरूप जीचें अशी बुद्धि. ८. 'बहुभागबुद्धि' असाही पाठ आहे. ९. सकाम कर्में करणाऱ्यांच्या बुद्धि बहुभाष्य (अनिश्चित) असतात—असा भावार्थ. १०. वेदवाणी (अर्थ न जाणतां केलेलें पठन). ११. फुललेली, बाहेरून रमणीय दिसणारी. १२. येथील रूपक स्पष्टपणें ध्यानांत येण्याकरितां जिज्ञासूंनीं वामनपंडितकृत 'यथार्थदीपिकें'तील श्लोक ४२ वरील टीका पहावी. १३. येथें कांहीं अपपाठ असावा असें दिसतें. १४. ह्या क्रियापदाचें 'कर्में' हें अध्याहृत कर्म. किंवा आचरति=वागतात. १५. वासनांच्या योगानें आकर्षून टाकलेला. १६. वामनपंडित समाधीची व्याख्या अशी करितातः—'एकनिष्ठ जे बुद्धि । तेचि म्हणावी समाधी. ॥' १७. सत्व, रज आणि तम हे त्रिगुण; ह्या त्रिगुणांनीं युक्त. १८. निर्वासनात्मक, निष्काम. १९. सत्वगुणयुक्त. २०. सुखदुःख, बरेंवाईट, माझेंतुझें अशा प्रकारची द्वैतबुद्धि टाकून. २१. सरोवराचे ठायीं. २२. वेदशास्त्रसंपन्न कर्मठास वेदमंत्रोक्त कर्में आचरल्यानें जी फलप्राप्ति व सुखप्राप्ति व्हावयाची ती ब्रह्मज्ञान झालेल्या विद्वानास कर्में न करितांच प्राप्त होते—हा इत्यर्थ. २३. कर्म केल्यामुळें प्राप्त होणारें फळ. २४. मनीं न धरीं=इच्छा करूं नको. २५. फलेच्छाविरहित. २६. ह्या ओंवीशीं आंग्लकवि लाँगफेलोच्या 'जीवितस्तोत्रां'तील ( Psalm of Life ) पुढील चार ओळी अगदीं समानार्थक आहेतः—

Let us then be up and doing,
With a heart for any fate ;

त्यजूनि । [1]सिद्धिअसिद्धि सम धरूनी । तो अनुरागी. ॥ ४८ ॥ बुद्धियोगाहुनी हीन । ज्ञानयोगातें इच्छून । कर्म करीं फल टाकून । तुच्छफळ. ॥ ४९ ॥ ज्ञान अंगीकारूनी । [2]फळें [3]हरपती दोनी । [4]योगातें अंगीकारुनी । कुशल [5]होयें. ॥ ५० ॥ म्हणोनि [6]योगी कर्म करिती । [7]फळसंगादिकें त्यजिती । [8]जन्मबंधावेगळे होती । पद पावती [9]अनामय. ॥ ५१ ॥ ज्ञान जाणितलिया । [10]मोहसागरीं तरती **धनंजया**! । पाविजे तया ठाया । वैराग्य [11]पावसी. ॥ ५२ ॥ [12]श्रवणसंदेह वाटेल जरी । संदेह टाकूनि [13]सांवरी । तेणें पावसी [14]अवधारीं । योगाभ्यास.' ॥ ५३ ॥ '[15]स्थितप्रज्ञाची बुद्धी कैसी? । योगीं वर्तणूक कैसी? । योग झालिया त्यासी । स्थितप्रज्ञ जाणिजे.' ॥ ५४ ॥ **देव** म्हणे, '**पार्था**! । जो [16]नातळे [17]काममनोरथा । आत्मसुखीं स्थिरता । तो स्थितप्रज्ञ बोलिजे. ॥ ५५ ॥

---

Still achieving, still pursuing
Learn to labour and to wait.

याचें पद्यात्मक भाषांतर रा० रा० मल्हार खंडेराव चिटणीसकृतः—'सोडोनि आळस तरी करि उद्यमातें; । जें जें घडे सहनही करि सर्व तें तें ॥ साधी समीहित सदा, करि यत्न फार । होवोनि कार्यरत चित्तिं धरीहि धीर ॥.' ह्याच अर्थाचीं **वा**यबलादि ग्रंथांत अनेक वाक्यें आढळतात परंतु तीं विस्तारभयास्तव देतां येत नाहींत. २७. योग म्हणजे कर्मफल प्राप्त होवो अगर न होवो, चित्ताचें समाधान व समता सोडून न देतां केवळ परमेश्वरास अर्पण करण्याच्या बुद्धीनें कर्में करणें यास 'योग' म्हणतात. [प्रो० भानु यांची श्रीमद्भगवद्गीता]. २८. संग=समागम, लोभ, इच्छा.

१. जयापजय. २. पाप व पुण्य हीं दोन फळें. ३. नाहींशीं होतात. ४. समत्वचित्तवृत्तीला. ५. ह्या ओंवीच्या मूळ संस्कृत श्लोकावर **वा**मनपंडितांचें मोठेंच व्याख्यान आहे; व त्यांत कर्म, कर्मनाश, माया, ब्रह्म वगैरे गहन विषयांचा चांगला ऊहापोह केलेला आहे. [यथार्थदीपिका—भाग १ काव्यसंग्रहग्रंथमाला. पृ० १०२–१०८ पहा]. ६. योगी=पापपुण्य अथवा सुखदुःख यांविषयीं समबुद्धि झालेले अधिकारी. ७. कर्मापासून प्राप्त होणाऱ्या फलाची इच्छा वगैरे गोष्टी. ८. जन्ममरणाच्या रहाटगाडग्यापासून मुक्त, जीवंत असतांच मुक्त. ९. जेथें कोणत्याही प्रकारचा आमय (त्रास, उपद्रव) नाहीं असें पद, परब्रह्मपद. १०. मोह(अज्ञान)-रूपी सागरांतून. ११. [जया ठाया] वैराग्य पावसी, तया ठाया पाविजे=ज्या ठिकाणीं तुला वैराग्य प्राप्त होईल अशा ठिकाणीं तूं जाशील म्हणजे तुला वैराग्य प्राप्त होईल—हा भावार्थ. १२. अनेक कर्मफळें सांगणारे वेदमंत्र ऐकिल्यामुळें झालेली मनाची गडबड, गोंधळून गेलेली बुद्धि. १३. ह्या क्रियापदाचें कर्म 'बुद्धि' (अध्याहृत). १४. ऐक, हे अर्जुना! लक्ष्य दे. १५. स्थिरबुद्धि पुरुषाची. हा अर्जुनाचा प्रश्न आहे. १६. स्पर्श करीत नाहीं, सोडून देतो. १७. कामना आणि वासना. 'अमुक एक फळ मिळणार असें ऐकिलें म्हणजे उत्पन्न होते ती कामना, व न ऐकलेलें फळ मिळावें अशी इच्छा असते त्यास वासना म्हणावें.' असा कामना

दुः[1]खें निश्चळ, सुखसंगीं । भयक्रोध टाकूनि [2]वीतरागी । तो मुनि जाण जगीं । स्थितप्रज्ञ बोलिजे. ॥ ५६ ॥ [3]शुभाशुभ प्राप्त झालिया । [4]ममत्वें न गुंते तया ठाया । [5]आनंदबुद्धि तया । त्याची प्रज्ञा [6]प्रतिष्ठिली. ॥ ५७ ॥ कांसव [7]अंगें जैसें । हातपाय [8]आंवरी [9]सरसें । इंद्रियें आंवरूनि विशेषें । तया ज्ञान प्रतिष्ठिलें. ॥ ५८ ॥ [10]निराहारी असे । [11]विषयवर्जे तुटती [12]फांसे । त्याची वासना असे । ती जातसे [13]ब्रह्मदर्शनें. ॥ ५९ ॥ पुरुष [14]प्रयत्नविचक्षण । आपण ज्ञानी असोन । इंद्रियें मन नेती हरून । **कौं**तेया ! जाण तूं. ॥ ६० ॥ सर्व नेमालागुनी । [15]युक्त नाहीं योगाहुनी । इंद्रियें वश [16]केल्यानी । त्याचें ज्ञान प्रतिष्ठित. ॥ ६१ ॥ विषयांचें ध्यान करी । विषयसंगें काम अंतरीं । कामापासूनि क्रोध भारी । ऐसे हे होती [17]निर्माण. ॥ ६२ ॥ क्रोधापासूनि [18]मोहो । [19]स्मृतीच्या भ्रंशीं ठावो । स्मृति बुडलिया भावो । [20]मूर्ख होतसे. ॥ ६३ ॥ [21]रागद्वेष असे वर्जून । तो आत्मा वश करून । इंद्रियासंगें भोग भोगून । तो [22]प्रसाद भोगील. ॥ ६४ ॥ प्रसाद पावलियावरी । सर्व दुःख होय [23]बोहरी । आत्मप्रसादें चित्त आंवरी । [24]प्रतिष्ठा पावतो. ॥ ६५ ॥ ज्ञानाविना न सांपडे [25]बुद्धि । बुद्धिविना [26]भावशुद्धि । [27]ध्यानावांचूनि शांति । कोठूनि ये सुख ? ॥ ६६ ॥ इंद्रियें [28]विचरत असतां । आवरीना आपुले चित्ता ।

---

आणि वासना या शब्दांत पंडितांनीं विशेष काढला आहे तो चिंतनीय आहे' [प्रो० भानु यांची श्रीमद्भगवद्गीता].

१. दुःखांच्या योगानें, दुःखें प्राप्त झालीं तरी. २. निरिच्छ, ज्याची भोगतृष्णा नष्ट झाली आहे असा. 'विरागी' असा पाठभेद आढळतो. ३. सुख किंवा दुःख, बरें किंवा वाईट. ४. मायेनें. ५. सुख होवो, दुःख होवो, नेहमींच आनंदी वृत्ति. ६. स्थिर झाली. ७. आपलें अंग, स्वतःचें शरीर. ८. आंखडून घेतें, मागें घेतें. ९. आंगाबरोबर. १०. ज्याच्या इंद्रियांनीं विषयांचें ग्रहण करण्याचें सोडिलें आहे असा. ११. विषयांचा त्याग केल्यामुळें. १२ भवबंध, संसाराचे पाश. १३. परब्रह्मप्राप्ति झाल्यावर, ईश्वर पाहिल्यावर. १४. प्रयत्न करणारा बुद्धिवंत पुरुष. १५. योग्य. १६. केल्यामुळें, केल्याच्या योगानें. १७. 'निर्वाण' असा अन्यपाठ आहे. १८. अविवेक. १९. स्मरणशक्तीचा घोंटाळा होतो. २०. क्रोधापासून उत्पन्न होणारी अनर्थपरंपरा या श्लोकांत वर्णिलेली आहे. इंग्रजींत Anger is second madness (संताप हा वेडेपणाचा धाकटा भाऊ होय) अशी एक म्हण आहे ती किती यथार्थ आहे ! २१. राग= अनुराग, प्रीति, लोभ. २२. शांति, स्वस्थता, चित्तप्रसन्नता. २३. भस्म, 'बाहेरी' असें पाठांतर. २४. स्थिरता, शांति. २५. आत्मज्ञान. २६. शुद्ध भाव, निष्काम भक्ति. २७. ध्यानाची व्याख्या:—'सोऽहं चिन्मात्रमेवेति चिन्तनं ध्यानमुच्यते ।' म्हणजे:—तो जो चैतन्यरूपी परमात्मा तो मी असें जें चिंतन त्यास ध्यान असें म्हणतात. २८. भटकत, फिरत.

प्रज्ञा[1] नाशे पाहतां । उदकीं नाव वायुबळें[2]. ॥ ६७ ॥ या कारणें **अर्जुना** ! । विषयापासाव करी वंचना[3] । टाकी इंद्रियवासना । त्याची प्रज्ञा प्रतिष्ठिली. ॥६८॥ जे रात्री[4] सर्वभूतीं[5] । ते समयीं जे जागती[6] । जेथें[7] भूतांची जागृती । ते रात्री मुनींसी. ॥ ६९ ॥ संपूर्ण समुद्रीं जाण । तेथें उदक जाय मिळोन । तेंवी कामनालीन[8] । शांति पावे. ॥ ७० ॥ सर्व काम सांडूनी । संगत्यागें निस्पृह[9] होऊनी । मोह अहंकार त्यजुनी । शांति पावे. ॥ ७१ ॥ अशा ब्रह्मीं स्थिति वर्तती । मोहरूप संसार न पावती । देहावसानीं[10] स्मरती[11] । ते मुक्त जाण[12].' ॥ ७२ ॥

## अध्याय तिसरा.

**अर्जुन** म्हणे, '**कृ**ष्णनाथा ! । कर्माहून ज्ञान श्रेष्ठ असतां । अघोरकर्मीं[13] कां **अ**नंता ! । प्रवर्तवितोसि मज ? ॥ १ ॥ मिश्रित[14]वाक्यें येणें । भुलविसी माझीं अंतःकरणें । तरी एक निश्चयेंसी सांग, ज्याणें । श्रेय[15] पाविजेल.' ॥ २ ॥ "[16]दों प्रकारची निष्ठा[17] । पूर्वी सांगितली **भा**रता ! । [18]सांख्यमती ज्ञानदाता[19] । योगियास कर्मयोग बोलिजे. ॥ ३ ॥ जे कर्मारंभ न करिती । ते पुरुष मोक्ष न पावती । कर्में उगीच त्यजिती । तयांसि सिद्धी[20] नाहीं. ॥ ४ ॥ कोणी कर्महीन नसती । क्षण एक कर्में न सांडिती । दाटूनियां[21] कर्म करविती । प्रकृतीचे गुण जाण. ॥ ५ ॥ [22]कर्मेंद्रियांतें दंडी । मनकल्पना न सांडी । तया नाहीं विष-

---

१. इंद्रियें विचरत असतां आपुले चित्ता आवरीना [तरी] पाहतां (पाहतां पाहतां) प्रज्ञा उदकीं वायुबळें नाव (नौका) [तैशी] नाशे—असा अन्वय. येथें वायु व इंद्रियें आणि प्रज्ञा व नाव यांची तुलना केली आहे. २. वाऱ्याच्या जोरानें. ३. दूर होणें, अलिप्त राहणें. ४. अज्ञानरूपी रात्र. ५. सर्व भूतमात्रांला. ६. ज्ञानरूप जागृतीचा अनुभव घेतात. 'योगी जागती' असा अन्य पाठ. ह्या **गी**तोक्तीचा अनुवाद आदिपर्व—अ० २० ओ० ११० येथें **मु**क्तेश्वरानें केला आहे. ७. 'जेतें' असें पाठांतर. ८. ज्याच्यामध्यें कामना लीन होतात म्हणजे अंतःकरणाला विकार करूं शकत नाहींत तो. ९. वासनाशून्य, उदासीन. १०. मरणसमयीं. ११. भगवत्स्मरण करितो. १२. येथें 'सांख्ययोग' नामक द्वितीयाध्याय संपला. १३. ज्यांत क्रूरपणाचीं कर्में करावीं लागणार अशा कर्मांत. १४. अनिश्चित, घोंटाळ्याच्या, किंवा धरसोडीच्या बोलण्यानें. १५. मोक्ष. १६. हें अर्जुनाच्या प्रश्नास श्रीकृष्णाचें उत्तर आहे. १७. भक्ति. १८. सांख्ययोगाचे ठिकाणीं ज्यांची मति स्थिर झाली आहे त्यांस. १९. ज्ञान देणारा, ज्ञानयोग. २०. इष्टकार्याची प्राप्ति, मोक्षप्राप्ति. २१. (१) सत्व, रज आणि तम ह्या प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या गुणांच्या प्राबल्यामुळें; (२) मुद्दाम, इच्छेविरुद्ध. २२. हात, पाय, मुख, गुद आणि उपस्थ—हीं कर्मेंद्रियें.

यांची सांडी[1] । म्हणोनि मूर्ख[2] म्हणावें. ॥ ६ ॥ इंद्रियांचें दमन करी स्वभावीं[3] । इंद्रियां हातीं कर्म करवी । कर्मफलाची आशा न धरावी । तोचि श्रेष्ठ म्हणिजे अर्जुना! ॥ ७ ॥ वर्णाश्रमकर्म[4] करीं । कर्म श्रेष्ठ हो! अवधारीं । न करितां कर्म त्यजिसी जरी । देहअवसानीं[5] सिद्धी[6] नाहीं. ॥ ८ ॥ 'यज्ञ[7] विष्णु' ऐसी श्रुती । तयावेगळें कर्म अन्यत्र अर्पितां बद्ध[8] होती । म्हणूनि कौंतेया! तत्प्रीत्यर्थ[9] देती । फळ टाकूनि आचरें तूं. ॥ ९ ॥ ब्रह्मयानें यज्ञ आणि सृष्टी केली । मग आशीर्वादांचीं उत्तरें[10] बोलिलीं । यज्ञकामधेनु[11] दुहिली । भक्तांस्तव. ॥ १० ॥ तुम्ही देवांतें भावें[12] पूजा । ते प्रसन्न होती सहजा । परस्परें तुमचिया भावें काजा[13] । श्रेय[14] देतील. ॥ ११ ॥ ईष्ट[15] भावें करूनी । यज्ञमुखें समर्पोनी । तो देव अंगीकारुनी । फल देत कल्पनेचें. ॥ १२ ॥ यज्ञशेष[16] जे भक्षिती । त्यांचीं पातकें जाती । उदरार्थ पशु भक्षिती । पाप भोगिती देख. ॥ १३ ॥ अन्नापासूनि भूतें होती । धान्यें पर्जन्यें[17] निपजती । पर्जन्य यज्ञाचेनि सुकृतीं[18] । यज्ञ कर्मापासुनी. ॥ १४ ॥ कर्में ब्रह्मयापासोनी[19] । ब्रह्म अक्षराहूनी[20] । या कारणें ब्रह्म अज्ञुनी । नित्य कर्म करीत. ॥ १५ ॥ ब्रह्मचक्रा[21] प्रतिष्ठिले । तें जन्म पावोनि भले । न संपादिले ते पापी जन्मले । भूभार होवोनियां ॥ १६ ॥ आत्मत्वीं जे राहिले । आत्मसुखें तृप्त झाले । स्वरूपींच समावले । तयां कर्में न लागती[22]. ॥ १७ ॥ कर्म न केलिया कांहीं । परस्परें[23] गुंतलें नाहीं । तैसेंच सर्वभूतांचे ठायीं । फलेच्छा न करी. ॥ १८ ॥

---

१. सांडणें, त्याग. २. मूळांत 'मिथ्याचारः स उच्यते' (त्याला दांभिक म्हणतात) असें आहे. ३. अंतःकरणपूर्वक, मनापासून. ४. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चार जातींनीं करावयाचीं कर्में तीं. ५. मरणकाळीं. ६. मोक्ष, इच्छित वस्तूची प्राप्ति. ७. 'यज्ञो वै विष्णुः' (यज्ञ म्हणजे विष्णुच होय) अशी श्रुति आहे. ८. कर्मांनी बद्ध, जन्ममरणाधीन. ९. यज्ञार्थ, श्रीविष्णुप्रीत्यर्थ. १०. 'तुम्हीं वृद्धि पावा' व 'तुमचे इष्ट मनोरथ तुम्हांस प्राप्त होवोत' हीं आशीर्वादवचनें. ११. यज्ञरूपी कामधेनु (इच्छितकामना पूर्ण करणारी स्वर्गीय गाय). १२. भक्तिपूर्वक. १३. कार्य, इच्छित वस्तु. १४. सिद्धि, कल्याण. १५. मुक्तेश्वराची ही ओंवी मूळश्लोकाच्या अर्थाशीं मिळत नाहीं. १६. यज्ञांतील हविर्भाग, देवतांस समर्पण केल्यानंतर शिल्लक राहणारा भाग. (पुढें अध्याय ४ ओंवी ३१ पहा). १७. पर्जन्याचे योगानें, पाऊस पडला तर. [मुक्तेश्वर—वनपर्व—काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० ९ टी० १३ पहा.] १८. पुण्यामुळें. १९. ब्रह्मापासून, वेदापासून. २०. ज्याचा कधीं नाश होत नाही अशा अविनाशी तत्वापासून. २१. अनादिकालापासून चालत आलेल्या रहाटगाडग्याप्रमाणें. २२. कर्में करावयाची गरज नाहीं. २३. कर्म आचरल्यामुळें किंवा न आचरल्यामुळें त्यांचें कांहीं अडत नाहीं.

या कारणें निष्काम । कर्म करावें [1]सकाम । निष्काम करावें काम । तो अहीं
मिळे. ॥ १९ ॥ विदेहादि [3]जनक बोलिले । ते [4]कर्मे सिद्धी पावले । म्हणोनि
श्रेष्ठ बोलिले । यास्तव तूं कर्म करीं. ॥ २० ॥ जें जें श्रेष्ठ वर्तती । लोक
तैसेंच आचरती । जैसें ते [5]प्रमाण करिती । जन त्यामागें असे. ॥ २१ ॥
त्रैलोक्याचे ठायीं । पार्था ! मज करणें कांहीं नाहीं । [6]अवाप्त पावणें नाहीं ।
तरी कर्मे करीतसें. ॥ २२ ॥ जरी कर्म मीं न [7]वर्तवीं । तरी कर्म [8]पडे स्वभावीं ।
म्यां आचरणूक करावी । लोक तैसेंच करितील. ॥ २३ ॥ मी कर्म जरी न
करीं । [9]संकर होईल अवधारीं । लोक भ्रष्टती यापरी । तें करणें मज नाहीं.
॥ २४ ॥ हे लोक नेणती कांहीं । वडिलांसारिखे वर्त्तती पाहीं । म्हणऊनि
[10]श्रेष्टीं [11]दोनी सोई । [12]लोकसंग्रहार्थ धर्म कीजे. ॥ २५ ॥ ज्ञानीं एकचित्त होऊनी ।
सर्व कर्मे उत्कृष्ट करूनी । अज्ञानियांस कर्म आचरवावें दाटूनी । [13]ज्ञानीं स्वयें.
॥ २६ ॥ प्रकृतिगुणांचें कार्य । क्रिया [14]निपजे [15]गुणमय । [16]नेणत्या संतोष होय ।
'मी कर्ता' मानी. ॥ २७ ॥ प्रकृतिगुण मोहिती । मूर्ख फळीं आसक्त होती ।
ते ज्ञानियांची युक्ती । इंद्रियगुण. ॥ २८ ॥ [17]प्रकृतिचेष्टा करी माया । विषयीं
आसक्त होऊनियां । मूढगती पावोनियां । मूर्खासि [18]खेवळूं नये. ॥ २९ ॥ सर्व
कर्मे मज अर्पी । चित्त आत्मयातें समर्पी । [19]उदासपणें वोपीं । ऊठ युद्धासी.
॥ ३० ॥ हें माझें ज्ञानमत । नर हृदयीं ठेवी अखंडित । [20]निर्द्वंद्वें करी श्रद्धा-
युक्त । तो [21]कर्मी विमुक्त असे. ॥ ३१ ॥ हें तुला सांगीतलें । तें न अनुष्टितां
तामसगुणी झाले । ज्ञानापासोनि [22]चेवले । महामूर्ख. ॥ ३२ ॥ ज्ञानी अससील
जरी । प्रकृति चेष्टा करी । पंचभूतांतें अवधारी । तया निग्रह काय ? ॥ ३३ ॥
विषयकल्पना बहुत । रागद्वेषीं वर्तत । जे तेथें होती आसक्त । विषयां वश
होऊं नये. ॥ ३४ ॥ आपला धर्म असोनी । परधर्म बरवा मनीं मानी । आ-

---

१. सकाम कर्म निष्काम करावें–असा अन्वय. २. विरक्त. ३. विदर्भदेशचा राजा. 'अनेक' असें पाठांतर. ४. कर्मांच्या साहाय्यानेंच. ५. मान्य, कबूल. ६. न मिळालेलें मिळवावयाचें नाहीं. ७. न करीं, न केलें तर. ८. पडे=घडणार नाहीं. ९. वर्णसंकर, भ्रष्टाकार. १०. अधिकारी पुरुषानें. ११. दोघांच्या (फलासक्त झालेले सामान्य लोक व फला-विषयीं निरिच्छ विद्वान् लोक यांच्या) सोईकरितां. ही ओंवी मूळाशीं जमत नाहीं. १२. लोककल्याणार्थ. १३. ज्ञाते पुरुषांनीं. १४. उत्पन्न होई. १५. सत्व, रज, तम ह्या तीन गुणांनीं युक्त. १६. अज्ञानी पुरुषास. १७. अविद्येच्या चेष्टा. १८. चाळवूं नये. १९. वासनाशून्य होऊन. २०. द्वैतरहित, भेदभाव सोडून. २१. कर्मापासून, कर्मबंधांतून. २२. मुकले, चळले.

पला धर्म टाकुनी । परधर्मी भय असे.' ॥ ३५ ॥ 'हा कोणीं प्रेरिला प्राणी ?। पाप आचरतो कोठुनी ? । वार्ष्णेया ! इच्छिल्यावांचोनी । बलात्कारें कोण करितसे ?' ॥ ३६ ॥ देव म्हणे, 'गा ! पार्था ! । हे कामक्रोध वैरी जाण निभ्रांता । रजोगुणापासोनि होतें असतां । निपजती पापातें. ॥ ३७ ॥ अग्नि झांकला धूम्रबळें । दर्पण जैसा मळें । गर्भ वेष्टिला जाळें । तैसा आत्मा अज्ञानेंकरूनी. ॥ ३८ ॥ तैसें ज्ञान झांकोळलें तेणें । म्हणोनि ज्ञानियाचा नित्य वैरी मी म्हणे । कामरूप देह दहनें । दूर करूनि त्यजिती. ॥ ३९ ॥ इंद्रियें आणि मनबुद्धी । यांसि काम अधिष्टान आधीं । यांतें भुलवोनि त्रिशुद्धी । ज्ञान लोपतसे. ॥४०॥ याकारणें इंद्रियदमना ! । तूं नियमीं गा ! अर्जुना ! । जाळोनि पापकामना । ज्ञानविज्ञाना हित असें. ॥ ४१ ॥ इंद्रियांत श्रेष्ठ मन । मनाहूनि परें बुद्धि जाण । बुद्धिपलीकडे आत्मा जाण । ऐसी गती. ॥ ४२ ॥ बुद्धीनें परमात्मा जाण । आणि आत्मा स्थिर करून । वैराग्यअग्नीनें जाळून । काम अजिंक्य जितीं.' ॥ ४३ ॥

---

## अध्याय चवथा.

'हा योग कीं पूर्वी । म्यां उपदेशिला रवी । सूर्य मनूसी दावी । मनूनें इक्ष्वाकुसी सांगितला. ॥ १ ॥ ऋषि परंपरा बोलिला । हा योग जरी ओळखिला । तूं भक्त म्हणूनि सांगितला । अति अपूर्व. ॥ २ ॥ आणि म्यां तुज

---

१. धर्माची व्याख्या:—'जगतः स्थितिकारणं प्राणिनां साक्षादभ्युदयनिःश्रेयसहेतुर्यः स धर्मः ।' म्हणजे:—जगाची व्यवस्था जेणेंकरून उत्तम प्रकारची चालते व ज्याच्या योगानें प्राण्यांस उत्तम प्रकारचें साक्षात् सुख मिळून शेवटीं मोक्ष मिळतो तो धर्म होय. २. हें अर्जुनाचें भाषण आहे. ३. हे वृष्णिकुलोत्पन्न कृष्णा ! ४. खरोखर, निःसंशय. ५. [कामक्रोध वैरी] रजोगुणापासुनि [उत्पन्न] होत असतां—असा अन्वय. ६. उत्पन्न करिती. ७. धुराच्या योगानें. ८. धुरळ्यामुळें. ९. वारेच्या जाळ्यानें. 'नाळें' असें पाठांतर. १०. येथें 'झांकला असे' हें क्रियापद अध्याहृत आहे. ११. लोपलें, झांकलें. १२. अज्ञानानें. १३. वसतिस्थान. १४. काया, वाचा, आणि मन या तिहींना. १५. इंद्रियांचें दमन करणाऱ्या (अर्जुना!) 'इंद्रियां दमना' असा पाठभेद. १६. संयमन कर, स्वाधीन करून घे. १७. ज्ञान आणि विज्ञान (स्वानुभव) यांस. १८. अस, रहा. १९. श्रेष्ठ. २०. जिंकण्यास कठिण असा. २१. येथें 'कर्मयोग' नामक तृतीयाध्याय संपला. २२. सूर्य. याचें दुसरें नांव विवस्वान. हा सूर्यवंशाचा मूळपुरुष. याचा पुत्र मनु, मनूचा पुत्र इक्ष्वाकु. २३. मनु हा मनुष्यसृष्टींतील पहिला पुरुष. २४. इक्ष्वाकु हा पहिला राजा. २५. 'तूं भक्त म्हणूनि सांगितला । अति अपूर्व.' हा भाग या ओंवींत आगंतुक आलेला दिसतो.

बुद्धी[1]-। योग सांगितला अनादी[2] । तूं सखा[3] भक्त आधीं । म्हणोनि रहस्य सांगीतलें.' ॥ ३ ॥ पार्थ म्हणे, 'कृष्णनाथा ! । तुम्हां जन्म आलीकडे[4] असतां । अनादि सूर्याची कथा । म्यां केंवी जाणावें ?[5]' ॥ ४ ॥ देव म्हणतो[6], 'तुज मज । बहु जन्म झाले सहज । तें सर्व आठवे मज, । जीवत्वें[7] तुला नाठवे. ॥ ५ ॥ अज[8] अव्यय[9] अवतार । सर्व भूतांचा मी ईश्वर[10] । प्रकृति अधिष्ठान[11] निरंतर । मायाधीन जन्म. ॥ ६ ॥ जे जे काळीं धर्मासी । स्थान[12]-भ्रष्टता होय पर्येसीं[13] । त्या काळीं अवतरोनि त्यासी । दुष्टांतें[14] मारितसें. ॥ ७ ॥ पवित्र साधु[15] तारावे । दुष्टांसि नाश करावे । धर्मस्थापन व्हावें । अवतरें युगायुगीं[16]. ॥ ८ ॥ माझें जन्म कर्म दिव्य[17] जाण । तयां नाहीं जन्ममरण । ते खूण ज्ञानी धरून । ते मज पावती[18]. ॥ ९ ॥ कामक्रोधभय त्यजिती । माझ्या आश्रयें असती । मम प्रसादें ज्ञान पावती । स्वरूपीं[19] मिळोनी. ॥ १० ॥ जैसे[20] जे मजला भजती । त्यांसि मी भजें तेच रीती । माझे मार्गी[21] वर्तती । सर्व लोक. ॥ ११ ॥ जे कर्मसिद्धी[22] इच्छूनी । चित्त ठेविती अन्यदेवभजनीं[23] । मनुष्यलोकीं क्षणीं[24] । सिद्धि[25] होती सत्वर. ॥१२॥

---

१. ज्ञानयोग. २. पुरातन, गुरुपरंपरागत. ३. स्नेही. ४. मागाहून, आलीकडचा. ५. ह्या पद्याचा स्पष्टार्थ ध्यानांत येण्यास तुकोबांचा पुढील अभंग बरीच मदत करील:—'······आलीकडे जन्म तुझा पूतनारी । उत्पन्न द्वापारीं आम्हीं झालों. ॥ २ ॥ आद्ययुगीं रवी त्यालागीं संवाद । वर्णिसी विषाद आम्हांपुढें ॥ ३ ॥ आतांचें नेणवे पूर्वी जाणे कोण । अंगीं पावों खूण ऐसें करा. ॥ ४ ॥ ·········'. 'जन्मान्तरानुभूतं च न स्मर्यते' (जन्मांतरीं अनुभविलेलें कांहीं एक आठवत नाहीं) अशी श्रुति आहे. ह्याकरितां आपला जन्म आलिकडचा असून आपण अनादिकालच्या गोष्टी सांगतां, त्यांवर मी विश्वास कसा ठेवावा?—असा अर्जुनाच्या भाषणाचा मथितार्थ. ६. 'म्हणे तो' असें पाठांतर. ७. मायावशत्वामुळें, मायेला वश झाल्यामुळें. ८. जन्मरहित. ९. शाश्वत. १०. स्वामी, कर्ता व करविता. ११. प्रकृतीच्या ठिकाणीं अधिष्ठान (आसन) मांडून, मायाधीन होत्साता पुन:पुन: (निरंतर) जन्म घेतों—असा इत्यर्थ. १२. अवनति, ग्लानी, क्षीणता. १३. परियेसीं, ऐक. १४. अधर्माचरण करणाऱ्यांना. १५. सात्विकवृत्तीनें आपलें व इतरांचें खरें कल्याण करणारे सत्पुरुष. १६. प्रत्येक युगांत. मुक्तेश्वरानें आपल्या ग्रंथांत ह्या 'गीतो'क्तीचा ठिकठिकाणीं अनुवाद केलेला आढळतो. [सभापर्व—अध्याय ६ ओवी १४६; अध्याय १५ ओवी १९४ इत्यादि पहा]. मुक्तेश्वराची श्रद्धा ह्या गीतावचनावर बरीच दृढ होती असें दिसतें. १७. अलौकिक. १८. मज पावती=माझ्यापाशीं येतात, मला येऊन मिळतात, मुक्त होतात. १९. मत्स्वरूपीं. २०. ज्या प्रकारें. २१. माझे मार्गी=माझी प्राप्ति व्हावी एतदर्थ. किंवा सर्व चरणाचा अर्थ.—मनुष्यमात्र माझाच मार्ग अनुसरतो. २२. आपण केलेल्या कर्माचें फळ. २३. श्रीकृष्णाव्यतिरिक्त दुसरे, मारुति, म्हसोबा, वगैरे. २४. तत्क्षणीं, तावडतोब, लवकर. २५. कर्माची सिद्धि (फळ).

ज्यां सृजिले[1] चारी वर्ण[2] । गुणकर्म[3] विभागून । त्यांचा कर्ता मी जाण । परी अव्यय[4] असें. ॥ १३ ॥ कर्मी जाणते[5] पाहीं । कीं मज कर्मइच्छा[6] नाहीं । ऐसें जो जाणे कांहीं । कर्मी[7] तो न बांधिजे. ॥ १४ ॥ ऐसें जाणोनि करीं कर्म[8] । मोक्ष इच्छूनि न करीं धर्म, । या कारणें वर्णाश्रम । केला पाहिजे[9]. ॥ १५ ॥ अकर्म कर्म[10] तें कोण? । कर्में वोळखावीं जाण; । आईक तें सांगेन । अशुभांतूनि[11] सूटसी. ॥ १६ ॥ कर्माचें ज्ञान असावें । विकर्म[12] तें ओळखावें । अकर्मी[13] चित्त न धीवें[14] । कर्मगती गहन म्हणोनियां. ॥ १७ ॥ कर्म[15] तेंचि अकर्म पाहे । अकर्म तें कर्म होऊनि राहे । मनुष्यांत बुद्धिवंत आहे । जो सर्वज्ञ सर्वकर्त्ता. ॥ १८ ॥ सर्व कर्मारंभ करी । कामना त्यजूनि अवधारी । ज्ञानाग्नीनें दाहकारी[16] । म्हणती तोचि पंडित[17]. ॥ १९ ॥ फलेच्छा त्यजी । तृप्त असोनि निराश्रयो[18] जी! । प्रकृतिकर्मी सहजीं । न बांधिजेल[19]. ॥ २० ॥ शरीरचित्त[20] स्ववश[21] करिशी । आशापरिग्रह[22] टाकिशी । शरीरें[23] कर्म करिशी । असा न पावे बंधातें. ॥ २१ ॥ सुखदुःखातें न धरी । लाभालाभीं चोंड[24] न करी । द्वंद्वातीत[25] विचारी[26] । तो बंध न पावे. ॥ २२ ॥ कर्तृत्वापासूनि[27] मुक्त । अखंड स्वरूपीं जयाचें

---

१. उत्पन्न केले. २. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण. ३. गुण आणि कर्में यांचे विषयीं पुढें अध्याय १८ मध्यें विवेचन केलेलें आहे. ४. निष्क्रिय, निर्विकार. ५. ज्ञाते, ज्ञानी. ६. कर्मफलेच्छा. ७. तो कर्मामुळें बद्ध होत नाहीं, त्याला कर्में बद्ध करूं शकत नाहींत. ८. प्रत्येक वर्णाच्या लोकांनीं करावयाचीं कर्में तीं. ९. ही ओवी मूळ गीताश्लोकाशीं ताडून पाहतां बरीच भिन्नार्थक दिसते. १०. कर्म म्हणजे काय? आणि अकर्म (कर्मशून्यता) म्हणजे काय?. ११. सुखदुःखापासून, पापपुण्यापासून. १२. निषिद्ध कर्म, शास्त्रविरुद्ध कर्म, दुष्कर्म. १३. कर्मशून्यता. १४. मूळांत 'अकर्मणश्च बोद्धव्यं' (अकर्मही जाणलें पाहिजे) असें आहे. यावरून येथील 'न'कार लेखकप्रमादजन्य असावा. १५. ह्या पद्याच्या गूढार्थाचें प्रो० भानूंनीं आपल्या 'श्रीमद्भगवद्गीतें'त सविस्तर विवेचन केलें आहे, तें पहावें. [प्रथम षडध्यायी—भाग २ पृ० ५०९—५३० पहा]. १६. सर्व कर्में ज्ञानरूपी अग्नीनें दहन करणारा, भस्म करणारा. 'दाह करी' असा अन्यपाठ. १७. पंडित कोणाला म्हणावें हें पुन्हा पुढें पांचव्या अध्यायांतही सांगितेलेलें आहे. (ओंवी १८ पहा). १८. आश्रयाची अपेक्षा न करणारा. १९. कर्में बद्ध करूं शकत नाहींत. २०. देह आणि मन. २१. स्वाधीन. २२. आशा हीच कोणी पत्नी तीतें किंवा आशा आणि परिग्रह (सभोंवतालचा पसारा), अथवा आशापरिग्रह=आशेचें मूळच. २३. शरीरानें (मनानें नव्हे.) वाचिक व मानसिक कर्में बद्धक होतात परंतु शारीरिक कर्में बद्धक होत नाहींत—असा भगवंतांच्या सांगण्याचा आशय आहे. २४. आवड, गोडी. २५. भेदभावाच्या (बरेंवाईट, शीतोष्ण, सुखदुःख यांच्या) पलीकडे गेलेला. २६. आत्मप्राप्तीविषयीं ज्याच्या मनांत नेहमीं विचार घोळतात असा पुरुष. २७. 'मी कर्ता' ह्या अहंकारापासून.

चित्त । [1]यज्ञार्थ कर्म आचरत । तेणें तें पावत [2]लयातें. ॥ २३ ॥ [3]कर्ता, [4]हव्य, आणि अग्नि, । होम, ब्रह्म जाणोनी । [5]कर्मब्रह्मसमाधि लावुनी । ब्रह्मींच [6]पावे. ॥ २४ ॥ इंद्रातें भावेंचि यज्ञ । कर्मयोगी उपासिती जाण; । ब्रह्माग्नींत चित्त मन । ज्ञानी [7]यज्ञरीतींच होमिती. ॥ २५ ॥ [8]श्रोत्रादि ज्ञानेंद्रियें । [9]संयमाग्नीं होमिती तयें । [10]शब्दादिक विषये । [11]इंद्रियाग्निषु होमिती. ॥ २६ ॥ इंद्रिय कर्मप्रधान । कर्म सर्वांसि जाण । [12]संयमाग्नींत [13]होमून । [14]निरोधाग्नींत [15]होमिती. ॥२७॥ एक द्रव्य वेंचिती । [16]त्रिविध तप करिती । एक योगातें अनुष्ठिती । [17]स्वाध्याय यज्ञ. ॥ २८ ॥ अपान होमिती प्राणीं । अपानीं प्राण अर्पुनी । हटयोग हा जाणोनी । यज्ञें यज्ञफळ पावती. ॥ २९ ॥ अल्प नेमूनि आहारें । [18]प्राणीं प्राण नेमिती खरे । हटयोगी निर्धारें । यज्ञेंचि यज्ञफळ. ॥ ३० ॥ [19]यज्ञशेष जे भक्षिती । अमृतपानें ब्रह्म पावती । यज्ञशेष जे न करिती । तयां नाहीं परलोक. ॥ ३१ ॥ ऐसे बहु [20]विस्तारले । यज्ञ ब्रह्म झाले । सर्व कर्म विस्तारलें । हें उमजल्या [21]सूटसी. ॥ ३२ ॥ सांगीतला द्रव्ययज्ञ । ब्रह्मार्पण [22]हुतयज्ञ । लौकिक वैदिक यज्ञ । [23]ज्ञानीं हे सर्व [24]संपती. ॥ ३३ ॥ रिघावें [25]सद्गुरूसी शरण । करावें पादसेवन । मग ते तुज उपदेशिती ज्ञान । तेणें पावन होशील. ॥ ३४ ॥ ऐसें ज्ञान जाणितल्यावरी । मग मोह न पावसील संसारीं । आत्मरूप देखसी चराचरीं । [26]ऐक्यतेसी. ॥ ३५ ॥ सकळ पापियांमाझारी । थोर पातकी तूं असती जरी । तरी या [27]ज्ञाननावेंत निर्धारीं । तरसी पापसागर. ॥ ३६ ॥

---

१. यज्ञयागासाठीं. २. तें (कर्म) लयातें पावत=कर्म दोषापासून मुक्त होतें, बद्धक होत नाहीं. ३. यज्ञकर्ता. ४. यज्ञांत आहुति टाकितात ती. ५. ब्रह्मकर्मांचें—ब्रह्मस्वरूपाचें चिंतन करायाचें तीच कर्मांची समाधी. ६. ब्रह्मपदाला जाई. ७. यज्ञ करितात त्याप्रमाणेंच. 'यज्ञरीतींत' असें पाठांतर. ८. कान, डोळे, नाक इत्यादि. ९. आत्मसंयमनरूपी अग्नीमध्यें. आत्मसंयमन करितात—हा इत्यर्थ. १०. शब्द, रस, गंध, स्पर्श इत्यादि. ११. इंद्रियस्वरूपी अग्नीमध्यें. इंद्रियनिग्रह करितात—हा भावार्थ. 'इंद्रियाग्नींत' असा पाठभेद. १२. आत्मसंयमरूपी अग्नींत. १३. होमून=प्रदीप्त, प्रज्वलित करून (?). १४. इंद्रियनिरोधरूपी अग्नीमध्यें. १५. होमून टाकतात, यज्ञ करितात. १६. कायिक, वाचिक आणि मानसिक. १७. वेदांचें अथवा उत्तमोत्तम ग्रंथांचें पठन करणें. १८. प्राणवायूमध्येंच. १९. यज्ञामध्यें राहिलेला जो अवशिष्ट भाग तो. (अध्याय ३ ओंवी १३ पहा). २०. सविस्तर सांगितले. २१. मुक्त होशील. २२. 'बहुत यज्ञ' पाठांतर. २३. ज्ञानामध्यें. २४. अंतर्भाव होतो, अंतर्भूत होती. ज्ञानीं (ज्ञानप्राप्ति झाल्यावर) हे सर्व (यज्ञयागादि) संपती (यांचें माहात्म्य मनास भासेनासें होतें)—असा अर्थही संभवनीय आहे. २५. गुरुमुखाशिवाय, गुरूपदेशाशिवाय—कोणतीही विद्या पूर्णपणें प्राप्त होत नाहीं; हें प्रसिद्धच आहे. गुरूचें माहात्म्य अनेक कविजनांनीं वर्णिलें आहे:—(१) गुरुविणें न घडे परमा मती । गति शुकादि गुरूसचि मागती ॥ [वामनपंडित], (२) गुरुबिन ग्यान मिलेना पूरा । [देवनाथ]. २६. अभेदपणानें, द्वैतरहित. २७. ज्ञानरूपी नौकेच्या योगानें.

जैसें महाभार[१] इंधन[२] । भस्म होय अग्निसंगें जाण । सर्व कर्में जाळून । ज्ञानाग्नी भस्म करी. ॥ ३७ ॥ ज्ञानासारिखें पवित्र । आणीक नाहीं सर्वत्र । तें ज्ञान सिद्धियोगें[३] करितां निरंतर । ज्ञानेंकरूनि[४] पाविजे. ॥ ३८ ॥ ज्ञान पाविजे भक्ति करूनि । इंद्रियें नेमिजे तत्पर होऊनी । ज्ञाननिष्ठा पावोनी । थोरत्व[५] पावती. ॥ ३९ ॥ श्रद्धाहीन[६] ज्ञानहीन[७] । तो संशयबुद्धी[८] जाण । त्या दोन्हीं[९] लोक नाहीं जाण । सुख त्या नसे. ॥ ४० ॥ [१०]कर्मयोगातें करिती । जे शास्त्रें[११] मुक्त होती । आत्मज्ञानातें पावती । धनंजया! ॥ ४१ ॥ या कारणें अज्ञान । हृदयीं उपजे [१२]संशय करून । तें ज्ञानें तोडून । योगें[१३] करीं[१४].' ॥ ४२ ॥

---

## अध्याय पांचवा.

पार्थ म्हणे, 'श्रीकृष्णनाथा! । [१५]संन्यासकर्म सांगतां । कर्म कीं संन्यास[१६] तत्वता । निश्चयें[१७] सांग.' ॥ १ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'पार्था! । [१८]कर्मसंन्यास दोन्ही उभयतां । फल एक[१९] दोहींचें विचारितां । परंतु कर्म श्रेष्ठ. ॥ २ ॥ असा जाणावा 'संन्यासी' । इच्छाद्वेष[२०] नसे मानसीं । [२१]द्वंद्व तोडोनि पावे ज्ञानासी । बंधा[२२]-पासोनि मोकळा. ॥ ३ ॥ [२३]सांख्ययोग दोन्हीं । हे वेगळे म्हणती ज्ञानी[२४] । पंडित म्हणती जनीं । दोहींचें फळ एक. ॥ ४ ॥ सांख्यें[२५] जें स्थान पाविजे । योगानें[२६]

---

१. पुष्कळ, मोठा ढीग. २. सर्पण, जळाऊ लांकडें. ३. योगसिद्धि, योगाभ्यास. ४. येथें 'कालेंकरूनि' (कांहीं काळानंतर)–असा पाठ असावयास पाहिजे होता. मूळांत 'कालेन' असें पद आहे. ५. श्रेष्ठपद, मुक्ति. ६. ज्याची कशावर श्रद्धा नाहीं असा. ७. अज्ञानी. ८. ज्याला कोणतीही गोष्ट खरी वाटत नाहीं असा. ९. हा लोक आणि परलोक. १०. 'कर्मत्यागातें' असा पाठ असता तर तो विषयप्रतिपादनाला पोषक झाला असता. मूळांत 'योगसंन्यस्तकर्माणं' असें पद आहे. ११. शास्त्राध्ययन करून. १२ संशय उत्पन्न झाल्यामुळें. १३. कर्मयोग, शास्त्रविहित कर्में करणें. १४. येथें 'कर्मब्रह्मार्पणयोग' नामक चतुर्थाध्याय समाप्त झाला. १५. संन्यास (कर्मत्याग) आणि कर्म (कर्मयोग). १६. कर्मयोग श्रेष्ठ किंवा कर्मसंन्यास श्रेष्ठ हें सांगा. १७. निश्चयपूर्वक, स्पष्टपणें. १८. कर्म (कर्मयोग, कर्मानुष्ठान) आणि संन्यास (कर्मत्याग; नित्यनैमित्तिक, व्यावहारिकादि कर्में न करणें). १९. कोणत्याही मार्गानें आचरण केलें तरी दोहोंपासून फलप्राप्ति एकच (मोक्ष). २०. कामक्रोधादि षड्विकाररहित. २१. भेदबुद्धि, द्वैतभाव. २२. बद्ध करणारें जें कर्म त्यापासून, संसारापासून. २३. सांख्य=ज्ञानमार्ग, योग=कर्ममार्ग. २४. येथें 'म्हणती अज्ञानी' असा पाठ असावयास पाहिजे. मूळांत 'बालाः प्रवदन्ति' (मूर्खलोक म्हणतात) असें आहे. २५. ज्ञानमार्गानुसार आचरण केलें असतां. २६. कर्ममार्गानुरूप कर्में आचरल्यास.

ते स्थळीं जाइजे । [1]सांख्ययोग जाणिजे । तोचि जाणता. ॥ ५ ॥ ऐसा संन्यास न जाणिजे । कर्माविण कैंवि पाविजे । कर्मयोगें जाइजे । ब्रह्मलोकीं. ॥ ६ ॥ योगकर्म केलिया । शुद्धत्व होय आत्मया । [4]जितेंद्रिय [5]विषयां । करूनि [6]अलिप्त जो. ॥ ७ ॥ कर्म करूनि [7]म्हणती नाहीं । देखणें आइकणें पाहीं । [8]गंध भोजन निद्रा गमन तेंही । श्वास टाकणें ही आठ. ॥ ८ ॥ बोलणें आणि घेणें देणें । [9]पातें पातया लावणें उघडणें । हा [10]इंद्रियें व्यापार करणें । ऐसें मानूनि वर्तती. ॥ ९ ॥ ब्रह्मार्पण कर्म करी । [11]संग त्यजूनि असे निर्धारीं । पापें न लिंपे ऐशिया परी । [12]पद्मपत्र उदकीं जैसें. ॥ १० ॥ कर्मफळाची इच्छा त्यजुनी । शांतीनिष्ठा पावे मनीं । [13]कायामनेंयुक्त आचरोनी । फळ टाकूनी कर्म करी. ॥ ११ ॥ ज्ञानी मुक्तीतें पावती । कर्म करूनि फलेच्छा टाकिती । [14]कामनाबंधें पडती । ते बद्ध होत. ॥ १२ ॥ मनें करूनि कर्मे जो त्यजी । ज्ञानी त्यास म्हणिजे जी ! । [15]देही [16]नवद्वारपुरीं जी ! । न करी, न [17]करवी. ॥ १३ ॥ ईश्वर नाहीं कर्म करित । [18]कर्तृत्व या [19]लोकांत । न [20]कर्मफलभोगांतें । [21] [22]संसारचक्र असे. ॥ १४ ॥ कोणाचें पाप [23]नै घे जाण । पुण्याचें नलगे कारण । अज्ञानें वेष्टिले जन । त्याणें भोग भोगिती. ॥ १५ ॥ अज्ञान गेलियावरी । [24]ज्ञान प्रगटवी

---

१. सांख्य आणि योग या दोहोंचें रहस्य, या दोहोंचें ऐक्य. २. योगाभ्यासाशिवाय. ३. आत्मया शुद्धत्व होय=आत्मा अहंकारशून्य व वासनाशून्य होतो. ४. इंद्रियांचें ज्यानें दमन केलें आहे असा. ५. निरनिराळ्या इंद्रियांचे निरनिराळे विषय (कर्मे). ६. निर्लेप, कर्माच्या •दोषांपासून अलिप्त. ७. निष्काम कर्मयोगी म्हणती—हा इत्यर्थ. ८. गंध=वास घेणें. ९. पातें=डोळ्यांची पापणी. डोळे उघडणें किंवा मिटणें—हीं कर्में. १०. इंद्रियें आपापल्या विषयांच्या ठिकाणीं व्यापार करितात, आपण कांहीं करित नाहीं, असें ज्ञानी समजतात—हा इत्यर्थ. 'ही इंद्रियें' असें पाठांतर. ११. आसक्ति, फलेच्छा. १२. कमलपत्र. पद्मपत्र जैसें उदकीं न लिंपे (कमलपत्र जसें पाण्यापासून अलिप्त असतें) ऐशिया परी (त्याप्रमाणें) [ज्ञानी, योगी] पापें न लिंपे (पापापासून अलिप्त राहतो)—असा सान्वयार्थ. १३. शरीरानें आणि मनानें. १४. लोभाच्या झपाट्यांत सांपडल्यामुळें, कर्मफलेच्छेच्या ठिकाणीं आसक्ति ठेविल्यामुळें. १५. देह धारण करणारा. १६. नऊ आहेत द्वारें जिला अशा नगरींत, देहामध्यें. १७. ज्ञानी कोणतींही कर्में करीत नाहीं व करवीतही नाहीं. १८. 'मी कर्त्ता' असा अहंकार, कर्तृत्वाचा अभिमान. १९. हे लोक= प्राकृत लोक, मूढजन. २०.आपण केलेल्या कर्माच्या फळाचा आपण उपभोग घ्यावा ही इच्छा तीतें. २१. मागील 'करीत नाहीं' ह्या क्रियापदाचा अन्वय ह्या चरणांशीं लाविला असतां अर्थ सुस्पष्ट होतो. २२. मायेचा खेळ. २३. 'न घे' ह्या क्रियापदाचा कर्त्ता 'ईश्वर' (ओवी १४ पहा). २४. आत्मज्ञान, परब्रह्मज्ञान.

अंतरीं । [1]तो ईश्वररूप निर्धारीं । ज्ञानवंत जाण तूं. ॥ १६ ॥ जो मन आणि बुद्धीतें । ईश्वरीं स्थापी निश्चितें । भय नाहीं तयातें । [2]मुक्त होय. ॥ १७ ॥ [3]विद्याविनयसंपन्न । गाय[4]गजसूकरश्वान । हे जयासि सम जाण । तोचि ज्ञानी पंडित. ॥ १८ ॥ [5]सम ज्यांचे जीवीं वसे । त्यांहीं संसार जिंकिलासे । निर्दोषही वसतसे । [6]ब्रह्मीं तो [7]सम. ॥ १९ ॥ सुख झालिया हर्ष नाहीं । दुःख झालिया क्रोध नाहीं । बुद्धी करूनि स्थिर तेही । ते ब्रह्मीं पावती. ॥ २० ॥ बाह्यसुखातें त्यजी । हृदयीं आत्मसुख जाणोन जी ! । ब्रह्मसुखीं निरंतर जी ! । अक्षयसुख भोगी. ॥ २१ ॥ [8]स्पर्शे संसार [9]गरलसार । तें दुःखाचें मूळ निरंतर । नाश होत अपार । कौंतेया ! ज्ञानी सुखी. ॥ २२ ॥ योगियातें हा योग । कामक्रोधांचा वेग[10] । साहूं सके सांग । तो [11]योगी सुखी असे. ॥ २३ ॥ ज्याचें हृदय [12]प्रकाशे । [13]अंतरसुख [14]आराम भासे । तोचि योगी असे । ब्रह्मीं [15]निर्वाण पावतो. ॥ २४ ॥ प्राणी पाप टाकीत । ब्रह्मीं जे लीन होत । त्यांचें सुख त्यांचे हृदयांत । सर्वभूतहितें[16]रत असे. ॥ २५ ॥ कामक्रोधविरहित । आत्मा जाणोनि वश करित । तोचि ज्ञानवंत म्हणत । [17]ब्रह्मात्मवित्. ॥ २६ ॥ बाह्य विषय संसार । त्यजोनि, दृष्टी [18]भोंवयांवर । प्राणायाम समकर । प्राण

---

१. तो=ज्याचे अंतःकरणांत आत्मज्ञानाचा प्रकाश पडला आहे असा, आत्मज्ञानी पुरुष. 'तों ईश्वरस्वरूपी' असा अन्यपाठ २. जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतो. ३. श्रीमद्भागवतांत पंडितलक्षण वर्णिलेलें आहे, तेंही येथें देण्यासारखें आहे:—'ब्राह्मणे पुल्कसे स्तेने ब्राह्मण्येऽर्के स्फुलिंगके । अक्रूरे क्रूरके चैव समदृक् **पंडितो** मतः ॥' [स्कंध ११, अध्याय २९, श्लोक १४] भगवान् श्रीकृष्णांनी पंडितलक्षण मागें चवथ्या अध्यायांतही एकदां सांगितलें आहे (ओवी १९ पहा). याखेरीज आणखी पंडितलक्षणें जाणण्याची इच्छा असल्यास महाभारत—उद्योगपर्व—विदुरनीति अध्याय ३३ श्लोक २०—३४ व श्लोक ४५ यांत वर्णिलेलीं आहेत, तीं पाहावीं. ४. गज=हत्ती. ५. समबुद्धि, समता. ६. ब्रह्माच्या ठायीं, ब्रह्मस्वरूपीं. ७. समबुद्धि, ज्याच्या अंतःकरणांतील भेदभाव नाहींसा झाला आहे असा. ८. इंद्रियांशीं विषयांचा स्पर्श (संयोग) झाल्यामुळें. ९. विषश्रेष्ठ, अत्यंत दुःखोत्पादक पदार्थ. १०. कामक्रोधादि षड्रिपूंचा वेग (झपाटा) सांग (नीटपणें) साहूं (सहन करूं) शकणें—हाच योग होय—हा भावार्थ. ११. त्या योग्यालाच खरें सुख प्राप्त होतें. १२. अंतर्ज्योतीनें प्रकाशे, आत्मसाक्षात्कारानें ज्याचे हृदयांत प्रकाश पडला आहे अशा पुरुषाचें. १३. आंतूनच सुख, बाह्यविषयांवर अवलंबून नसलेलें सुख. १४. आनंद, विश्रांतीचें स्थान. १५. निर्वाणपद, ब्रह्मसुख, स्वस्वरूपस्थिति. १६. सर्व प्राणिमात्राचें हित करण्याविषयीं तत्पर. १७. ब्रह्मज्ञानी, ज्याला ब्रह्मपरिचय झाला आहे असा. १८. दोन्ही भोंवयांचे मध्यभागीं, नासाग्रीं.

अपान सम करूनियां; ॥ २७ ॥ इंद्रियबुद्धिमन जिंकिलें । मुक्तीसाठीं मन घातलें । इच्छाभयक्रोध त्यजिले । मुक्तपद पावला[1]. ॥ २८ ॥ जपतप यज्ञांचा भोक्ता । सर्वलोकांत ईश कर्त्ता । शांति पावे जाणता[2] । सर्वांचा सखा[3] जाण मीं.[4]' ॥ २९ ॥

## अध्याय सहावा.

'कर्माचें फळ नापेक्षितां[5] कर्म करी । तोचि संन्यासी योगी अवधारीं[6] । जो साग्निककर्माचा[7] अधिकारी । तो कर्मयोगी नव्हे. ॥ १ ॥ ज्यातें संन्यासी म्हणती । तो योग जाणें निश्चितीं । संकल्प न टाकिला किरीटी ! । तो योगी नव्हे. ॥ २ ॥ योगारूढ[8] जो इच्छित । तया कर्म[9] हें निभ्रांतें[10] । योग पावल्या शांत । शमबुद्धि[11] तोची. ॥ ३ ॥ इंद्रियार्थीं झाला हीनें[12] । कर्म निपजों राहे आपण[13] । तयासि संन्यासी म्हणोन । योगारूढ[14] बोलिजे. ॥ ४ ॥ निज आत्मा उद्धरत । उद्योगावांचूनि मन टेवित । आपला शत्रु आपण जाणत । मित्र आपुलें चित्तें[15] पैं. ॥ ५ ॥ बंधुरात्मा[16] चित्त जितोनी । तें चित्त बंधू जाणोनी[17] । स्वरूपीं[18] वोळखी नाणी । चित्त शत्रुवत् वर्ते. ॥ ६ ॥ मन जिणोनि शांति पावे । तया परे[19]निष्ठा जाणावें । ऐसियासि सुखदुःख न पावे । तैसेच मानापमान ॥ ७ ॥ ज्ञान[20]विज्ञानतृप्त झाले । अविनाश[21] विषय गेले । जेयां[22] सुवर्ण[23]मृत्तिका हें

---

१. ओव्या २७–२८ यांचें युग्मक आहे. २. मला जाणणारा. ३. खरा मित्र. ४. येथें 'कर्मसंन्यासयोग' नामक पांचवा अध्याय संपूर्ण झाला. ५. अपेक्षा न करितां, आशा न ठेवतां. ६. ऐक, जाण. ७. अग्निहोत्रहोमहवनादि कर्मांचा. ८. योगरूपी पर्वतावर आरूढ होऊं इच्छिणारा, योगप्राप्तीकरितां झटणारा. ९. कर्मयोग हेंच साधन आहे—असा मथितार्थ. १०. खरोखर. ११. ज्याची वृत्ति निश्चल झाली आहे तो. १२. आसक्तिविरहित, वासनाशून्य. १३. आपोआप. वासनेचा नाश झाल्यामुळें कर्मांची उत्पत्ति थांबते. असा पहिल्या दोन चरणांचा अर्थ. १४. ज्याचा योग सिद्ध झाला आहे असा. १५. 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः' हें वचन ह्या पद्याशीं ताडून पाहण्यासारखें आहे. १६. आत्मा हाच बंधु. येथील 'बंधु' हा शब्द निष्कारण दिसतो. १७. 'जाणी' (समजे) असा पाठ असावा. १८. [जो] स्वरूपीं वोळखी नाणी (ज्याला स्वस्वरूपज्ञान प्राप्त झालें नाहीं) [त्याचें] चित्त शत्रुवत् (शत्रूप्रमाणें वर्ते)—असा अर्थान्वय. १९. परमात्म्याचे ठिकाणीं ज्याची निष्ठा आहे असा. २०. वेदांतशास्त्राचें ज्ञान आणि अनुभवज्ञान यांनीं ज्यांचें अंतःकरण तृप्त झालें आहे असे. २१. चिरंजीव. २२. 'तयां' असें पाठांतर. संन्यासी व योगी हे एकरूपच होत असें येथें प्रतिपादन केलें आहे. २३. सोनें आणि माती हीं ज्याला सारखींच वाटतात असे पुरुष. 'पदार्थांवरील भोग्यदृष्टि नष्ट झाली; हवें नको हा भेद संपला; म्हणजे सर्व पदार्थ सारख्याच

नकळे । ते योगी जाण तूं. ॥ ८ ॥ सोयरे बंधु मित्रजन । वैरी, सखा, [1]उदासीन । यांतें मानी समान । तो [2]समबुद्धी. ॥ ९ ॥ योगी एकांतीं बैसोनी । असावें रहस्य ध्यानीं । चित्त आत्मा जिंतोनी । टाकी [3]आशापरिग्रहें. ॥ १० ॥ [4]पवित्र [5]शुद्धदेशीं जाण । स्थिर करावें आसन । [6]उंचनीच नसावें जाण । [7]कुशचर्मवस्त्र आंथरोनी; ॥ ११ ॥ मन इंद्रियें चित्त [8]नेमुनी । बैसावें तये आसनीं । आत्मशुद्धी व्हावयालागोनी । योग करावा. ॥ १२ ॥ काया [9]सम करोनि कटि हनवटी । दृष्टि दीजे [10]नासापुटीं । स्थिर कीजे श्वासाची [11]परिपाटी । [12]दिशाअवलोकन न करावें. ॥ १३ ॥ निर्मल मनेंकरूनी । निर्भय मनीं होऊनी । ब्रह्मचर्य आचरोनी । मज सांनिध्य होइजे. ॥ १४ ॥ चित्त ठेवीं माझे ठायीं । मी [13]निजवस्तू पाहीं । [14]समाधि होऊनि राहीं । [15]मज तत्पर अर्जुना ! ॥ १५ ॥ सदा मन [16]लक्ष्यीं असतां । नये बहु खातां । [17]उपोषण न करितां । [18]न जागतां अर्जुना ! ॥ १६ ॥ अति आहार नसावा । कर्मीं [19]बोध असावा । बुद्धिवंतें साधावा । योगें[20] दुःखनाशक. ॥ १७ ॥ [21]युक्त आहार स्वल्प । कर्मचेष्टा करी अल्प ।

---

किंमतीचे होतात असा अर्थशास्त्रकारांचाही समज आहे.' [प्रो० भानु यांची 'श्रीमद्भगवद्गीता'–प्रथम षडाध्यायी–भाग २ पृ० ७९८.]

१. तटस्थ असणारा. २. समान आहे बुद्धि ज्याची असा योगी. ३. आशा (वासना, आसक्ति) आणि परिग्रह (परिवार, मायेचा गुंता). ४. येथून अभ्यासयोगास सुरुवात झाली. पुढें ३२ व्या ओंवीपर्यंत हाच विषय आहे. ५. पवित्र व शुद्ध अशा ठिकाणीं. ६. फार उंच किंवा फार खोलांत. ७. पहिल्यानें कुश (दर्भ), त्यांवर चर्म (मृगचर्म, व्याघ्रचर्म) आणि त्यावर वस्त्र–आंथरावें. ८. परमात्म्याचे ठिकाणीं लय लावून. नियमित करून, आवरून. ९. काया (शरीर), कटि (कंबर), आणि हनुवटी सम (सरळ) करून असा अन्वय. मूळांत 'समं कायशीरोग्रीवं' (शरीर, मस्तक आणि मान हीं सरळ करून) असें आहे. १०. नासाग्रीं, नाकाच्या टोंकाकडे. ११. चलनवलन. १२. हिकडे तिकडे पाहूं नये. १३. नित्यवस्तु, शाश्वतवस्तु (मोक्ष). १४. समाधियुक्त होत्साता. समाधीचें लक्षण:—'ध्यानस्याविस्मृतिः सम्यक्**समाधि**रभिधीयते ।'—म्हणजे:—ध्यानाची उत्तम अविस्मृति (पक्की आठवण) तीच समाधि होय. १५. मत्परायण, माझ्या ठायीं लीन. १६. ध्याननिमग्न, ईश्वरचिंतनांत गढून गेलेलें. १७. उपोषण (कांहींच न खाणें) करितां न (नये, येत नाहीं). १७. जागतां (सर्वरात्र जागणें) न (नये). १९. युक्तायुक्त कर्माविषयीं ज्ञान. २०. 'योग'शब्दाचा स्वाभाविक अर्थ 'समागम' असा आहे. योगशास्त्रांत या शब्दाच्या वरील व्यापक अर्थाचा संकोच होऊन 'कांहीं एक विशिष्ट प्रकारचा समागम' इतकाच अर्थ 'योग'शब्दानें ध्वनित होतो. 'आपल्या शुद्ध व निर्मळ चित्ताचा परमात्म्याशीं संयोग किंबहुना 'तादात्म्य' म्हणजे योग असा या शब्दाचा अर्थ आहे.' [प्रो० भानु]. २१. मित, आवश्यक तेवढाच.

सुषुप्ति[१] असे नेमस्त । सिद्ध[२] तेव्हां खरा. ॥ १८ ॥ चित्त नेमिलें[३] असे । केवळ आत्माचि[४] दिसे । निर्वातसदनीं[५] दीप असे । तैसी[६] उपमा योगियासी. ॥ १९ ॥ चित्त नेमिलें[७] असे । आत्मा केवळ दिसे । जेथें आत्मा वसे । संतोष पाहे. ॥ २० ॥ अतिसुख जें अनुभवेंकरूनी । इंद्रियां अगोचर[८], बुद्धिज्ञानें[९] जाणोनी । जो स्थिर दृढ आपुले मनीं । तो न चळे[१०] कांहीं निश्चित. ॥ २१ ॥ यापरता आणिक लाभ नाहीं । त्याहून अधिक न मानी कांहीं । राहूनि सुखाचे ठोहीं[११]। अत्यंत दुःख न चळे. ॥ २२ ॥ जेथें दुःखसंबंध नाहीं । तोचि योग जाणावा निश्चित पाहीं. । वैराग्ययुक्त अंतःकरण करूनि राहीं । योगाभ्यासीं. ॥ २३ ॥ संकल्पमात्रेंचि झाले[१२] । काम ते सर्व टाकिले । मनें इंद्रियग्राम धरिले । दडूनियां सर्वत्र; ॥ २४ ॥ बुद्धि करूनि[१३] धोरणेनें[१४] । हळुहळु स्थिर करीं मन । चिन्मात्रीं योजीं चित्तालागून । मन कांहीं चिंतूं[१५] नये. ॥ २५ ॥ मन चंचल, नाहीं स्थिर, । धांवे सैराट[१६], न धरी धीर । तया आंवरोनि, विचार[१७] । राहे आत्मतत्वीं[१८]. ॥ २६ ॥ अंतःकरण ज्याचें शांत । त्या योगिया सुख अत्यंत । रजोगुणें मुक्त ब्रह्मभूत[१९] । ऐशिया प्रशांती[२०]. ॥ २७ ॥ सदा आत्मचिंतन करितां । योगी कि-ल्बिषें[२१] जिंती तत्वतां । सुखेंचि ब्रह्मीं[२२] सायुज्यता । अनंत सुख पावतो. ॥ २८ ॥ आत्मत्वें[२३] सर्व भूतें देखे । सर्वात्मा[२४] आपण कौतुकें । योगयुक्त[२५] आत्मा देखे । सर्वत्र समान तया. ॥ २९ ॥ मज सर्वाठायीं वोळखे । मी सर्वत्र त्यास देखें ।

---

१. निद्रा; योग्यानें दहा घटिका रात्रीस निजून पहांटेच्या दहा घटिका रात्रीस उठावें, असें शास्त्र आहे. २. ज्यास योगसिद्धि प्राप्त झाली आहे असा, योगी. ३. चित्ताचें संयमन केलें आहे. ४. जो आत्मस्वरूपामध्येंच मग्न असतो. ५. निवांतस्थानीं, जेथें वारा नाहीं अशा ठिकाणीं. कविकुलगुरु कालिदासानेंही हा दाखला आपल्या काव्यांत योजिला आहे. [कुमारसंभव—सर्ग ३, श्लोक ४८ पहा]. ६. निश्चल, स्तब्ध, स्थिर. ७. निरोधिलें, आवरून धरिलें. ८. अगम्य, इंद्रियातीत. ९. बुद्धि व अनुभवज्ञान यांच्या योगानें. १०. आत्मस्वरूपापासून चलन पावत नाहीं. ११. आश्रयास, स्थितीमध्यें. १२. झालेले, उत्पन्न झालेले. १३. स्थिर करूनी—हा भाव. १४. एकाग्रतेनें. १५. मनांत कोणत्याही विषयासंबंधानें कल्पना येऊं देऊं नयेत. १६. सैरावैरा, हिकडे तिकडे. 'मन हें ओढाळ गुरूं, परधनपरकामिनीकडे धांवे' हें सर्वांस माहितच आहे. १७. आत्मतत्वीं (आपल्याच ठिकाणीं) विचार राहे (राहील) [असें कर]—हा भाव. १८. येथें 'आत्मत्वीं' असा मूळचा पाठ असावा. १९. ब्रह्मस्वरूपी. २०. उत्तम शांति. २१. किल्बिषें जिंती=पापांस जिंकितो, निष्पाप होतो. २२. ब्रह्माचे ठिकाणीं लीन होणें, ब्रह्मस्वरूपी होणें. २३. आपल्या ठायीं. २४. आपण सर्वात्मा=आपण सर्व भूतांचे ठायीं. २५. समाधिनिष्ठ.

माझे निमित्तें सुखें । मी त्याचा तो [१]माझा पैं. ॥ ३० ॥ सर्वभूतीं जो आत्मत्वें भजत । तो सर्वथा संसार नाहीं वर्तत । [२]मजवेगळें नाहीं होइजेत । तोचि मीं असें. ॥ ३१ ॥ [३]आपलें सुखदुःख सर्वत्र । जे देखती जीवमात्र । ते योगी परम पवित्र । ते थोर [४]मम [५]संमत.' ॥ ३२ ॥ **पार्थ** म्हणे, 'योग सांगीतला । **देवा**! नाहीं तो म्यां पाहिला । चंचळ मन याला । [६]निग्रह केंवि घडे ? ॥३३॥ मन चंचल बहु, [७]**कृष्ण**! । इंद्रियांहूनि बळकट गहन । वायूचे परी जाय घेवोन । त्याचा निग्रह [८]दुष्कर असे. ॥ ३४ ॥ 'खरेंचि सांगतों **अर्जुना**! । मन चंचल आवरेना । [९]अभ्यासवैराग्यें जाणा । जिंकिलें जातें. ॥ ३५ ॥ ज्याचें अंतःकरण स्थिर नाहीं । तो [१०]दुःखेंकरूनि योगासि न पवे कांहीं । ज्यास आत्मा वश्य झाला पाहीं । तो [११]उपायें योगासी पावे सत्य.' ॥ ३६ ॥ **पार्थ** म्हणे, '**कृष्णनाथा**! । भक्तियुक्त होवोनि प्रयत्न करितां । योगी [१२]चळोनि सिद्धि न पावतां । कोण गती पावे ? ॥ ३७ ॥ मूढपणें न पावतां । [१३]उभयभ्रष्ट तो तत्वतां । याची गती विचारितां । '[१४]नासे जैसें अभ्र दिसे वितळे.' ॥ ३८ ॥ **पार्थ** म्हणे, '**कृष्णा**! । हा संशय छेदेना । तुजवांचूनि दीनजना । न दिसे [१५]संशयपरिहरिता.' ॥ ३९ ॥ **देव** म्हणे, 'योगाभ्यासी [१६]नाहीं । ऐसें कवणासी

---

१. सारांशः—तो ईश्वराच्या ठायीं अगदीं तद्रूप होऊन जातो. २. माझ्यापासून वेगळा होत नाहीं, माझ्याच ठिकाणीं राहतो. ३. आपल्याप्रमाणेंच. ४. मला (भगवान् श्रीकृष्णांना). ५. मान्य. ६. निरोध करणें, आवरून धरणें. ७. भक्तजनांचीं पापें मुळासकट उपटून नाहींशीं करणाऱ्या देवा! (श्रीकृष्णा). 'कृष्ण' हा शब्द 'कृष्'=उकरून काढणें, मुळासहित उपटणें—ह्या धातूपासून सिद्ध झाला आहे. ८. अवघड, दुःसाध्य. ९. अभ्यास आणि वैराग्य यांचे योगानें. "अभ्यास म्हणजे कोणत्या तरी एका चित्तवृत्तीमध्यें पुष्कळ कालपर्यंत मनाला स्थिर ठेवणें, म्हणजे तीच तीच वृत्ति निरंतर उद्भवूं देणें याचें नांव अभ्यास······वैराग्य म्हणजे दिसणारे अगर न दिसणारे जे काय विषय व त्यांचे उपभोग आहेत ते सर्व दुष्ट, बद्धक, आहेत, असा निश्चय वरचेवर करित गेल्यानें जी वितृष्णा उत्पन्न होते तिचें नांव वैराग्य होय." [प्रो० भानु]. १०.कितीही कष्ट सोसले तरी. ११. योग्य उपाय केले असतां. उद्योग केला असतां कोणती गोष्ट साध्य होणें अशक्य आहे? 'नर करनी करे तो नरका नारायन होत' ही कबीरोक्ति लक्षांत ठेवण्यासारखी आहे. १२. योगापासून मन चळल्यामुळें. १३. कर्म व ज्ञान या दोन्ही मार्गांपासून भ्रष्ट. १४. येथें 'भासे' असा पाठ असता तर बरें झालें असतें. १५. कृष्णा! तुजवांचुनी दीनजनां हा संशय छेदेना (तुझ्याशिवाय बाकीचीं पामर, मूढ अशीं माणसें हा माझा संशय फेडूं शकणार नाहींत); [तुजवांचुनी] संशयपरिहरिता (माझ्या संशयाचा परिहार करणारा) न दिसे—असा सान्वयार्थ. १६. येथें कांहीं अपपाठ असावासें भासतें. नाहीं=नष्ट झाला, नाश पावला (?).

घडलें नाहीं । मोक्षमार्गीं चालतां कांहीं । [1]दुर्गतीं न जाय. ॥ ४० ॥ [2]पुण्य-श्लोक [3]स्वर्गवासी । वर्षें बहुत स्वर्गासी । शेवटीं श्रीमंताचे कुशी । जन्म घेणें. ॥ ४१ ॥ योगियांचे कुळीं जन्मोन । आपुल्या पुण्यें करून । लोकीं दुर्लभ होऊन । या [4]लोकीं; हे रीती. ॥ ४२ ॥ तया [5]जन्मीं [6]पूर्वदेहबुद्धी, । तो मोक्ष-प्रयत्न करी बोधीं । ज्ञानाध्यासबळें सिद्धी । साधी; हे कुरुनंदना! ॥ ४३ ॥ [7]पूर्वी अभ्यासाचा धडा । म्हणोनि योग स्मरला पुढां । योगाचा विचार गाढा । वेदातें अतिक्रमी. ॥ ४४ ॥ ज्ञान प्रयत्न करी । पाप दोष होती दुरी । मग ज-न्मांतरीं । मुक्ति पावे. ॥ ४५ ॥ [8]तपस्वियांहूनि [9]अधिक । ज्ञान्यांहूनि [10]संमत असे एक । [11]कर्मियांहूनि अधिक । यास्तव योगी होय तूं. ॥ ४६ ॥ [12]योगीश्वरां-माझारी । [13]अंतःकरण ठेवी निर्धारीं । तो भक्त अवधारीं । तो योगी मज [14]मानलो.'[15] ॥ ४७ ॥

---

## उपासनाकांड.

## अध्याय सातवा.

'अर्जुना! अवधारीं । मन माझे ठायीं ठेवोनि योग करीं । तुझे संशय नास-तील [16]ज्यापरी । तें सांगेन आतां. ॥ १ ॥ ज्ञान [17]विज्ञानसहित । तुज सांगेन समस्त । जें [18]जाणितलिया निश्चित । [19]जाणणें न उरे. ॥ २ ॥ मनुष्यांचिया सहस्रांमधें । सिद्धीतें पावती एखादे । ऐसिया सिद्धसहस्रांमधें । मज [20]जाणे

---

१. दुर्गति प्राप्त होत नाहीं. २. पुण्य (पवित्र) आहे श्लोक (कीर्ति) ज्यांची असे, पुण्यशील. श्लोक=कीर्ति. 'पद्ये यशसि च श्लोकः' इत्यमरः. ३. स्वर्गवासी (मृत) झाल्यावर. ४. ह्या ठिकाणीं 'अवतार घेती' हे शब्द अर्थपूरणार्थ पदरचे घेतले पाहिजेत. 'बुद्धिवंत जोगी-कुलनु आन लेय अवतार' [तुळसीदास]. ५. योगीकुळांत जन्म प्राप्त झाल्यावर. ६. पूर्वजन्मार्जित ज्ञान [ही प्राप्त होतें]. ७. मागच्या जन्मीं. ८. तपस्वी=तपश्चर्या करणारा, व्रती. (१) 'अनुकम्प्यस्तपस्वी स्यात् तपस्वी च धृतव्रतः' इति हारावली. (२) 'तपस्वी तापसे चानुकम्प्ये च' इति श्रीनिवासचंपु. (३) 'तपस्वी चानुकम्पार्हः' इत्यमरः. ९. श्रेष्ठ. १०. मान्य, पूज्य. ११. कर्मठांपेक्षां. १२. योगीश्रेष्ठांमध्यें सुद्धां. १३. जो परमेश्वराचे ठिकाणीं आपलें अंतःकरण ठेवितो. १४. मान्य झाला, पसंत पडला. १५. येथें 'ध्यानयोग' अथवा 'आत्मसंयमयोग' नामक सहावा अध्याय संपला. १६. ज्या रीतीनें, जेणेंकरून. १७ प्रत्यक्ष अनुभवासहित ज्ञान. १८. जाणल्यावर. १९. जाणण्यासारखें कांहीं शिल्लक राहातच नाहीं, मनुष्य सर्वज्ञ होतो. 'एकविज्ञाने सर्वं विज्ञातं भवति' अशी श्रुति आहे. २०. सत्यत्वेंकरून जाणतो, माझें यथार्थ स्वरूप समजतो.

एखादा. ॥ ३ ॥ पंचभूतें मन बुद्धि श्रेष्ठ । ऐसीं हीं अहंकार आठ[1] । ऐसी [2]प्रकृति [3]जुनाट । असे [4]वेगळाली. ॥ ४ ॥ यांहींहुनी [5]आणीक असे प्रकृति । [6]जीवभूतां [7]ते [8]महाबाहो! धरिती । [9]उत्पत्तिप्रलयस्थिती । [10]तयांमाजी. ॥ ५ ॥ सर्वभूतांची [11]योनी । वर्ते तया अधिष्ठुनी । [12]सती झाली मजपासुनी । सर्वांचें उत्पत्तिप्रळयस्थान मी असें. ॥ ६ ॥ यापरतें कांहीं । अर्जुना! दुसरें नाहीं । मीच अवघे ठायीं । जैसा सूत्रीं मणी, [13]पटीं तंतू. ॥ ७ ॥ सर्व रसांची गोडी । चंद्रसूर्य माझी [14]प्रौढी । पुरुषीं पुरुषत्वाची [15]गाढी । [16]ॐकार तो वेदीं जाण मीं. ॥ ८ ॥ मी पृथ्वीचा [17]गंधविषय । अग्नींत जठराग्नी मीं होय । जीवांचा [18]जीवनठाय । तापसीयांत तप मी. ॥ ९ ॥ सर्वभूतांचें [19]बीज मी होऊन । सर्व वर्तणूक मजपासून । बुद्धिवंताची बुद्धि आदिकरून । तेजस्वियांचें तेज मीं. ॥ १० ॥ बलवंताचें जें बळ । [20]कांमरागविवर्जित सकळ । [21]धर्माविरुद्ध [22]भूतीं मी केवळ । काम तो मीच जाण. ॥ ११ ॥ सात्विकराजसतामस भाव । मजपासूनि झाले सर्व । तें मज आधीन आहे तत्व । [23]तयांमाजी मी नाहीं. ॥ १२ ॥ [24]त्रिगुण मजपासोनि झाले । तेथूनि हें विश्व रचिलें । तेणें भुलोनि, मज [25]चुकले । नेणती परम अव्यय. ॥ १३ ॥

---

१. पृथ्वी, उदक, अग्नि, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें व मन, बुद्धि आणि अहंकार मिळून आठ. २. सृष्टि, माया. ३. पुराण, शाश्वत. ४. विभागलेली. ५. निराळी, दुसरी. ६. सकल जीवमात्रातें. 'जीवभूतांतें' असें पाठांतर. ७. ते (परा, श्रेष्ठ प्रकृति) जीवभूतां धरिती (धरिते, धारण करिते). सारांश ती ह्या जगताला आधार आहे. ८. हे आजानुबाहो अर्जुना! ९. उत्पत्ति=उत्पन्न करणें, प्रलय=नाश; व स्थिति=पोषण, संरक्षण करणें. १०. तिच्या हातांत. येथें 'तियेमाजी' असा पाठ असणें आवश्यक आहे. ११. उत्पत्तिस्थान. १२. सती (?) येथें कांहीं अपपाठ आहे काय? १३. पट=वस्त्र. 'पटीं तंतू' हा दृष्टांत मूळांत नाहीं. १४. थोरवी, मोठेपणा. १५. थोरवी. १६. ओंकार=देवत्रयीवाचक शब्द. 'ॐ' हा शब्द अ, उ, आणि म हीं तीन अक्षरें मिळून झालेला आहे. 'अ' म्हणजे विष्णु, 'उ' म्हणजे शिव आणि 'म' म्हणजे ब्रह्मा, तेव्हां ॐ हें देवत्रयाचें नाम होय—'अकारो विष्णुरुद्दिष्ट उकारस्तु महेश्वरः । मकारस्तु स्मृतो ब्रह्मा प्रणवस्तु त्रयात्मकः ॥' [विशेष माहितीकरितां मुक्तेश्वरकृत वनपर्व—काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० १ टीप २ पहा]. १७. सुवास. १८. प्राण, आत्मा. १९. बीजांत जसा वृक्ष, त्याच्या शाखा, त्याचीं पानें, फुलें, फळें वगैरे असतात, त्याप्रमाणें माझ्यामध्यें सर्व जगत् असतें—हा इत्यर्थ. २०. इच्छाद्वेषरहित. हें बळाचें विशेषण. २१. धर्म+अविरुद्ध=अधर्मशून्य, धर्मास अनुकूळ. हें 'कामा'चें विशेषण. २२. प्राणिमात्राचे ठायीं. २३. त्यांच्या स्वाधीन. २४. सत्व, रज आणि तम—हे त्रिगुण. २५. चुकले (चुकलेले, मूढजन) परम (श्रेष्ठ) [आणि] अव्यय (अविकृत) [असा जो मी त्या] मज (मला) नेणती (जाणत नाहींत)—असा सान्वयार्थ.

माझी माया हे त्रिगुण[1] । त्यजावया अशक्य जाण । जे करिती माझें भजन । मम मायेतें ते तरती. ॥ १४ ॥ पापी मूर्ख जाण । मज नेणती अधम जन । मायेनें हेरपलें[2] ज्ञान । असुरभाव[3] पावले. ॥ १५ ॥ लोक चतुर्विध[4] भजती मज । जे नर आहेति सुकृतांचें बीज । तत्व इच्छिती सहज । दुःखी[5], अर्थकामी[6], जिज्ञासु[7], ज्ञानी[8]. ॥ १६ ॥ त्यांमध्यें नित्ययुक्त[9] म्हणोनी । मम मत श्रेष्ठ ज्ञानी; । ज्ञानियासि आवडें[10] म्हणोनी । ज्ञानी तो मज[11] प्रिय. ॥ १७ ॥ सर्व हे उदार[12] असती । त्यांमाजी ज्ञानी ते माझा आत्मा होती । म्हणूनि आश्रयें असती । माझिया ते सुखें. ॥ १८ ॥ बहुत जन्म कष्टोनी । ज्ञान पावे कृपेकरूनी । वासुदेव[13] सर्व जाणोनी । तो मज[14], ऐसा दुर्लभ. ॥ १९ ॥ अभिलाषें[15] ज्ञान गेलें । अन्यदेवता[16] भजों लागले । स्वप्रकृतीवश[17] झाले । त्या त्या नेमें[18] करूनियां. ॥ २० ॥ जे ज्या देवातें भजती । श्रद्धेनें सिद्धी इच्छिती । तयांची मनकामनातृप्ती । त्या देवतेनें[19] मी करीं. ॥ २१ ॥ श्रद्धेकरूनि[20] अन्य देवतीं । त्यांची आराधना करिती । जे इष्टकामना पावती । तयां अचळश्रद्धा[21] मीच असें. ॥ २२ ॥ हीनबुद्धि[22] मागती । ते नाशवंत फळ पावती; । जयांचें भजन तयां तेचि गती[23] । मज भजती ते पावती[24]. ॥ २३ ॥ मातें कोणी नेणती । अव्यक्त व्यक्तीं[25] आलें म्हणती । माझा उत्कृष्टभाव[26] नेणती । मूढपणें[27]. ॥ २४ ॥ मी सर्वांस प्रगट नाहीं । योगमायेनें वेष्टिलें[28] पाहीं । अज[29] अव्यय[30] असोनही । मूढ नेणती. ॥२५॥

---

१. त्रिगुणयुक्त. २. हिरावून घेतलें. ३. राक्षसासारखी वृत्ति, तामसी वृत्ति. ४. हे चतुर्विध लोक कोण हें पुढें चौथ्या चरणांत सांगितलेलें आहे. ५. दुःखपीडित. ६. धन मिळवूं इच्छिणारे. ७. आत्मज्ञानप्राप्तीची ज्यांना इच्छा आहे असे. ८. ज्यांना आत्मज्ञान प्राप्त झालें आहे असे. ९. ज्याचें चित्त सर्वकाळ माझ्याकडे लागलेलें असतें असा. १०. [मीं] आवडें=मी आवडतों, ज्ञानी पुरुषाला मीच प्रिय असतों. ११. मज प्रिय=माझेंही त्याच्यावर प्रेम असतें. १२. महान्, मोठे, उत्कृष्ट. १३. वासुदेवमय सर्व जगत् आहे असें जाणून. वासुदेव=सर्व विश्वाला मायेनें वास्यति (आच्छादित करितो व प्रकाशित करितो) तो देव. १४. येथें 'भजे' हें क्रियापद अध्याहृत आहे. १५. निरनिराळ्या वासनांच्या योगानें, वेगवेगळ्या कामनांमुळें. १६. मदितर निराळ्या देवता, क्षुद्र दैवतें. १७. आपापल्या स्वभावांस वश. १८. निरनिराळ्या देवतांचे निरनिराळे नियम पाळून. १९. त्या त्या देवतांकडून. २०. श्रद्धापूर्वक, निष्ठापुरःसर. २१. दृढभक्ति. २२. मंदबुद्धि, अल्पबुद्धि, मूढजन. २३. जे क्षुद्रदेवतांना भजतात, ते त्या क्षुद्रदेवतांप्रत जातात. २४. मज पावती (माझ्याकडे येतात). २५. माझें अव्यक्त (अस्फुट, अस्पष्ट, अज्ञेय) असें जें सर्वश्रेष्ठ स्वरूप तें व्यक्तीं आलें (व्यक्त झालें) असें म्हणती. देहातीत, प्रपंचातीत असा जो मी, तो मी देहधारी, प्रापंचिक झालों असें म्हणतात—हा इत्यर्थ. २६. सर्वश्रेष्ठ स्वरूप. २७. अज्ञानामुळें. २८. ह्या क्रियापदाचें कर्म 'मज' अध्याहृत. २९. जन्मरहित. ३०. विकारशून्य.

ों जीं झालीं भूतें । आतां वर्तमान जीं वर्ततें । भविष्यही मज कळतें ।
ला कोणी नोळखे कीं. ॥ २६ ॥ इच्छाद्वेषापासून । द्वंद्वमोह उपजला तेथून ।
। भूतसृष्टीचे आदि जाण । मोहातें पावती; अर्जुना ! ॥ २७ ॥ ज्यांचें पाप
लें । ते द्वंद्वमोहनिर्मुक्त झाले । माझे भजनीं निघाले । दृढबुद्धी करूनियां.
। २८ ॥ जरामरणनाशार्थी । आश्रयें मम यत्न करिती । ते ब्रह्म जाणती ।
र्म अध्यात्म अवघें. ॥ २९ ॥ अधिभूत आधिदैवत माझे ठायीं । जाणती
यज्ञवेत्ते यज्ञासही । मरणकाळीं मज जाणितलें पाहीं । ते योगयुक्त झाले.' ॥३०॥

---

## अध्याय आठवा.

पार्थ म्हणे, 'पुरुषोत्तमा ! । कैसा निर्वाडा कर्मब्रह्मा ? । अधिभूत अधिदैवत आम्हा । निर्वंडूनी सांगिजे. ॥ १ ॥ अधियज्ञ कसा ? कोण ? । देहांत वोळखावा कवण ? । अंतकाळीं तूं मधुसूदन ! । यतेचित्तीं केंवि जाणिजे ?' ॥ २ ॥ 'अक्षर तेंचि ब्रह्म । सद्भाव तोचि अध्यात्म. । भूतभावांचें विसर्गकर्म । तें कर्म जाणिजे. ॥ ३ ॥ अक्षर तें अधिभूत । जीवात्मा अधिदैवत. । आदि अनंत सर्वांत । अधियज्ञ देहीं मी. ॥ ४ ॥ अंतकाळीं मज स्मरोनी । जो जाय कलेवर टाकोनी । तो पावे मजलागूनी । येथें नाहीं संशय. ॥ ५ ॥ ज्या

---

१. वर्ततात, सध्या असणारीं. २. मी त्रिकालज्ञ आहें—हा भाव. ३. द्वैतभावरूपी मोह. ४. आरंभापासून, सृष्ट्युत्पत्तीपासून. ५. मम आश्रयें=माझा आश्रय करून. ६. त्यांनी ब्रह्मज्ञान, अध्यात्मज्ञान, कर्मज्ञान इत्यादि सर्व ज्ञानें प्राप्त होतात—हा इत्यर्थ. ७. या ओंवीचें स्पष्टीकरण भगवंतांनीं आठव्या अध्यायांत केलें आहे; म्हणून येथें टीपा दिल्या नाहींत. ८. ह्या अध्यायास 'ज्ञानविज्ञानयोग' असें नांव आहे. हा अध्याय येथें संपला. ९. स्पष्टीकरण. १०. स्पष्ट करून. ११. तूं=तुला. १२. चित्ताचें नियमन ज्यांनीं केलें आहे त्यांनीं, आत्मसंयमी पुरुषांनीं. १३. अविकारी, अविनाशी. १४. असणेपणा, स्वतःसिद्धत्व. १५. भूतमात्रांचें, चराचरांचें. १६. उत्पत्ति आणि वृद्धि करणारें आचरण. १७. नाश न पावणारें. १८. चिच्छक्ति. १९. सर्व देवतांमध्यें श्रेष्ठ. २०. सर्वांत (सर्व चराचराचे ठायीं असणारा) [आणि] देहीं (या देहामध्यें असणारा) [असा जो] आदि (जन्मरहित) अनंत (मरणरहित) मी (भगवान् श्रीकृष्ण) [तोच] अधियज्ञ (सर्व यज्ञांत श्रेष्ठ असा यज्ञ) [होय]—असा स्पष्टार्थ. 'यज्ञो वै विष्णुः' इत्यादि श्रुति प्रसिद्धच आहे. २१. देह, शरीर. २२. माझ्या स्वरूपाला जाऊन मिळतो, ईश्वराशीं तादात्म्य पावतो, मुक्त होतो. 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' (ब्रह्मज्ञान झालेल्या पुरुषास ब्रह्मत्व प्राप्त होतें) इत्यादि श्रुति आहे.

ज्या भावें स्मरतां । होय ५५

म्हणोनियां. ॥ ६ ॥ यास्तव मज सेव५॥८

करीं; । माझे ठायीं मनबुद्धि दृढ धरीं । तेणें मज

अभ्यासयोगें करून । चित्त अन्यत्र न करी गमन । ।स्व

जाण, । **पार्था**! ते परमपुरुषातें पावती. ॥ ८ ॥ कवि आणि पुराण । लाव.
शिक्षा करी जाण । सर्वउत्पत्तिकारण । सूक्ष्माहूनि सूक्ष्म; ॥ ९ ॥ ऐसा जो अंतकाळीं । मन चंचळ करी ते वेळीं । भक्तियोगें तो बळी । प्राणें भ्रुकुटी भेदी, परमपुरुषातें पावे. ॥ १० ॥ ज्यास अविनाशपद ज्ञाने बोलती । जें इच्छूनि ब्रह्मचर्य आचरिती । तैयातें संन्यासी विरक्त होवोनी पावती । तें संक्षेपें सांगेन मी. ॥ ११ ॥ सर्व द्वारें रोधूनी । मन हृदयीं ठेवूनी । प्राण मस्तकासि नेऊनी । अनुष्ठिती योगी योग. ॥ १२ ॥ ॐमिति ब्रह्म उच्चारितां । माझें स्मरण करितां । जो होय देह त्यजिता । तो पावे परमगतीस. ॥ १३ ॥ चित्त

---

१. ज्या ज्या=निरनिराळ्या देवता, क्षुद्र दैवतें. २. भक्तिपूर्वक. ३. त्यांतें पावे=त्या त्या देवतांच्या स्वरूपीं जाऊन मिळतो. 'त्या त्या भावें' असा अन्यपाठ. ४. त्या देवतेचे ठिकाणीं भक्ति. ५. 'अहो येतां, जातां, उठत, बसतां, कार्य करितां, सदा देतां, घेतां, वदनिं वदतां ग्रास गिळितां । घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं । समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करीं. ॥' ही **वा**मनपंडितोक्ति प्रसिद्धच आहे. ६. माझ्या नांवाचा उच्चार कर, माझें भजन कर. ७. हे अर्जुना! युद्धाला आरंभ कर. युद्ध केलें असतां अर्जुनाचें अहित (पारमार्थिक) कोणत्या प्रकारें होण्याचें टळेल, हें **भ**गवंतानीं पुढील दोन चरणांत सुस्पष्ट केलें आहे. ८. मन आणि बुद्धि. ९. दृढाभ्यासानें, नित्य अनुचिंतनानें. १०. अन्य विषयांचे ठायीं. ११. परम (श्रेष्ठ) पुरुष (आत्मा) त्याप्रत, परमात्म्याशीं. १२. सर्वज्ञ, सर्वद्रष्टा. १३. अनादि, सनातन. १४. सर्व चराचराचें शासन, नियमन. १५. सर्वांस उत्पन्न करणारा. १६. अत्यंत सूक्ष्म, लघूत्तम. १७. हें परमात्मस्वरूपाचें वर्णन आहे. १८. येथें 'निश्चल' असा पाठ असावा. मूळांत 'मनसाऽचलेन' असें आहे. १९. भक्तियुक्त होऊन. २०. ज्यास योगबळ (समाधिसामर्थ्य) प्राप्त झालें आहे असा. २१. प्राणें भ्रुकुटी भेदी=जो आपल्या प्राणवायूस योगबलानें भोंवयांच्या मध्यें (मध्यबिंदूवर) उत्तम प्रकारें स्थिर करितो तो. योगशास्त्रांत एकंदर सहा चक्रें वर्णिलेलीं आहेत त्यांपैकीं हें 'आज्ञाचक्र' होय. सहा चक्रांचीं नांवें:—मूलाधारचक्र, स्वाधिष्ठानचक्र, मणिपुरचक्र, अनाहतचक्र, विशुद्धचक्र, आणि आज्ञाचक्र. ह्या चक्रांविषयीं सविस्तर माहिती **वा**मनपंडितांनीं आपल्या '**य**थार्थदीपिके'त सांगितली आहे, ती जिज्ञासूंनीं त्या ग्रंथांत पाहावी. २२. येथें 'ज्ञानी' असा पाठ असावा. मूळांत 'वेदविदः' असें पद आहे. २३. त्या अविनाशपदातें. २४. इंद्रियें. २५. प्राणवायु मस्तकांत नेऊन. २६. आचरतात. २७. ब्रह्माचें वाचक 'ॐ' हें अक्षर.

, तयां मी सुलभ होईं । योग[1]-

युक्त जे पावले मज । तयांसि पुनर्जन्म

हे आहे चोज[2] । थोरगती[3] पावल्याचें. ॥ १५ ॥ जे

करून । तयां असे मागुती[4] पतन[5] । मज पावल्या अर्जुना! जाण । जन्मा नये मागुता. ॥ १६ ॥ सहस्र[6]युगपर्यंत । ब्रह्मयाचा दिवस होत । तैसाच रात्रीचा संकेत[7] । ही[8] अहोरात्रिज्ञानी[9] जाणती. ॥ १७ ॥ अव्यक्त जे असती । ते ब्रह्मदिवसा व्यक्त होती । रात्रि झालिया प्रळय[10] पावती । अव्यक्ताचे ठायीं. ॥ १८ ॥ ही पंचभूतांची सृष्टी । उपजे[11] जाय[12] पुढतपुढती[13] । नाश पावे ब्रह्म-दिनांतीं । पुन्हा दिवसीं[14] उत्पत्ति होय; अर्जुना! ॥ १९ ॥ मायेपासूनि ईश्वर । अव्यक्त व्यक्त नित्य स्थिर । सर्वभूतांत निरंतर । तो न नाशे, जग नासतां[15].॥२०॥ अव्यक्त[16] अक्षर[17] ऐसें बोलती । तीच माझी परमगती । तेथें पावलिया पुढती । तयां जन्म नाहीं. ॥ २१ ॥ तो परमपुरुष जाण गा! पार्था! । तया भक्ति[18] पाविजे तत्त्वतां[19] । भूतीं[20] प्रपंच निरुता । ज्यानें जग व्यापिलें. ॥ २२ ॥ ज्या काळीं योगी मरण पावोनि जन्मा न येती । आणि मरण झालिया पुनरावृत्ती[21] होती । तें सकळ अर्जुना! तुजप्रती । सांगेन मी. ॥ २३ ॥ दिवस आणि शुक्लपक्षदैवत अग्नी । षण्मास उत्तरायण जाणोनी । तेथें[22] जाती, देह त्यजुनी, । ते ऐक्य होती ब्रह्मीं जाण[23]. ॥ २४ ॥ कृष्णपक्ष, रात्री, धूम, जाण । दैवत

---

१. समाधिनिष्ठ. २. कौतुक, नवल. ३. परमगति, उत्तम गति (मोक्ष). ४. ब्रह्मदेव राहातात त्या लोकास ब्रह्मलोक असें नांव आहे. भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, आणि सत्यं हे सात लोक. ५. पुनर्जन्म. ६. ब्रह्मदेवाचा एक दिवस म्हणजे मानवी एक हजार युगें! ७. परिमाण, प्रमाण, बेत. ८. ही गोष्ट. ९. दिवस आणि रात्र यांचे परिमाण जाणणारे, ज्योतिषी. १०. नाश. ११. उत्पन्न होते. १२. जाते, नाश पावते. १३. पुढतोपुढती, पुन्हा पुन्हा. हा शब्द मुक्तेश्वराचे कवितेंत ठिकठिकाणीं आढळतो. [वनपर्व—अ० १ ओंवी ७० व १५४; आदिपर्व—अ० २० ओंवी ३० पहा]. १४. ब्रह्मदेवाचा दिवस सुरू होतो तेव्हां. १५. सर्व जगाचा नाश झाला तरी, सर्व जग बुडालें तरी. १६. इंद्रियातीत, अगम्य. १७. अविनाशी, शाश्वत. १८. भक्तिपूर्वक. १९. तत्वतः, खरोखर. २०. सर्व चराचरांचे ठायीं. २१. पुनर्जन्म. २२. जेथें दिवसाची देवता, शुक्लपक्षाची देवता, आणि अग्नि यांचें अधिष्ठान आहे तेथें. २३. ह्या ओंवीच्या स्पष्टीकरणार्थ पुढील लांब उतारा येथें घेतल्याबद्दल आमचे वाचक आमच्यावर रागावणार नाहींत अशी आशा आहे:—"ब्रह्म-वेत्ते लोकांस प्रकाशक देवतांचें पाठबळ असल्यामुळें त्यांस पुनर्जन्म येणें संभवनीय नाहीं. प्रकाश

एक दक्षिणायन । योगी जे त्यजिती प्राण । त्यां पुनरावृत्ति होय. ॥ २५ ॥ शुक्लकृष्ण या दोनी गती । ज्ञान अज्ञान यांसि म्हणती । एक गतीपासूनि होय मुक्ती । एकेंकरून जन्म धरी. ॥ २६ ॥ दोन्ही आहेति सृती । यांस योगी जाणती । ते मोहातें न पावती । यास्तव योगयुक्त होय; अर्जुना! ॥ २७ ॥ वेदयज्ञतपदान । यांचें जें बोलिजे पुण्य । ज्या असे शुक्लकृष्णगतीचें ज्ञान । तो पुण्यवंत परमगतीतें पावे.' ॥ २८ ॥

---

## अध्याय नववा.

अर्जुनासी म्हणे कृष्ण, । 'हें गुह्य असे परमपावन । तूं भक्त माझा म्हणोन । सांगेन ज्ञानविज्ञानसहित. ॥ १ ॥ गुह्य राजविद्या जाण । उत्तम तें पवित्रपण । हें प्रत्यक्ष धर्म जाण । सुख देतसे नाशरहित. ॥ २ ॥ या धर्मी श्रद्धा नाहीं । तो मज न पवे कांहीं । जन्मसंसारीं वर्ते पाहीं । जीवरूपें. ॥ ३ ॥

---

व प्रकाशक देवता ज्ञानपोषक आहेत, असा पूर्वीचा समज सर्वत्र होता. प्रसिद्ध कवि **मिल्टनमध्यें** प्रकाश म्हणजे ज्ञान असें प्रकट करणारीं अनेक कवितास्थळें दाखवून देतां येतील. शिवाय प्रकाशानें जितकें ज्ञानसंपादन होतें, तितकें इतर भूतांकडून होत नाहीं. एवंच प्रकाश हा ज्ञानपोषक असल्याकारणानें दिवसा, शुक्लपक्षांत व उत्तरायणांत, सारांश उत्तरायणांतील शुक्लपक्षाच्या दिवसा जर मरण आलें तर तो भाग्यवान् समजावा; (कारण त्या जीवाला मार्गदर्शक प्रकाशक देवता असतात), असा प्रकार असणें, असें मत असणें साहजिकच होतें, तसेंच उत्तरेकडे राहणाऱ्या लोकांस सूर्यप्रकाश ज्यास्त वेळ मिळतो, हेंही विसरतां कामा नये. शिवाय आलीकडील शास्त्रान्वयें सूर्यकिरणांनीं आकर्षित झालेला जीव पृथ्वीवर येणें शक्य नाहीं, पण चंद्राकर्षित जीव पृथ्वीवर येऊं शकेल, हें पृथ्वी ही सूर्यमालेतील एक ग्रह व चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह आहे हें ध्यानांत ठेविलें असतां समजणार आहे. एवंच अज्ञानमार्गानें जाणारे लोक पुनर्जन्म पावतात व ज्ञानमार्गानें जाणाऱ्या लोकांस पुनर्जन्म येत नाहीं; ते उत्तम लोकांप्रत जाऊन शेवटीं मुक्त होतात. अद्वैताचें ज्ञान झाल्यावर मुक्त होतात.' [प्रो० **भानु** यांची 'श्रीमद्भगवद्गीता'–द्वितीय षड्ध्यायी–पहिला भाग 'आठव्या अध्यायाचा उपसंहार'–पृ० १५७–१५८ पहा].

१. पुनर्जन्म. २. गति, मार्ग. ३. योगाभ्यासरत. ४. येथें 'अक्षरब्रह्मयोग' अथवा 'तारकब्रह्मयोग' नामक आठवा अध्याय संपला. ५. गुप्त ज्ञान. ६. ज्ञान=शास्त्रादिकांचें ज्ञान; विज्ञान=प्रत्यक्ष अनुभवाचें ज्ञान; यांसह. ७. श्रेष्ठ विद्या, सर्व विद्यांचा राजा (अध्यात्मविद्या). ८. धर्माला साधक, धर्माविरोधी. ९. अक्षय्य, कालस्थलाबाधित. १०. जन्ममरण आणि संसार यांच्या चक्रांत परिभ्रमण करीत राहतो.

मी सर्व जगाचे ठायीं, । व्यापक[1] सर्वभूतीं[2] पाहीं, । सर्वभूतें माझे ठायीं, । मज आश्रयो[3] नसे. ॥ ४ ॥ माझे ठायीं न राहती भूतें । माझें ऐश्वर्य[4] तें निरुतें[5] । भूतांतें मी धरीं आरुतें[6] । भूतांवेगळा असोनी. ॥ ५ ॥ वायू सर्वांचे ठायीं । अव्यक्तमूर्ति[7] पाहीं । भूतें सर्व माझे ठायीं । वायूचे परी. ॥ ६ ॥ सर्वभूतें अर्जुना ! । प्रकृतीतें[8] पावती जाणा । कल्पांतीं[9] सांठवून[10] । कल्पादीं[11] सृजीं[12] मी. ॥ ७ ॥ प्रकृतीचे बळें करूनी । सृजीं[12] मागुतेमागुतेनी[13] । हा सर्व भूतग्राम[14] आदिकरोनी । प्रकृतीचे आधीन असती. ॥ ८ ॥ म्हणोनि कर्म तयांचिया । मला न बाधे धनंजया[15] ! । उदास[16] होऊनियां । आसक्त तेथें[17] नव्हें[18]. ॥ ९ ॥ प्रकृति माझ्या अधिष्ठानें[19] करून । चराचरातें प्रसवे जाण । याकारणें हे अर्जुन ! । जगास जन्ममरण होतसे. ॥ १० ॥ मज मनुष्य मूढलोक[20] म्हणती । मनुष्यांची अज्ञानगती । मी ईश[21] ऐसें नोळखती । ते मूर्ख जाण पैं. ॥ ११ ॥ या पुरुषांची आशा निष्फळ[22] । तैसेंच कर्म आणि ज्ञान चंचळ । त्यांची गती न निर्मळ । राक्षसी आसुरी मोहिनी[23] योनी पावती. ॥ १२ ॥ महासुबुद्ध[24] निगुती ।

---

१. व्यापून राहिलेला, ओतप्रोत भरलेला. २. 'भू, जल, तेज, समीर, ख, रवि, शशि, काष्ठादिकीं असे भरला । स्थिरचर व्यापुनि अवघें, तो जगदात्मा दशांगुळें उरला. ॥' ही प्रल्हादोक्ति कोणास माहीत नाहीं ? ३. मज [त्यांचा, भूतांचा] आश्रयो नसे–असा अन्वय. मी सर्व भूतमात्रांचें आश्रयस्थान आहें, पण मला मात्र कोणाचा आधार नाहीं; मी निराधार स्वयंशक्त आहें–असा भावार्थ. ४. अघटितघटनाचातुर्य, ईश्वरी करणी. ५. खरोखर. ६. अलीकडे. ७. अगोचर, अदृश्य, निरवयव. ८. माझ्या प्रकृतीचे ठिकाणीं लीन होतात. ९. कल्पाचा क्षय होण्याचे वेळेस. १०. आपल्या प्रकृतीचे ठिकाणीं अंतर्भूत करून. ११. कल्पाच्या आरंभीं. कल्प=ब्रह्मदेवाचा दिवस. देवांचीं दोन युगसहस्रें झालीं म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो ! त्यांपैकीं एक युगसहस्र उत्पत्तिकाल आणि एक युगसहस्र प्रलयकाळ. १२. उत्पन्न करितों. १३. पुनः पुन्हा. १४. चराचराचा समुदाय, भूतसमूह. १५. अर्जुना ! अर्जुनास धनंजय असें नांव पडण्याचें कारणः– 'जिंकोनी भूपाळांचीं धनें । यज्ञीं देवब्राह्मण दीनें । तोषवी म्हणोनी व्यासवचनें । धनंजय हें नांव. ॥ ७८ ॥' [मुक्तेश्वर–विराटपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–अध्याय ६ पृ० ५५]. १६. विकारशून्य, निःसंग. १७. त्या कर्मांचे ठायीं, कर्मामध्यें. १८. नसतों, होत नाहीं. १९. अध्यक्षत्वामुळें, आधिपत्याचे योगानें. २०. अज्ञानी लोक. २१. सर्वभूतांचा स्वामी, ईश्वर. २२. निरर्थक, व्यर्थ. २३. मोहपूर्ण. राक्षसांची आणि असुरांची जी मोहपूर्ण योनी ती धारण करितात. २४. उत्कृष्ट ज्ञानी.

अर्जुना! ते [1]सदाश्रित होती । [2]मनोभावें तत्पर असती । अंतीं एक म्हणोनियां. ॥ १३ ॥ माझें [3]कीर्तन सदा करी । हेंच व्रत मनीं दृढ धरी । आणि भक्ति [4]उपासना करी । मन तत्पर होवोनी. ॥ १४ ॥ कितीएक [5]ज्ञानयज्ञें करून । माझी उपासना करिती जाण । [6]पृथकत्वें [7]एक जाणून । मी [8]विश्वतोमुखी. ॥१५॥ मीच [9]याग, आणि [10]यज्ञ करणें, । मीच [11]स्वधाकार, [12]औषधी जाण । मंत्र, [13]आज्य आणि अग्नि आदिकरून । [14]हुतें मीचि असें. ॥ १६ ॥ मी जगाचा मातापिता । मी पवित्र ॐकार असें तत्वता । [15]चहूं वेदांचा वक्ता । तो मीच असें. ॥ १७ ॥ मी [16]गती, [17]साक्षी, [18]पोषक, । समस्तां [19]स्थान एक । [20]अधिष्ठान, रक्षक, । द्रव्य, [21]बीजें हें जाणणें. ॥ १८ ॥ उत्पत्तिप्रलयस्थान । मीच असें सर्वांचें कारण । मोक्षकाळ मी जाण । [22]सदसत् मीच असें. ॥ १९ ॥ ते ज्ञाते [23]सोमपान करिती । स्वर्गलोक पावावया इच्छिती । तेणें पुण्यें इंद्रलोकीं पावती । [24]दिव्य देवभोग. ॥ २० ॥ ते स्वर्गी वास करिती । [25]क्षीणपुण्यें मृत्युलोका येती । [26]मायीक धर्म आचरिती । [27]कामी काम. ॥ २१ ॥ [28]अन्यठायीं मन न घालिती । [29]मम उपासना जे करिती । त्यांचा [30]योगक्षेम निश्चितीं । करणें मज पडे. ॥२२॥

---

१. सदाश्रित=सत्+आश्रित. सत् म्हणजे पूज्य असा जो मी, त्या माझे ठिकाणीं आश्रय करणारे. २. अंतःकरणपूर्वक भक्तीनें. With heart and soul. ३. नामसंकीर्तन, नामघोष. ईश्वराची भक्ति करण्याचे नऊ प्रकार आहेत:—श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन. ४. शुश्रूषा, सेवा. ५. ज्ञानरूपी यज्ञाचे योगानें. ६. पृथकत्वें जाणून=द्वैतभावपूर्वक. ७. एक जाणून=अद्वैतभावपूर्वक, अभेद कल्पून. ८. विश्वव्यापी. ९. ज्योतिष्टोमादि यज्ञ. १०. ब्राह्मणानें दररोज करावयाचे पंचमहायज्ञ ते. पंचमहायज्ञांचीं नांवें:—भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ आणि ब्रह्मयज्ञ. ११. देवांस किंवा पितरांस जो हवि देतात तो. १२. औषधी=औषधिः=ओषः पाकः धीयते अस्यामिति. औषधी याचा अर्थ (१) प्राणी जें काय खातात तें किंवा (२) रोगाचा उपशम होण्यासाठीं ज्याची योजना होते तें. यापैकीं कोणत्याही अर्थाचें ग्रहण केलें असतां चालेल. १३. घृत, तूप. १४. आहुति. १५. ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, आणि अथर्वणवेद—हे चार वेद. १६. पुरुषार्थ, इष्टतम वस्तु. १७. सर्वद्रष्टा. १८. पोषण करणारा. १९. राहण्याची जागा. २०. आश्रयस्थान. २१. उत्पत्तिकारण. २२. सत्=असतेपणा, जें काय आहे तें. असत्=नसतेपणा, जें कांहीं नाहीं असें म्हणतात तें. २३. सोमरसाचें पान (पिणें). यज्ञांत सोमरस पिण्याची चाल होती. २४. देवांस मात्र जे दिव्यभोग मिळावयाचे ते. २५. पुण्य संपल्यावर. २६. मायामय, असार, प्रापंचिक. २७. कामी (कामुक) काम आचरती (सकामतेनें कर्मांचें आचरण करितात). २८. अन्य देवतांचे ठिकाणीं. २९. माझी सेवा, दास्य. ३०. चरितार्थ. योग=जें मिळालें नाहीं तें मिळविणें; क्षेम=जें मिळालें आहे त्याचें रक्षण करणें. योग=अलभ्यलाभ, क्षेम=लब्धपरिपालन. 'योगक्षेम' याचा चरितार्थ, उपजीवन, अन्नाच्छादनादिकें करून प्रपंचाचा निर्वाह—असा अर्थ होतो.

पूजन अन्य देवताठायीं । तेंही माझेंच घडे पाहीं । विधिपूर्वक सोई[1] । नाहीं तयांची कीं. ॥ २३ ॥ मी सर्व यज्ञांचा भोक्ता, । स्वामी सर्वांचा, अधिष्ठान[2]-कर्त्ता । तत्त्व नेणती[3] तत्वता । मज न पावतां च्यवतील[4]. ॥ २४ ॥ देवपितृ-आराधना करिती । भूतें देवतांतें भजती[5] । ज्यां भजे त्या लोकां जाती; । मज भजती, मज पावती ते. ॥ २५ ॥ पत्र[6]पुष्पफळउदक । जे मज देती भक्तिपूर्वक । तें मी अंगीकारीं आईक । भक्तिभावें करूनियां. ॥ २६ ॥ जें करणें आणि भक्षणें । जें अग्नीसि होम करणें । जें तपीं तप साधणें । तें मज अर्पण करीं. ॥ २७ ॥ शुभाशुभफळ[7]. । कर्मबंध सुटे[8] सकळ । संन्यासयोगयुक्त होऊनि केवळ । तूं मज पावसी. ॥ २८ ॥ सर्व भूतांचे ठायीं । मी समबुद्धी असें पाहीं । मज वैरी, मित्र, द्रोही[9] । समचि असे. ॥ २९ ॥ असो दुष्ट दुराचारी । मातें भजे अनन्यभक्तीनें जरी । तरी तुवां तो साधूच मानावा परी । कीं त्याचा दिव्य[10] निश्चय[11]. ॥ ३० ॥ ते[12] तत्काळ धर्मी[13] होऊन । निरंतर शांतितें असती पावून । माझिया भक्तांसि जाण । नाश नाहीं; अर्जुना! ॥ ३१ ॥ स्त्रीवैश्यशूद्र आदिकरून । पापयोनि[14] असोन । माझी भक्ति केलियान । तयांसी जाण परमगती. ॥ ३२ ॥ यापरी द्विजभक्त पुण्यवंत । राजऋषी पावती समस्त; । 'अनित्य[15] सुखलोक[16] पावुनी त्वरित । मज भजें तूं. ॥ ३३ ॥ माझे ठायीं अंतःकरण । भक्तिरूप मज अर्पण । मंज[17]उद्देशें योग करून । योजितां मज पावसी.[18]' ॥ ३४ ॥

---

१. मार्ग, रीति, उपाय. २. आश्रयदाता. ३. मला स्वस्वरूपानें ओळखीत नाहींत. 'न नेणतां' असें पाठांतर. ४. च्युत होतील, स्वस्वरूपापासून भ्रष्ट होतील, पुन्हां जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतील. ५. ज्या देवतांना भजतात त्या देवतांच्या लोकांप्रत जातात–हा इत्यर्थ. ६. द्रौपदीनें पत्र (भाजीचें पान), गजेंद्रानें पुष्प (कमळाचें फूल), शबरीनें फळें (बोरें वगैरे) आणि बळीनें उदक (दानोदक) दिलें होतें. ह्या सर्व शुद्धचित्त भक्तांस कोणती गति प्राप्त झाली हें प्रसिद्धच आहे. ७. शुभ किंवा अशुभ फळें देणारीं जीं नानाप्रकारचीं (विहित अथवा अविहित) कर्मे त्यांचें बंधन. ८. सुटतें, नाहींसें होतें. ९. विश्वासघात करणारा. १०. दिव्य=देवताविषयक. ११. ह्या ओंवीच्या स्पष्टीकरणार्थ तुकोबांचा पुढील अभंग बराच साधनीभूत होईल:–'जरी असे दुराचारी । वाल्हा कोळियाचे सरी. ॥ १ ॥ भजे मज, न आणिका । शैव जैसा कीं त्र्यंबका. ॥ २ ॥ तो तों साधूच मानावा । जेथें देव सांपडावा; ॥ ३ ॥ तेथें निश्चयचि देव । तुका नेणे हव्यकव्य. ॥ ४ ॥.' १२. दुराचारी पण मला शुद्धांतःकरणानें भजणारे. १३. धार्मिक, पुण्यशील. १४. नीच योनींत उत्पन्न झालेले, अंत्यजादि. १५. क्षणभंगुर. १६. येथें 'असुखलोक' असा पाठ असला पाहिजे. १७. माझ्या प्रीत्यर्थ. १८. येथें 'राजयोग' नामक नवमाध्याय समाप्त झाला.

# अध्याय दहावा.

कृष्ण म्हणे, 'अर्जुन! । ऐक माझें परमवचन । तूं सखा म्हणून । हितोपदेशितों तुझिया हितालागीं. ॥ १ ॥ माझी उत्पत्ति नेणती सुरवर । आणि ऋषीही समग्र. । 'हे नेणती?' याचें उत्तर; । यांची उत्पत्ती मजपासुनी. ॥ २ ॥ मज अनादित्वें मातें । जाणे मज सर्वेश्वरातें । तोचि सुज्ञ मनुष्यांतें । बंधापासूनियां सुटे. ॥ ३ ॥ बुद्धि, ज्ञान, मोह नाहीं । क्षमा, सत्य, शम, दमही । सुख, दुःख, उत्पत्ति, नाश नाहीं । भूतांचे भाव हे पृथक्; ॥ ४ ॥ अहिंसा, समता, संतोष, । तप, दान, यश, अपयश, । सर्व भाव उपजती जीवांस । ते वेगळे मजपासुनी. ॥ ५ ॥ ऋषी आणि चारी मनू । हे सर्व मजपासून; । सृष्टि झाली त्यांपासून । म्हणोनि हे लोक माझी प्रजा. ॥ ६ ॥ ऐसा मजपासुनी विस्तार । मज जो जाणे नर । तो दृढ योग पावे निर्धार । एथें नाहीं संशयो. ॥ ७ ॥ मी सर्वांसि उत्पत्तिस्थान । प्रवृत्ति सर्व मजपासून । ऐसें जाणोनि सर्व माझें करिती भजन । ज्ञानी भावयुक्त होवोनिया. ॥ ८ ॥ माझे ठायीं चित्त ठेऊनी । माझी गाथा करूनी । राहे संतोषी होऊनी । गात नाचत. ॥ ९ ॥ ऐसे निरंतर भक्तियुक्त । ते प्रीति करोनि मज भजती अत्यंत । तयांसि योगज्ञान देईन बहुत । जेणें ते मज पावती. ॥ १० ॥ तयां उपजलिया अज्ञानअंधकार । त्यांवरि मी कृपा करीं करुणाकर । ज्ञानदीप हा सोज्ज्वळ

---

१. या अध्यायांत विभूतिवर्णन व विभूति(महापुरुष)पूजा (Hero-worship) सांगितली आहे; म्हणून या अध्यायास 'विभूतियोग' असें नांव आहे. २. हितकारक उपदेश करितों. ३. इंद्रादि देव. ४. हे (ऋषी) कां जाणत नाहींत, त्यांस कां माहीत नाहीं. ५. येथें 'अज' असा पाठ असेल काय? 'मज'–'मातें' अशी द्विरुक्ति मुक्तेश्वराच्या हातून झाली असेल असें वाटत नाहीं. ६. मनुष्यांत, मनुष्यांपैकीं. ७. बंध=मायापाश. ८. येथें कांहीं अपपाठ असावा असें दिसतें. मूळगीतेंत 'भवंति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः' (प्राण्यांचे निरनिराळे भाव माझ्यापासूनच उत्पन्न होतात) असें आहे. कदाचित् मुक्तेश्वरानें 'पृथग्विधाः' पदाचा अन्वय 'मत्तः' या पदाशीं केला असावा. ९. पुढें ओवी २५ वरील टीपा पहा. १०. एकंदर मनु चौदा आहेत, त्यांपैकीं चार. चौदा मनूंचीं नांवें:–स्वायंभुव, स्वारोचिष, औत्तमि, तामस, रैवत, चाक्षुष, वैवस्वत, सावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि आणि इंद्रसावर्णि. ११. मुलें, लेंकरें. १२. प्रवृत्त करणें, चैतन्य. १३. भाव (भक्तीनें) युक्त होऊन. १४ गाथा=पूर्वीं झालेल्या गोष्टी. माझी गाथा करूनी=माझी लीला वर्णन करून. १५. ज्ञानयोग, ज्ञानरूप साधन. १६. करुणा+आकर=दयेची खाणच असा मी (कृष्ण). १७. देदीप्यमान, प्रकाशमान.

निरंतर । अज्ञान नाशी तयाचें.' ॥ ११ ॥ **अ**र्जुन म्हणे, 'अगा परब्रह्मा ! । पवित्र तूं परंधामा ! । सत्य पुरुष शाश्वतनामा । आदिदेव तूं नित्य प्रभू. ॥ १२ ॥ हें[1] मज सांगितलें ऋषीश्वरीं सर्व । देवर्षि **ना**रदादिक देव । **अ**सित **दे**वल **व्या**सादिक देव । तेंच स्वयें तूं सांगसी. ॥ १३ ॥ सर्वेही तुवां मज सांगितलें । तितुकें मज साच[2] मानवलें । **भ**गवंता ! ज्ञान उपजलें । देवदानवां न कळे कीं. ॥ १४ ॥ तूं आपआपणांतें आत्मा[3] । जाणशी, तूं पुरुषोत्तमा[4] ! । भूतभावन[5] हे महिमा । **दे**वाधिदेवा ! आहे तुझी. ॥ १५ ॥ समस्त दिव्य तुझिया विभूती । तूं सांग गा ! मजप्रती । जिहीं विभूतीं[6] **श्री**पती ! । त्रिभुवन व्यापुनी आहेसी. ॥ १६ ॥ **यो**गेश्वरा ! तुझें चिंतन करितां । तुज कैसिया रीतीं जाणणें ? **अ**नंता ! । तुझें ध्यान कोणे[7] स्थळीं[8] आतां । तें **भ**गवंता ! सांगें मज. ॥ १७ ॥ तुझ्या विभूती आत्मयोग[9] विस्तारें करून । वेळोवेळां ऐकतां होय अमृतपान; । हें मज प्रसन्न होऊन । सांग स्वामी ! **ज**नार्दना !' ॥ १८ ॥ **कृ**ष्ण म्हणे **अ**र्जुनाप्रती, । 'माझ्या दिव्य विभूती बहुत असती, । त्यांमाजी सांगेन श्रेष्ठ तुजप्रती, । येरा[10] पाहतां अंत नसे. ॥ १९ ॥ **पा**र्था ! गा ! अवधारीं । मी आत्मा सर्व भूतांचे शरीरीं, । मी आदिमध्य निर्धारीं[11], । मीच अंत सर्व भूतांचा. ॥ २० ॥ अदितिपुत्रांत[12] मी **वि**ष्णु, । तेजांत[13] मी असें भानु[14], । **म**रुद्गणांमाजी[15] **म**रीचि होऊनू[16], । नक्षत्रांत[17] शशी[18] मी. ॥ २१ ॥ वेदांमध्यें **सा**मवेद[19], ।

---

१. वरील ओंवींत सांगितलेलें ईश्वराचें वर्णन. २. खरोखर. 'साचित मानिलें' असा अन्यपाठ. ३. आपणच आपलें आत्मस्वरूप जाणता–असा भावार्थ. ४. हे पुरुषश्रेष्ठा (कृष्णा). ५. विश्वोत्पादक, विश्वाचा उत्पन्नकर्ता. ६. ज्या विभूतींच्या योगानें. ७. कोणत्या ठिकाणीं. ८. पूजायोग्य स्थळें. ९. आत्मस्वरूप, भगवद्रूप सर्वत्र पाहणें. १०. इतर, वरकड, क्षुद्र. ११. खरोखर, निश्चयपूर्वक. १२. अदिति ही दक्षाची मुलगी आणि कश्यपऋषीची सहधर्मचारिणी. ही विष्णु, इंद्र वगैरे देवांची माता. बारा आदित्य हे तिचे पुत्र. बारा आदित्यांचीं नांवें:–धाता, मित्र, अर्यमा, इंद्र, वरुण, सूर्य, भग, विवस्वान्, पूषा, सविता, त्वष्टा आणि विष्णु. १३. तेजस्वी पदार्थांत. १४. सूर्य. १५. मरुद्गण हे देवांचे वैश्य होत. हे सात आहेत:–अवह, प्रवह, विवह, परीवह, उद्वह, संवह आणि परिवह. १६. 'होऊन' याचें 'होऊनू' हें रूप चिंतनीय आहे. १७. नक्षत्रें सत्तावीस आहेत, तीं सर्वांस माहीत आहेत. 'नक्षत्र' शब्दाची व्युत्पत्ति:–(१) न क्षरन्ति स्थानात् चलन्ति इति नञ्+क्षर+ष्ट्रन्=नक्षत्राणि; अथवा (२) न क्षीयन्ते क्षयं यान्ति इति नक्षत्राणि, ज्यांचें स्थानांतर होत नाहीं अगर जीं तेजोहीन होत नाहीत तीं नक्षत्रें. १८. चंद्र. १९. साम शब्दाची व्युत्पत्ति:–(१) 'सा च आम च' (सा ऋक् आमो गीतिरूपः स्वरः तयोः मिथुनं)=ऋचा आणि संगीतस्वर या दोघांचें संमेलन तो साम होय [प्रपाकार]; किंवा (२) सर्वरूपेषु समत्वात् सामः=ज्याचा सर्व चराचराचे ठायीं समभाव असतो तो साम.

[1]देवांत इंद्र मी प्रसिद्ध, । [2]इंद्रियांत **मन** [3]संबंध । जीवांचें [4]**चैतन्य** मी. ॥ २२ ॥ [5]**रुद्रां**मध्यें मी [6]**शंकर**, । [7]यक्षांमाजी [8]**धनेश्वर**, । [9]वसूंमध्यें **वैश्वानर**, । [10]पर्वतांत **मे**[11]**रू** मी. ॥ २३ ॥ पुरोहितांत [12]**बृहस्पती**, । सेनापतींत स्वामी[13]**कार्तिक** म्हणती, । [14]सरितांत [15]सागरपती, । सर्व मीच जाण. ॥ २४ ॥ [16]ऋषींमाजी **भृगुऋषीश्वर**, । [17]वाचांमाजी [18]एकाक्षर, । यज्ञांत [19]जपयज्ञेश्वर, । [20]स्थावरीं मी **हि**[21]**मालय**. ॥ २५ ॥ वृक्षांत [22]अश्वत्थ प्रसिद्ध, । देवर्षींमाजी **नारद**, । [23]गंधर्वीं **चित्ररथ**, । सि[24]द्धांत **क**-

---

१. तेहतीस कोटी देवांमध्यें. २. पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें त्यांपैकीं. ३. संबंध (?). 'सवंध, सबंद (पूर्ण)'–असें तर नसेलना? ४. ज्ञानशक्ति, ज्ञानकला, चेतना. ५. रुद्रदेवता अकरा आहेतः–वीरभद्र, शंभु, गिरीश, अजैकपात्, अहिर्बुध्न्य, पिनाकी, अपराजित, भुवनाधीश्वर, कपाली आणि स्थाणु. यांचीं नांवें आदिपर्व–अध्याय ६५ यांत दिलेलीं आहेत, तीं वर दिलेल्या नांवांहून जरा भिन्न आहेत. [पुढें गरुडगर्वपरिहाराख्यान–ओवी ११ वरील टीपा पहा]. हे सप्तविध देवांतील तिसरे प्रतीचे असून, भूतपिशाचयक्षराक्षसादिकांचे अधिपति होत. ६. सुखकारक, मंगळकारक. शं सुखं करोतीति शंकरः. ७. ब्रह्मदेवांनीं एकदां कांहीं प्राणी उत्पन्न केले. त्या प्राण्यांनीं ब्रह्मदेवांस 'किं कुर्मः' (काय करूं?) असें विचारिलें. त्यावर ब्रह्मदेवांनीं 'रक्षध्वम्' (प्राण्याचें रक्षण करा) असें उत्तर दिलें. हें ऐकून त्यांना फार आनंद झाला व त्यांनीं त्या आनंदाच्या भरांत 'यक्षाम' (पूजन करूं), व कांहींजणांनीं 'रक्षाम' (रक्षण करूं) असें म्हटलें, तेच पुढें अनुक्रमें यक्ष आणि राक्षस झाले. यक्ष हे कुबेराचे सेवक असून त्याच्या धनाचें व बागेचें रक्षण करितात असें वर्णन आढळतें. [वाल्मीकिरामायण–उत्तरकांड–सर्ग ४ श्लोक९–१३ पहा]. ८. कुबेर (धनपति). ९. हे आठ आहेत, त्यांचीं नांवें:–धर, ध्रुव, सोम, अह, अनिल, अनल, प्रत्यूष आणि प्रभास. [मुक्तेश्वर–आदिपर्व–अ० १४।८२ पहा.] १०. सप्त कुलपर्वतांत. सप्त कुलपर्वतः–'महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः । विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥'. ११. हा पर्वत सुवर्णमय व रत्नमंडित असून यावर देव राहतात–असें वर्णन आहे. १२. सुरगुरु, देवांचा गुरू. १३. कार्तिकस्वामी हे देवांचे सेनापति. १४. नद्यांमध्यें. १५. महासागर. 'सरोवरांत सरितापती' असा अन्यपाठ. १६. सप्तर्षींमध्यें. सप्तर्षींचीं नांवें:–कश्यप, अत्रि, वशिष्ठ, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि आणि भरद्वाज. १७. वाणीमध्यें, बोलण्यांत. १८. 'ॐ' हें एक अक्षर. १९. सर्व यज्ञांमध्यें जपयज्ञाला महत्व देण्याचें कारण तो यज्ञ अतिपवित्र असतो. त्यांत हिंसादि दोष घडत नाहींत. २०. दृढ आणि अचल पदार्थमात्रामध्यें. २१. ह्या पर्वतावर योगी राहतात असें म्हणतात. २२. पिंपळाचें झाड. २३. गंधर्व हे गायनकलानिपुण असतात–अशी प्रसिद्धि आहे. २४. सिद्ध= स्वतःसिद्ध; जन्मतःच ज्यांस धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य इत्यादिकांचा अतिशय प्राप्त झाला आहे असे.

पिलमहामुनी मी. ॥ २६ ॥ अश्वांमाजी उच्चैःश्रवा[1] वारू[2], । गजांत **ऐरावत**[3] कुंजरू[4], । मनुष्यांत राजा नरू । मीच असें. ॥ २७ ॥ शस्त्रांत मी वज्र[5], । धेनूंमध्यें कामधेनु[6] परिकर[7], । संतानहेतु[8] काम निर्धार[9], । सर्पांत[10] मीं **वासु**की. ॥ २८ ॥ नागांमाजी **अ**नंत[11], । **व**रुण[12] मी जलचरांत, । **अर्य**मा पितृगणांत । संयमांत[13] **यम** मी. ॥ २९ ॥ **प्र**ल्हाद मी दैत्यांत, । काळ मी महाकाळांत[14], । सिंह मी श्वापदांत, । पक्ष्यांत मी **ग**रुड जाण. ॥ ३० ॥ चाळकांमाजी[15] पवन, । शस्त्रधरांत[16] मी **द**शरथनंदन, । झषांमाजी[17] मगर होऊन, । सरितांमाजी[18] **जा**न्हवी[19]. ॥ ३१ ॥ सृष्टीचें आदिअंतमध्यस्थान, । विद्यांत[20] अध्यात्मविद्या[21] जाण, । वादांत[22] तत्त्वकथन[23] । सर्व जाण मीच असें. ॥ ३२ ॥ अक्षरांमाजी[24] अकार[25] देख, ।

१. देवदानवांनीं अमृतासाठीं समुद्रमंथन केलें त्या वेळीं समुद्रांतून उत्पन्न झालेला घोडा. हा सूर्याचें वाहन असून ह्यास सात तोंडें आहेत, असें वर्णन आढळतें. ह्याचे कान उंच असल्यामुळें ह्यास 'उच्चैःश्रवा' असें नांव पडलें. २. वाऱ्यासारख्या चपळ गतीनें चालणारा (घोडा). ३. समुद्रमंथनसमयीं उत्पन्न झालेला गजश्रेष्ठ. हा सर्व दिग्गजांचा स्वामी व इंद्राचें वाहन होय. हा चतुर्दंत व शुभ्रवर्ण आहे, असें वर्णन आढळतें. ['इरा आपः तद्वान् इरावान् समुद्रः तस्मादुत्पन्नः । इरा उदकानि संत्यस्मिन् इरावान् । इरावत्यब्धौ भवः ऐरावतः,' असा 'ऐरावत' शब्दाचा मूलार्थ आहे. सारांश–समुद्रांत उत्पन्न झालेला तो ऐरावत होय]. ४. कुंजर=गज=हत्ती. ५. वृत्रासुराला मारण्याकरितां दधीचिऋषींच्या अस्थींपासून उत्पन्न केलेलें अमोघ शस्त्र तें (वज्र). ६. इष्ट काम पूर्ण करणारी धेनु. ७. परिकर=परिवार, समूह. ८. प्रजोत्पत्ति करणारा, प्रजोत्पत्तिफलरूप विवाहितस्त्रीविषयक काम (संभोगेच्छाप्रधान काम नव्हे). ९. 'निरधार' असें पाठांतर. १०. सापांत. साप सविष आणि दुष्ट असतात. सापांस एकच मस्तक असतें, नागांस पुष्कळ असतात व ते सापांसारखे दुष्ट नसतात. ११. शेष. १२. जलदेवताविशेष. Neptune. [विशेष माहितीकरितां जिज्ञासूंनीं मुक्तेश्वरकृत वनपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० १०२ टीप ६ पहावी.] १३. शासन करणाऱ्यांमध्यें. १४. मूळांत 'कलयतां' (गणित करणाऱ्यांमध्यें, आकलन करणाऱ्यांत, वश करणाऱ्यांत) असें आहे. १५. मूळांत 'पवताम्' (शुद्ध करणारांमध्यें, पवित्र करणाऱ्या वस्तूंमध्यें) असें आहे. १६. वीरांत, क्षत्रियांत. १७. जलचरांमध्यें. १८. नद्यांमध्यें. १९. जन्हुकन्या (गंगा). २०. चौदा विद्यांमध्यें [ह्या विद्यांचीं नांवें वगैरे माहिती मुक्तेश्वरकृत वनपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० १३० टीप २ येथें दिलेली आहे ती पाहावी.] २१. परमार्थज्ञान. ह्याच्या योगानें स्वस्वरूपप्राप्ति होऊन मोक्ष मिळतो. २२. मूळांत 'वादः प्रवदतामहम्' (वाग्युद्धामध्यें वाद तो मी) असें आहे. मुक्तेश्वराच्या 'वादांत तत्वकथन' या शब्दांनीं मोठी बहार होऊन मूळावर ताण झाली आहे. २३. येथें 'वादे वादे जायते तत्वबोधः' ह्या उक्तीची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. २४. वर्णलिपींत, मूळाक्षरांत. २५. 'अ' हें अक्षर 'अकारो विष्णुरुद्दिष्टः' या न्यायानें विष्णुवाचक आहे म्हणून त्यास सर्व अक्षरांत प्राधान्य दिलें असावें.

समासीं[1] [2]द्वंद्वसमासक, । मी [3]अक्षयी काळ देख, । ब्रह्माविष्णु मीच असें. ॥३३॥ [4]सर्वहरांमाजी मरण, । जन्मकाळींचें जनन, । कीर्ति, [5]श्री, वाणी, [6]नारींत जाण । स्मृति, [7]प्रज्ञा, [8]धृति, क्षमा मी. ॥ ३४ ॥ [9]बृहत्साम सामवेदांत, । आणि छंद तो गायत्रींत, । मार्गशीर्ष मी मासांत, । ऋतूंमध्यें [10]वसंत मी. ॥ ३५ ॥ [11]छलकांमाजी [12]द्यूत, । [13]तेजस्वियांत [14]तेजदीप्त, । व्यवसायांमाजी जयो समस्त, । [15]सत्त्ववंतांमध्यें [16]सत्वगुण मी. ॥ ३६ ॥ यादवांमाजी [17]वासुदेव, । पांडवांमाजी [18]धनंजय, । मुनींमध्येंही मी व्यासदेव, । [19]कवींमाजी शुक्र मी. ॥ ३७ ॥ [20]दंडकर्त्यांत मी [21]दंड, । [22]जयांत जयवंत [23]निवाड, । ज्ञानवंतांत [24]ज्ञानमुंड, । [25]गुह्यांमाजी मौन मी. ॥ ३८ ॥ सर्व भूतांचें बीजें[26] असें मी जाण, । मजवेगळें नाहीं स्थान । [27]चराचरीं झालें [28]जाण । ऐसें जाण अर्जुना! ॥ ३९ ॥ माझ्या दिव्यविभूती, अर्जुना! । अंत नाहीं यांसि जाणा । ही सांगीतली खुणा । संक्षेपें तुला. ॥ ४० ॥ जे ऐश्वर्यवंत सत्यवंत देखसी । लक्ष्मी आहे जयांपासी । अथवा जय असे ज्यांपासी । ते जाण अंश माझे. ॥ ४१ ॥ अर्जुना! ऐक

---

१. समास हे व्याकरण शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या परिचयाचेच आहेत. २. द्वंद्व समासाला प्राधान्य देण्याचें कारण असें दिसतें कीं या समासांत दोन्ही पदें मुख्य असतात. ३. ज्यास कधीं क्षय नाहीं असा, अखंड. ४. सर्व हरण करणाऱ्यांमध्यें, सर्व नाश करणाऱ्यांमध्यें. ५. संपत्ति, शोभा. ६. स्त्रीजातींत. ७. बुद्धि. ८. धैर्य. ९. बृहत्साम हें एक सामवेदांतर्गत मुख्य व मोक्षप्रतिपादक स्तोत्र आहे. १०. चैत्र आणि वैशाख या दोन महिन्यांस वसंतर्तु असें म्हणतात. [विशेष माहितीकरितां मुक्तेश्वर–वनपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० १०७ टीप १० पहा]. ११. छळ करणारांमध्यें. १२. द्या द्यूताच्या योगानें पुण्यश्लोक नळराजा व अजातशत्रु धर्मराज यांस किती संकटें भोगावीं लागलीं, हें प्रसिद्धच आहे. १३. तेजस्वी पुरुषांचे ठायीं. १४. तेजदीप्ति (?), तेजप्रभाव, वजन, दरारा. १५. सात्विक पुरुषांचे, साधुजनांचे ठायीं. १६. सात्विकवृत्ति, सद्वर्तन करण्याचा निश्चय व तसें आचरण, ईश्वरभक्ति. [विशेष माहितीकरितां मुक्तेश्वर–वनपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० १२६ टीप ४ पहा]. १७. वसुदेवाचा पुत्र (कृष्ण). १८. अर्जुन. १९. कवि=पंडित, बुद्धिमान्. २०. शासनकर्त्यांत. २१. शिक्षा, शासन करण्याचें साधन (दंड). २२. जय=कार्यसिद्धि. २३. खरोखर. २४. श्रेष्ठ ज्ञान (मुंड=मस्तक). 'आतां ज्ञान जें ज्ञानियां । ज्ञानेश्वरु वंद्य ठायां ॥' [तुकाराम]. २५. गुप्त गोष्टींमध्यें. २६. उत्पत्तिकारण. २७. चरण दुसरा व तिसरा यांचा अन्वय:–चराचरीं मजवेगळें (भगवद्रहित) स्थान झालें नाहीं [असें] जाण. २८. 'जाण' या क्रियापदाची द्विरुक्ति निरर्थक दिसते. 'जाण' च्या ठिकाणीं 'ज्ञान' असा पाठ असेल काय?

ज्ञान । बहु [1]सांगितलिया काय कारण? । [2]विश्व झालें मजपासून । एक अंशें; जाण पां [3]तुज.' ॥ ४२ ॥

---

## अध्याय [4]अकरावा.

**अर्जुन** म्हणे, '**चक्र**पाणी! । [5]अध्यात्म निरूपिलें कृपेंकरुनी । जें बोलिलेति तुम्ही आपुल्या वचनीं । तेणें [6]मोह गेला माझा. ॥ १ ॥ भूतांची उत्पत्ति प्रलयो । तो तुम्हांपासोनि ऐकिला अनुभवो । तूं [7]कमलपत्राक्षदेवो । [8]माहात्म्य आइकलें तुझें. ॥ २ ॥ परम ऐश्वर्य सांगितलें । तें उत्तम म्यां आइकलें, । आतां मनीं [9]उपजलें । जें पाहावें रूप तुझें. ॥ ३ ॥ जरी मज [10]दाखवूं येईल । [11]पहावें ऐसें असेल । तरी तें [12]अपूर्व [12]नवल । दाखवीं [13]अव्ययरूप तुझें.' ॥ ४ ॥ **दे**व म्हणे, '**पा**र्था! रूप पाहें । [14]शतसहस्र अनुपम हें । [15]नानावर्णांची सोये । [16]नानाकृती आसती. ॥ ५ ॥ **आ**दित्य **[17]रुद्र व**सु पाहें । **[18]अ**श्विनीदेव **[17]म**रुद्गण ते हे । हें पूर्वीं देखिलें नोहे । [19]आश्चर्यरूप. ॥ ६ ॥ जग अवघें [20]एकाठायीं । चराचर [21]व्यापोन ही । याहूनि आणिक इच्छिसी कांहीं । तें माझे देहीं पाहीं;

---

१. आतां तुला ज्यास्त सांगण्याची गरज कोणती? २. शेवटच्या दोन चरणांत सर्व अध्यायाचें सारच जणुं काय भगवंतांनीं सांगितलें आहे. ३. 'तुज' ह्याचा संबंध कोठें लावावयाचा? येथें 'तूं' असा पाठ असावा. ४. भगवंतांनीं आपलें विराटस्वरूप अर्जुनास दाखविलें, असें वर्णन या अध्यायांत आहे म्हणून ह्या अध्यायास 'विश्वरूपदर्शनयोग' असें नांव आहे. ५. अध्यात्मज्ञान, परमार्थज्ञान. ६. 'भीष्मद्रोणादि हे माझे गुरू, आप्त वगैरे आहेत, तर यांस मी मारूं कसा?' हा जो मोह तो नाहींसा झाला. ७. आत्मज्ञानामुळें तेजस्वी आहेत नेत्र ज्याचे असा देव. 'कमल'शब्दाची व्युत्पत्ति:—'कं' म्हणजे ब्रह्मसुख, त्याला 'अलति' म्हणजे प्रकाशवितें तें कमल म्हणजे आत्मज्ञान. [शंकरानंद]. ८. अध्याय ९ पहा. ९. इच्छा उत्पन्न झाली. १०. दाखवितां येईल, दाखविणें शक्य असेल तर. ११. मी पाहावें, असा माझा अधिकार असेल तर. १२. अपूर्व नवल=आजपर्यंत कधींही न घडलेलें कौतुक (चमत्कार). १३. निर्विकाररूप, अक्षय्य असें ईश्वरी स्वरूप. १४. लाखों (शंभर हजार=एक लक्ष), अगणित. १५. नानाप्रकारचीं, निरनिराळ्या रंगांचीं. १६. भिन्न भिन्न आकारांचीं. १७. मागें अध्याय १० ओंव्या २१,२२,२३ वरील टीपा पहा. १८. अश्विनीकुमार. अश्विनी (वडवा) रूपधारिणी सूर्यपत्नी संज्ञा (त्वाष्ट्री) हिला अश्वरूपधर सूर्यापासून झालेल्या दोन पुत्रांस अश्विनीकुमार असें म्हणतात. यांतील ज्येष्ठाचें नांव नासत्य आणि कनिष्ठाचें दस्र. हे देवांचे वैद्य होत, म्हणून यांस 'स्वर्वैद्य' अशी संज्ञा आहे. १९. आश्चर्यजनक, चमत्कारिक रूप (माझें स्वरूप). २०. एकाच ठिकाणीं (ह्या माझ्या देहामध्यें). २१. व्यापून, ओतप्रोत भरून.

पार्था! ॥ ७ ॥ या चर्मचक्षूनें न देखवे[1] मज । ज्ञानचक्षु देतों तुज । मग ईश्वरयोग सहज । पाहाशील तूं[3].' ॥ ८ ॥ संजय म्हणे, 'राया!। ऐसें वासुदेव बोलोनियां । आपलें ईश्वरत्व धनंजया । निज विश्वरूप दाखविता झाला. ॥ ९॥ अनेक नयन मुखें । अनेक अद्भुत रूपें देखे । दिव्याभरणें[4] अनेकें । दीप्तिवंत[5] आयुधें ज्यामाजी[6]; ॥ १० ॥ दिव्यमाळा आणि पीतांबरधारण । दिव्यगंधाचें लेपन । सर्व अपूर्वरूप पाहातां गहन[7] । दशदिशांमध्यें सन्मुख[8]; ॥ ११ ॥ सहस्र सूर्यप्रभा आकाशीं । उगवोनि दीप्त[9] होय एकसरसी[10] । तरीच साम्यता घडे कांहीं त्यासी । ऐसें तेज परम याचें. ॥ १२ ॥ तेथें सर्व एके[11] ठायीं पाहिलें । जग सर्वत्रही वेगळालें । देवाचे देहीं देखिलें । पांडुपुत्रें. ॥ १३ ॥ त्यानंतर आश्चर्य वाटलें । अर्जुना रोमांच दाटले । मग दोन्ही कर जोडिले । केला नमस्कार.' ॥ १४ ॥ '[12]तुझे देहीं सर्व[13] देखिले । ब्रह्मदेव नाभीं[14] बैसले । ऋषिआदि नागकुळातें[15] पाहिलें । तुझ्या देहीं. ॥ १५ ॥ अनंत बाहु, उदरें, नेत्रें, मुखें, । अनंतापरीचीं[16] देखें । आदि अंत नोळखे[17] । विश्वेश्वरा! ऐसें विश्वरूप. ॥ १६ ॥ मस्तकीं मुगुट, गदाचक्र करीं, । सर्व तेजोमय[18]दीप्ति अवधारीं । तैसें तेज देखिलें शरीरीं । दावाग्नीसारिखें[19]. ॥ १७ ॥ तूं परम[20], अक्षर[21] आणि ज्ञेय[22] । या विश्वाचें तूं निधान[23] मूळमय । तूं शाश्वत, धर्मरक्षक, अक्षय । आदिपुरुष मज मानला[25]. ॥ १८ ॥ अनंतवीर्या! नकळे आदिमध्यअंत । अनंत भुजा, शशिसूर्य नेत्र, । प्रज्वलित अग्नि जैसा तेजरेखित । त्रिजगत्प्र-[25]

---

१. तूं मला पाहूं शकणार नाहींस, माझें दिव्यरूप तुला पाहतां येणें शक्य नाहीं म्हणून. २. ईश्वराची अद्भुत शक्ति, ईश्वराचें अघटितघटनाचातुर्य. ३. अर्जुनाच्या प्रश्नास (ओंवी ४ पहा) अनुलक्षून हें भगवंताचें बोलणें आहे. ४. अलौकिक (दिव्य) आभरणें (अलंकार). ५. तेजस्वी. ६. ज्या रूपामध्यें (असें रूप). ७. गंभीर, दुरधिगम. ८. समोर. कोणत्याही दिशेस पहा, ईश्वर आपल्यासमोर आहे, असें दिसतें. ९. प्रकाशित. १०. एकदम, एका काळीं. 'एक रसीं' असें पाठांतर. ११. एकत्र झालेलें, एकवटलेलें. १२. येथपासून ओंवी ३१ च्या अखेरीपर्यंत अर्जुनाचें भाषण आहे. १३. पुढील सर्व. १४. नाभिकमलावर. १५. नाग पाताळांत राहतात, अशी समजूत आहे. १६. नानाप्रकारचीं. १७. नोळखे=न ओळखे, कळत नाहीं. १८. तेजस्वी कांति. १९. अरण्यांत लागलेल्या वणव्याप्रमाणें, अर्थात् अत्यंत तेजस्वी. २०. परब्रह्म. २१. अखंड, अभंग. २२. ज्याचें ज्ञान करून घ्यावें असें (तुझें स्वस्वरूप). २४. मूळमय (आरंभयुक्त) निधान (शेवटचें आश्रयस्थान)=आरंभापासून शेवटपर्यंतचें आश्रयस्थान. २५. मान्य झालास, प्रिय झालास. २५. तिन्हीं जगांना प्रकाशित करणाऱ्या देवा!

काशा! ॥ १९ ॥ तुझेनि एकें स्वरूपतेजें । पृथ्वीनभ[1] व्यापिलें सहजें । दशदिशांत दाटलें उग्ररूप अद्भुत जें । तें देखोनि भ्यालें[2] लोकेंभय. ॥ २० ॥ तुझे ठायीं देव प्रवेशती[3] । कितीक भयेंकरुनि स्तुति करिती । देवऋषी स्तविती । देवा! तुजकारणें. ॥ २१ ॥ रुद्रादित्यवसु । ऋषी विश्वेदेवमरुद्गण आणि जेसु[4] । यक्ष आणि राक्षसु । देखतां आश्चर्य पावले. ॥ २२ ॥ रूप आहे बहु मुखें नेत्र । महाबाहो[5]! ऊरुपदादि[6] विचित्र । बहुत उदरें, विक्राळ दाढांचें चरित्र । तेणें लोकांसहित[7] माझें मन भय पावलें. ॥ २३ ॥ अत्युत्कट[8] विचित्र । प्रचंडदीप्त नेत्र । ऐशासि देखोनि सर्वत्र । धैर्य आणि शांति न पवे[9]. ॥ २४ ॥ दाढा विक्राळ मुखाभीतरी । जैसा अग्नि प्रगटला प्रळयअवसरीं[10] । तेणें तेजें दिशा[11] न कळती; मुरारी! । सुख न पवें; जगन्निवासा! ॥ २५ ॥ दुर्योधनादि सर्व । जयांचे समुदाव । भीष्मद्रोणादि देव । मुखीं प्रवेशती[12]. ॥ २६ ॥ ऐशा भयानक मुखाभीतरी । एक रिघतां अडकले दाढेमाझारीं । एक चूर्ण मुखांतरीं । शिरें अडकलीं मज दीसताती. ॥ २७ ॥ जैसीं सरिताउदकें[13] वाहती । तीं अवघीं सागरीं मिळती । तैसे नरलोक भूपती[14] । तव वदनीं प्रवेशले. ॥ २८ ॥ औज्वल्य[15] दीपावरी । जैसा पतंग[16] रिघे अवधारी । तैसे नाशावया मुखाभीतरी । प्रवेशती लोक. ॥ २९ ॥ तुझी मुखें[17]ज्वाळाच जिव्हेचें ललन[18] । तेणें होतसे सर्व लोकग्रसन । त्या ज्वाळें भरलें त्रिभुवन । ऐसें विष्णु! उग्ररूप तुझें. ॥ ३० ॥ तूं उग्ररूप[19] मज सांग क-

---

१. पृथ्वी आणि आकाश. २. भगवंताचें उग्र रूप पाहून लोकांस भय वाटलें, इतकेंच नाहीं तर लोकांचें भयसुद्धां भ्यालें! येथील चमत्कारजनक कोटीचें जनकत्व मुक्तेश्वराकडे आहे. मूळांत 'लोकत्रयं प्रव्यथितम् (तिन्ही लोकांस भीति उत्पन्न झाली आहे)'–असें साधें वर्णन आहे. मुक्तेश्वरानें मूळावर ताण केली आहे, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. ३. तुझ्या स्वरूपांत मिळून लीन होत आहेत. ४. जेसु (?) येथें अपपाठ आहे. ५. आजानुबाहो! (भगवंता). ६. मांड्या आणि पाय वगैरे. ७. येथील 'सहोक्त्य'लंकार मुक्तेश्वरानेंच आपल्या प्रतिभाकौशल्यानें निर्माण केला आहे. ८. अत्यंत तीव्र. ९. न पवे=प्राप्त होत नाहीं, मिळत नाहीं. १०. प्रलयकाळीं. ११. दिशा न कळती=दिशाभूल झाली आहे, मी अगदीं गोंधळून गेलों आहें. 'दिशा नमती' असें पाठांतर. १२. मुखीं प्रवेशती=गिळले जात आहेत, नाश पावत आहेत. १३. नद्यांचे प्रवाह. १४. मृत्युलोकींचे (मानवी) राजे. १५. प्रदीप्त, प्रखर. १६. पतंग दिव्याच्या ज्योतीवर स्वेच्छेनें झडप घालितो आणि मरण पावतो, हें सुप्रसिद्धच आहे. [मुक्तेश्वर–सभापर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० १५४ टी० ११ पहा]. १७. तोंडांतून निघणाऱ्या अग्नीच्या ज्वाळा. १८. जिभल्या चाटणें, मिटक्या मारणें (ललन=हालणें). १९. तूं उग्ररूप धारण करणारा कोण आहेस तें मला सांग.

वण । तुजला नमन, होय प्रसन्न, । पहिलें रूप पाहों इच्छी मन । तुझी
प्रवृत्ती[1] नकळे; स्वामी!' ॥ ३१ ॥ देव झाला बोलता, । म्हणे, 'मी काळ,
लोकांचा संहर्त्ता; । तुज[2] वेगळें करोनि पार्था! । हे युद्धीं सर्व संहार पावती.
॥ ३२ ॥ या कारणें ऊठ तूं यश घेईं । वैरी जिंतोनि राज्य[3] वाहीं । म्यां
मारिले सर्वेही । युद्धीं निमित्तधारी[4] हो; अर्जुना! ॥ ३३ ॥ भीष्मद्रोणजयद्रथ-
कर्ण । वीर सर्व मारिले जाण । आतां ऊठ तूं; अर्जुन! । शत्रू मारीं.'
॥ ३४ ॥ संजय म्हणे, 'ऐसें वचन ऐकोनि कृष्णाचें । कंठ[5] सद्गदिलें अर्जु-
नाचें। मग अंजळी जोडोनि तयाचे । मागुती[6] भीत भीत स्तवितसे.' ॥ ३५ ॥
अर्जुन म्हणे, 'नारायण! । तुमचेनि कीर्ति[7] संतोषी झालों जाण । भयें दश-
दिशा पळताति राक्षसगण । नमस्कार करिती सिद्धादिक. ॥ ३६ ॥ तूं श्रेष्ठ
म्हणोनि नमस्कार करिती । ब्रह्मयाची तूं उत्पत्ती[8] । ऐसी देवा! स्थिती । सत्[9]
तूंची. ॥ ३७ ॥ तू आदिदेव पुरुष[10] पुरातन । तूं विश्वाचें परमनिधान[11] । तूं
उत्कृष्ट ज्ञान यज्ञ । तूं अनंता! व्यापिलें विश्व रूपें[12]. ॥ ३८ ॥ वायु, अग्नि,
वरुण, यम, । प्रजापति आणि सोम, । प्रपितामह तूं महात्म[13] । सहस्त्र नमनें
पुन:पुन्हा. ॥ ३९ ॥ अगणित पराक्रम तुझें वीर्य[14] असे जाण । पूर्वपश्चिमे[15] तुज
नमन । तूं सर्वांसि पावतोस म्हणवून । तूं 'सर्व' होसी[16]. ॥ ४० ॥ 'हे
यादवा!' म्हणोनि बोलिलों । 'कृष्णा! सखया[17]!' वदलों । प्रीतीनें[18] जें बो-

---

१. कर्म, लीला, रीति. २. तुज वेगळें करोनि=तुला दूर ठेविला तरी; तूं ह्या संहारकर्मापासून दूर राहिलास तरी, तूं भीष्मद्रोणादिकांस मारावयास प्रवृत्त न झालास तरी. ३. राज्य वाहीं=राज्याचा भार वाहावयास लाग; राज्य संपादन करून त्याचा उपभोग घे. 'राज्य साधणें' आणि 'राज्य वाहाणें'—हे प्रयोग मुक्तेश्वराच्या काळीं सर्वांस अवगत होते. ४. निमित्तमात्र, खरा संहारकर्ता नव्हे. ५. 'कंठ'शब्दाचा नपुंसकलिंगी प्रयोग चिंतनीय आहे. ६. पुन्हा, आणखी एकदां (ओवी १४ पहा). ७. कीर्तीच्या योगानें, तुझ्या कीर्तिमाहात्म्यामुळें. ८. ब्रह्मदेवाची उत्पत्ति विष्णूच्या नाभिकमळापासून झाली, हें प्रसिद्धच आहे. ९. असतेपणा, अविनाशी तत्व. १०. परम पुरुष, पुराण पुरुष. ११. उत्कृष्ट आश्रयस्थान. १२. आपल्या विराट्स्वरूपानें. १३. महात्मा, परमात्मा. १४. शारीर बल. १५. पूर्वेकडून व पश्चिमेकडून, सारांश सर्व बाजूंकडून. १६. 'सर्व' असें तुझें नांव पडलें. १७. गड्या, संवगड्या. १८. तुझा महिमा न जाणतां, लडिवाळपणानें 'अरे कृष्णा, अरे ए गड्या' अशा अपमानसूचक शब्दांनीं संबोधिलें; याबद्दल मला क्षमा कर—हा इत्यर्थ.

लिलों । तें क्षमा कीजे. ॥ ४१ ॥ विहार आसन भोजन शयन । असत्का-रिला लीलाविनोदाकारण । अच्युता! थोर अपराध झाला म्हणोन । क्षमा करवितों, स्वामिया! ॥ ४२ ॥ तूं पिता चराचरलोकांसी । आणि गुरु पूज्य होसी । आणिक अधिक नाहीं तुज ऐसी । त्रैलोक्यामाजी. ॥ ४३ ॥ याकारणें तुला नमस्कारितों । जसा सखा सख्यासि तो । पुत्रासि पिता क्षमा करितो । तैसी कृपा करीं; नारायणा! ॥ ४४ ॥ कधीं नाहीं देखिलें तें देखून । हर्ष आणि भय पावलें माझें मन । आतां पहिलेंच रूप दाखवीं प्रसन्न होऊन । देवा! जगन्निवासा! ॥ ४५ ॥ माथां मुगुट, गदाचक्र करीं । पहावया इच्छितों अंतरीं । तें रूप तुझें ऐसें चतुर्भुज मुरारी! । प्रगट करीं आतां.' ॥ ४६ ॥ 'अर्जुना! [6]योगेंकरून । रूप दाविलें होऊनि प्रसन्न । हें तुजवांचून । देखिलें नाहीं कोणीं. ॥ ४७ ॥ वेदें यज्ञें अध्ययनें दानें । विधिनें कर्माचरणें । त्रैलो-क्यामाजी कवणें । माझें रूप तुजवेगळें देखिलें नाहीं. ॥ ४८ ॥ माझें थोर रूप देखोनि नयनीं । तेणें भयव्यथा न धरीं मनीं । आतां भय टाकोनि, प्रीति धरोनी, । पहिलें पूर्वरूप पाहें माझें.' ॥ ४९ ॥ संजय म्हणे, 'देव ऐसें बोलोनी । आपलें रूप दाखविलें मागुतेंनी । आंश्वासिला सौम्यरूप हो-वोनी । भ्यालिया अर्जुनासी.' ॥ ५० ॥ अर्जुन म्हणे, 'जनार्दन! । मनुष्य-रूपातें देखोन । मोह गेला पळोन । ज्ञान मज जाहलें.' ॥ ५१ ॥ 'माझें हें दुर्लभ स्वरूप । तुला दाखविलें [13]अनूप । पहावया करिती तप । देवांसु दुर्लभ जें. ॥ ५२ ॥ वेदयज्ञदानें करून । हें रूप कोणा न दिसे जाण । तुवां पाहून झालें रूपाचें ज्ञान । आणिक कोणी पहावया शक्य नोहे. ॥ ५३ ॥ मज पाहणें जाणणें देखणें । तें सर्व [15]भक्तीचेनि गुणें । ऐसें मज जें जाणणें ।

---

१. क्रीडा करीत असतां, एके ठिकाणीं गप्पागोष्टी करीत बसलों असतां, जेवतांना किंवा निजा-वयाचे वेळीं—हा इत्यर्थ. २. अपमानिला, अपमान केला. ३. करवितों (?). 'करावी त्वां' असा तर पाठ नसेलना? ४. मित्र आपल्या मित्रास क्षमा करितो त्याप्रमाणें. ५. भगवान् म्हणतात. ६. आपल्या योगसामर्थ्यानें. ७. यथाविधि कर्माचरण केल्यानें. ८. कोणींही. ९. पूर्वीचें रूप पुनः (मागुतेंनी) दाखविलें. १०. धीर दिला. ११. ज्ञान जाहलें—देहभानावर आलों. १२. भगवंत म्हणतात. १३. ज्याला उपमा देतां येत नाहीं असें. १४. अर्जुन घाबरला होता तो शांत झाल्यावर ४८ व्या ओवींत सांगितलेलेंच पुन्हा या ओवींत सांगितलें आहे. १५. अनन्य भक्तिपूर्वक.

तें मनरूपीं[1] प्रवेशवी. ॥ ५४ ॥ मद्भक्तीनें[2] जाण । 'मी थोर' करी हें कीर्त्तन । सर्वभूतीं[3] निर्वैर[4] होण[5] । तो मजमाजी समावे[6]. ॥ ५५ ॥

## अध्याय बारावा[7].

'तूं[8] विश्वरूप म्हणून करिती भजन[9] । एक[10] अक्षर अव्यक्त ऐसें जाणोन । तरी दोहींमध्यें श्रेष्ठ कोण? । तें सांग मजप्रती.' ॥ १ ॥ 'माझे[11] ठायीं मन नेमून । श्रद्धापूर्वक[12] करी भजन । तो भक्त मज पावे जाण । निश्चयेंशीं. ॥ २ ॥ जें अक्षर अनिर्वाच्य[13] अव्यक्त जाण । तें सर्वत्र व्यापक संपूर्ण । अंतःकरणास नित्य अगोचर जाणोन । त्याची उपासना करिती; ॥ ३ ॥ इंद्रियसमूह नेमूनें[14] । सर्वां ठायीं बुद्धी समान धरून । सर्वहितीं[15] तत्पर होऊन[16] । ते मज पावती; गा! अर्जुना! ॥ ४ ॥ कष्टेंकरून अव्यक्तीं[17] मन नेमिती । त्यांसि क्लेशचि होती । अव्यक्ताची गती[18] दुःखें पावती[19] । देहवंतें[20] हे. ॥ ५ ॥ सर्व कर्में माझ्या ठायीं । अर्पिती, जाणोनि माझी सोई[21] । मज ध्याती अहर्निशीं[22], पाही । माझें ध्यान सर्वदा; ॥ ६ ॥ मी उद्धरीं तयांसी । भवसागरीं[23], परियेसीं[24]; । चित्त माझे ठायीं नेमिसी[25] । तारक[26] त्यातें होतसें. ॥ ७ ॥ योगबळें करूनी । मनबुद्धि माझे ठायीं

---

१. 'मनरूपीं' असें पाठांतर. २. माझ्या ठायीं अढळ आणि अव्यभिचारिणी भक्ति ठेवून. ३. सर्व चराचर विश्वाचे ठिकाणीं. ४. शत्रुत्वरहित, द्वंद्वभावशून्य. ५. येथें यमकसुखार्थ 'होणें' या शब्दाचें 'होण' असें रूपांतर करावें लागलें. ६. माझ्याशीं तादात्म्य पावतो, मत्स्वरूपीं लीन होतो. ७. ह्या अध्यायास 'भक्तियोग' असें नांव आहे. 'हा अध्याय म्हणजे द्वितीय षडध्यायीचें सारसर्वस्व होय. येथें 'तत्पदार्था'चें स्वरूप समजलें आहे असें लक्ष्यांत ठेवून साधनें कोणतीं करावीं, साधनांची परंपरा कशी आणि उत्तम भक्तांची लक्षणें काय इत्यादि मनोरम विषयांची मीमांसा केली आहे.' [प्रो० भानु]. ८. अर्जुन प्रश्न करितो. ९. एक (कित्येक लोक) अक्षर (शाश्वत, अविनाशी) [आणि] अव्यक्त (अगोचर, अगम्य) [तूं आहेस असें] जाणून [तुझें] भजन करिती—असा अन्वय. १०. एक=कित्येक. 'एक'शब्दाचा अनेकवचनार्थी प्रयोग चिंतनीय आहे. ११. भगवान् उत्तर देतात. १२. एकनिष्ठ भक्तिपूर्वक. श्रद्धा म्हणजे परमेश्वराचें आराधन एकनिष्ठेनें केलें असतां तो मला तारील, अशी निश्चितबुद्धि. १३. जें अमुक म्हणून सांगतां येत नाहीं असें (ब्रह्म). १४. संयमन करून. १५. सर्वत्रांच्या हिताविषयीं. १६. याचा संबंध तिसऱ्या ओंवींतील 'उपासना करिती' या शब्दांशीं आहे. १७. अव्यक्त ब्रह्माचे ठायीं. १८. ज्ञान. १९. जाणती. २०. हे देहवंत=सामान्य प्रतीचे लोक, अनधिकारी लोक. २१. मद्दर्शक मार्ग (हीच सोय). २२. रात्रंदिवस, अहोरात्र. २३. संसाररूपी सागरांतून. २४. लक्ष्य दे, आइक. २५. 'नेमिती' असा पाठ असावयास पाहिजे. २६. उद्धार करणारा.

अर्पूनी । सुखी होसील मनमिळणीं[1] । यांत संशय नसे कीं. ॥ ८ ॥ तुझिया चित्ता नये स्थिरपण[2] । अभ्यास[3] करीं आपण । योगाभ्यासें करून । पावसी; धनंजया ! ॥ ९ ॥ अभ्यासही जरी न करवे । तरी कर्म[4] मज समर्पावें । कर्म करितां भावें[5] । इच्छिली सिद्धी[6] पावसी. ॥ १० ॥ कर्मही जरी न करवे । तरी माझे पाठीं रिघावें[7] । कर्मफळ[8] टाकावें । सुखस्पृहा[9]. ॥ ११ ॥ अभ्यासाहूनि[10] ज्ञान श्रेष्ठ । ज्ञानाहूनि ध्यान वरिष्ठ । ध्यानाहूनि त्याग[12] वरिष्ठ[11] । तो जीवन्मुक्त कीं. ॥ १२ ॥ सर्वभूतीं द्वेष नाहीं । मैत्री[14] दयाळु पाहीं । सुखदुःखातेंही[15] । समसमान मानीतसे; ॥ १३ ॥ योगी तृप्त सुखेंसी । स्थिर करूनि मनासी । मजमाजि मनबुद्धि अर्पी नेमेंसी[16] । तोचि भक्त मम प्रिय. ॥ १४ ॥ ज्यापासूनि लोक नेण्हती[17] दुःखी । लोकांपासाव आपण असे सुखी । हर्षक्रोधभय उद्वेग[18] न घे विशेषीं । तोचि भक्त मज प्रिय. ॥ १५ ॥ जया अपेक्षा[19] नसे कांहीं । सदा शुची[20] दक्ष[21] पाहीं । कर्मारंभ टाकूनही । असे, तो मद्भक्त प्रिय. ॥ १६ ॥ नाहीं हर्ष, ना द्वेषशोक, । न करी कांक्षेचें[22] सुख । शुभअशुभत्यागी[23] देख । तो भक्त मज प्रिय. ॥ १७ ॥ जया शत्रुमित्र समान जाण । नाहीं मान आणि अपमान । शीतउष्ण, सुखदुःख, समान । जया आसक्तता[24] नाहीं. ॥ १८ ॥ स्तुतिनिंदा समानी । आत्मलाभ संतोष दोन्हीं । निराश्रय[25] स्थिर[26] होउनी । जो राहे तो माझा भक्त. ॥ १९ ॥ हें धर्मामृत[27] । याची उपासना[28] करित । तो जाण जीवन्मुक्त । माझा भक्त पैं. ॥ २० ॥

---

१. तुझें मन माझ्या स्वरूपाचे ठायीं लीन झाल्यावर, तादात्म्यवृत्ति झाल्यानंतर. २. स्थिरता, निश्चलता. ३. अध्याय ६ ओंवी ३५ वरील टीपा पहा. अभ्यास=अनन्यभक्ति. ४. वर्णाश्रमविहित कर्में, शास्त्रविहित कर्में. ५. भक्तीनें. ६. इष्टवस्तु, मनोरथ (मोक्षप्राप्ति). ७. पाठीं रिघावें= शरण जावें, आश्रय मागावा. ८. कर्मापासून प्राप्त होणारें फळ. ९. सुखोपभोग घेण्याविषयीं इच्छा. १०. येथें 'टाकावी' हें क्रियापद अध्याहृत आहे. ११. येथें भगवंतांनीं कर्मफलत्यागाचें माहात्म्य केवढें मोठें आहे, हें सांगितलें आहे. १२. कर्मफलत्याग. १३. ह्या ओंवींत **सारा**लंकार आहे. श्रीगीतादेवीच्या आंगावरील हा दागिना मूळचाच आहे. १४. सर्व भूतमात्राशीं मैत्री. १५. 'सुखदुःखतेंही' असा अन्यपाठ. १६. नियमानें, निश्चयपूर्वक. १७. न होती, होत नाहींत. १८. दुःख, चिंता. १९. इच्छा, जरूर. २०. पवित्र, पापरहित. २१. सावध, आलस्यशून्य, तत्पर. २२. कांक्षा= अपेक्षा, लोभ. २३. मंगल आणि अमंगल यांचा ज्यानें त्याग केला आहे असा. २४. आसक्ति, कर्मफलस्पृहा. २५. ज्याला घरदार नाहीं असा. २६. स्थितप्रज्ञ. २७. धर्मशील अमृत (ओंवी १३ पासून या अध्यायाच्या अखेरपर्यंत वर्णन केलेलें रहस्य). २८. शुश्रूषा, सेवन.

## ज्ञानकांड.

## अध्याय तेरावा.[1]

अर्जुन म्हणे, 'देवा! । प्रकृतिपुरुषांचिया भावा । क्षेत्रें क्षेत्रज्ञ निवडावा[3] । ज्ञान ज्ञेय ईच्छितों.' ॥ १ ॥ श्रीकृष्ण म्हणे, 'पार्था! परियेसी; । हें देहक्षेत्र जाणावें यासी, । हें जाणे जो [5]नेमेंसी । तो क्षेत्रज्ञ जाणावा. ॥ २ ॥ क्षेत्र क्षेत्रज्ञ दोन्ही । दोहींचा जाणता म्हणोनी । तोचि म्हणिजे ज्ञानी[6] । तो मज मानला. ॥ ३ ॥ तें क्षेत्र कैसें जाणिजे । आणि क्षेत्रज्ञ कासया म्हणिजे । या दोहींचा निवाडा [7]वोजें । संक्षेपें आइक. ॥ ४ ॥ ऋषींहीं बहुतीं सांगितलें । वेद त्रिधी बोलिले वेगळाले । [8]उपनिषदीं निश्चित केलें । हें सत्य जाण. ॥ ५ ॥ महाभूतें आणि अहंकार । बुद्धि अव्यक्त [9]असे थोर । [10]दशेंद्रियांचा विस्तार । पांच [11]इंद्रियविषय जाण; ॥६॥ इच्छा, द्वेष, सुख, दुःख, । देह, चेतना, धृति देख । इतुकियांतें क्षेत्रज्ञ म्हणती आइक । [12]बुद्धिवंत पैं. ॥ ७ ॥ अहंकार ना दंभादि धरी । हिंसा[13] न करी; शांति [14]आर्जव करी, । गुरूचें भजन अंतरीं । पवित्रपणें [15]अंतःकरण [15]निरोधी. ॥ ८ ॥ [16]विषयवैराग्य, सुखदुःख । अहंकार हाही देख ।

---

१. ह्या अध्यायास 'प्रकृतिपुरुषनिर्देशयोग' अथवा 'क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग' असें नांव आहे. हा अध्याय अति महत्वाचा आहे. ह्यांत ज्ञानाची पराकाष्ठा जें अद्वैतज्ञान आणि कर्तव्याची परमावधि जें मोक्षसाधन यांचा स्पष्टपणें ऊहापोह केलेला आहे. २. शेत (शरीर). संसारतरूचें बीज शरीरांत चांगलें रुजतें म्हणून त्यास क्षेत्र असें म्हटलें आहे. ३. ओळखावा, जाणावा. ४. मूळांत अर्जुनाचा प्रश्न नाहीं. 'क्षेत्र' व 'क्षेत्रज्ञ' म्हणजे काय हें भगवंतांनीं सांगण्यास एकदम सुरुवात केली आहे. मुक्तेश्वरानें पहिल्या ओंवींत अर्जुनानें प्रश्न केला व श्रीकृष्णांनीं त्याचें उत्तर पुढील ओंव्यांत दिलें असें वर्णन केलें आहे; तें प्रसंगास साजेसें आहे. ५. नियमानें, निश्चयपूर्वक. ६. क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ यांविषयीं ज्यास पूर्णज्ञान झालें आहे असा. ७. काळजीपूर्वक, लक्ष्यपूर्वक. ८. उपनिषदांनीं, उपनिषद्ग्रंथांनीं. 'उपनिषद्–हा शब्द ब्राह्मणकालाच्या शेवटीं उत्पन्न झाला. याचा मूळचा अर्थ गुरूच्याजवळ खालीं बसणें असा आहे. पुढें शिष्य गुरूजवळ जें काय शिके त्याचा वाचक तो शब्द झाला, आणि शेवटीं त्याचा अर्थ गूढज्ञान असा झाला.' [कै० वा० **शं० बा० दी**क्षितकृत धर्ममीमांसा–भौतिक धर्मविवेचन–पृ० ५४]. ९. पंचमहाभूतांचीं सूक्ष्मस्वरूपें, अहंकार, बुद्धि व अव्यक्त (माया)–असे आठ विषय. १०. पांच कर्मेंद्रियें व पांच ज्ञानेंद्रियें. ११. इंद्रियांस गोचर होणारीं पांच स्थूलभूतें. १२. बुद्धिवंत म्हणती–असा अन्वय. १३. हिंसा=दुसऱ्यास त्रास देणें, पीडा करणें. १४. सरळपणा. १५. आत्मसंयमन करी, अंतःकरण विषयांकडे न जाईल असें कर. १६. विषयांचे ठिकाणीं विरक्ति.

जन्ममरणव्याधिदु:ख । यांचे ठायीं [1]दोषदर्शन. ॥ ९ ॥ स्त्रीपुत्रगृहाचे ठायीं [2]संगरहित । विषयीं नाहीं आसक्त । इष्ट अनिष्टाचे ठायीं चित्त । [3]समचि असे. ॥ १० ॥ [4]असाधारणयोगेंकरूनी । दृढभक्ति धरूनी । एकांत स्थळीं बैसोनी । प्रीति नाहीं [5]लोकांठायीं; ॥ ११ ॥ अध्यात्मीं तत्पर होणें । तत्त्वज्ञानें विषयांतें [6]नेमणें । [7]जाणिवेचें जें जाणणें; । [8]उलटीं अज्ञानलक्षणें. ॥ १२ ॥ आतां सांगतों [9]ज्ञेये । भक्तिज्ञानें होय [10]जेंय । आदि अंत शुद्ध होय । ब्रह्म 'सत् [11]असत्' नसे. ॥ १३ ॥ सर्वत्र हातपाय दिसती । शिरें मुखें तया असती । नेत्र कर्ण सर्वत्र भासती । दशदिशा व्यापूनि असे. ॥ १४ ॥ [12]सर्वेंद्रियेंगुण भासती । परी इंद्रियें तयाठायीं नसती । [13]असक्त असोनि सर्वांभूतीं । निर्गुण होवोनि गुण भोगी. ॥ १५ ॥ भूतीं असे अंतर्बाह्य । चर आणि अचरही होय । सूक्ष्म म्हणोनि जाणावया [14]शक्य । दूरि असोनि जवळ तें. ॥ १६ ॥ भूतांचे ठायीं अविभक्त असे । परी विभक्तपणें दिसे । [15]गिळी [16]उगळी अनायासें । [17]धरी जाणोनी. ॥ १७ ॥ [18]ज्योतींत जें ज्योती । अज्ञानाहूनि [19]परें बोलती । [20]ज्ञानज्ञेय असें म्हणती । [21]सर्वचित्तीं अधिष्ठूनि असे. ॥ १८ ॥ क्षेत्र आणि ज्ञान । ज्ञेय सांगीतलें संक्षेपें करून । जो माझा भक्त [22]जाणोन । माझा प्रसाद पावे. ॥ १९ ॥ प्रकृतिपुरुषांची स्थिती । [23]उभयवर्ग [24]अनादि असती । प्रकृतीपासूनि [25]विकार होती । ऐसें जाण तूं. ॥ २० ॥ कार्य कारण कर्तृत्व । तिहींचें प्रकृतीस कारणत्व । [26]सुखदु:खभोगीं पुरुषास हेतुत्व । ऐसें बोलिजे. ॥ २१ ॥ पुरुष प्रकृतीमाजी अ-

---

१. दोषदृष्टि, दोषयुक्त आहेत—असें समजणें. २. नि:संग, असक्त. ३. हर्षविषादरहित. ४. अनन्यभावेंकरून. ५. सामान्य (प्राकृत) लोकांविषयीं. ६. ताब्यांत ठेवणें, संयमन करणें. ७. ज्ञानाचें. ८. निराळीं, भिन्न; वर ज्ञानाचीं लक्षणें सांगितलीं त्यांच्या विरुद्ध. ९. जाणावयास जें योग्य तें. १०. परब्रह्मप्राप्ति. ११. जें खरोखर नाहीं असें म्हणतां येत नाहीं व आहे असेंही म्हणतां येत नाहीं असें. १२. सर्व इंद्रियांच्या गुणांचा भास होतो. १३. आसक्तिशून्य, संगरहित. १४. येथें 'अशक्य' असा पाठ असावयास पाहिजे; कारण मूळांत 'अविज्ञेयम्' असें पद आहे. १५. खाई, ग्रास करी. १६. ओके (पुन्हा उत्पन्न करी). १७. धारण करी, भूतमात्रास आधारभूत होई. १८. चंद्रसूर्यादि ज्योतींपेक्षां श्रेष्ठ ज्योति (तेजोगोल) [भगवद्गीता—अध्याय १५ श्लोक ६ पहा]. १९. निराळें. २०. ज्ञानानें जाणण्यासारखें. २१. सर्वांच्या हृदयामध्यें. २२. वर जें क्षेत्र, ज्ञान आणि ज्ञेय यांच्या स्वरूपाविषयीं विवेचन केलें तें जाणल्यामुळें. २३. उभयतां, दोन्हीं. २४. जन्मरहित. २५. भिन्न स्वरूपें, स्थित्यंतरें. २६. सुखदु:खादि भोगण्याची जी स्थिति प्राप्त होते त्या स्थितीला कारण (हेतु) पुरुष आहे—हा भावार्थ.

सोन। भोगी प्रकृतीचे गुण। ऐसें गुणसंगेंकरून। नाना योनीं जन्मतो. ॥ २२ ॥ पाहता, अनुमोदन देता,। ईश्वर, पोषक आणि भोक्ता। तोचि परमात्मा म्हणिजे तत्वतां। देहीं परमपुरुष तो. ॥ २३ ॥ प्रकृती, पुरुष आणि गुण। ऐसें जयासी झालें ज्ञान। तो संसारीं असोन। पुन्हा जन्मा न ये. ॥ २४ ॥ ध्यानें पाहती कोणीं। कोणीं देखती आपण आपणेंनी। कोणीं सांख्ययोगेंकरूनी। कोणीं कर्मयोगें. ॥ २५ ॥ आणि जे अज्ञान असती। गुरुपासाव जाऊनि उपासना करिती। ते मृत्युसंसारीं तरती। श्रुतिपरायण.॥२६॥ जें आकारासी आलें। स्थावर जंगम बोलिलें। क्षेत्रक्षेत्रज्ञापासूनि झालें। तें जाण; भरतर्षभा! ॥ २७ ॥ सर्वभूतांतरीं। ईश्वर आहे सर्वांतरीं। भूतें नासून, आपण नाश न पावे निर्धारीं। हें पाहे, तो डोळस. ॥ २८ ॥ परमात्मा सम आहे। असें समबुद्धी पाहे। तो आत्मघाती न होये। जो आपणा वोळखे. ॥ २९ ॥ कर्में आणि सत्क्रिया। जाण प्रकृतीपासोनियां। असें पाहे आपणया। अकर्तृत्व पाहता तो. ॥ ३० ॥ म्हणूनि वेगळाली सर्वांभूतीं। जे बोलिली विस्तारस्थिती। आत्मयातें एकत्वें देखती। ते ब्रह्म पावती निश्चयेंसी. ॥ ३१ ॥ तो निर्गुण आत्मा त्या आदि नाहीं। असा परमात्मा अव्यय पाहीं। संसारीं असोनि कांहीं। अकर्ता लिप्त नोहे. ॥ ३२ ॥ जैसा आकाश घटीं सूक्ष्म होऊन। असे, घटा न लिंपे जाण। तैसा आत्मा देहीं असोन। अलिप्त पैं. ॥ ३३ ॥ जैसा सूर्य एक। सर्व जनां प्रकाशक। तैसा सर्वदेहीं जीव प्रकाशभासक। भारता! ये रितीं. ॥ ३४ ॥ ऐसा क्षेत्रक्षेत्रज्ञांचा भेद। जो देखे ज्ञानचक्षु करोनि शुद्ध। पंचभूतें आणि प्रकृति मोक्ष जाणोनि निबंध। तो पावे परमगती.' ॥ ३५ ॥

---

१. सत्वरजतमादि गुणांच्या प्रीतीच्या योगानें. 'सगुणसंगें' असें पाठांतर. २. अनेक (उच्च किंवा नीच) योनींमध्यें. ३. या देहामध्यें (असणारा). ४. भगवंतांनीं हाच भावार्थ वर १९ व्या ओंवींत ध्वनित केला आहे. ५. आकारास येणें=उत्पन्न होणें, आकार धारण करणें. ६. नाश पावलीं तरी. ७. द्रष्टा, पाहणारा, ज्याला डोळे आहेत असा. ८. आपलाच घात करणारा. ९. जो आपणा वोळखे तो आत्मघाती न होय–असा अन्वय. १०. आपणाला, आत्म्याला. (?) ११. कर्तव्यशून्यता. १२. पाहणारा, यथार्थज्ञानी. १३. प्रकृतीच्या अवलोकनानें मोक्षाचा उपाय जाणणाऱ्यांस मोक्षप्राप्ति होते–हा मथितार्थ.

## अध्याय [1]चवदावा.

'[2]मागुती सांगेन परम । ज्ञानाचें ज्ञान उत्तम । जाणोन ऋषी जें ब्रह्म । [3]येथून सिद्धी पावले. ॥ १ ॥ हें ज्ञान जिहीं आश्रयिलें । माझें [4]समानत्व पावले । भवसागरीं ते न [5]आले । नाशकाळीं त्यां नाश नसे. ॥ २ ॥ प्रकृति माझें [6]गर्भाधानस्थान । तेथें मीं करीं बीजारोपण । तेव्हां सर्वभूतांचें जनन । होतसे गा! भारता! ॥ ३ ॥ सर्वांचे ठायीं कुंतीसुता! । ज्या ज्या व्यक्ति होती त्यांची माता । प्रकृती, आणि असें पिता । [7]बीजनिक्षेपकर्ता मीं. ॥ ४ ॥ सत्त्वरजतम हे गुण । झाले प्रकृतीपासोन । देहासवें [8]देऊन । मीं गुणातीत अव्यय. ॥ ५ ॥ सत्वगुण हा निर्मळ । धर्मप्रकाशशीळ । सुखसंगीं [9]बांधे प्रबळ । ज्ञानसंगीं; [10]अनघ! ॥ ६ ॥ इच्छात्मक जाण रजोगुण । होय तृष्णा [11]संगेंकरून । तो [12]बांधे कर्मसंगेंकरून । पुरुषा, तें गा! अर्जुना! ॥ ७ ॥ [13]अज्ञानीं झाला तमोगुण । सर्वां मोह करी जाण । विस्मरण अलसनिद्रेनें । तम बांधितसे. ॥ ८ ॥ [14]सुखेंशी योग करी सत्वगुण । कर्म करी रजोगुण । ज्ञान लपवी तमोगुण । प्रबळ [15]तेंमें वेष्टुनी. ॥ ९ ॥ रजतमातें पराभवून । सत्त्वगुण [16]होय, अर्जुन! । रज होय सत्त्वतम [17]मोडोन । सत्वरजेंसि [18]तेंम होय. ॥ १० ॥ सर्वेंद्रियीं शरीरीं । [19]प्रकाशज्ञान होय जरी । सत्वगुण [20]वाढे तरी । असें होतसे.

---

१. ह्या अध्यायास 'गुणत्रयविभागयोग' अथवा 'गुणातीतयोग' असें नांव आहे. ह्या अध्यायांत 'प्राण्यांस संसारांत ओढणारे जे प्रकृतिगुण आहेत, त्यांची उत्पत्ति, त्यांचें कार्य, त्यांचे धर्म इत्यादिकांचा विस्तार करून गुणातीतत्व प्राप्त झालें तरच अद्वैतज्ञान व अद्वैतविज्ञान होणें शक्य आहे; असें ठरवावयाचें आहे. त्याप्रमाणें गुणांचें स्वरूप समजून घेऊन त्या त्या गुणकृतबंधनापासून सुटावयाचें कसें हेंही सांगावयाचें आहे.' [प्रो० भानु]. २. मागाहून, पुन्हा. ३. ह्या संसारांतील जन्ममरणादि बंधनांपासून. ४. सायुज्य पावले, परमेश्वराचे स्वरूपाप्रत प्राप्त झाले. ५. न आले= उत्पन्न झाले नाहींत. ६. गर्भ ठेवण्याचें स्थान. ७. बीजारोपण करणारा. ८. येथें स्पष्टार्थ कळत नाहीं. ९. सत्वगुण (सत्वरूपी दोर) सुखसंगीं (सुखाच्या संगतीनें) [आणि] ज्ञानसंगीं (ज्ञानाच्या संगतीनें) [जीवास] बांधे (बांधितो, बद्ध करितो)—असा सान्वयार्थ. 'बाधे' असें पाठांतर. १०. निष्पाप, निष्कलंक अशा अर्जुना! ११. रजोगुणाच्या संगतीनें तृष्णा (जी वस्तु प्राप्त झाली नाहीं ती प्राप्त करून घेण्याची इच्छा) उत्पन्न होते—हा इत्यर्थ. १२. बद्ध करितो. १३. अज्ञानापासून तमोगुणाची उत्पत्ति झाली. १४. सुखाशीं. १५. अज्ञानानें. १६. रजतमातें (रजोगुण व तमोगुण यांना) पराभवून (दाबून टाकून) सत्वगुण होय (प्रकट होय). १७. सत्वतम (सत्वगुण व तमोगुण) यांस मोडून (पराभव करून) रज (रजोगुण) होय (उदय पावतो). १८. सत्वरजेंसि (सत्वगुण व रजोगुण यांस) [दाबून टाकून] तम (तमोगुण) होय (प्रादुर्भूत होतो, अस्तित्वांत येतो). १९. ज्ञानाचा प्रकाश. २०. वाढतो, वरचढ होतो.

॥ ११ ॥ विषयीं लोभप्रवृत्ती[1] । कर्मारंभ आणि अशांती[2] । इच्छा, भरतश्रेष्ठा! होती । विलास[3] रजोगुणाचा. ॥ १२ ॥ अस्फूर्ति[4], आळस, विसर, । असावध[5], मोह फार, । तमोगुणाचा व्यापार; । कुरुनंदना! ॥ १३ ॥ जेव्हां उदयातें पावे सत्व । तेव्हां मृत्यु पावे जीव । तयां स्वर्गादि ठाव[6] । राहावया प्राप्त होय. ॥ १४ ॥ रजोगुणांत मरिजे । तरी मनुष्यांमाजी जन्मिजे; । तमोगुणीं देह सांडिजे । तरी होइजे वृक्षादिक[7]. ॥ १५ ॥ कर्म करी सांग[8] सकळ । सात्विक शुद्ध[9] त्याचें फळ । रजोगुणांत दुःख केवळ । अज्ञान तमापासुनी. ॥ १६ ॥ सत्वगुणें होय ज्ञान; । लोभ रजोगुणेंकरून; । विस्मरण, मोह, अज्ञान, । हें होय तमोगुणास्तव. ॥ १७ ॥ सत्त्वीं[10] राहिले जाती स्वर्गास; । मनुष्यलोकीं राहे राजस; । अधःपतन पावती तामस । नीचगुणीं जे राहिले. ॥ १८ ॥ गुणाहूनि आणिक नाहीं कर्त्ता । असें पाहे जो तत्वतां । तो पावे मत्स्वरूपता[11] । द्रष्टा असोनी. ॥ १९ ॥ देहीं जे झाले तीन गुण । त्यां[12] देही[13] अतिक्रमून[14] । जन्म-मृत्युजरादुःखांपासून । सुटोन मोक्षातें भोगिती'. ॥ २० ॥ अर्जुन म्हणे, 'श्रीकृष्णा! । कवणें लक्षणीं त्रिगुणा । उल्लंघिलेंसें जाणिजे या जना, । काय त्याचा आचार वर्ततसे?' ॥ २१ ॥ 'प्रकाश[15] प्रवृत्ति जाणे । मोह सत्त्वादिल[16]-क्षणें । प्रवृत्ति कर्माचेनि गुणें[17] । कर्मीं द्वेष नसे जया; ॥ २२ ॥ उदासीनापरी[18] जो राहत । कर्मीं चंचळ न होत । असे हे गुण वर्तत । कांहीं कौज[19] न करी; ॥ २३ ॥ स्तुतिनिंदा मानापमान । समान, आत्मनिष्ठता ध्यान, । ज्या सुवर्ण[20]-मृत्तिका समान । भासतसे ज्ञानिया; ॥ २४ ॥ तुल्य मानापमान । मित्रारिपक्षीं[21]

---

१. जें काय दृष्टीस पडेल तें हवेंसें वाटणें, हांवरेपणा. २. अस्वस्थता, धडपड. ३. खेळ, लीला. ४. उत्साहशून्यता. ५. असावधपणा, अनवधान, दुर्लक्ष्य. ६. ठिकाण, जागा. ७. मूळांत 'मूढयोनिषु' असें आहे व त्यावर 'मूढयोनिषु पश्वादियोनिषु जायते' असें आचार्यांचें भाष्य आहे. ८. यथासांग, विध्युक्त. ९. शुद्ध=रज किंवा तम यांच्या विरहित. १०. सत्वगुणावलंबी, सात्विक. ११. माझ्या स्वरूपाचे ठिकाणीं तादात्म्यवृत्ति. १२. त्यांना (त्रिगुणांना). १३. देहधारी (प्राणी). १४. अतिक्रमण करून, मागें टाकून. १५. ओंवी २१ मधील अर्जुनाच्या प्रश्नाचें उत्तर भगवान् देतात. १६. सत्वादि [गुणांचीं] लक्षणें प्रकाश, प्रवृत्ति [आणि] मोह [हीं अनुक्रमें होत असें जो] जाणे (जाणतो)–असा पहिल्या दोन चरणांचा अन्वय. 'सत्त्वादिमोहलक्षणें'–असा अन्य पाठ. १७. येथें कांहीं अपपाठ असावा असें वाटतें. १८. उदासीन (तटस्थ) मनुष्याप्रमाणें. १९. कार्य, काम, खटाटोप. २०. अध्याय ६ ओंवी ८ पहा. २१. मित्र+अरि+पक्षीं=मित्र किंवा शत्रूच्या पक्षांतील लोकांसंबंधानें.

समान । [1]आरंभ सर्व टाकून । [2]गुणातीत असे. ॥ २५ ॥ [3]अव्यभिचारी भक्ति करून । भक्तियोगें उपासून । तिन्ही गुणांतें लंघून । ब्रह्मीं जातसे. ॥ २६ ॥ वेदांची आणि मोक्षाची । शाश्वत धर्मांची । एकांत सुखाची । [4]प्रतिष्ठा [5]सोहळा [6]मुक्तेश्वर.' ॥ २७ ॥

---

## अध्याय पंधरावा.

'ऊर्ध्वं मूळ [8]वृक्षाचें । अध: शाखाविस्तार त्याचे । सत्य वेद [10]पर्णे त्याचे । जाणे तो [11]अर्थवक्ता. ॥ १ ॥ अध ऊर्ध्वं विस्तारल्या शाखा । [12]गुणफांदिया पसरिल्या देखा । [13]कर्मे मूळें [14]अधो गेलीं आइका । मनुष्यलोकीं. ॥ २ ॥ तयाचें स्वरूप नकळे कैसें । आदि अंत [15]प्रतिष्ठा न दिसे । तो [16]दृढमूळ [17]अश्वत्थ असे । [18]असंगशस्त्रें तोडावा. ॥ ३ ॥ [19]त्याचें त्यामध्यें धुंडणें । परतोन पैं न येणें । आदि-

---

१. सर्व सकामकर्मांचा आरंभ. २. त्रिगुणांच्या पलीकडचा, जीवन्मुक्त. अध्याय २ यांत वर्णिलेलीं स्थितप्रज्ञ पुरुषाचीं लक्षणें येथील गुणातीत पुरुषाच्या लक्षणांशीं ताडून पाहण्यासारखीं आहेत. ३. शुद्ध, एकनिष्ठ. ४. वसतिगृह, निवासस्थान. ५. गौरव, थोरपणा. ६. मुक्त+ ईश्वर=जीवन्मुक्तांमध्यें श्रेष्ठ (भगवान्); (पक्षीं) मुक्तेश्वरकवि. ७. ह्या अध्यायास 'पुरुषोत्तमयोग' असें नांव आहे. ह्या अध्यायास हें नांव देण्याचें कारण ओंव्या १६–१९ वरून स्पष्ट होतें. ८. प्रपंचवृक्षाचें मूळ (पाळेंमुळें) ऊर्ध्व (वर आहेत). पहिल्या तीन ओव्यांत प्रपंचवृक्षाचें **रूपक** आहे. कठोपनिषदामध्यें संसाराचें असेंच वर्णन केलें आहे:–'ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख एषोऽश्वत्थ: सनातन: । तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते । तस्मिंल्लोका: श्रिता: सर्वे तदु नात्येति कश्चन ॥' ह्याचा अर्थ:–हा (संसार) सनातन अश्वत्थवृक्ष आहे. त्याचीं मुळें वर जातात व त्याच्या शाखा खालीं येतात. ह्या संसारवृक्षाला शुक्र (शुद्ध) म्हणतात; त्याला ब्रह्म म्हणतात, त्यालाच अमृत असेंही म्हणतात, त्याच्या आश्रयानें सर्व लोक आहेत. त्याच्या पलीकडे कोणीही जात नाहीं. ९. फांद्या खालीं आहेत. १०. चार वेद हीं त्या वृक्षाचीं पानें. ११.मूळांत 'वेदवित्' (वेदवेत्ता) असें पद आहे. १२.सत्व, रज, तम हे जे गुण त्या प्रपंचवृक्षाच्या फांद्या. १३. ह्या जगांतील आपण केलेलीं बरीं वाईट कृत्यें हीं मुळें. १४. खालीं. १५.अस्तित्व, मधली स्थिति. १६.ज्याचीं मूळें जमिनींत फार खोल गेलीं आहेत असा. १७. प्रपंचाला 'अश्वत्थ' वृक्ष म्हणण्याचें कारण:–'अ' म्हणजे 'नाहीं,' 'श्वस्' म्हणजे 'उद्यां' आणि 'स्था' म्हणजे 'राहणें'; यापासून उद्यां राहीलच याचा नेम नाहीं अर्थात् अशाश्वत, असा 'अश्वत्थ' शब्दाचा मूळ अर्थ आहे. [कै. **रा. भि. गुं**जीकरकृत 'सुबोधचंद्रिका' टीका]. संसाराचें अस्तित्व उद्यां असेल कीं नाहीं अशी नेहमीं शंका असते म्हणून त्यास 'अश्वत्थ' असें म्हणतात. १८. वैराग्यरूपी शस्त्रानें. असंग=अहंममताशून्यत्व. १९. त्यामध्यें (त्या अश्वत्थांत) त्याचें धुंडणें (त्या उत्तमपदाचा शोध करावा).

पुरुषीं [1]पावणें; । जाणें हें सत्य. ॥ ४ ॥ गेला [2]मानमोह तयांचा । [3]विषयसंग त्यजूनि आरंभ अध्यात्माचा । कामना संबंध तोडी सुखदुःखांचा । ते ज्ञाते परमपद पावती. ॥ ५ ॥ सूर्यतेज आणि चंद्रप्रभा । अग्निदीप्ति नाहीं शाश्वत-[4]नभा । माझें [5]तेजधाम [6]अनादिशोभा । नाशरहित सर्वकाळ असे. ॥ ६ ॥ सर्व भूतीं [7]ममांश जाण । असें मी सर्व व्यापून । [8]साही इंद्रियें मनआदीकरून । [9]प्रकृतीं मीच चालवीं. ॥ ७ ॥ [10]जे शरीरातें धरिती, । वागविती घेऊनि जातीं; । [11]वायो परिमळ येती । वारा [12]गंध नेतसे. ॥ ८ ॥ श्रोत्रचक्षुत्वचाजिव्हा-घ्राण । यांस मनचि अधिष्ठान । सकळ विषयांचें [13]सेवन । [14]येणेंचि होय. ॥ ९ ॥ [15]असणें अथवा जाणें । [16]गुणकर्म भोगणें । हें ज्ञानियां लागे देखणें । मूर्ख एक न देखती. ॥ १० ॥ योगी आपुले ठायीं । निजस्वरूपातें [17]पाहीं । आत्मा ज्यां आधीन नाहीं । ते [18]अबुद्धि न देखती. ॥ ११ ॥ जें सूर्यतेज जगीं भासे । जें चंद्रीं आणि अग्नीचे ठायीं असे । तें तेज [19]माझेनि प्रकाशे । तेज तें माझें जाण तूं. ॥ १२ ॥ पृथ्वींत प्रवेशोनी । आत्मबळें [20]भूतें

---

१. सायुज्यप्राप्ति करून घ्यावी. ह्या ओवींतील 'धुंडणें,' 'येणें,' 'पावणें' ह्या क्रियावाचकनामांचा येथें क्रियापदाऐवजीं उपयोग केला आहे. अशा प्रकारचीं उदाहरणें काव्यग्रंथांत व इतर ठिकाणीं क्वचित् आढळतात; जसें:-(१) वारंवार पत्र पाठवून कुशल कळवीत **जाणें**. (२) सर्वज्ञाला अज्ञ मनुष्यें काय ज्ञान **शिकविणें** [मोरोपंत]. २. अभिमान आणि मोह. 'गेला माज ही' असा अन्यपाठ आहे. ३. विषयासक्ति, विषयवासना. ४. शाश्वतपदरूपीं आकाशाला. ब्रह्मतेजापुढें सूर्य, चंद्र व अग्नि यांचें तेज फिकें पडतें—हा तात्पर्यार्थ. ५. तेजस्वी असें श्रेष्ठ पद (ब्रह्म). ६. ज्याच्या शोभेला आद्यंत नाहीं असें, अत्यंत शोभायमान; मूळ श्लोक व ही ओवी यांत बराच फरक आहे. ७. माझा अंश. यच्चावत् जीवमात्र माझेच अंश आहेत—हा इत्यर्थ. ८. कर्ण, नेत्र, त्वचा, जिव्हा, आणि घ्राण हीं पांच कर्मेंद्रियें व सहावें मन. (पुढें ओंवी ९ पहा). ९. प्रकृतीं=देहाकृतींत, शरीरांत. (वामनपंडित–यथार्थदीपिका–अ० १५ ओ० ४७७-४९४ पहा.) मूळांत 'प्रकृतिस्थानि' म्हणजे 'शरीरांत राहणारीं, शरीरांतलीं' असें आहे. १०. माझे अंश. ११. वायूच्या योगानें. १२. सुगंध, सुवास. रा० शंकर कानोजी (सावंतवाडी) यांच्या पोथींत असा पाठ आहे:–'या शरीरानें धरिती । वागविती घेउनि जाती । जैसा वायु परिमळाचिये प्रति । तयापरि असे ॥.' १३. उपभोग. १४. इंद्रियांच्या द्वारानें. १५. ह्या देहामध्यें असणें किंवा देहापासून विमुक्त होणें. १६. सत्वरजादिकांनीं युक्त असलेलें कर्म. १७. पाहतो. १८. बुद्धिहीन, मूढ, अज्ञानी. १९. माझ्या योगानें, माझ्यामुळें. २०. सर्व प्राणिमात्र.

धरोनी[1] । रसस्वरूप[2] चंद्र होउनी । तेजें औषधी[3] पोषितों. ॥ १३ ॥ मी वैश्वा[4]-
नर होउनी । असें प्राणियांचे देहीं जैाठराग्नी[5] । प्राणापान समान[6] करूनी । मी
पचवीं अन्नें चतुर्विधें[7]. ॥ १४ ॥ मी प्रविष्ट असें सर्वांचे हृदयीं । मजपासोनि
स्मृति, ज्ञान, अज्ञान, पाहीं । उपनिषद्भाग मींच केले तेही । वेदही मीच जाण-
णार. ॥ १५ ॥ लोकीं पुरुष दोन जाण । एक क्षर[8], दुसरा अक्षर[9] जाण ।
सर्व भूतें हें क्षरप्रमाण । अक्षर परमात्मा. ॥ १६ ॥ पुरुष उत्तम तो आंणिक[10] ।
परमात्मा बोलिजे तोचि एक । व्यापक असोनि धरी[11] तीन लोकें[12] । अव्यय ई-
श्वर जो. ॥ १७ ॥ यांकारणें[13] क्षराहूनि मी अतीत । अक्षराहूनि उत्तम म्हणि-
जेत । मी वेदीं आणि लोकांत । **पुरुषोत्तम** नाम माझें. ॥ १८ ॥ जे ज्ञानी
होऊनि असती । आणि **पुरुषोत्तम** जाणती । ते सर्व जाणूनि समजती ।
सर्वभावें[14] गा! अर्जुना! ॥ १९ ॥ हें गुह्यतम[15] शास्त्र । म्यां सांगितलें अतिप[16]-
वित्र । हें उत्तम जें यंत्र[17] । त्वां स्वतंत्र[18] होइजे.[19]' ॥ २० ॥

---

१. आवरून धरून (किंवा) धारण करून. २. मूर्तिमंत रसच. ३. चंद्र सर्व औषधींचें पोषण करितो अशी समजूत आहे. [मुक्तेश्वर–वनपर्व–अध्याय १ ओंवी ४३ पहा]. ४. अग्नि. ५. प्राणिमात्राच्या पोटांत नाभिकमळाजवळ 'विश्वार्चि' नामक अग्नि असतो तो. ६. प्राण व अपान हे समान (सारखे) करून. मूळांत 'प्राण व अपान यांनीं युक्त होऊन' असें आहे. ७. 'लेह्य, पेय, चोष्य, खाद्य । अन्नें बोलिलीं चतुर्विध. ॥' [मुक्तेश्वर–आदिपर्व–अ० २९।६०]. खाद्य (चावून खाण्याचें), चोष्य (चोखून खाण्याचें), लेह्य (चाटून खाण्याचें) आणि पेय (पिण्याचें)– हीं चतुर्विध अन्नें [विशेष स्पष्टीकरणार्थ मुक्तेश्वर–वनपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० ११ टीप पहा]. ८. नाशवंत. ९. नाशशून्य, अविनाशी. 'अक्षर म्हण' असा अन्य पाठ. १०. आणखी, भिन्न, निराळा. ११. धारण करितो. १२. स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ–हे तीन लोक. १३. ज्या अर्थी मी क्षराहूनि अतीत (क्षराच्या पलीकडचा) व अक्षराहूनि उत्तम (श्रेष्ठ) आहें. १४. कायावाचामनःपूर्वक, नवविधा भक्तियुक्त होत्साता. १५. अत्यंत गूढ, अत्यंत गुप्त. 'हें गुह्यतमशास्त्र बांधियलें । सख्या! गुह्य सांगितलें ।' असा अन्यपाठ. १६. मूळांत 'अनघ' असें पद आहे व तें अर्जुनाचें विशेषण आहे. १७. यंत्र=नियमन करणारें (?). हें शास्त्राचें विशेषण. (यंत्र=थांबविणें, नियमन करणें). १८. षड्रिपु व सुखदुःखादि द्वैतशून्य (?). १९. ह्या ओंवीचे शेवटचे दोन चरण मूळापासून भिन्नार्थक आहेत. मूळांत 'एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत' असें आहे. रा० शंकर कानोजी यांच्या पोथींतील पाठः–'हें गुह्य उत्तम शास्त्र । जें सांगितलें अति पवित्र । हें जाणोनि जे होती बुद्धिमंत । ते कृतकृत्य जाण भारता! ॥'

# अध्याय सोळावा.[1]

श्रीकृष्ण म्हणे, '[2]ज्ञानयोगाची स्थिती । [3]ज्ञानयज्ञ [4]दमयज्ञ म्हणिजेती । [5]स्वाध्याय [6]आर्जव करिती । [7]सत्त्वें सर्वांसी अभय दे. ॥ १ ॥ हिंसा न करी, क्रोध न करी । सत्य, शांति, [8]त्याग असोनि, निंदा न करी । [9]सर्वत्र मार्दवदयाधारी । लज्जा असोनि [10]चंपलता टाकी. ॥ २ ॥ सत्य, क्षमा, [11]परमशुची । द्रोह [12]साभिमान नाहींची । अशी बुद्धी जयाची । तया दैवीसंपत्ती [13]जाण. ॥ ३ ॥ दंभ, दर्प, अभिमान । क्रोध, निंदा, [14]पारुष्य, जाण । हे अज्ञानाचे गुण । [15]ऐसा तो [16]आसुरसंपदी; पार्था ! ॥ ४ ॥ दैवीसंपत्तीनें मोक्ष होय । आसुरसंपत्तीनें बद्ध होय । तूं दैवीसंपत्तीचा होय । म्हणोनि [17]शोकीं अयोग्य तूं. ॥ ५ ॥ यालागीं भूतसृष्टी [18]दोन्ही । दैवी आणि आसुरयोनी । दैवी [19]सांगितली विस्तारोनी । आसुरी आतां आइक; पार्था ! ॥ ६ ॥ [20]प्रवृत्ति आणि [21]निवृत्ति । असुर ते नेणती । [22]शौचें [23]आचार विसरती । आसुरीयोगें. ॥ ७ ॥ त्रैलोक्य [24]असत्य [25]अप्रतिष्ठित बोलती । ईश्वर नाहीं ऐसें म्हणती । मैथुनेंच [26]प्रजोत्पत्ती । मूढांचें ज्ञान हें. ॥ ८ ॥ ऐशीं दृष्टीं

---

१. ह्या अध्यायास 'दैवासुरसंपद्विभागयोग' असें नांव आहे. ह्या अध्यायांत सत्व, रज आणि तम ह्या तीन गुणांनुरूप व्यक्त होणाऱ्या दैवी, आसुरी व राक्षसी प्रकृतींचा विस्तार करून दैवी प्रकृतीच्या पुरुषांस मात्र संसारांतून मुक्त होण्याची पात्रता आहे; आसुरी व राक्षसी प्रकृतीच्या लोकांस ही पात्रता नाहीं, हें स्पष्ट करून दाखविलें आहे. २. आत्मज्ञान प्राप्त होईल अशा उपायांचे ठिकाणीं एकनिष्ठा. पाठभेद:—'आत्मयोगाची'. ३. 'दानयज्ञ' असें पाठांतर. ४. इंद्रियदमन, विषयविन्मुखता. पाठभेद:—'दानदमतपयज्ञ म्हणिजेति'. ५. आपल्या धर्मग्रंथांचें अध्ययन. ६. (मनाचा) सरळपणा. ७. सत्वगुणाच्या योगानें. ८. 'अत्याग असोनि दान करी' असा अन्य पाठ. ९. सर्व प्राणिमात्रांचे ठायीं. १०. अस्थिरपणा, कारणावांचून कर्म करण्याची प्रवृत्ति. ११. अत्यंत शुचिर्भूत. १२. अभिमाना(गर्वा)सह द्रोह (वैर). १३. दैवीसंपत्ति प्राप्त होते—हा इत्यर्थ. १४. पारुष्य=कठोरपणा, दुसऱ्यास टोंचून बोलणें. १५. वर सांगितलेल्या गुणांनीं युक्त. १६. आसुरी संपत्ति मिळण्यासारखें ज्याचें पूर्वकर्म आहे असा (पुरुष). १७. शोका (शोक करण्यास) अयोग्य. शोक करूं नको—असा भावार्थ. १८. दोन प्रकारची (दैवी आणि आसुरी). १९. ह्या अध्यायाच्या ओंव्या १–३ व मागें अध्याय २, ९, १२, १३, व १४ यांत. २०. कर्ममार्ग. २१. कर्मसंन्यास. २२. अंतःकरणशुद्धि, शुचिर्भूतपणा. २३. सदाचार. २४. सत्यशून्य, सत्यरहित. २५. निराधार, धर्माधर्माचा आधार नाहीं असें. २६. गीतार्थबोधिनीचा पाठः—'प्रजापती'. प्रजोत्पत्ति व्हावयास ईश्वरी कृपाप्रसाद किंवा पूर्वजन्मार्जित सुकृतासुकृत कारण आहे, असें आसुरी पुरुषांस वाटत नाहीं—हा इत्यर्थ. २७. ऐशा दृष्टीं=अशा प्रकारच्या (नास्तिक) दृष्टीचा (विचाराचा) आश्रय करून.

स्वार्थीं गुंतोनी । अल्पबुद्धी अल्पज्ञानी होऊनी । उग्र कर्में आचरोनी । क्षेया[1]-कारणें करिती जगीं. ॥ ९ ॥ दंभश्लाघामदेंकरूनी । बुडोनि कामकामनीं[2] । मोहें[3] दुर्बुद्धीकरोनी । अशुचिव्रत[4]. ॥ १० ॥ मृत्युचिंतेनें व्यापिले । मृत्युचिंतनीं मृत्यु पावले । पुरुषार्थ भोग वेगळाले । प्रत्यक्ष, निश्चयो झाला. ॥ ११ ॥ आशापाशें बांधले । कामक्रोधें व्यापिले । अभिलाष[5] आचरले । अन्यायधनें[6]. ॥ १२ ॥ लाभ झाला आजि मज । मनोरथ[7] पावलों सहज । आजि हें आलें[8] मज । पुन्हां आणिक धन होईल. ॥ १३ ॥ म्यां वैरी मारिले, । बहुतांचे प्राण घेतले, । समर्थ मी, मज भोग झाले, । मी सिद्ध[9], बळकट, सुखी. ॥ १४ ॥ लोकांमाजी मी थोर । कोणी न राहे मजसमोर । यज्ञ दान करून होईन सुखतर[10].' । ऐसा अज्ञानें झांकोळला[11]. ॥ १५ ॥ ऐसा मोहजाळें वेष्टूनी । अनेक चित्तें भ्रमोनी । कामभोगातें इच्छोनी । नरकीं पडती ते जाण. ॥ १६ ॥ 'सर्व' म्हणे 'म्यां केलें.' । ऐसे स्तब्ध[12], धनें मातले[13] । त्यांहीं जरी सर्व यज्ञ केले । तरी ते नांममात्र[14]. ॥ १७ ॥ अहंकारबळदर्पेंकरोनी । कामक्रोधातें आश्रयोनी । मी परमात्मा असोनी । ज्यांहीं न देखिला; ॥ १८ ॥ ज्यांहीं मज द्वेषिलें । ते नर अधम बोलिले । तेणें पापें जन्मले । दुष्ट योनींत. ॥१९॥ ते आसुरीयोनींत जन्मती । जन्मोजन्मीं मज अंतरती । तयां होय अधोगती । कौंतेया! जाण पैं. ॥ २० ॥ आत्मया[15] नासावयाकारण । द्वारें असती गा! तीन । कामक्रोधलोभ जाण । तस्मात् हें त्रय टाकीं. ॥ २१ ॥ हीं अज्ञानाचीं तीन द्वारें । त्यजोनियां जो सत्कर्म आचरे । तोचि प्राणी पावे निर्धारें । कौंतेया! परमगती. ॥ २२ ॥ शास्त्रविधी सोडूनी । जो वर्ते ईच्छेकरूनि[16] ।

---

१. क्षय व्हावयासाठीं, जगाचा नाश होईल अशीं. २. विषयवासनेमध्यें. ३. मोहाला वश होऊन, मूढ झाले असल्यामुळें. ४. अमंगल आचरण करणारे. ५. दुसऱ्याची वस्तु हरण करण्याची इच्छा, अपहारबुद्धि. ६. अन्यायानें मिळविलेल्या द्रव्याच्या योगानें. ७. मनोरथ=मनास इष्ट वाटणाऱ्या प्रिय वस्तु. ८. प्राप्त झालें. ९. सिद्ध=जन्मतःच ज्यास धर्म, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्यादिकांचा अतिशय प्राप्त झाला आहे असा पुरुष. [भगवद्गीता—अध्याय १० श्लोक २६ वरील आचार्यांचें भाष्य पहा.] १०. अत्यंत आनंदयुक्त. ११. गुरफटून गेला, आच्छादित झाला. १२. मानी. 'अत एव स्तब्ध अत्यंत । खुंट खैराचा लवेना निश्चित । तैसें नम्र कधीं नव्हता, गर्वित । युक्त धनमानमदें करूनी. ॥' (यथार्थदीपिका—१६।३२५.) १३. उन्मत्त झाले. १४. नांवाचे मात्र, श्रद्धाशून्य. १५. आत्म्याचा नाश करणारीं. १६. आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणें, 'मनःपूतं समाचरेत्' या न्यायानें.

तया सुख नाहीं म्हणोनी । परमगती नसे. ॥ २३ ॥ शास्त्र[1] तें कारण प्रमाणें । कार्याकार्याकारणें[2] । वेदोक्त जें वर्तणें । त्यासी योग्य[3] तूं. ॥ २४ ॥

---

## अध्याय सतरावा[4].

**पार्थ** म्हणे, 'कृष्णनाथा! । शास्त्रविधी[5] टाकोनि योग करितां । त्यांची निष्ठा कोण[6]? समर्था! । ते सांगिजे मज.' ॥ १ ॥ देव म्हणे, 'गा! अर्जुना! । श्रद्धा त्रिविध असे जाणा. । सात्त्विक, राजस, तामस माना । ते आतां आइकें. ॥ २ ॥ सत्त्वरूप[7] श्रद्धा सर्वांसी । परी ज्याची भक्ती ते परियेसी । तो पुरुष श्रद्धायुक्त ज्या देवांसी । तो तद्रूप[8] होय. ॥ ३ ॥ सात्त्विक देवांतें येजिती[9], । राजस यक्षांतें पूजिती; । प्रेतभूतांतें येजिती । ते तामस जाणावे. ॥ ४ ॥ अशास्त्रविहितें[10] घोरें[11] । जो तप करी अविचारें । अहंदंभें[12] अपारें । कामक्रोधें बांधला; ॥ ५ ॥ शरीरीं पंचभूतें पीडिती । मला[13] देहीं कष्ट होती । ऐसे जे पुरुष असती । ते असुर जाण. ॥ ६ ॥ सर्वजीवांचा आहार । त्रिविध आवडती प्रकार । यज्ञतपदान[14], सार । तें तूं आइक. ॥ ७ ॥ सत्व आयुष्य बल आहार । वाढवी सुख प्रीति विस्तार । गोड आंबट तिखट प्रकार[15]; । प्रकार

---

१. 'शास्त्र'शब्दाची व्याकरणरीत्या व्युत्पत्ति एके ठिकाणीं अशी आढळते:–'शास्तीति शाः, त्रायत इति त्रम्, शाश्च तत् त्रं च शास्त्रम्.' ह्या व्युत्पत्तीवरून शास्त्रशब्दाचा अवयवार्थ असा होतो कीं जें अमुक करा असें अनुशासन करितें व अमुक वर्ज करा, असें सांगून अकार्यापासून रक्षण करितें तें शास्त्र. २. करावें कोणतें व करूं नये कोणतें (कार्य) त्यासंबंधें. ३. अखेरीस श्रीकृष्णपरमात्मा अर्जुनास त्याच्या धर्मास (क्षत्रियधर्मास) योग्य असें कर्म (युद्ध) करावयास सांगत आहेत–हें वाचकांच्या ध्यानांत आलेंच असेल. ४. ह्या अध्यायास 'श्रद्धात्रयविभागयोग' असें नांव आहे. यांत श्रद्धेच्या तीन प्रकारांचें विवेचन करून, अज्ञानी पण श्रद्धालु जनांनीं कोणत्या श्रद्धेचा आश्रय करावा म्हणजे त्यांची आत्मिक उन्नति होईल; हें श्रीकृष्णपरमात्म्यांनीं सांगितलें आहे. ५. अशास्त्र, शास्त्रमार्गविरहित, शास्त्रनिषिद्ध. ६. कोणत्या प्रकारची, सात्विक, राजस किंवा तामस? ७. सत्वांशयुक्त. ८. त्या देवाच्या ठिकाणीं तादात्म्य पावतो. ९. पूजन करितात, आराधना करितात. १०. शास्त्रनिषिद्ध, शास्त्रबाह्य. ११. घोर तप=स्मशानांत नग्न होऊन काळोख्या रात्रीं भूतप्रेतांची आराधना करणें इत्यादि. येथें भगवंतांचा कटाक्ष 'जारणमारणा'वर असावा असें वाटतें. १२. अहंकार आणि दंभ यांहीं युक्त होत्साता. १३. सर्वांच्या अंतरात्म्याच्या ठिकाणीं वास करणारा जो मी (प्रत्यक्ष भगवान्) त्याला. १४. यज्ञ, तप व दान यांचेही तीन तीन प्रकार आहेत. १५. याचा मूळाशीं मेळ नाहीं.

तेही सांगतों. ॥ ८ ॥ कटु, आंबट, खारट, [1]तीक्ष्ण । तिखट कोरडें अतिउष्ण । अन्न राजसांचें जाण । दुःखशोक होती तयां. ॥ ९ ॥ अमंगळ चवीहीन । शिळें विटलें तें जाण । उच्छिष्ट अमंगळ भोजन । तामसांचें. ॥ १० ॥ फळेच्छा टाकुनी । यज्ञ करी भक्तिकरूनी । [2]ऐकास एकनिष्ठ भजनीं । ऐसा यज्ञ सात्त्विकांचा. ॥ ११ ॥ दंभें कर्म जें करी, [3]मैनें । फळइच्छा तेणें । भरतश्रेष्ठा! ऐसें भजणें । तें कर्म राजस जाणावें. ॥ १२ ॥ वेदशास्त्रांविरहित । श्रद्धा नाहीं आणि करित । मंत्रहीन दक्षिणारहित । तो तामस यज्ञ बोलिजे. ॥ १३ ॥ देवगुरुब्राह्मण । तयांचें भक्तीसह पूजन । ब्रह्मचर्य अहिंसा जाण । तें तप शरीराचें. ॥ १४ ॥ [4]परापवादहीन बोले । [5]सत्यप्रियहित बोलिलें । वेदपठणीं मंत्रीं [6]आथिलें । तें तप वाचिक गा! **पार्था!** ॥ १५ ॥ मन निश्चळ करी शांत । कांहीं न बोले असत्य । आत्मशुद्धि निश्चित । तप हें मानसाचें. ॥ १६ ॥ जें करणें तें श्रद्धेसहित । नर तप [7]त्रिविधें करीत । तें सात्त्विक म्हणत । तप सात्त्विकांचें जाण पां. ॥ १७ ॥ सन्मान [8]पूजा करूनी । [9]दुर्भर्त्सनादंभेंकरूनी । हें राजस तप जाणोनी । [10]अशाश्वत चंचळ. ॥ १८ ॥ मूढत्व [11]झाला अंगीकारी । आणि [12]पीडारूप तप करी । दुसरियासि धिक्कारी । तामसतप जाण गा! ॥ १९ ॥ यथाशक्ति दान देणें । [13]पात्रापात्रविचार करणें । [14]उपकाराविण देणें । हें सात्त्विकदान बोलिजे. ॥ २० ॥ सेवा करवूनि दान करी । फल इच्छूनि कर्म करी । [15]कष्ट मानूनियां अंतरीं । देणें दान राजस. ॥ २१ ॥ [16]अदेशीं [16]अकाळीं करी । भलतियास भजे जरी । ज्ञान

---

१. चांगलें क्षणक्षणीत. २. कोणत्या तरी एका विशिष्ट देवास. ३. मनांतून, मनापासून. 'दंभ कर्म जें करी मानें' असा अन्यपाठ. ४. परनिंदारहित. ५. खरें पण गोड व पथ्यकर असें. ६. वेदपठण व मंत्र यांनीं युक्त असें. ७. तीन प्रकारचें:—कायिक, वाचिक व मानसिक तप. ८. लोकांमध्यें आपला बहुमान व्हावा, मानमरातब वाढावा म्हणून केलेलें तप. ९. दुसऱ्याची निंदा, निर्भर्त्सना. १०. अनिश्चित अशा प्रकारच्या (राजस) तपाचें फळ मिळेल अशी खातरी नसते व कदाचित् मिळालें तरी चिरकाळ टिकत नाहीं—हा इत्यर्थ. ११. मूढत्व अंगीकारी झाला=मूर्खपणाला अंगीकारिता झाला. येथें कदाचित् 'मूढत्व ज्याला अंगी-कारी' असा मूळ पाठ असावा. १२. स्वतःस दुःख होईल असें. १३. ज्यास दान द्यावयाचें तो पुरुष योग्य आहे किंवा अयोग्य आहे याविषयीं नीट विचार करून. १४. ज्यास दान द्यावयाचें तो आपल्यावर कांहीं प्रत्युपकार करील अशी इच्छा न करितां. १५. दान करावयाचें पण संतोषपूर्वक नव्हे असें. १६. अयोग्य स्थळीं व अयोग्य वेळीं.

[1]नेणतां असत्कारी । तें दान गा! तामस. ॥ २२ ॥ '[2]ॐतत्सदि'ति विचारणें । यज्ञदानतप करणें । ही [3]ब्रह्मवादियाची खुण । जाणणें हेंची. ॥ २३ ॥ 'ॐतत्सदि'ति उच्चारणें । हें ब्रह्मयाचें बोलणें; । [4]येणें करी वेद यज्ञ ब्राह्मण । निर्माण झालें पाहीं. ॥ २४ ॥ मृत्तिका म्हणतां कुंभ जाण । कर्मब्रह्म हें अनुमान । मोक्षार्थी करिती यज्ञतपदान । [5]निष्काम मनानें. ॥ २५ ॥ भक्ति आणि [6]सद्भाव । तेथें सत्कर्मी तोचि स्वभाव । तोचि विचारितां ठाव । [7]सच्छब्द तोची. ॥ २६ ॥ म्हणून [8]यज्ञदानतपस्थिती । तो सच्छब्द बोलती । [9]येणें गुणें जें करिती । सत्यात्मक सत्य कर्म. ॥ २७ ॥ दान होम अश्रद्धेनें । तपहवन कीं करणें । [10]असत्; साधु नेणें, । मेल्या जितां निरर्थक.' ॥ २८ ॥

---

## अध्याय [11]अठरावा.

अर्जुन म्हणे, '**ना**रायणा! । मी इच्छितों [12]तत्वलक्षणा । त्याग आणि संन्यास ही [13]कवणा? । वेगळे करोनी सांग [14]मज.' ॥ १ ॥ '[15]अर्जुना! हीं ऐशीं । [16]कामनाफळें त्यागशी । तया म्हणती [16]संन्यासी; । [17]त्याग ईश्वरार्पण. ॥ २ ॥

---

१. याचकाची विद्वत्ता न जाणतां त्याचा अपमान करून, नंतर त्यास दान द्यावयाचें; अशा प्रकारच्या दानास तामस दान म्हणतात. २. ॐ+तत्+सत्–हीं तीन ब्रह्माचीं नांवें आहेत. ३. ब्रह्मज्ञानी पुरुषांची, ब्राह्मणांची. मूळांत 'ब्राह्मणाः' असेंच पद आहे. ४. ह्या 'ॐ' 'तत्' आणि 'सत्' ह्या त्रयीच्या योगानें. 'ॐ' ह्या शब्दापासून वेदोत्पत्ति झाली, 'तत्' शब्दापासून ब्राह्मणांची उत्पत्ति व 'सत्' शब्दानें यज्ञांची उत्पत्ति झाली–अशी कथा आहे. ५. फलेच्छारहित, फळाची इच्छा न करितां. ६. अस्तित्व, चांगलेपणा व मंगलत्व–असे 'सत्' शब्दाचे तीन अर्थ होतात. ७. 'सत्' हा शब्द. ८. यज्ञनिष्ठा, दाननिष्ठा व तपोनिष्ठा. स्थिती=निष्ठा. ९. येणें गुणें ('सत्' शब्दानें युक्त) जें (कर्म) करिती [तें] सत्यात्मक सत्य कर्म [होय]–असा अन्वय. १०. अश्रद्धेनें दान, होम, तप, हवन, कीं (आणखी काय वाटेल तें) करणें असत् [होय]; साधु नेणें (मी अश्रद्धायुक्त कर्मास साधु, सत्कर्म समजत नाहीं); [तें कर्म] मेल्या जितां निरर्थक (त्या कर्माचा मेल्यावर किंवा जीवंतपणीं कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं)–असा सान्वयार्थ. ११. ह्या अध्यायास 'मोक्षसंन्यासयोग' असें नांव आहे. गीताशास्त्राचा सारसंग्रह ह्या अध्यायांत आला आहे. १२. तत्व (रहस्य, यथार्थस्वरूप) आणि लक्षण. १३. त्याग कशास म्हणावें व संन्यास कशास म्हणावें हें स्पष्ट करून सांग. १४. ह्या ओंवीच्या ठिकाणीं **ना**वलेकर यांचे प्रतींत पुढील ओंवी आढळते:–'संन्यासाचें दीनोद्धरणपटो! । तत्व इच्छितों जाणों । त्यागाचेंही दानवदमना । मी वेगळें हृषीकेशा! ॥ १ ॥' १५. भगवान् उत्तर देतात. १६. काम्यकर्मे करावयाचींच नाहींत असा जो निश्चय त्यास 'संन्यास' म्हणतात. १७. कर्म करावयाचें परंतु त्याचें फळ ईश्वरास अर्पण करावयाचें अशी जी बुद्धि तीस 'त्याग' म्हणतात.

एक दोषरूप म्हणोनि कर्म त्यजिती । एक म्हणती तपयज्ञदान हेचि कर्माची गेती; । एक ऐसें पां सांगती । कर्म त्यजूं नये. ॥ ३ ॥ तो त्याग निश्चयेंसी आईक, । तुज न सांगूं मायीक. । तो त्याग त्रिविध, लोक । आचरताती देख तूं. ॥ ४ ॥ यज्ञदानतपकर्म न टाकावें । कर्म निरंतर अवश्य करावें । यज्ञदानतप स्वभावें । ज्ञानी तो पवित्र. ॥ ५ ॥ फलसंग त्यजोनी । नित्यकर्मे आचरोनी । हें जाणोनि मनीं । उत्तम मज मानिलें. ॥ ६ ॥ नित्यकर्म करावें । कर्मे करून दुंणवावें । अज्ञानें त्यजी स्वभावें । तामस त्याग बोलिला. ॥ ७ ॥ दु:खरूप आहे कर्मसंग । शेरीरकष्टें भयें करी त्याग । यास म्हणती राजस जेंग । येणें त्यागाचें फळ नाहीं. ॥ ८ ॥ कर्म अवश्य नित्य करी । फळाची अपेक्षा न धरी । ऐसा जो त्याग करी । तो सात्त्विक बोलिजे. ॥ ९ ॥ असत्कर्माचा द्वेष न करी । सत्कर्मी आसक्तता न धरी । त्यागी सत्वनिष्ठा वेरी । बुद्धिच्छिन्नसंशय. ॥ १० ॥ पुरुषास कर्मे करणें अवश्य । सर्वकर्मत्याग तोही अयोग्य । कर्मफळाचा त्याग । तो त्यागी बोलिजे. ॥ ११ ॥ अनिष्ट इष्ट आणि मिश्रित । हें त्रिविधकर्मांचें फल त्वरित; । त्याग न करी पावे सत्य । संन्यासी न पावती. ॥ १२ ॥ या कारणें मजपासुनी । पार्था! तूं आईक

---

१. येथें 'एक' शब्दाचा उपयोग 'कित्येक' अशा अर्थीं केला आहे; हा 'एक' शब्दाचा अनेकवचनी प्रयोग अजूनही व्यवहारांत आहे; व याची सांगड 'एक' किंवा 'दुसरे' या शब्दांशीं घातली जाते. या प्रयोगाला संस्कृताचा आधार आहे, कारण संस्कृतांत 'एके' हें रूप 'कोणी, कित्येक, कांहीं' या अर्थीं योजितात व त्याची 'अपरे' किंवा 'अन्ये' याशीं सांगड असते. २. श्रेष्ठ पदवी, अखेरची पायरी. ३. ऐसें कर्म=तपयज्ञदानादि कर्म. ४. असत्य, खोटें. 'अर्जुना! जाण हें थोर कौतुक' असा अन्यपाठ आहे. ५. तीन प्रकारचा. सात्त्विक, राजस आणि तामस किंवा पूर्वी अध्याय ३ श्लोक ३० यांत सांगितल्याप्रमाणें ममत्वत्याग, फलत्याग व स्वकर्तृत्वत्याग. ६. मान्य झालें, मला संमत आहे. ७. दुणवावें=दुप्पट करावें, वाढवावें. येथें खरा पाठ 'उणवावें' असा असावा, असें वाटतें. नित्यकर्मे करूनच प्राक्तनसंचित उणें करावें, हा इष्टार्थ आहे. ८. कर्मे त्यजी. ९. शरीरास कष्ट होतील या भयानें. १०. जग म्हणती—असा अन्वय. ११. अवश्य कर्म=अवश्य केलींच पाहिजेत अशीं संध्यावंदनहोमहवनादि नित्यकर्मे. १२. सत्वगुणाविषयीं निष्ठा वरी (धारण करितो) तो. मूळांत 'वरी' असा पाठ आहे तो अपपाठ असावा. १३. बुद्धीच्या योगानें छिन्न (=नष्ट) झाला आहे संशय (=मनांतील किंतू) ज्याच्या असा. कदाचित् खरा पाठ 'सुबुद्धिच्छिन्नसंशय' असा असावा. १४. येथें 'अशक्य' असा पाठ असता तरी चालला असता. मूळांत 'न शक्यं' असें आहे. १५. सुखदु:खमिश्रित. १६. आपल्या कर्मानुरूप इष्टानिष्ट फळ पावतो—असा भावार्थ. १७. संन्याशाला त्याच्या कर्माचें इष्टानिष्ट फळ भोगावें लागत नाहीं—हा इत्यर्थ.

सावध होउनी । सांख्यमतीं[1] बोलती म्हणूनी । कर्माचीं पांच कारणें. ॥ १३ ॥ अधिष्ठान तें शरीर । कर्त्ता तो आत्मापरिकर[2] । करणचेष्टा[3] इंद्रियव्यापार । पांचवें अदृष्ट[4] पैं. ॥ १४ ॥ शरीरवाचामनाच्या युक्तीं[5] । प्राणी जें आचरताती । बरें अथवा वाईट करिती । पांच कारणें त्या कर्माचीं. ॥ १५ ॥ ऐसें असतां केवळ जाण । कर्त्ता म्हणून देखे[6] बुद्धीकरून[7] । तो दुरात्मा मूर्ख जाण । अंध शास्त्रदृष्टिही[8]. ॥ १६ ॥ जया अहंभाव नाहीं । मी कर्ता ही बुद्धी न लिंपे कांहीं । तो लोकांसि मारील जर्‍हीं । तरी पातकासी न लिंपे. ॥ १७ ॥ ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञाता । कर्म तिर्‍हींची कर्तव्यता[9]; । कर्म, करण आणि कर्त्ता । हा संग्रह कर्माचा[10]. ॥ १८ ॥ ज्ञान, कर्म आणि कर्त्ता । वेगळाले गुणभेद[11] देखा । त्रिगुणांची संख्या । यथार्थ आइक. ॥ १९ ॥ सर्व भूतांचे ठायीं । अव्यय देखे पाहीं । वेगळे पदार्थ एके ठायीं । सात्त्विकज्ञान, देखें[12]. ॥ २० ॥ वेगळाले पदार्थ देखे ऐसे । नाना भावांची वृत्ती दिसे । भूतांचे ठायीं वृत्ति[13] असे । तें ज्ञान राजस म्हणावें. ॥ २१ ॥ न करावें तेंचि करी । अभिमानबळ चित्तीं धरी । अत्यंत बुद्धी भरी । तें तामस ज्ञान होय. ॥ २२ ॥ फळरहित नित्यकर्म करी । रागद्वेष[14] तो न धरी । फळउद्देशें[15] कर्म न करी । तें कर्म सात्त्विक बोलिजे. ॥ २३ ॥ सकाम कर्म करणें । अहंकारदंभ धरणें । सायासें[16] आचार दाखवणें । तें कर्म बोलिजे राजस. ॥ २४ ॥ दुसरियासी बंधन करणें । हिंसामोहें पोसणें । आरंभूनि कर्म टाकणें । तें कर्म तामस. ॥ २५ ॥ उत्साहें कर्म करी । फलेच्छा अहंकार न धरी । सिद्धी असिद्धी सैरी[17] । तो सात्त्विक जाण गा! ॥ २६ ॥ कर्म करूनि फल इच्छी । लुब्धक[18] हिंसात्मक अशुची[19] । जो सुखसंतोष पावे सवेंची[20] । तो राजस जाण गा! ॥ २७ ॥

---

१. सांख्यशास्त्रोक्त. २. आत्म्याचा परिवार. ३. कर्ण, नेत्र इत्यादि क्रिया करण्याचीं साधनें, चेष्टा=प्राण, अपान इत्यादिकांचे व्यापार. पाठभेद:–'कारणें चेष्टा'. ४. दैव. ५. युक्तीनें, योगानें. ६. (आपणच्च कर्ता असें) समजे. ७. बुद्धिपूर्वक, जाणूनबुजून. ८. ज्ञानदृष्टी. ९. ज्ञान, ज्ञेय आणि ज्ञाता [ह्या] तिर्‍हींची कर्तव्यता कर्म [होय]. म्हणजे ज्ञान, ज्ञानविषय आणि ज्ञाता हे कर्मप्रवर्तक होत–हा इत्यर्थ. १०. क्रिया घडविण्याला कर्म, करण आणि कर्त्ता ह्या त्रयीचा आश्रय लागतो; हा भावार्थ. ११. निराळ्या गुणांमुळें झालेले भेद. १२. हे अर्जुना! समजून घे. १३. भेदभाव, भेदरूप समज. १४. राग (अनुराग, प्रीति) आणि द्वेष (वैरभाव). १५. फळ मिळेल ह्या आशेनें. १६. आयासयुक्त, दुःख सोसून. १७. समान, सारखीच. १८. लुब्धक=लोभी. हिंसात्मक=परपीडादायी. १९. अमंगळ, अपवित्र. २०. एकदम, बरोबर.

अयुक्त[1] देहाभिमानी । निश्चळ ठक आळसी अज्ञानी । रागीट अतिद्वेष जाणोनी । कर्त्ता तामस बोलिला. ॥ २८ ॥ बुद्धिधृतीचे[2] गुण । त्रिविध हा भेद सांगेन । ते वेगळाले करून । ऐक धनंजया! तूं गा! ॥ २९ ॥ प्रवृत्ति निवृत्ति आणि कार्य । अकार्य, भय अभय । जाणे बंधमोक्षाचें स्थैर्य । बुद्धी ते सात्त्विक जाणिजे. ॥ ३० ॥ जो अधर्म धर्म धनंजया! । अकार्य कार्य जाणिया । ऐसे जो यैथाविधी[3] नेणिया । ते बुद्धी राजस गा! ॥ ३१ ॥ अधर्मातें धर्म जाणे । सर्व अर्थासि विपरीत म्हणे । आचार विपरीत असा जेणें[4] । अर्जुना! ते बुद्धि तामसी. ॥ ३२ ॥ धैर्य धरूनि मन । आणि प्राणेंद्रिय जाण । निश्चल योगपणें[5] । हें धैर्य सात्त्विकाचें. ॥ ३३ ॥ धर्म, अर्थ, काम जाण । अर्जुना! राहे धैर्यें करून । फळाची आशा घेऊन । तें धैर्य राजसाचें. ॥ ३४ ॥ निद्राशोकभयांतीं । विषाद आणि मदप्रीती । दुर्बुद्धी न होय परती[6] । धारणा तामस. ॥ ३५ ॥ आतां त्रिविध तें सुख । भरतर्षभा! तूं आइक, । दुःख जाऊनि, योगाभ्यासक । तो उत्तमगती पावतो. ॥ ३६ ॥ आरंभीं विषाचेपैरी[7] । शेवटीं अमृत होय अवधारीं । आत्मबुद्धीनें[8] जें करी । तें सुख सात्त्विक जाण. ॥ ३७ ॥ विषयेंद्रियसंयोगें । भोग भोगी सुखसंगें । शेवटीं विषतुल्य सांगे । तें राजस सुख जाण. ॥ ३८ ॥ आरंभ दाखवी बंधमोक्षाचियेपरी । परिणामीं तोच पदार्थ विकारी । निद्रा, आळस, अज्ञान धरी । तें सुख तामसाचें. ॥ ३९ ॥ या पृथ्वीवरी पाहीं । स्वर्गीं अथवा देवाचे ठायीं । त्रिगुणाविरहित सुटका नाहीं । तें माझें तेज केवळ. ॥ ४० ॥ ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र जाण । चारी वर्ण हे प्रमाण । त्यांसी कर्में वेगळालीं जाण । परि उपजती त्रिगुणापासुनी. ॥ ४१ ॥ शम, दम, तप, आचार, । शुचि, शांति, आर्जवपर, । ज्ञान, विज्ञान, आस्तिक्य स्थिर, । हें कर्म गा! ब्राह्मणाचें. ॥ ४२ ॥ शौर्य, तेज, धृति, दक्षपणें । संग्रामीं पाठ न देणें । दान समर्थपणें । हें कर्म क्षत्रियाचें. ॥ ४३ ॥ कृषि, गोरक्ष आणि वाणिज्य[9] । हें वैश्यकर्म स्वभावज[10]; । शूद्रासि सेवाकर्म सहज । झालें वर्णासमागमें. ॥ ४४ ॥ आपुलाले कर्मीं वर्तत । ते नर सिद्धीतें पावत । आपुले कर्मीं

---

१. ज्याचें चित्त एकाग्र नाहीं असा, कार्याकडे दुर्लक्ष्य करणारा. २. धृति=दृढनिश्चय, शांति. ३. यथार्थस्वरूपानें, स्पष्टपणें. ४. ज्या बुद्धीच्या योगानें. ५. योगाची वृत्ति, योगीपणा. ६. दूर, निराळी. ७. प्रमाणें, सारखें. ८. आत्मविचारामध्यें निमग्न अशा बुद्धीच्या योगानें. ९. क्रयविक्रयाचा व्यापार. १०. स्वभावोत्पन्न, स्वभावाला अनुरूप.

सिद्धी होत। कैसी ते आइक पां. ॥ ४५ ॥ स्वकर्में[1] जगाची प्रवृत्ती[2]। तेणें सर्व बांधिले असती। म्हणोनि स्वकर्मी आचरती । ते सिद्धी पावती देख. ॥ ४६ ॥ स्वधर्म हीनें[3] परि तो कैल्याण[4], । परधर्मापरिस उत्तम जाण. । आपुलें कर्म आचरणें । येणें पाप न होय निश्चितें. ॥ ४७ ॥ म्हणोनि स्वकर्म गा! अर्जुन । दोषरूप म्हणून न द्यावें टाकून । येन्हवीं सर्व कर्म नाहीं दोषाविण । अग्नि तेथें धूम्र असे. ॥ ४८ ॥ सर्वत्र बुद्धी असक्त[6] करूनी । निस्पृह[7] वर्ते आत्मा जिंकोनी । तयासी कर्माची परमसिद्धी देवोनी[8] । तो संन्यासें पावतसे. ॥ ४९ ॥ जैसें ब्रह्म तैसे सिद्धि पावती । तें आइक अर्जुना! सांगेन यथास्थिती । तया ज्ञानाची प्रतीती । संक्षेपें करिता होय. ॥ ५० ॥ आत्मत्वीं[9] निष्काम चित्तीं । बुद्धी करूनियां धरिती। शब्दादि विषयांतें त्यजिती।प्रीति द्वेष टाकूनियां; ॥ ५१ ॥ एकांतीं बैसोनियां । लघु आहार असोनियां । मनोवाक्कायनिग्रह[10] करूनियां । योगध्यानवैराग्य; ॥ ५२ ॥ कामक्रोधबलदर्पक । अहंकार परिग्रहादिक[11] । सांडूनि होइजे निर्मम[12] शांत निःशंक । जे ब्रह्म व्हावया इच्छिती. ॥ ५३ ॥ आत्मा प्रसन्न झालिया ब्रह्म होती । शोक इच्छाही न करिती । भक्ति माझी सर्व भूतीं । ते सर्व पावती सम[13]. ॥ ५४ ॥ भक्तीनें सम जाणती । जशी आहे माझी स्थिती । आत्मत्त्वें तत्त्व जाणती । प्रवेशती तयांत[14]. ॥ ५५ ॥ सर्व कर्में प्रारब्धें[15] होती । मदाश्रयें जे करिती; । माझ्या प्रसादें पावती । जें पद शाश्वत अव्यय. ॥ ५६ ॥ मनपूर्वक माझे ठायीं । सर्व कर्म अर्पी, पाहीं, । सुबुद्धी धरूनि राहीं । मज तत्पर होउनी. ॥ ५७ ॥ माझे ठायीं चित्त ठेविसी । तरी माझ्या प्रसादें सर्व दुःखें तरसी । अहंकार धरोनि करिसी । तरी सर्व दुःखें होती तुज. ॥ ५८ ॥ मनीं अहंकार धरोनी । 'युद्ध

---

१. आपापल्या कर्मोपासून. २.व्यवहार. या ओंवीचा मूळ श्लोकाशीं मेळ नाहीं. ३. हलका, कमी प्रतीचा. ४. हितकारक. [अ० ३ ओं० ३५ पहा.] ५. या ठिकाणीं 'धर्म' हा शब्द ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्या स्वाभाविक कर्तव्याला उद्देशून वापरला आहे. 'हिंदुधर्म' 'खिस्तीधर्म' वगैरे शब्दांतील 'धर्मा'चा अर्थ प्रस्तुत 'धर्मा'हून अगदीं निराळा आहे. ६. आसक्तिरहित, वासनाशून्य. ७. विगतस्पृह, निरिच्छ. ८.संन्यासें (कर्मसंन्यस्त होत्साता) पावतसे (मजप्रत पावतो, मुक्त होतो)–असा भाव. ९. आपल्या आत्म्याच्या ठिकाणीं. १०. मन, वाणी व देह यांचें संयमन. ११. व्याप, खटाटोप, परिवार. १२.ममत्वशून्य, मायारहित. जे ब्रह्म व्हावया (ब्रह्मसाक्षात्कारास योग्य व्हावयास) इच्छिती [त्यांनीं] काम, क्रोध, बल, दर्प, अहंकार [व] परिग्रहादिक सांडूनी निर्मम, शांत [व] निःशंक होइजे (झालें पाहिजे)–असा अन्वय. १३. समबुद्धिपुरुष, समत्व ठेवणारे. १४. आत्मस्वरूपांत. ईश्वराशीं तादात्म्य पावतात–हा इत्यर्थ. १५. प्रारब्धानुसार, दैवानुसार.

न करीं.' ऐसें मनी । तरी या उद्योगाची होईल हानी । प्रकृति युद्ध करवील तुज. ॥ ५९ ॥ अर्जुना ! तूं स्वभावें बांधलासी । अज्ञानें करूनि 'युद्ध न करीं' म्हणतोसी । तरी युद्धकर्म तूं अवश्य करिसी । यासि संदेह नाहीं. ॥ ६० ॥ सर्वभूतीं असे ईश्वर । व्यापूनि जग निरंतर । खेळ खेळवी साचार । सूत्रधारी आपण असे. ॥ ६१ ॥ भारता ! सर्वभावें करूनी । शरण होय मजलागुनी । माझा प्रसाद पावुनी । पद शाश्वत पावसी. ॥ ६२ ॥ अंतरींचें गुह्यांतर । तुला उपदेशिलें सार । मना येईल तो करीं विचार । सांगणें तें सांगीतलें. ॥ ६३ ॥ सर्व गुह्यतम जाण । हें सांगतों मित्र म्हणून । तूं प्रीतीचा सखा माझा जाणून । तुझें हित सांगतसें. ॥ ६४ ॥ मन ठेवोनि माझी भक्ती करीं । मज वंदोन यज्ञ करीं । मज पावसी निर्धारीं । प्रियसख्या ! ॥ ६५ ॥ सर्व धर्मातें त्यजोनी । मज एकासी शरण होउनी । संचित क्रियमाण जाणोनी । मी सर्व नाशीन भिऊं नको. ॥ ६६ ॥ ज्ञानतपअनुष्ठानहीन । भक्तिविना जें श्रवण । अभक्तांतें दे आण । ते दोष लाविती. ॥ ६७ ॥ हें परमगुह्य पावन । जो माझ्या भक्तांसि उपदेशी जाण । माझी भक्ती असे करून । तो मज पावे निःसंदेह. ॥ ६८ ॥ मनुष्यांत सांगितलें करी । तो माझा भक्त अवधारीं । त्याहूनि मज पृथ्वीवरी । कोण्ही प्रिय नसे. ॥ ६९ ॥ धर्मकारण हा संवाद । पठण करी जो सांडोनी भेद । तो ज्ञानयज्ञें यजून पावे परमानंद; । माझी बुद्धी निश्चितं. ॥ ७० ॥ भक्तियुक्त जो होउनी । आदरें करोनि आइके श्रवणीं । तो उत्तमलोकातें पावोनी । मुक्त होय; सत्य जाण. ॥ ७१ ॥ अर्जुना ! म्यां सांगीतलें । तुवां एकाग्रमनें ऐकिलें ? । अज्ञानमोह आहे कीं गेले ? । हें सांग धनंजया !' ॥ ७२ ॥ 'गेला मोह' म्हणे पार्थ । 'तुमचे प्रसादें सावचित्त । संदेह फिटला निश्चित, । साच करीन वचन तुझें.' ॥ ७३ ॥ देवपार्थाचा संवाद । ऐकोनि अद्भुत परमानंद । रोमांच

१. मानिलेंस तर. २. प्रारब्ध कर्म, संचित. ३. प्राक्तन कर्मानें. ४. तत्व, रहस्य. ५. अत्यंत गुह्य (गुप्त). ६. संचित=पूर्वजन्मार्जित कर्म, प्रारब्धकर्म. ७. क्रियमाण=शरीर, मन व इंद्रियें यांहीं करून मनुष्य यावज्जीव जीं कर्में करितो त्यांस 'क्रियमाण' कर्में असें म्हणतात. 'कायामनें करुनि आणिक इंद्रियेंही, कर्में करी पुरुष तीं 'क्रियमाण' देहीं । तो देह जोंवरि पडे क्रियमाण तों तें, त्यानंतरें वदति 'संचितकर्म' त्यातें. ॥' [वामनपंडित—कर्मतत्व—अध्याय १।४९]. ८. येथें अपपाठ असावा असें वाटतें. कदाचित् शुद्धपाठ 'अभक्तां नेदे जाण' असा असेल. ९. सांगितलें करी=सांगे, प्रकट करी. १०. अशी माझी खात्री आहे. ११. सावध झालों, आत्मस्वरूपाचें ज्ञान झालें. १२. 'कौरवांशीं युद्ध कर' हें वचन. १३. संजय धृतराष्ट्रास सांगतो.

उभे स्वानंद । तें वाचे काय सांगों ? ॥ ७४ ॥ वेदव्यासाचे प्रसादें । परमगुह्य अनुवादे । योगीश्वर श्रीकृष्णें आनंदें । स्वमुखें सांगीतलें. ॥ ७५ ॥ राया ! तो पुनःपुन्हा आठवत । जो संवाद अतिअद्भुत । केशवार्जुनांचा पुण्यपवित्र । तेणें पुनःपुन्हा आनंद होतसे. ॥७६॥ तें आठवे हरिचें रूप । विस्मय होय अमूप । सुख होय अकस्मात । पुनः पुन्हा काय सांगों ? ॥ ७७ ॥ जेथें श्रीकृष्ण योगीश्वर । दुसरा पार्थ धनुर्धर । श्री आणि विजय परिवार । दोन्ही अचळ तेथ; राया !' ॥ ७८ ॥

---

**उपसंहार.**

जरी भजती गोविंदा । तरी जन्मा न ये कदा । समूळ चुके भवबाधा । तोचि मुक्ती पावला. ॥ १ ॥ परंतु गीता पढतां । पुण्यांची राशी जोडतां । अर्थी प्रीति उपजतां । मग मुक्त स्वयेंचि तो. ॥ २ ॥ या जन्मींच हरी त्याला । गुरुरूपें देव भेटला । अथवा पुढील जन्माला । त्यातें मुक्ती न संशय. ॥ ३ ॥ अष्टादशाध्यायीं वर्णिलें । योगभ्रष्ट जसा बळें । पावोनि पुण्य तें झाले । तो मुक्त न संशय. ॥ ४ ॥ आत्मा कळे गुरुमुखें । अभ्यास योगाचे सुखें । तो पावे निकें । मुक्तसुख. ॥५॥ सर्वात्मभावें शरण । मज होय तूं लीन । ज्ञानेंकरूनि ये शरण । भवबंधापासोनि मुक्त करीं. ॥ ६ ॥ लीलाविश्वंभरवदनें । अज्ञानासि झालें ज्ञान । मुक्त मुक्तेश्वरप्राण । झाला जाण सहजेंची. ॥७॥

---

१. माग पृष्ठ १४ टीप २ पहा. २. राजा धृतराष्ट्र. ३. विश्वरूप. ४. पुष्कळ. ५. संपत्ति. ६. अखंड, अभंग, स्थिर. ७. संसारदुःख. ८. भगवद्गीतेच्या अर्थाविषयीं. ९. माझ्या (श्रीकृष्णपरमात्म्याचे) ठिकाणीं. १०. मुक्तेश्वरानें आपल्या मातापितरांच्या नांवाचा उल्लेख 'लीलाविश्वंभर' या सामासिकपदानें आपल्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं केला आहे. ११. हें प्रकरण 'गीतार्थबोधिनी' व नावलेकर यांची 'श्रीमद्भगवद्गीता' ह्या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या मुक्तेश्वराच्या समपद्य टीकेच्या आधारानें शुद्ध करून छापिलें आहे. या प्रकरणाचे तेरा अध्याय छापून झाल्यावर, रा० शंकर कानोजी (सावंतवाडी) या गृहस्थांनीं मोठ्या आस्थेनें आमच्याकडे एक हस्तलिखित पोथी पाठविली. ही पोथी अगदीं सुवाच्य व बरीच शुद्ध आहे. हींतील शेंकडा पन्नास ओव्या मुक्तेश्वरी ओव्यांशीं तंतोतंत जुळतात, व त्यांचाच पाठ निश्चित करितांना उपयोग करण्यांत आला आहे. परंतु बाकी राहिलेल्या म्हणजे सुमारें निम्मे ओव्या मुक्तेश्वराच्या प्रसिद्ध असलेल्या गीतेवरील ओव्यांहून इतक्या भिन्न आहेत, कीं त्यांची गणना पाठांतरांत न करितां, स्वतंत्र कृतींतच करणें भाग आहे. मुक्तेश्वरी गीता लिहितांना जेथें जेथें अशुद्ध, संदिग्ध किंवा मूळ गीतेशीं न जुळणारी ओवी आढळली, तेथें तेथें लेखकानें नवीन ओवी बनविली असावी, असा आमचा अदमास आहे. या पोथींत उपसंहारात्मक आठ ओव्या आहेत; पण त्यांतील एकही वरील उपसंहाराशीं जुळत नाहीं व त्यांत मुक्तेश्वराचा नामनिर्देशही नाहीं. ही पोथी शके सतराशें बासष्टांत (१७६२) लिहिली आहे.

## ३. सौप्तिकपर्व.[1]

### अध्याय पहिला.[2]

[3]भारतकथाक्षीरनिधी । श्रवणें [4]निर्वारे सर्व व्याधी । नाश पावोनि, ब्रह्मानंदीं । सावकाश [5]विवरण. ॥ १ ॥ सभासमुद्रीं [7]सुरतें । विद्वज्जन [6]सोज्वल ज्ञानें । [8]संन्निधमात्रें होती [9]निधानें । ज्यांचेनी कैवल्याचीं. ॥ २ ॥ [10]त्यांचिया [11]पदरजतीर्थीं । मानस पावलें ज्ञानस्फूर्ती । [12]कवित्वसाहित्यीं [13]रूढली मती; । कवित्वरचना [14]यांपरी. ॥ ३ ॥ तेंचि **सौप्तिक कविवरें** । [15]गीर्वाणगिरा **व्यासें** चतुरें । वर्णिलें; त्यालागीं [16]देशांतरें । [17]दीन पामरें आरंभिलें. ॥ ४ ॥ [18]राजा पावला मृतदशा । **पांडव** पावले राज्ययशा । पुढें चतुरीं [19]पर्वकळसा । आकर्णावें सुकर्णीं. ॥ ५ ॥ **संजयो** म्हणे, '[20]कुरुनंदना ! । अस्तासी जातां श्री[21]तपना । [22]तिघे सांडोनि **दुर्योधना** । दक्षिणमार्गें [23]मुरडले. ॥ ६ ॥ चिंताडोहीं मग्न मानस । [24]महावनीं केला प्रवेश । हृदयमर्मी व्यथाविष । **तक्षकमुखींचें** ज्यापरी. ॥ ७ ॥ रिपु-

---

१. सौप्तिकपर्व म्हणजे सुप्तां (निजलेल्या लोकां) विषयीं ज्यांत वर्णन आहे तें पर्व. भारतीय युद्धाच्या शेवटच्या दिवशीं रात्रीं पांडवपक्षीय सर्व वीर आपल्या शिबिरांत निजले असतां अश्वत्थाम्यानें त्यांवर अकस्मात् छापा घालून त्यांस ठार मारिलें इत्यादि कथाभाग ह्या पर्वांत वर्णिलेला आहे म्हणून ह्यास **'सौप्तिकपर्व'** असें नांव आहे. २. ह्या अध्यायांत मुक्तेश्वरानें मूळांतील पहिल्या पांच अध्यायांचा सारांश ग्रथित केला आहे. ३. महाभारतकथा हाच क्षीरसागर. ४. 'निरसे' असें पाठांतर. ५. स्पष्टीकरण. 'विवटण' असें पाठांतर. ६. देदीप्यमान, तेजस्वी. (२) निर्मळ, पवित्र. 'सोज्वळ' ह्या विशेषणाचा संबंध 'विद्वज्जन' या विशेष्याशीं आहे. ७. (विद्वज्जनरूपी सुरतें) नुसतीं जवळ असलीं तर. ८. प्राप्त होती. ९. निधान=ठेवा, भांडार, खजीना. १०. विद्वज्जनांच्या. ११. पायांची धूळ हेंच तीर्थ त्यांत. १२. कविता (काव्य) आणि साहित्यशास्त्र यांचे ठिकाणीं. साहित्यशास्त्र=काव्यनाटकादिकांचीं अलंकारलक्षणें ज्यांत सांगितलीं आहेत तें शास्त्र. १३. रूढ झाली, तन्मय झाली. 'रूढ कृप्ति' असा पाठभेद. १४. 'ज्यापरी' असें पाठांतर. १५. संस्कृत भाषेत. 'श्रीव्यासें' असा पाठभेद. १६. देशभाषेत (?). 'वेशांतरें' असा मूळपाठ असावा. वेशांतरें=अन्य वेशानें, मराठी रूपानें. १७. 'हीन पामरें' असा अन्यपाठ. १८. दुर्योधन. १९. पर्वश्रेष्ठास. कळस=शिखर. 'पर्वकलशां' असें पाठांतर. २०. धृतराष्ट्रा ! युद्धाचें सर्व वर्तमान दिव्यदृष्टीनें संजयास कळत असे व तो तें धृतराष्ट्रास सांगत असे. (मागें पृ० १४ टी० २ पहा). २१. सूर्य. २२. अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा—हे तिघे. 'रणीं सांडोनि' 'तेथें सांडोनि' असे अन्यपाठ आहेत. २३. वळले, फिरले, बाजूनें गेले. २४. 'महारण्यीं' असें पाठांतर.

हस्तींच्या शरमारें । शरीरें क्षितीं[१] स्रवती रुधिरें । उष्ण श्वासोच्छ्वासें शिबिरें । परमोद्वेगें[२] सेविलीं. ॥ ८ ॥ ऐशियामाजी दारुण घोष । पांडवमुखींचे ऐकतां त्रास[३] । पावोन, भ्रमितमानस[४] । पळते जाले पूर्वेसी. ॥ ९ ॥ क्रोध पावला तारुण्यदशा[५] । राजमृत्यें प्राणांत वळसा[६] । यापरी मुहूर्त[७] मानसा । संताप पीडी; राजया!' ॥ १० ॥ धृतराष्ट्र म्हणे, 'हीनकर्में[८] । गुणाब्धि[९] मारिला भीमें । नागायुतबळी[१०] आज्ञाकर्में । ज्याचेनि धरा नित्य चालें[११]. ॥ ११ ॥ जो अवध्य भूतसृष्टीसी । वज्रासमान वपुवेंसी[१२] । तो ममात्मज अधर्मेंसीं । पांडवीं मारिला; संजया! ॥ १२ ॥ पूर्वप्राक्तनाचे[१३] प्रवाहीं । निश्चयें विश्व बुडालें पाहीं; । हे मृषा[१४] करावया ठायी[१५] । त्रिलोकीं कोणी दिसेना. ॥ १३ ॥ शतपुत्रमृत्यूचें श्रवण । होतां, हृदय न होय चूर्ण । निश्चयें अश्मसार[१६] जाण । ब्रह्मा निर्मोनी ठेलासे. ॥ १४ ॥ राजपिता स्वयें राजा । अवनी[१७] आज्ञापट[१८] माझा । वेष्टूनि होती; तो मी अनुजात्मजां[१९] । ग्रासासी[२०] याचूं कैसेनी? ॥ १५ ॥ आम्ही वृद्ध[२१]-

---

१. जमिनीवर. 'शरीरक्षितीवरी रुधिरें' असा अन्यपाठ. २. परम+उद्वेगें=अत्यंत दुःखानें. 'परमोद्योगें' असें पाठांतर. परमोद्योगें=मोठ्या प्रयासानें. ३. भय. ४. ज्यांच्या मनाला भ्रम झाला आहे असे, घाबरलेले (अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा). ५. हें **'चेतनधर्मारोपोक्ति'** (Personification.) ह्या अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें अचेतन पदार्थावर सचेतनत्वाचा आरोप करून सचेतनाचा धर्म दाखविला असतो तेथें हा अलंकार होतो. येथें 'क्रोध' अचेतन असून सचेतन प्राण्याप्रमाणें त्यास 'तारुण्यदशा' प्राप्त झाली आहे, असें वर्णिलें आहे म्हणून हा **'चेतनधर्मारोपोक्ति'** अलंकार. 'तरुणदशा' असें पाठांतर. ६. प्राणांत होईल असें संकट. वळसा=संकट, त्रास, अडचण. 'राजमृत्यें'—येथें उकारान्त शब्द प्रथम अकारान्त करून मग त्यास विभक्तिप्रत्यय लाविण्यांत आला आहे. अशीं उदाहरणें प्रस्तुत प्रकरणांत बरींच आहेत. पुढें एकविसाव्या गीतींतील 'चक्षीं' शब्द पहा. ७. मुहूर्तपर्यंत, थोडा वेळ. मुहूर्त=दोन घटका. 'त्रिवर्ग मानसा' असा अन्य पाठ. ८. नीच कर्मांच्या योगानें, अधमपणानें. ९. सद्गुणी, सद्गुणसागर. १०. अयुत (दहा हजार) नागांचें (हत्तींचें) ज्यास बळ होतें असा. ११. ज्याचेनि आज्ञाकर्में धरा (पृथ्वी) नित्य चाले—असा अन्वय. 'चालती' असें पाठांतर. १२. वपूसह, शरीरासह. वज्राप्रमाणें अभेद्य शरीर ज्याचें होतें असा (दुर्योधन). 'वपुवेषी' असें पाठांतर. १३. पूर्वजन्मीं केलेल्या बऱ्या वाईट कर्मांच्या प्रवाहांत. १४. असत्य, खोटें. १५. ठायी=ठाव, ठिकाण. १६. लोखंडासारखें (कठिण). अश्मसार=लोखंड. 'अश्मसार' हें 'हृदया'चें विशेषण. 'आरंभसार' 'रश्मिसार' अशीं पाठांतरें. १७. पृथ्वी. १८. आज्ञारूपी पट (वस्त्र). 'अवनी आज्ञापद माझा । वंदूनि…' असा पाठभेद. १९. पांडवांजवळ. २०. ग्रास=गोळाभर अन्न. २१. धृतराष्ट्र व गांधारी. 'युग्में वृद्धें' असा पाठभेद.

युग्में अनाथ । मस्तकीं बैसला क्लेशपर्वत । भीमवाक्याचे वज्रघात । कैसेनी क्षमूं?[1] संजया ।। १६ ।। कुशळांमाजी परम कुशळ । पूर्वीं मातें विदुर विमळ[2] । वदला, तेंची अविकळ[3] । घडोनी आलें ये समयीं. ।। १७ ।। अधर्मैंकरूनि[4] ताता ! । पांडवीं मारिला भूमिभर्ता । कोणें[5] कर्तृत्व त्रयरथा । आचरलें? तें निरोपीं.' ।। १८ ।। कौरवप्रश्नीं[6] वदे सूत[7] । 'समीप जातां त्रयरथ । काळान-[8]नातुल्य अद्भुत । दृष्टी देखिलें अरण्य. ।। १९ ।। गगनचुंबित तरुवर । माजीं[9] तुंबळ सरितापूर । श्वापदगणांचे[10] संभार[11] । सुखाडले[12] सुखवस्तीं.[13] ।। २० ।। नाना मृग नाना पक्षी । नाना लता नाना वृक्षीं । नाना व्याळ[14] दिसती चक्षीं[15] । विविधाकृतींचे; भूपाळा ! ।। २१ ।। पीयुषातुल्य शीतळोदकें । अक्षोभ[16] तडागें अनेकें । वन भीषण[17] देखोनि धाकें । विस्मय विशेष काळासी. ।। २२ ।। पंचवर्णी[18] नीलोत्पलें । विकसलीं आयतदळें[19] । माजी मधुकरांचीं[20] कुळें । झंकारें कर्णासी पूजिती ।। २३ ।। अस्तासि सेवितां[21] गभस्ती । तेथ उतरले[22] महारथी[23] । कवचें फेडुनियां द्वय हस्तीं । उदकालागीं सेविलें[24]. ।। २४ ।। संध्या सारितां तात्काळी । अदृश्य जाला किरणमाळी[25] । जगद्धात्री[26] ब्रह्मांडगोळीं । रात्री क्रीडों पातली. ।। २५ ।। रथींचे अश्व नरवरेशा ! । सोडोनी, तडागोदकें तृषा । बोळवोनि, श्रमरूप विषा । मुहूर्तमात्र नाशिलें. ।। २६ ।। समर्थ[27] पावतां तेजोहानी । आकाश भरलें नक्षत्रगणीं[28] । हास्यविनोदें गर्जोनी ।

---

१. सहन करूं. 'साहूं' असें पाठांतर. २. पवित्र, नीतिशास्त्रज्ञ. ३. समग्र; संपूर्ण. विकल=कलारहित, असमग्र; अविकल=समग्र. 'अवकळ' असें पाठांतर. अवकळ=कलारहित, विरूप, अनिष्ट. ४. 'अधर्मैंपासूनि' असें पाठांतर. ५. 'कोणतें' पाठभेद. ६. धृतराष्ट्रानें प्रश्न केला असतां. ७. संजय. ८. काळाच्या मुखासारखें भयंकर. ९. त्या अरण्यांत. १०. 'चतुःपदगणाचे' असा पाठभेद. ११. समुदाय. १२. सुख पावले. १३. सुखानें वस्ती करण्याचें जें स्थळ त्या ठिकाणीं. १४. (१) हत्ती, (२) सर्प. 'व्यालो दुष्टगजे सर्पे' इति हैमः. १५. डोळ्यांनीं. १६. शांत, स्थिर. १७. भयंकर. १८. पंचरंगी कमळें व नीलोत्पलें (निळ्या रंगाचीं कमळें). 'तेच वर्णी' असें पाठांतर. १९. विस्तृत आहेत दळें (पत्रें) ज्यांचीं अशीं (कमळें). २०. भ्रमरांचे समूह. कुळ=समूह. 'कुलं जनपदे गोत्रे सजातीये गणेऽपि च' इति. २१. 'जातां' असें पाठांतर, गभस्ति=सूर्य. २२. वस्तीस राहिले. उतरणें=वस्तीस राहणें, मुक्काम करणें. उतरले=रथांतून उतरले-असा अर्थ केला तरी चालेल. २३. मोठे योद्धे. [मागें पृष्ठ १४ टीप ९ पहा.] २४. 'सेविती' असा पाठभेद. २५. सूर्य. २६. हें 'रात्री'चें विशेषण. मूळांतही 'जगतो धात्री' असेंच पद आहे (अध्याय १ श्लोक २४ पहा). २७. सूर्य (?). २८. तारागणांनीं.

क्रीडा करिती रात्रिंचरें.[१] ॥ २७ ॥ दिवाचरें[२] पावलीं निद्रा । क्रव्यादांच्या[३] हर्ष-समुद्रा । दाटणी[४] तेणें; **कौरवेंद्रा**! । विकृतस्वरें[५] गर्जती. ॥ २८ ॥ न्यग्रोधवृक्षा-चिये तळीं[६] । उतरले तिघे क्षीणबळी[७] । मानसचंदनासि वेंटाळी । निद्रासर्पिणी द्रुयांच्या. ॥ २९ ॥ मानसरंगणीं[८] क्षोभदेवता । मनोमय नृत्यासी करितां । परम विषाद **कृ**पीसुता; । द्रुयालागीं जाणवी. ॥ ३० ॥ **मेरुमां**दारसमान गुणी[९] । **कृपभो**ज निद्रिस्थ वनीं । श्रमतम[१०] धैर्यतरणी[११] । बुडोनियां, हो! नाशलें. ॥ ३१ ॥ जे सौख्य**मान**सींचे हंस । त्यांतें प्राप्त दुःखदोष । लोळतां देखोन विशेष । क्षोभ **द्रौ**णीस श्रृंगारी. ॥ ३२ ॥ देह त्यागोनी पळे निद्रा । जेविं प्रपंचवातें मोक्षमुद्रा । प्रतिज्ञा[१२] स्मरोनी म्हणे 'क्षुद्रा[१३] । कोण्याप्रकारें मारावें?' ॥ ३३ ॥ ऐसा क्षोभवातें वपुतरू । कांपवितां करी विचारू । अकस्मात **कृ**पी-कुमरू[१४] । आश्चर्य देखे वटमस्तकीं. ॥ ३४ ॥ प्रगटतां रात्रीचें मंडळ । उलूक-[१५] भयें काककुळ[१६] । न्यग्रोधपादपीं[१७] निश्चळ[१८] । सहस्त्रावधी राहिले. ॥ ३५ ॥ करूनि निद्रेसी सत्यत्व । अज्ञानासी विकिलें जीवित्व । आयुष्यमर्यादेचें सत्व[१९] । काळ घेवोनी जातसे. ॥ ३६ ॥ त्याच समयीं उलूक घोर । पातला ज्याचें दीर्घ-शरीर । मुखें करीत विकृतस्वर । हर्यक्ष[२०], चंचू पिंगळा[२१]. ॥ ३७ ॥ आयत ग्रीवा[२२], नखें तीक्ष्ण, । वेगासि तुळावा[२३] **सु**पर्ण । तेणें वायसांचें सैन्य । बहूत सांडिलें मारूनी. ॥ ३८ ॥ यापरी निद्रेचिया संगतीं[२४] । जाली

---

१. निशाचरें–राक्षस, पिशाच्च वगैरे. २. दिवाचरें–दिवसास संचार करणारे प्राणी. ३. राक्षसांच्या. ४. दाटण, दाटी, भरती. ५. भयंकर स्वरानें. विकृत=भयंकर, विलक्षण, विकृतियुक्त. ६. वडाच्या झाडाखालीं. ७. ज्यांचें बळ क्षीण झालें आहे असे. 'क्षण बळी' असा पाठभेद. ८. मनरूपी रंगभूमीवर. ९. अत्यंत गुणवान्–हा इत्यर्थ. १०. श्रमरूपी अंधार. ११. धैर्यरूपी सूर्य. १२. धृष्टद्युम्नास मारण्याविषयीं केलेली प्रतिज्ञा. ती प्रतिज्ञा अशी:–"······तोंन्हि कृपाचा स्वयें वदे भाचा । 'धृष्टद्युम्नाचा वध करिन पणें, हरि जसा मदेभाचा. ॥ १ ॥ जेणें न्यस्तायुध **गुरु** वधिला त्याचा करीन जरि वध मी । तरि उतरीन कवच हें, नमनें ही न द्रवेल मन अधर्मीं. ॥ २ ॥ होतां वृथा प्रतिज्ञा सद्गति न घडो, मला घडो पतन । भीमासि अर्जुनासहि मारीन, करील त्यासि जो जतन. ॥ ३ ॥". [मोरोपंत–कर्णपर्व–अध्याय ३५।४४–४६.] १३. नीचास, अधमास (धृष्टद्युम्नास). १४. अश्वत्थामा. ह्याच्या मातेचें नांव कृपी. १५. घुबडाच्या भयानें. १६. कावळ्यांचे समुदाय. १७. वटवृक्षावर. १८. शांत मनानें. १९. स्वामित्व. येथील अलंकारिक वर्णनास मूळांत आधार नाहीं. २०. हरि+अक्ष=ज्याच्या डोळ्यांचा रंग हिरवट आहे असा. (अध्याय १।३८ पहा.) २१. 'चक्षु पिंगळ' असें पाठांतर. २२. मान. २३. गरुडासारखा अत्यंत वेगानें उडणारा–असा स्पष्टार्थ. 'वेगासी तुळावया पूर्ण' असा पाठभेद. मूळांत 'सुपर्णमिव वेगितम्' असें आहे. २४. संगतीनें, संगति केल्यामुळें.

वायसांची शांती । [1]कौशिकें करोनी यशप्राप्ती । गर्जत गेला स्वस्थाना. ॥ ३९ ॥ तें कौतुक देखोन द्रौणी । [2]तेंद्वावकृत [3]भावला मनीं । म्हणे, 'हा उलूकें मजलागोनी । उपदेशमार्ग दाविला. ॥ ४० ॥ पांडव यशःश्रीसन्मुख । युद्धीं मजलागीं अजिंक्य । काककुळा [4]मारी उलूक । तेवीं मारोन सांडावे. ॥ ४१ ॥ निष्कपटें [5]रमतां युद्धीं । [6]जेवीं अग्नीसि [7]पतंगबुद्धी । यालागीं कपटें जयसिद्धी । करोन, शत्रू [8]साधावे. ॥ ४२ ॥ येणेंच अर्थाचें साधन; । ऐसें वदती [9]विचक्षण, । सर्वोपायें रिपु-हनन । करिजे; तें पांडवीं केलें. ॥ ४३ ॥ याच अर्थी [10]श्लोकद्वय । वदले पूर्वी ज्ञानवर्य । येणें आपणासी रणीं जय । होऊनि, [11]सिद्धी सौख्यासी.॥ ४४ ॥ श्रमित, [12]विदीर्ण, भोजनीं, । निद्रिस्त, प्रवेशे, प्रस्थानीं, । [13]नष्टनायक, अर्ध-रजनीं, । रिपुक्षयासी करावें. ॥ ४५ ॥ या श्लोकींच्या हितोपदेशें । आपणासी न ग्रासिजे दोषें; । [14]पुरुषत्व प्रयत्नें, शूरत्व रोषें । मी आतां अवलंबितों.' ॥ ४६ ॥ [15]मातुळ भोज युद्धश्रमें । निद्रिस्त, जागवी करपद्में, । पुढती लज्जे-चिया [16]वर्में । उत्तर नेदी द्वयातें. ॥ ४७ ॥ येक मुहूर्त धरूनि ध्यान । बा-ष्पोदकें विव्हळ [17]मन. । [18]वदे, 'येकवीर दुर्योधन । आजी रणीं निमाला. ॥ ४८ ॥ जो [19]सार्वभौम[20]राज्यधर । तो कपटें मारिला वृकोदरें । [21]मूर्ध्नी [22]रांजा-

---

१. घुबडानें. २. त्यानें विशेष हेतुपूर्वक केलेलें कृत्य. ३. समजला. 'भावना' असें पाठांतर. ४. 'मार्जी' असा अन्यपाठ. ५. 'मारावे' असा पाठभेद. ६. 'जे दिसे' असें पाठांतर. ७. अग्नीवर पतंग पडून नष्ट होतो त्याप्रमाणें. ८. तावडींत आणावे. 'सांडावे' असा पाठभेद. ९. पंडित, चतुर पुरुष. १०. ते श्लोक हेः—'परिश्रांते विदीर्णे वा भुंजाने वाऽपि शत्रुभिः ॥ प्रस्थाने वा प्रवेशे वा प्रहर्तव्यं रिपोर्बलम् । निद्रार्तमर्धरात्रे च तथा नष्टप्रणायकम् ॥ भिन्नयोधं बलं यच्च द्विधायुक्तं च यद्भवेत् । इत्येवं निश्चयं चक्रे सुप्तानां निशि मारणे. ॥' (अध्याय १ श्लोक ५३—५५.) भावार्थः—शत्रु परिश्रांत असले, विदीर्ण झाले असले, भोजन करीत असले, कोठें प्रस्थान करीत असले, किंवा निद्रेनें व्याप्त झाले असतील तर त्यांजवर प्रहार करावा. ज्याच्या सैन्यांत नायक नसेल अथवा ज्या शत्रूच्या सेनेंत कोणी योद्धा नसेल किंवा सैन्य जरी द्विधा झालें असेल तथापि त्या शत्रूच्या सैन्यावर प्रहार करावा. ११. 'साधूं' असा पाठभेद. १२. 'उदीर्ण' 'ददीर्ण' अशीं पाठांतरें. १३. ज्याचा नायक नष्ट झाला आहे असें. 'समीप-नायका' असा पाठभेद. १४. पराक्रम. १५. मामा (कृपाचार्य) व भोज (कृतवर्मा). १६. वर्म=टोंचणी, बोचणी. लज्जेमुळें—हा इत्यर्थ. १७. 'लोचन' 'विकृत मन' असे पाठभेद. १८. ह्याचा कर्ता अश्वत्थामा (अध्याहृत). १९. सार्वभौमराजा. २०. ज्याच्या मस्तकावर राजाभिषेक झाला होता असा.

भिषिक्त पादाग्रें । नष्टें रणीं मर्दिला. ॥ ४९ ॥ तेणें हर्षित पांचाळ । गजरें करिती गदारोळ[1] । शंख वाजवोन, पुष्कळ । दुंदुभिवाद्यें ताडिलीं[2]. ॥ ५० ॥ खुर तडके, अश्व हिंसती । विशाळ गज किंकाटती । शूर[3] सिंहनादें गर्जती । प्राची दिशे वीर हो ! ॥ ५१ ॥ सर्वास्त्रज्ञानी[4] कितीयेक । नागायुतबळी अनेक । पांडवीं मारिले; वृंदारक[5] । ज्यांची किर्ती वानिताती[6]. ॥ ५२ ॥ आतां ज्ञानें उदार तुम्ही । युक्तिमान[7] जिव्हाकरपद्मीं । मातें[8] वोपीं; जेणें भूमीं[9] । यशाची वृद्धी पावेन[10].' ॥५३॥ कृप म्हणे, 'महामती ! । आकर्णावी[11] माझी सद्युक्ती[12] । जेणें धर्मज्ञ संतोषती । विवेकबुद्धीं[13] आपुलिया. ॥ ५४ ॥ दैवें आणि पुरुषाकारें[14] । ग्रंथिलीं[15] मानवाचीं शरीरें । विवेकें विलोकतां तिसरें[16] । यांच्या[17] ठायीं मिळेना. ॥ ५५ ॥ परी दैवाविण चतुरा ! । निर्फळता पुरुषाकारा[18] । कर्म करितां नित्य वीरा[19] । श्रमचि प्रांतीं[20] उरताती. ॥ ५६ ॥ उद्योग आणि आळस । दैवचि करी यांचा नाश । यांलागी प्रमाण तें विशेष[21] । सेवून तैसेंचि वर्तावें. ॥ ५७ ॥ दैवासी करोनि नमस्कार । विचारीं होवोनी चतुर । उद्योगीं ठेवूनि अंतर[22] वृद्धांलागीं[23] सेवावें. ॥ ५८ ॥ कर्में रामनैषध[24] वनांतरीं । चंद्र कलंकी क्षीरां-[25]

---

१. मोठी आरोळी. २. 'ताडिती' असा पाठभेद. ३. 'सुर सिंहनादें आक्रंदती' असा पाठभेद. ४. सर्व अस्त्रांविषयीं ज्ञान ज्यांस आहे असे. 'सर्वज्ञानी' असा पाठभेद. ५. देव. ६. वर्णन करितात. ७. 'युक्तिभाव' 'युक्तिदान' अशीं पाठांतरें. ८. आतां उदार [व] युक्तिमान् [असे] तुम्ही [आपलीं] ज्ञानें जिव्हाकरपद्मीं (जिव्हारूप हातानें) मातें वोपीं.—असा अन्वयार्थ. मला युक्ति सांगा—असा भावार्थ. ९. पृथ्वीवर. १०. येथें मूळांतील पहिला अध्याय संपला. 'पावेल' असा अन्यपाठ. 'यशचि मी पावेन' असा आणखी पाठभेद आहे. ११. ऐकावी. १२. (माझी) उत्तम युक्ति. 'सामर्थ्ययुक्ति' 'सद्बुद्धि' अशीं पाठांतरें. १३. 'विवेकदृष्टी' असा पाठभेद. १४. पराक्रमानें, उद्योगानें. 'पुरुषाचारें' असें पाठांतर. १५. रचिलीं गेलीं. १६. दैव आणि उद्योग यांशिवाय तिसरें. १७. देहाच्या. १८. उद्योगास. 'पुरुषकरा' असें पाठांतर. १९. 'नरा' असें पाठांतर. २०. शेवटीं, अखेरीस. २१. दैवाला विशेष महत्व देऊन, त्याप्रमाणें वर्तन करावें—हा इत्यर्थ. २२. अंतःकरण, मन. २३. वडिल जनांस. २४. राम आणि नळ यांस वनवास भोगावा लागला—ह्या कथा प्रसिद्धच आहेत. [मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रह)—अध्याय ६—८ व अ० १५ पहा.] २५. खाऱ्या पाण्याच्या समुद्रांत. 'चंद्रास कळंक क्षीरांबुसागरीं' असा पाठभेद. येथें कदाचित् मूळपाठ असा असावा:—चंद्र कलंकी, क्षार अंबु-सागरीं ।

बुसागरीं । नहुष सर्प[1], कपाळी[2] त्रिपुरारी । मांडव्यमुनी[3] शूळपीडित. ॥ ५९ ॥ कर्में रसातळीं[4] वैरोचनी[5] । कर्मचि वागवी सर्व स्थानीं[6] । येथें रिघतां[7] अभिमानीं[8] । अपकीर्ति माथां घेतसे. ॥ ६० ॥ पाळूनि वडिलांचें वचन । उद्योगकर्मी[9] लाविजे मन । येणें न लागे दूषण । पुढें दैवें होतसे. ॥ ६१ ॥ क्रोधभयलोभप्रीति । हे अर्थांतेंचि[10] नाशिती । परावमानीं[11] ठेविती मती । ते राज्यभ्रष्ट जाणावे. ॥ ६२ ॥ या दुष्टाचरणाच्या[12] विवरीं[13] । गांधार[14] प्रवेशतां, शरीरीं[15] । अनर्थसर्पे दंशूनि[16], नगरी । दंडपाणीची[17] दाखविली[18]. ॥ ६३ ॥ त्याच्या कुसंगतीचा संग । होतां, आपणासी हो क्लेशभोग । जेवीं इंद्रवित्तें[19] सरितारंग । व्यथा अद्भुत पावला. ॥ ६४ ॥ जो करी वृद्धांचा सन्मान । तोचि जगीं[20] पुरुष धन्य । त्याच्या यशाचें गायन । स्वर्गी गंधर्व करिताती. ॥ ६५ ॥ आतां आकर्णी[21] येक युक्ती । जेणें वृद्धि पावेल सत्कीर्ति । आपण बैसोनियां रथीं । मातंगपुर[22] प्रवेशों. ॥ ६६ ॥ धृतराष्ट्र गांधारी विदुर । यांतें पुसोनियां विचार । कर्म करीतां आश्रयसागर[23] । आपुला वृद्धी पावेल. ॥ ६७ ॥ तेणें नैष्ठिक[24] मतिच्या चळा । येई पूर्ण धैर्य स्थळा । ऐसी माझी मानसकळा[25] । चतुरा

---

१. मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रह) पृ० १५९ टी० ५ पहा. २. मुंडमाला धारण करणारा. 'कपाळपुरारी' असें पाठांतर. ३. मांडव्यऋषीवर चोरीचा आळ आल्यामुळें त्यास सुळावर चढविण्याची शिक्षा झाली होती. [मार्कंडेयपुराण—अ० १६.] ४. पाताळांत. ५. विरोचनपुत्र (बळी) [मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रह) पृ० ५४ टी० २ पहा]. हे दाखले मूळांत नाहींत. ओंव्या ५९।६० ह्या मुक्तेश्वराच्या पदरच्याच आहेत. ६. 'सर्वां स्थानीं' असें पाठांतर. ७. 'रिघे तो अभिमानी' असा पाठभेद. ८. अभिमानीं रिघतां=अभिमान (गर्व) केला तर. ९. 'उद्योगमार्गी' असें पाठांतर. १०. अर्थ=उद्दिष्ट हेतू, जो कार्यभाग साधाव-याचा तो. 'अर्थांतरें विनाशती' असा पाठभेद. ११. [जे] परावमानीं (दुसऱ्याचा अपमान करण्याविषयीं) मति (बुद्धि) ठेविती ते—असा अन्वय. 'ठेवितां मती' असा अन्यपाठ. १२. 'दुष्ट आ-चरणाचिये' असा पाठभेद. १३. बिळांत, छिद्रांत. १४. दुर्योधन. १५. 'स्वशरीरीं' असें पाठांतर. १६. दंश करून, चावून. 'दोषूनि' 'डंवसूनि' अशीं पाठांतरें. १७. दंडपाणीची (यमाची) नगरी दाखविली—असा अन्वय. 'नगरीं । दंडपाणि क्षोभविला. ॥' असा पाठभेद. १८. 'देवविली' असा पाठभेद. १९. समुद्र. दुर्वास ऋषीच्या शापानें निःश्रीक व पदच्युत झालेल्या इंद्रास फिरून स्वपद-लक्ष्मी प्राप्त व्हावी म्हणून विष्णूच्या सांगण्यावरून समुद्रमंथन करण्यांत आलें, या कथेवर कटाक्ष आहे. २०.'जनीं' असें पाठांतर. २१. ऐक; श्रवण कर. २२. हस्तिनापुर. २३.(वडिलांचा) आश्रय-रूपी सागर (समुद्र). 'अक्षय सागर' असा पाठभेद. २४.नैष्ठिकमतीच्या चळा स्थळा पूर्ण धैर्य येई—असा अन्वय.आमच्या मनांत वडिलांविषयीं जी अस्थिर (चळा) निष्ठा आहे,ती त्यांना पाहिलें असतां दृढ होईल—हा इत्यर्थ. 'नैष्ठिकमति वाचाळा' असें पाठांतर. २५. मनोदेवता. (कळा=युक्ति, चातुर्य).

साक्षी [1]देतसे.' ॥ ६८ ॥ ऐसीं [2]धर्मार्थयुक्त वचनें । मातुळाचीं [3]गुरुनंदनें । ऐकोनी, [4]दुःखशोक मनें । [5]उपासिला त्या काळीं. ॥ ६९ ॥ [6]मानसरंगणीं क्षोभदेवता । मनोमय नृत्यासी करितां । परम विषाद कृपीसुता । हृयालागीं जाणवी. ॥ ७० ॥ [7]धरोन दृढ बुद्धीची [8]कास । विवेकहस्तें लोटोन क्लेश । तुम्हांप्रती हा उपदेश । मी करीतसें [9]यशातें. ॥ ७१ ॥ [10]मनबुद्धि हे अशाश्वत, । यालागीं विलंब करणें हा [11]व्यर्थ, । दुजियाचा उपदेशस्वार्थ । सहसा [12]नागीकारावा. ॥ ७२ ॥ निजमानसींची कल्पना । परोपदेशें विटंबना । पावे; तेणें अंतःकरणा । [13]भग्नता सहजें येतसे. ॥ ७३ ॥ यालागीं वीर हो! [14]नागाव्हयीं । प्रवेशतां, जे [15]बुद्धी हृदयीं । सांडोनी जातां, अन्यत्र [16]भावीं । सख्य [17]करोन रमेल. ॥ ७४ ॥ [18]वैद्य कुशळ जाणे व्याधी । [19]भेषजें करी यथाविधी । तेवीं [20]चित्तशमनार्थ बुद्धी- । ज्ञान पुरुषीं [21]रक्षावें. ॥ ७५ ॥ ऐका वार्ता शुभलक्षण । प्रजापतीनें प्रजाजन । [22]निर्मूनियां [23]वर्णावर्ण । विहित मार्ग [24]नेमिला. ॥ ७६ ॥ ब्राह्मणातें [25]अव्यग्रशम । वैश्यासी [26]दक्षता तोचि धर्म । क्षत्रियातें [27]तेज उत्तम । शूद्रास [28]सर्वां [29]अनुकूळता. ॥ ७७ ॥ [30]अदांत असाधुत्व द्विजा । निस्तेज अधर्म

१. येथें मूळांतील दुसरा अध्याय संपला. २. धर्मशास्त्रार्थानें युक्त अशीं. 'धर्मार्थयुक्तिवचनें' असा पाठभेद. ३. 'द्रोणनंदनें' असें पाठांतर. ४. मनें (मनानें) दुःखशोक उपासिला—असा अन्वय. ५. 'उपासिलीं' असा पाठभेद.' ६. हीच ओंवी मागें एकदां आली आहे. (ओंवी ३० पहा.) ७. 'घालोन' असें पाठांतर. ८. बुद्धीची बळकट कांस धरून, बुद्धीचा आश्रय करून. ९. यश प्राप्त व्हावें म्हणून. १०. 'मतिबुद्धि' असा पाठभेद. ११. दिवसगत चांगली नाहीं. १२. 'अंगीं न करावा' असें पाठांतर. १३. व्यग्रता, खेद. 'भग्नतासह जय वसे' असा पाठभेद. १४. हस्तिनापुरास. 'नागालयीं' असें पाठांतर. १५. पांडवांच्या शिबिरावर अकस्मात् छापा घालून त्यांस मारण्याविषयीं मनांत घोळत असलेला विचार. १६. अन्यत्र भावीं=दुसऱ्याच विचारांत, भलत्याच बेतांत. 'भावी' असें पाठांतर. १७. 'सख्यें करोन' असा अन्यपाठ. १८. मूळांतही हाच दृष्टांत आहे. (अध्याय ३।९ पहा.) १९. औषधें. २०. चित्तास शांति प्राप्त व्हावी म्हणून. २१. 'ज्ञानरूपी रक्षावीं' असा पाठभेद. २२. 'क्रमोनियां' 'करूनियां' अशीं पाठांतरें. २३. उच्च व नीच जाती. २४. 'विहित भावें नेमिल्या' 'भिन्न मार्गें नेमिला' असे पाठभेद. २५. व्यग्रतारहित (स्थिरतायुक्त) शम (शांति). [अव्यग्र=अ+व्यग्र. व्यग्र=विगतं अग्रं यस्य सः अग्र म्हणजे मुख्य जी मनाची शांति, ती ज्याची विगत झाली आहे असा, ज्याचें चित्त स्थिर नाहीं असा. अव्यग्र=ज्याचें स्थिर चित्त आहे असा.] २६. कुशलता, सावधानता. २७. पराक्रम. २८. 'सेवा अनुकूळ' असा पाठभेद. २९. अनुवशता, आज्ञा मानणें. मूळांत 'शूद्रे च सर्ववर्णानुकूलताम्' असेंच आहे. (अ० ३।१९ पहा.) ३०. अपवित्र, अशुचि. अदांत द्विजा असाधुत्व—असा अन्वय.

वर्णा दुजा[1] । अदक्षता निंद्य[2] तों तिजा । शूद्रा प्रतिकूळत्व[3] वानूं. ॥ ७८ ॥ श्रेष्ठ कुळींचा ब्राह्मण मी । मंदभाग्यें[4] क्षात्रधर्मीं । रतलों, आतां दोषकर्दमीं । गुंतोनी, द्विजत्वा मूकलों. ॥ ७९ ॥ द्विजचंद्राचें चांदिणें । सांडोनी क्षात्ररवीचीं उष्ण किरणें । सेविलीं, आतां विचारणें । धर्माधर्म[5] कोणता[6]? ॥ ८० ॥ करूनि दयेचें हनन[7] । करें कंपिलें[8] शरासन[9] । अनेक रिपुगणांचे प्राण । दिव्यास्त्रें[10] विखंडिले. ॥ ८१ ॥ त्या माझिया पितराचें । पार्षतें[11] शिर हीन कवचें । छेदिलें; त्या दुःखें[12] नित्य खोंचे । जिव्हार[13] भोजमातुळा ! ॥ ८२ ॥ तो मी आजी निजनियमीं[14] । दास्यत्व करीन[15] क्षात्रधर्मीं । पांचाळ जिंकोनियां व्योमीं । यशध्वजा उभारीन. ॥ ८३ ॥ यथाकामीं[16] निजशिबिरीं[17] । रिपू सुप्त[18] रजनीमाझारी । त्यांतें कृतांताचिया करीं । मी वोपीन औदार्यें[19]. ॥ ८४ ॥ अग्नी जाळी वनमृगां[20] । कीं पंचानन[21] महामातंगा[22] । नाना[23] अकस्मात लोटे गंगा । दोष क्षितीं[24] क्षाळावया ॥ ८५ ॥ पांचाळ पशु, रुद्रासमान[25] । मी, मर्दावया शक्ति नूतन; । मेघांतुल्य[26] योजूनि बाण । आजि पांडव मारीन[27]. ॥ ८६ ॥ तेवींच[28] पांचाळांचीं प्रेतें । धरेसी विलोका अगणितें । पितृऋणापासून मातें । येणें मुक्तता; वीर हो ! ॥ ८७ ॥ भीष्म

---

१. दुजा (दुसऱ्या) वर्णा=क्षत्रियास. २. 'निंघे' असें पाठांतर. ३. 'शूद्र प्रतिकूळवत' असा अन्यपाठ. ४. दुर्दैवानें. 'मंदभाग्य या' असा पाठभेद. ५. आतां अधर्म कोणता व धर्म कोणता ह्याविषयीं विचार करण्यांत अर्थ नाहीं—हा भावार्थ. ६. 'कोण पां' असें पाठांतर. ७. 'दहन' असा पाठभेद. ८. 'स्पर्शिलें' असें पाठांतर. ९. धनुष्य. १०. धृष्टद्युम्नानें. ह्याचा आजा 'पृषत' नांवाचा होता म्हणून ह्यास 'पार्षत' असें नांव आहे. ११. कवचरहित. हें 'शिरा'चें विशेषण. 'पार्षद दोषरहित कवचें' असें पाठांतर. १२. 'दुःखाचें' असा पाठभेद. १३. मर्मस्थान, अंतःकरण, काळीज. १४. आपल्या नियमानुसार. 'यथाकामी' असें पाठांतर. १५. 'करितसें' 'करीं' असे पाठभेद. १६. 'यथाकामी' 'यथाकामें' अशीं पाठांतरें. १७. आपल्या गोटांत. १८. निजलेले. १९. 'उदार' असा पाठभेद. २०. अरण्यांतील पशूंस. 'वनचरमृगां' असा अन्यपाठ. २१. सिंह. पंच+आनन=विस्तृत+मुख=विस्तृत ज्याचें मुख आहे तो; किंवा आनन आणि चार पाद हीं च पांच मुखें ज्याचीं तो (सिंह). 'मुखं पादाश्च पंच आस्यानीव यस्य स पंचास्यः'. २२. मोठा हत्ती. २३. नाना=कीं, किंवा. अन्य उदा०—ना तरी सर्व सुखांची आदि । जे प्रमेयमहानिधि । नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे. ॥ (ज्ञानेश्वरी, १, २९.) २४. पृथ्वीवर. 'व्योम क्षिती' असा पाठभेद. २५. 'पशुरूपासमान' असा अन्यपाठ. २६. पर्जन्याप्रमाणें, असंख्य, अगणित. २७. 'मारि तूं' असा पाठभेद. २८. 'केवीं' 'तेवीं मी' अशीं पाठांतरें.

सैंधव, राजा, कर्ण, । यांचें होणें आजि अनृण । सौप्तिकें मारोन सर्व सैन्य । पाववीन अक्षयी सुखातें. ॥ ८८ ॥ जेवीं पितृवधाच्या श्रवणें । क्षोभ धरिला जामदग्न्यें । क्षेत्री मारिले, तेवीं बाणें । निर्विण्ण करीन अमित्रां. ॥ ८९ ॥ याच क्षणीं सामर्थ्य पूर्ण । उदयीक होईल याहून न्यून; । हे शब्द करोन श्रवण । आतांचि उठा वंडील हो! ॥ ९० ॥ कृप वदे गिरा गौरवें । 'हें क-रिसी तूं श्रेष्ठ दैवें । तुझिया पराक्रमा न पावे । सुरेंद्र हें मी जाणतसें. ॥ ९१ ॥ परंतु क्षेमेसीं घालून मिठी । आमुच्या संगीं रात्र कंठीं । प्रभातें द्विषतांच्या थाटी । यमपुरीस बोळवूं. ॥ ९२ ॥ पाहें विमुक्त कवचें केत । शरीरें जालीं क्षतविक्षत । रात्रीं करोनि विश्रांत । यश प्रार्थूं प्रभातें. ॥ ९३ ॥ कवचें रक्षूं तनूतें । विश्रांती देवोनि अंखांतें । सावध होऊनि तुजसहितें । जाऊं पैरासन्मुखीं. ॥ ९४ ॥ पैदानुगेंसीं पांचाळ । मारूनि, घालूं वीरश्री-गोंधळ । येणें यश शुद्ध धवळ । जगत्रयीं विस्तारेल. ॥ ९५ ॥ विश्रांतें वि-निद्र जागृत । रिपू जालिया सावचित । पुढें वीरधर्में करितां घात । शास्त्रें दोषातें न स्थापिती. ॥ ९६ ॥ शारद्वतेंसी कृतवर्म । द्रौणी रक्षिलिया क्षात्र-

---

१. सिंधुदेशाचा राजा (जयद्रथ). राजा=दुर्योधन. २. 'पावेन' असा अन्यपाठ. ३. 'कारणें' असें पाठांतर. ४. जमदग्निपुत्रानें, परशुरामानें. कार्तवीर्य राजाच्या मुलांनीं जमदग्नीस मारिलें ह्यामुळें परशुरामास राग येऊन त्यानें एकवीस वेळां पृथ्वीवरील क्षत्रियांचा संहार केला—अशी कथा आहे. [मुक्तेश्वरवनपर्व (काव्यसंग्रह) पृ० ३१ टीप १२ पहा.] ५. क्षत्रिय. ६. खिन्न, निराश, निरुत्साह. 'निर्वीर' असें पाठांतर. ७. शत्रूंना. ८. कमी. 'शून्य' असा अन्यपाठ. ९. 'शब्द माझे' असा पाठभेद. १०. 'वीर हो' असें पाठांतर. येथें मूळांतील तिसरा अध्याय समाप्त झाला. ११. गौरवून, आदरानें. १२. दैव बलवत्तर असल्यामुळें. १३. न पावे=बरोबरी करूं शकत नाहीं. पराक्रमास 'पेवा' असें पाठांतर. १४. इंद्र. १५. भुईवर अंग टाकून, भुईवर निजून. क्षमा=पृथ्वी, भूमी. 'क्षेमेसी' असा पाठभेद. क्षेम=कुशलता, खुशाली. १६. शत्रूंच्या. १७. समुदाय, टोळया. १८. ध्वजा, पताका, झेंडा. १९. विश्रांति, आराम. २०. डोळ्यांना. पाठभेदः—कवचरक्षण तनूतें । विश्रांति देवोनि अश्वांतें ।. २१. शत्रूंसमोर. २२. सेवकांसह, अनुचरांसह. २३. 'विश्रांति' असा पाठभेद. २४. शुभ्रवर्ण. यशाचा रंग पांढरा असतो, असा कविसंकेत आहे. २५. 'विस्तारे' असा अन्य पाठ. २६. विगतश्रम (ताजेतवाने, स्वस्थ) व निद्रारहित झाल्यावर. 'विश्रांतिनिद्रे' असा पाठभेद. २७. सावध, हुशार. 'स्वस्थचित्त' असें पाठांतर. २८. 'शास्त्री दोष न स्थापिती' 'शास्त्र रोष न प्राशिती' असे पाठभेद. २९. कृपाचार्यासह. कृपाचार्य हा शरद्वतमुनीचा पुत्र म्हणून ह्यास शारद्वत असें नांव आहे.

धर्म । पुढें शचीरमणविक्रम[1] । थोरूं[2] न शके संग्रामीं[3]. ॥ ९७ ॥ मी पूर्ण दिव्यास्त्रज्ञानी । तेवीं भोजाची प्रज्ञा[4] मानीं[5] । यालागीं क्षमेतें अवलंबोनी । निद्रा सेवीं; प्रतापिया! ॥ ९८ ॥ नासोनी रात्रीची दशा । उदया येतां सहस्त्रांशा[6] । रिपूसी मारणें, हा भरवंसा । रेखोनी[7] ठेवीं हृत्पद्मीं[8].' ॥ ९९ ॥ एवं शारद्वताच्या वचनीं । क्रोधें प्रदीप्त जाला द्रौणी । जेवीं घृताहुतीनें वन्ही[9] । अमर्याद धडाडी[10]. ॥ १०० ॥ अरुण आभा[11] द्वयनेत्रीं । श्वासोच्छ्वास[12] सोडी वक्त्रीं[13] । म्हणे, 'मातुळा! या रात्रीं । मातें निद्रा वरीना. ॥ १०१ ॥ आतुर[14], क्रोधी, अर्थासी चिंती, । कामलुब्धक यांतें रातीं[15] । निद्रा नये, जेवीं विश्रांती । कंटकस्थळीं लाधेना. ॥ १०२ ॥ या चतुर्थ दोषांचा[16] स्पर्श । मातें, तेणें निद्राविनाश[17] । पितृवधस्मरणें मानस । माझें खेदें व्यापिलें. ॥ १०३ ॥ प्रत्यक्ष समस्तांच्या पुढें । माझा पिता मारिला मूढें । त्या पापपुरुषाचीं हाडें । तिळप्राय[18] करीन. ॥ १०४ ॥ तेवीं भग्नशक्ति[19] राजा । विलपतां, आत्मा माझा । शोकें व्यापिला, त्याच्या काजा[20] । उत्तीर्ण होणें अवश्य[21]. ॥ १०५ ॥ एकाग्रचित्तें पितृपक्ष[22] । करीन मी नेमदक्ष[23]; । पांचाळ, पार्थपद्माक्ष[24] । रक्षितां[25], आजी मा-

---

१. इंद्राचा पराक्रम. २. थारणें=स्थिरावणें, टिकाव धरणें. ३. युद्धांत. ४. बुद्धि, ज्ञान. ५. मान, समज. ६. सहस्रांशु (सूर्य). अंशु=किरणें. येथें उकारान्त नाम अकारान्त बनविलें आहे, व नंतर पद्याच्या चरणाच्या शेवटीं अकारान्त शब्द आल्यास तो आकारान्त करण्याची जी कित्येक वेळां वहिवाट आढळते, तीस अनुसरून 'सहस्रांशा' हें रूप निष्पन्न झालें. ७. 'देखोनि' असें पाठांतर. ८. हृदयकमळावर. 'हृत्पटीं' असा पाठ असता तर बरें झालें असतें. 'हृदयीं' 'हृदयपत्रीं' असे पाठभेद. ९. 'अग्नि' असें पाठांतर. १०. प्रज्वलित होई. 'अमर्यादेनें धडधडी' असा अन्यपाठ. ११. अरुणाप्रमाणें आरक्त कांति. १२. दुःखाचे सुसकारे. १३. तोंडानें. 'चक्री' असा पाठभेद. १४. रोगी, रागीट, द्रव्य प्राप्त कसें होईल अशी चिंता करणारा व कामी पुरुष या चौघांस झोंप येत नाहीं–असा स्पष्टार्थ. मूळांतही असेंच वर्णन आहे:–'आतुरस्य कुतो निद्रा नरस्यामर्षितस्य च। अर्थांश्चिंतयतश्चापि कामयानस्य वा पुनः ॥' (अध्याय ४ श्लोक २२). १५. 'कामलुब्धकातें' असा पाठभेद. रातीं=रात्रीं. १६. 'दोषाच्या स्पर्शें' असें पाठांतर. १७. 'निद्रा विनाशे' असा पाठभेद. १८. 'तिळप्राय' हा शब्द अश्वत्थाम्याचे ठिकाणीं सूड घेण्याची इच्छा किती प्रबळ झाली आहे, हें दर्शवितो. धृष्टद्युम्नाला मारीन इतकेंच नाहीं तर (त्याला मारल्यानंतर) त्याच्या हाडांचे तिळाएवढे तुकडे तुकडे करीन–असा स्पष्टार्थ. १९. ज्याची शक्ति भग्न झाली आहे असा राजा (दुर्योधन). 'तेवींच भग्न शकुनी राजा' असें पाठांतर. २०. (सूड उगविणें हें) कार्य. २१. 'उत्तीर्ण होय मानस' असा पाठभेद. २२. द्रोणाचार्यांचा पक्ष. पक्ष=महालय श्राद्ध, मृतमनुष्याची और्ध्वदेहिक क्रिया. २३. आपली प्रतिज्ञा पाळण्याविषयीं दक्ष. २४. पार्थ आणि पद्माक्ष (कृष्ण) धृष्टद्युम्नाचें रक्षण करितील, तरि सुद्धां त्यास मारीन–असा भावार्थ. २५. 'न रक्षितां' असें पाठांतर.

रितों. ॥ १०६ ॥ या नेमाचें ध्रुवमंडळ[1] । यथार्थ, आजीं न पवे चळ । हें साधु[2] मद्बुद्धीचें बळ । यशःप्राप्तिसाधक[3]. ॥ १०७ ॥ मित्रनाश[4], **पां**डवां जय; । वार्त्तिक[5] सांगतां विदारे हृदय । यास्तव सौप्तिकीं[6] समुदाय । रिपूचे[7] आजीं मी-रितों.'[8] ॥ १०८ ॥ **कृप** म्हणे, 'इंद्रियवश । जो सर्वदा असे पुरुष । त्यातें करितां ज्ञानोपदेश । विषातुल्य अवगमे[9]. ॥ १०९ ॥ मेधावी[10] आणि जितेंद्रिय । तो जाणतसे कार्याकार्य । तुझी मती **गु**रुप्राय[11], । विचार[12] ताता! विवरीं पां. ॥ ११० ॥ कल्याणठायीं ठेवूनि मती । ज्ञानी निंद्यकर्में अव्हेरिती । जेवीं मराळ[13] न सेविती । कल्पांतींही गोमय[14]. ॥ १११ ॥ मद्वचन पूजूनि, बापा! । ज्ञानदंडें दंडीं संतापा । वश न[15] होईं कुश्चिळ[16] पापा । अपर**रा**मपराक्रमा![17] ॥ ११२ ॥ विर्मुक्तमूर्धज[18], हतवाहन[19] । जालें **पां**चाळाचें सैन्य । निद्रिस्त प्रेता-समान । त्याचा वध न करावा[20]. ॥ ११३ ॥ जो दुजियासी कपटें मारी । तो बुडे नरकाभीतरीं । अपकीर्ति प्रबळ धरेवरी, । हीनें[21] होय सर्वस्वें. ॥ ११४ ॥ तूं अपर[22]**व्योम**केश । तूतें न लागो[23] अपकीर्तिदोष । स्फटिका-तुल्य यशःप्रकाश । तुझा ब्रह्मांडीं पसरला[24]. ॥ ११५ ॥ कार्यसिद्धी स्वमनो-रथें । होतां, आपणासी ईश्वरत्व घडतें[25] । यालागीं एक चिंतितां चित्तें । दुजेंचि जडे शरीरा[26]. ॥ ११६ ॥ कोणे युगीं कोणे ठायीं । स्वमनोरथें[27] कोण जाला विजयी? । यालागीं बापा! शांत होईं । बुद्धीनें[28] कार्य साधावें. ॥ ११७ ॥

---

१. ध्रुवमंडळ अचल आहे, त्याप्रमाणें माझी प्रतिज्ञाही अचल (स्थिर) आहे—असा स्पष्टार्थ. २. हें 'बळा'चें विशेषण. 'साधुमत बुद्धीचें' असा पाठभेद. ३. हें 'बळा'चें विशेषण. 'यशः-प्राप्तिसाधक' असें पाठांतर. ४. दुर्योधनादि मित्रांचा नाश. 'मित्रां नाश' असें पाठांतर. ५. हेर, बातमीदार. ६. रात्रीच्या छाप्यानें, रात्रीं छापा घालून. ७. 'रिपु जे' असा पाठभेद. ८. येथें मूळां-तील चौथा अध्याय संपला. ९. वाटे. १०. प्रज्ञावान्, पंडित. ११. बृहस्पतीसारखी. १२. विचार विवरीं—विचाराचा स्वीकार कर, विचार कर. 'विचार ताता विचारिया' असें पाठांतर. १३. हंस. १४. शेण. 'गोमयातें' असें पाठांतर. १५. 'नव्हे' 'न हो' अशीं पाठांतरें. १६. अपवित्र, निंद्य. 'शक्य न होय कुश्चित पापा' असा पाठभेद. १७. प्रतिपरशुरामाप्रमाणें पराक्रम करणाऱ्या (अश्वत्थाम्या)! १८. ज्यांचे केश सुटले आहेत असे. १९. ज्यांचें वाहन नष्ट झालें आहे असे. २०. अध्याय ४ श्लोक ११–१३ पहा. २१. धरेवरी (पृथ्वीवर) प्रबळ अपकीर्ति [होय] (व तो पुरुष) सर्वस्वें हीन होय—असा अन्वय. 'लीन' असें पाठांतर. २२. प्रतिमहादेव. व्योमकेश=व्योम (पाणी) आहे केशीं (डोक्यावर) ज्याच्या तो (शंकर). शंकरानें आपल्या मस्तकावर गंगा धारण केली म्हणून त्यास व्योमकेश असें नांव पडलें. २३. 'लागे' असें पाठांतर. २४. 'भेदला' असा पाठभेद. २५. 'घडे' असें पाठांतर. २६. 'शरीरा घडतसे' असा अन्यपाठ. २७. आपल्या इच्छेप्रमाणें. २८. 'बुद्धींच' असा पाठभेद.

[1]कर्कश हे रजनीची [2]केळा । लोटोनि येतां रविमंडळा । [3]त्रैय पुरुषार्थें भूप-
पांचाळा । छोडुनि पाडूं संग्रामीं.' ॥ ११८ ॥ द्रौणी म्हणे, 'सत्य
मातुळा ! । तुझी [4]शब्दानुभावलीला । परंतु [5]अमित्रीं [6]अवनीपाळा । [7]स्मरें
कपटें मारिलें. ॥ ११९ ॥ [8]न्यस्तशस्त्र माझा [9]पितृ । मारी पार्षत अपवित्रु ।
[10]रथचक्रग्रस्त राधापुत्रू । श्वेतवाहनें [11]निर्दाळिला. ॥ १२० ॥ [12]शिखंडी
पुढें करोनि पार्थें । शर [13]मारिले भीष्मातें; । [14]प्रायोपवेशी भूरिश्रव्यातें ।
युयुधानें जाणावें. ॥ १२१ ॥ त्यानंतरें [15]द्वितीयपार्थें । जीवें [16]मारिलें राज-
यातें, । [17]त्यांतें निद्रिस्त मारितां; येथें । [18]शब्द श्रेष्ठीं न लाविजे. ॥ १२२ ॥
[19]कीटकपतंगादि योनी । भोगीन [20]अनेकही सत्य मानीं । परंतु पांचाळातें मारोनी ।
ऋण फेडीन [21]पितृचें. ॥ १२३ ॥ आग्रह करितां अश्वत्थामा । 'तथास्तु' [22]वदती;
[23]नरेंद्रोत्तमा ! । जेवीं इंद्रियें [24]मनेंनियमा । अन्यथा करूं न शकती. ॥ १२४ ॥
द्रौणी म्हणे, 'वीर हो ! आंगीं । कवचें घालोनि, [25]कार्मुकखड्गी । रथीं बैसोनी,

---

१. भयंकर. 'कर्कशं कठिनं क्रूरं कठोरम्' इति अमरः ।. २. 'रजनी विकळा' असा पाठभेद. ३. आपण तिघेजण. 'त्रयपुरुषीं' असा अन्यपाठ. ४. वाक्पाटव, वाक्पटुत्व. 'शब्दानुभवलीला' असें पाठांतर. ५. शत्रूंनीं (पांडवांनीं). 'अमित्र' असें पाठांतर. ६. राजास (दुर्योधनास). ७. 'स्मरोनि' असें पाठांतर. ८. ज्यानें शस्त्र खालीं ठेवलें आहे असा. द्रोणाचार्य ध्यानस्थ बसले असतां त्यांस धृष्टद्युम्नानें मारिलें—अशी कथा आहे. ९. पिता (द्रोणाचार्य). 'मित्रू' असें पाठांतर. १०. कर्णाच्या रथाचें चक्र पृथ्वीनें गिळिलें असतां अर्जुनानें त्याचा वध केला. (महाभारत—कर्णपर्व—अ० ९०). ११. 'मारिला' असा पाठभेद. १२. शिखंडी ही द्रुपदराजाची कन्या. हिला एका यक्षाच्या कृपेनें पुरुषत्व प्राप्त झालें, अशी कथा आहे. (महाभारत-उद्योगपर्व. अ० १७३–१९२ पहा.) स्त्रीवर बाण सोडावयाचा नाहीं असा भीष्माचा बाणा असल्यामुळें, त्यानें अर्जुनावर उलट बाण सोडणेंच बंद केलें कारण अर्जुनाच्या रथांत, त्याच्या पुढें शिखंडी होती. अशा रीतीनें अर्जुनानें भीष्मास मारिलें. १३. 'शरें मारिलें' 'स्मरें मारिलें' असे पाठभेद. १४. अन्नपाणी सोडून मरणाची वाट पाहात बसलेला. भूरिश्रवा हा एक कौरवांकडील योद्धा. ह्यास सात्यकीनें मारिलें. १५. पार्थ=पृथा-(कुंती)पुत्र. द्वितीयपार्थें=कुंतीच्या दुसऱ्या मुलानें (भीमानें). 'द्वितीय पंडुसुतें' असें पाठांतर. १६. ठार मारिलें. १७. कर्ण, भीष्म, भूरिश्रवा, इत्यादिकांस मारणाऱ्यांस. १८. दोष. 'शब्दश्रेणी' असा पाठभेद. १९. 'कीपट (?)' असें पाठांतर. २०. 'अथवा' 'आणिके' असे पाठभेद. २१. पित्याचें. 'पितरांचें' असें पाठांतर. २२. कृपाचार्य व कृतवर्मा वदती. २३. धृतराष्ट्रा ! २४. मनाच्या नियमांस. नियम=नेम, निर्बंध. २५. कार्मुक (धनुष्य) व खड्ग यांनीं युक्त.

[1]लागवेगीं । जाऊं रिपुदमनातें. ॥ १२५ ॥ ते वेळीं **कृपकृत**वर्मा । रथीं बैसोन,
[2]भूपाळोत्तमा ! । [3]मार्गीं जातां उपमा । अपूर्व [4]मिनली त्यांलागीं. ॥ १२६ ॥
[5]आहुतीलागीं [6]त्रयअग्नी । धांवती [7]जैसे लोकदहनीं । जेवीं युगाच्या [8]अवसानीं ।
[9]ग्रह [10]क्षोभती आकाशीं.[11] ॥ १२७ ॥ ते वेळीं **शिवासीं केशवें** । निश्चयो केला
[12]एकभावें । शेष **पांचाळ** घालावे । [13]काळाननीं या रात्रीं. ॥ १२८ ॥ ऐसे एक-
[14]मूर्तिधर द्वय । स्थापिते जाले हें कार्य । पुढें चतुरीं भ्रमरप्राय । [15]कथासुमनीं
रमावें. ॥ १२९ ॥ **व्यासगुरूच्या** कृपादृष्टीं । **मुक्तेश्वर** अधिकार **भारतसृष्टीं** ।
पावला; जैसा [16]क्षीरार्णवतटीं । [17]उपमन्यू लाधे [18]क्षीरातें. ॥ १३० ॥ इति
श्री**भारतसौ**प्तिकपर्वणी । अपूर्व चरित [19]लोकतारणी । उत्तराध्यायाच्या निरू-
पणीं । मानस निश्चळ [20]रक्षावें. ॥ १३१ ॥

---

१. लगबगीनें, तांतडीनें, घाईनें. २. धृतराष्ट्रा ! ३. 'पराभिमुख जातां' असा पाठभेद. ४. मिळाली, प्राप्त झाली. ५. 'आहुतिलाभें' असें पाठांतर. ६. येथें अश्वत्थामा, कृप व कृतवर्मा ह्या तिघांस अग्नीची उपमा दिली आहे. हीच मूळांत आहे. येथें मूळांतील पांचवा अध्याय संपला. ७. जणुं काय. ८. अखेरीस. युगसमाप्तीच्या वेळीं ग्रह क्षोभतात व उल्कापातादि अनेक दुश्चिन्हें होतात—अशी समजूत आहे. ९. हे नऊ आहेत, त्यांचीं नांवें:—रवि, सोम, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनि, राहू व केतू. आपल्या पूर्वजांस हे नऊच ग्रह माहीत होते. परंतु अर्वाचीन ज्योतिर्विदांस आणखी दोन ग्रहांचा शोध लागला आहे; त्यांचीं नांवें:—युरेनस (प्रजापति) व नेपच्यून (वरुण). तसेंच रवि व सोम हे ग्रह नसून, एक तारा व दुसरा उपग्रह आहे, हेंही आतां निश्चित झालें आहे. राहू आणि केतू हेही ग्रह नाहींत. १०. 'शोभती' असें पाठांतर. ११. ह्या ओंवीनंतर एका पोथींत पुढील ओंवी आहे:—'कामक्रोध लोभ जाण । तेवीं क्षोभले त्रयजण । द्वयासहित गुरुनंदन । शिबिरद्वार पावला ॥.' १२. एकमतानें. १३. 'काळानळीं' असा पाठभेद. १४. एक मूर्ति धारण करणारे, ज्या दोघांमध्यें भेदभाव नाहीं असे, द्वैतरहित. १५. 'कथासुरंगीं' 'कथासुगंधीं' असे अन्यपाठ. १६. क्षीरसागराचे कांठीं. १७. हा व्याघ्रपादऋषीचा पुत्र. हा आपल्या बालमित्रांसह दुसऱ्या एका मुनीच्या आश्रमांत खेळावयास गेला असतां तेथें त्यानें गाईचें दूध पाहिलें. तो घरीं आल्यावर आपल्या आईजवळ दूध मागूं लागला तेव्हां त्याची आई त्यास 'शंकरास शरण जा म्हणजे तुला दूध मिळेल' असें म्हणाली. तेव्हां त्यानें तप करून शंकरास प्रसन्न केलें व शंकरानें त्यास क्षीरसमुद्र व आकल्प आयुष्य दिलें, अशी कथा आहे. (मोरोपंत.—अनुशासनपर्व—अ० ३-४.) १८. दुग्धातें, दूध. १९. लोकांचें तारण करणारें. २०. ह्या अध्यायास 'अश्वत्थामाकृपभोजगूढविचार' असें नांव एका पोथींत दिलेलें आहे. दुसऱ्या पोथींत 'द्रौणिसौप्तिकउद्योगकरणम्' असें नांव आहे.

## अध्याय दुसरा.[1]

**भार**द्वाज, **भो**ज, कृप, । गेले शिबिरद्वारासमीप । जेवीं क्षात्रशाळेपासूनि द्विप[2] । सुटले रिपुदमनातें. ॥ १ ॥ ब्रह्मांडगेहीं[3] अंधकार । दाटला, तेणें रात्री घोर । आभासे, तंव अपूर्व[4] थोर । द्वारदेशीं देखिलें. ॥ २ ॥ तेथें घोररूप[5] एक भूत । चंद्रातुल्य[6] वपु कांत[7] । द्वारीं उभा, जैसा पर्वत । रुक्माचा[8] लोमहर्षण[9]. ॥ ३ ॥ व्याघ्रचर्माचिया चिरा[10] । रक्तलिप्त वेष्टिलें शरीरा । अपूर्व कृष्णाजिनो-[11]त्तरा । नागयज्ञोपवीत[12]. ॥ ४ ॥ कराळ[13] दंष्ट्रा, भ्यासुर वक्त्र । सहस्रावधी विचित्र नेत्र । त्यांचिया तेजें धरा[14] पात्र । तप्त, गिरी फुटताती. ॥ ५ ॥ नासिकीं श्रवणीं आणि नयनीं । ज्वाळा निघती दीप्तवर्णी[15] । वाटे **ब्र**ह्मांडासी पाणी[16] । कवळोनियां राहिले[17]. ॥ ६ ॥ तें रूप[18] भयंकर अद्भुत । देखोनी, **द्रौ**णी सावचित्त । धनू विस्फारोनि योजित । दिव्यास्त्रातें निर्भयें[19]. ॥ ७ ॥ जेवीं निर्भाग्याचे[20] उद्योग[21] । तेवीं **द्रौ**णीचे शर अनेक[22] । धांवत पसरूनि उत्तरांग[23] । भूत ग्रासी बाणातें. ॥ ८ ॥ उदधीउदकीं[24] वडवानळ[25] । तेवीं ग्रासितां शर सकळ । कोपोनियां **द्रौ**णी सबळ । दिव्यशक्ती[26] तैं योजी. ॥ ९ ॥

---

१. ह्या अध्यायांत मूळांतील अध्याय ६,७ व ८ यांतील कथाभाग आहे. २. हत्ती. ३. विश्रांत. ४. अत्यंत अपूर्व असें भूत. 'पराक्रम' असें पाठांतर. ५. भयंकर. ६. 'चंद्रार्कातुल्य' असा पाठभेद. ७. सुंदर. ८. सुवर्णाचा. ९. अंगावर कांटा उभा करणारा, भयंकर. १०. व्याघ्रचर्माचिया रक्तलिप्त चिरा (वस्त्रा) शरीरा वेष्टिलें--असा अन्वय. ११. मृगचर्म हेंच उत्तरीय वस्त्र (उपरणें). १२. सर्प हेंच जानवें. १३. भयंकर दाढा. 'कराळ कृष्णा' असें पाठांतर. १४. धरा (पृथ्वी) ही तप्तपात्र, [व त्यांत] गिरी [फुटाण्यासारखे] फुटताती--असा अन्वय. ज्याप्रमाणें उष्णतेमुळें चणे फुटतात त्याप्रमाणें श्रीशंकराच्या तेजामुळें पर्वत तापून फुटावयास लागले--असा स्पष्टार्थ. येथें **'अतिशयोक्ति'** आहे. १५. उज्ज्वलवर्णा. १६. हात. १७. ह्याचा कर्ता 'पाणी'. 'राहिला' असें पाठांतर. १८. 'लोक' असें पाठांतर. १९. 'निर्भय' असें पाठांतर. २०. ज्याप्रमाणें दुर्दैवी मनुष्यानें हातांत घेतलेल्या कोणत्याही कामांत त्यास यश येत नाहीं, त्याप्रमाणें अश्वत्थाम्यानें सोडलेल्या बाणांची अवस्था झाली. (त्या भूतास बाण लागले नाहींत)--हा इत्यर्थ. २१. 'उद्वेग' असें पाठांतर. २२. 'आनेग' असें पाठांतर. २३. मुख, तोंड (?). 'उत्तमांग' असा पाठभेद. उत्तमांग=शिर, मस्तक. २४. समुद्राच्या जलांत. २५. अग्निविशेष. हा समुद्रांत राहून समुद्राचें पाणी शोषून घेतो--अशी समजूत आहे. [विशेष माहितीकरितां मुक्तेश्वरकृत वनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ० १३ टीप १० व पृ० २९ टीप १३ पहा.] २६. शक्ति=अस्त्रविशेष. **'शक्तिरस्त्रान्तरे गौर्यामुत्साहादौ बले स्त्रियाम्'** इति मेदिनी. 'दीप्त शक्ति' असें पाठांतर.

जैशी दीप्त अग्नीची शिखा[1] । तेजें तापवी[2] दिशामुखां[3] । नानायुगांतींच्या[4]
उल्का[5] । पतन पावती[6] धरेसी. ॥ १० ॥ तीतें ग्रासितांचि भूत । खड्ग[7] उचली
**गुरु**सुत । विकोश[8] करूनियां त्वरित । सर्पासमान योजिलें. ॥ ११ ॥ तेंही
ग्रासितां, राजवरा![9] । परम कोप **कृ**पीकुमरा । अनेक शस्त्रें योजूनि, धरा ।
प्रकाशानळें[10] भूपवी. ॥ १२ ॥ तें[11] समस्तही जाती लया । **अ**श्वत्थामा प्राप्त
विस्मया । नभ[12] विलोकितां, राजया! । जनार्दनरूप[13] देखिलें. ॥ १३ ॥ प्रवे-
शोनी संतापविवरीं[14] । **कृ**पवाक्यातें स्मरे अंतरीं । म्हणे, 'सुहृद्शब्दाच्या अव्हेरीं ।
मी व्यसन[15] हें पावलों. ॥ १४ ॥ [16]गोब्राह्मणनृपसुकांता । गुरुवृद्धबाळमाता[17] ।
सखाजडांधभयभीता[18] । यांतें निद्रिस्त वधों [19]नये. ॥ १५ ॥ इत्यादिक **आ**चार्य
पूर्वीं । मातें सर्वदा धर्म दावी । तो[20] मी आजी मिथ्यार्णवीं[21] । सांडितां, व्यथा[22]
पावलों. ॥ १६ ॥ जो अमार्गें करील गमन । नाइकें वडिलांचें वचन ।
त्यातें प्राप्त ऐसेंचि व्यसन । येऊनियां ग्रासितसे[23]. ॥ १७ ॥ यालागीं विवेकें[24]
गुरुत्वसीमा । ईश्वरें स्थापिली सत्यमहिमा । येरहित[25] तो पावोनी श्रमा ।
निंद्य होय जनमुखें. ॥ १८ ॥ माझ्या [26]दुःप्रणीतें मातें । क्लेश होती परंतु धै-
र्यातें । धरूनियां, रणमस्तकातें । विक्रमपदें[27] पिटीन[28]. ॥१९॥ दैवचि[29] असे सर्व
कारण । अन्यत्र मिथ्या भावार्थ जाण । आतां श्री**शि**वासी शरण । जातां लाभ[30]

१. ज्वाळा. २. 'तापती' असा पाठभेद. ३. सर्व दिक्प्रांत तप्त करी–असा इत्यर्थ. ४. 'युगांतींची' असें पाठांतर. ५. उल्का=आकाशांतून अग्निरूप जो तारा पडतो तो. ६. 'पावे' असें पाठांतर. ७. शस्त्र विशेष. परं खंडयतीति खड्गः । 'ऋष्टिः खड्गस्तरवारीति' त्रिकांडशेषः । ८. कोशरहित, म्यानांतून बाहेर काढलेली, नंगी. 'विक्रोश' 'विकसित' असे अन्यपाठ. ९. धृतराष्ट्रा! १०. प्रकाशरूपी अग्नीनें. 'प्रकाशानंदें' असें पाठांतर. ११. खड्गादि शस्त्रास्त्रें. १२. आकाश. १३. महादेवाचें रूप. जनार्दन=दुष्टजनांचें मर्दन करणारा. १४. संतापरूपी बिळांत. १५. आपत्ति, संकट. १६. गाई+ब्राह्मण+राजा+साध्वी स्त्री. १७. आचार्य+वडील माणसें+बालक+माता. १८. मित्र+मूर्ख+आंधळा+भयाकुळ. १९. 'निद्रिस्त मत्ता न मारणें' असा अन्यपाठ. (अ० ६ श्लोक २१।२२ पहा.) २०. 'तो या' असें पाठांतर. २१. असत्यसागरांत सांडितां=असत्य मानिल्यामुळें, अव्हेर केल्यामुळें. २२. 'वेथा' असें पाठांतर. २३. 'ग्रासी तसें' असें पाठांतर. २४. विचारपूर्वक. २५. 'पारहीन तो' असा पाठभेद. २६. अविचारी वर्तनानें. 'दुष्प्रणिपातें' असें पाठांतर. २७. रणरूपी मस्तकातें विक्रम–(पराक्रम) रूपी पदें (पायानें) पिटीन (रणांत पराक्रम गाजवीन)–असा स्पष्टार्थ. २८. पिटणें=मारणें, ठोकणें, बडविणें. २९. 'देवचि' असें पाठांतर. ३०. 'कल्याण' असें पाठांतर.

दिसताहे ॥ २० ॥ ऐसें वदोनी अंतर्यामीं[2] । रथ त्यागुनी पातला भूमीं[3] । कर-पद्में शिरपद्मीं[4] । शिवभजनीं प्रवर्तला. ॥ २१ ॥ म्हणे, 'शिवा[5]! हरा! रुद्रा! सघृणा[6]! । शितिकंठा! शंभो! त्रिलोचना! । विरूपाक्षा स्मरहरा[7]! स्थाणा[8]! । निवास तुझा सर्वदा. ॥ २२ ॥ कुमारपितया[9]! वृषभवाहना! । हिरण्यकवचा देवरक्षणा! । चंद्रमौळी! करुणाघना! । गौरीहृदयवल्लभा! ॥ २३ ॥ अल्पबुद्धीच्या[10] उपासनें । कुश्चित कर्म धरिलें मनें । त्रिपुरनाशना! त्याकारणें । आत्मार्पणीं[11] मी सादर.' ॥ २४ ॥ ऐसा त्यागात्मक[12] द्रौणी । स्तवन करितां शिवें ज्ञानीं[13] । जाणोनियां, पुढें कांचनी[14] । वेदी[15] एक निर्मिली. ॥ २५ ॥ त्यामाजीं दिसे चित्रभानू[16] । करी प्रकाशित रजरेणू[17] । तेजपूरित सर्व तनू । गर्भीं[18] विशाळ देखिला. ॥ २६ ॥ अनेक पादशिरोपाणी[19] । रूपें निघतीं विकृताननीं[20] । द्विप शैलांपरी[21] धांवोनी । द्रौणीवरी येताती. ॥ २७ ॥ उष्ट्र[22]व्याघ्रमार्जार[23]वदनें । अनेक वक्त्रें[24] विलक्षणें । कर्णपाणीसहस्रनयनें । शतोदरें[25]सीं विशाळ[26]. ॥ २८ ॥ भुशुंडी[27]-पाशगदापाणी । पृष्टीं बांधिले विचित्र तूणी[28] । रजोध्वस्त[29], शुक्लवसनी ।

---

१. येथें मूळांतील सहावा अध्याय संपूर्ण झाला. २. मनांत, अंतःकरणांत. अंतर्याम=हृदय. अंतः (आंत) व यामी (गमन करणारा)=अंतर्यामी असें विशेषण सिद्ध झालें, कालांतरानें हें विशेषण नसून सप्तम्यंत नाम आहे असा लोकांचा समज झाला व त्याचें 'अंतर्याम' असें प्रातिपदिकरूप सिद्ध झालें. [ मुक्तेश्वरआदिपर्व (काव्यसंग्रह)—पृ० ३७९ टी० १७ पहा.] ३. जमिनीवर. ४. शिर-पद्मीं (मस्तकावर) करपद्में (हातानें, हात ठेवून)=नमस्कार करून. ५. 'शिवाकरा' असें पाठांतर. ६. दयायुक्ता, दयाळा. ७. 'स्मरगणा' असें पाठांतर. ८. 'स्थाणु' हें शंकराचें नांव आहे. उकाराच्या बदलीं अकार घालून, संबोधन केलें, म्हणजे 'स्थाणा' हें रूप तयार झालें. ९. कार्तिकेयपित्या. १०. मूढबुद्धियुक्त उपासनेच्या योगानें. 'आत्मबुद्धीच्या' असा पाठभेद. ११. 'आत्मार्पणासी सादर' असा अन्यपाठ. १२. आत्मत्याग करण्यास तयार. १३. 'शिव ज्ञानी' असें पाठांतर. १४. सुवर्णमय. 'काननीं' असें पाठांतर. १५. वेदि=अग्निहोत्र, यज्ञ इत्यादिकांकरितां डमरूच्या आकाराप्रमाणें केलेली जी भूमी ती, यज्ञकुंड. १६. अग्नि. १७. अणुरे-णूंसारखे अत्यंत सूक्ष्म पदार्थ सुद्धां. १८. (वेदीच्या) मध्यभागीं. १९. ज्यांला अनेक पाय, अनेक शिरें व अनेक हस्त आहेत अशीं. २०. विचित्र तोंडांचीं. पाठभेदः—विकृतानयनीं. २१. पर्व-तासारखे. पाठभेदः—'शैलावरी' 'शैलातुल्य.' २२. 'उग्र' असें पाठांतर. २३. उंट, वाघ, मांजरें यांच्यासारखीं मुखें ज्यांस असे. २४. 'वस्त्रें' असा पाठभेद. २५. कान, हात, हजार डोळे व शंभर उदरें यांनीं युक्त. २६. भव्य. २७. भुशुंडी, पाश व गदा इत्यादि आयुधें ज्यांच्या हातांत आहेत तो. भुशुंडी=अस्त्रविशेष. 'गदापद्मी' असें पाठांतर. २८. भाते. या शब्दाचीं 'तूण' व 'तूणी' अशीं दोन रूपें आहेत. २९. धूळीनें मळकट झालेले. (अ० ७ श्लोक ३१.)

कर्दमदिग्ध पातले. ॥२९॥ अनेक वाद्यें ताडूनि[1] करें । गर्जना करिती मुखोद्गारें[2] । गायन करूनि नृत्याकारें । अपूर्व आकृती दाविती. ॥ ३० ॥ मूर्द्धजें[3] झोंडिती[4] भूरजा[5] । नभीं उभविल्या शस्त्रभुजा[6] । विचित्रभूषणवपुभाजा[7] । नित्य जिहीं भूषिल्या. ॥ ३१ ॥ चूडाळा[8] आणि कर्णिकारा[9] । प्रकृत्यादि विशाळोदरा । ऱ्हस्वा दीर्घा विकृतस्वरा[10] । विकट कराळा लंबोदरा[11]. ॥ ३२ ॥ ऐशा सैन्यासी[12] शूळपाणी । संगीं नगाची नंदिनी[13] । आला, जेथें उभा द्रौणी । धैर्यें स्तवन करीतसे. ॥ ३३ ॥ भूतसंघाच्या[14] दर्शनें[15] । त्रैलोक्य पीडे भयदानें । त्या शिवाच्या अवलोकनें । द्रौणी वेथा[16] न पावे. ॥ ३४ ॥ बद्धगोधांगुळीत्राणी[17] । द्विज सावध धनुष्यबाणीं । आपुला[18] उपहार[19] मानुनी । शरीर समर्पी शिवातें. ॥ ३५ ॥ धनुष्य[20] समिधा, पवित्र शर । हवी[21] कल्पिलें स्वशरीर । सौम्यमंत्रें[22] धैर्यसागर । देहार्पणा पुढारला[23]. ॥ ३६ ॥ शिवासी प्रार्थितां कृतांजळी[24] । 'मी जन्मलों अंगिरसकुळीं[25] । माझें शरीरदान बळी । घेऊनि, कृपा करावी. ॥३७॥ तूं परम समाधीचा ठाव । भक्तपाळक श्रीमहादेव । शिवंकारक[26] तूं सदाशिव ।

---

१. वाजवूनि. २. 'मुखद्वारें' असा पाठभेद. ३. केशांनीं. मूर्ध्नि (डोक्यावर) जातः (उत्पन्न झालेला) मूर्द्धजः केशः । केंस डोक्यावर उत्पन्न होतात म्हणून त्यांस 'मूर्द्धज' असें म्हणतात. ४. 'सांडिती' असें पाठांतर. ५. धूळ, मृत्तिकाकण. ६. शस्त्रयुक्त भुजा (हात). 'नभीं उभारिल्या शस्त्रेंसी भुजा' 'नभें उभारी शस्त्रें सभुजा' असे पाठभेद. ७. विचित्र भूषणांनीं युक्त अशा वपु (शरीरें) ह्याच भाजा (स्त्रिया). 'वपुभुजा' असें पाठांतर. ८. चूडायुक्ता. चूडा=तुरा, शिरोभूषण. चूडां लान्ति (गृण्हन्ति) ते चूडालाः ।. ९. 'कर्णिकारा' याचा अर्थ लांब कानाचा, लंबकर्णयुक्त असा असावासें वाटतें. मूळ भारतांतील ज्या श्लोकार्धाचें या ओवीच्या अर्धांत भाषांतर केलें आहे, तें असें आहे:-चूडालाः कर्णिकाराश्च प्रहृष्टाः पिठरोदराः । १०. भयंकर गर्जना करणाऱ्या. 'विकृतीश्वरा' 'विकृति स्वरा' अशीं पाठांतरें. ११. 'लंबोष्ट्रा' असें पाठांतर. १२. सैन्यासह. १३. पर्वतकन्या (पार्वती). १४. भूतसमुदायाच्या. १५. 'दरुषनें' 'भीषणपणें' अशीं पाठांतरें. १६. व्यथा, दुःख. १७. ज्याच्या हाताला गोधा (एक प्रकारचें चामड्याचें हस्तवेष्टन) बांधलेलें आहे व जो अंगुलित्राणानें युक्त आहे असा द्विज. १८. 'आला' असें पाठांतर. १९. बळी, देवतेस जें अर्पण करावयाचें तें. २०. धनुष्य (ह्याच) समिधा, (व) शर (हेच) पवित्र (=कुश दर्भ). 'धनुष्य मेंढा' असें पाठांतर. २१. हवन करावयाचें जें द्रव्य तें. २२. सोमदेवतेंच्या मंत्रांनीं. 'शौचमंत्रें' व 'सैन्यमंत्रें' अशीं पाठांतरें. २३. पुढें झाला, तयार झाला. २४. कृत+ अंजली=हात जोडून. २५. अंगिरस्‌नामक ऋषीच्या गोत्रांत. ब्रह्ममानसपुत्र जो अंगिरस् त्याचा पुत्र बृहस्पति, त्याच्या अंशानें झालेला पुत्र द्रोण व त्याचा पुत्र अश्वत्थामा होय. (अध्याय ७।५६ पहा). २६. 'विश्वकारक' 'विश्वतारक' अशीं पाठांतरें.

गुणप्रधान स्वामिया ! ॥ ३८ ॥ जेवीं सागरावरी तरंग । तेवीं तुजवरी हें जग । अंगिकारीं अंगभाग । माझा कृपें; कृपाळुवा !' ॥ ३९ ॥ इतुकें वदोनियां मुखीं । प्रवेशे वेदीदीप्तपावकीं[3] । देहत्यागधर्मोदकीं । मीनप्राय मानस. ॥ ४० ॥ गर्भीं प्रवेशतां द्रौणी । शीतचेष्टा धरी अग्नी । वेगीं शिवें धरूनि पाणी । हास्य मुखें जाणवित. ॥ ४१ ॥ 'सत्यशौचआर्जवत्यागें । तपें क्षमें शांतियोगें । भक्तिधृतिबुद्धिमार्गें । कृष्णापेक्षां कोण दुजा ? ॥ ४२ ॥ त्यासमवेत मजलागीं । तोषविलें तुवां भक्तिरंगीं । आमुच्या कृपेचें कवच आंगीं । पांचाळनाशन पाव तें. ॥ ४३ ॥ आतां वेर हा लाभे वीरा ! । छेदीं रिपुकुळकांतारा; । पाळूनि प्रतिज्ञारूप दारा । क्षात्रगार्हस्थ्य संपादीं.' ॥ ४४ ॥ ऐसें[13] वदोनियां हरिकेश । विमळ, खड्ग, आत्मकोश । स्थापूनियां दीप्तिप्रकाश, । अश्वत्थामियातें दीधलें. ॥ ४५ ॥ भूतमेळीं भूतवल्लभ । क्रमोनी गेला ऊर्ध्व नभ । ते वेळीं द्रौणीचा मनोस्तंभ । वरदानंदें शोभला. ॥ ४६ ॥ धृतराष्ट्र दिव्यदर्शना । म्हणे, 'संजया ! ज्ञानघना ! । रिपुशिबिरीं गुरुनंदना । येणें जालें क्षोभसंगें; ॥ ४७ ॥ ते वेळीं सात्वतशारद्वत । भयें पळाले काय त्वरित ? । किंवा सन्मानूनियां पुरुषार्थ । द्रौणीस साह्य मिळाले ? ॥ ४८ ॥ सोमक पांडवाचिये शिबिरीं[22] ।

---

१. सत्व, रज आणि तम हे गुण श्रेष्ठत्वानें ज्याचे ठायीं वास करीत आहेत असा (शंकर). २. लाटा. ज्याप्रमाणें तरंगांस आश्रयभूत समुद्र, त्याप्रमाणें सर्व जगास श्रीशंकर आधारभूत आहे–असा भावार्थ. ३. वेदींतील प्रदीप्त अग्नींत. 'वेगीं दीप्तपावकीं' असा पाठभेद. ४. देहत्यागरूपी (=आत्मार्पणरूपी) जो धर्म (=भक्ताचें पवित्र कर्तव्य) तेंच जल, त्यांत. पाठभेदः– देहत्यागें धर्मोदकीं. ५. मत्स्यप्राय, माशाप्रमाणें. ६. (यज्ञकुंडाच्या) मध्यभागीं. ७. शीतचेष्टा धरी=शीतळ होई, थंड झाला. ८. प्रामाणिकपणा, पावित्र्य, रुजुता (मनाचा सरळपणा) व दान ह्यांच्या योगानें. ९. 'वरदलाभें' असें पाठांतर. १०. शत्रुकुळरूपी वनास. ११. भार्या. १२. क्षात्रधर्मरूप गृहस्थाश्रमास. १३. 'एवं' असें पाठांतर. १४. हरिक (जुगार खेळणारा)+ईश=जुगार खेळणाऱ्यांत श्रेष्ठ (महादेव). शंकर व पार्वती ह्या उभयतांस पण लावून सारिपाट (सोंगट्या) खेळणें फार आवडतें–अशी प्रसिद्धी आहे. कांहींच्या मतें या शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे:–हरि (=विष्णु) व क(=ब्रह्मा) यांचा ईश (=नाथ, स्वामी). १५. 'दीप्तप्रकाश' असा पाठभेद. १६. भूतेश्वर (महादेव). भूतवल्लभ नभ क्रमोनी ऊर्ध्व गेला–असा अन्वय. १७. 'वरदानें' असा पाठभेद. १८. येथें मूळांतील सातवा अध्याय संपला. १९. दिव्यदृष्टि ज्यांची आहे अशाला (=संजयास). २०. सात्वत–यदुकुलोत्पन्न, कृतवर्मा. शारद्वत=शरद्वताचा मुलगा कृप. 'सात्वन' 'सत्व' अशीं पाठांतरें. २१. 'काम' असें पाठांतर. २२. 'शिरीं' असा पाठभेद. सोमक=द्रुपदाचा आजा जो सोमक त्याचे वंशज, पांचाळ.

राजाज्ञें द्रौणी कैसा मारी? । हें क्रूरकर्म झडकरी । माझ्या श्रवणा मेळवीं.' ॥ ४९ ॥ संजय म्हणे, 'वीर प्रतापी । द्रौणी द्वयांसी द्वारीं स्थापी, । वदे 'तुम्ही येथें साक्षेपीं[1] । शिबिरद्वार रक्षावें. ॥ ५० ॥ मी रिघोनी वीरें[2]सदनीं । वैरी लोटितों[3] काळाननीं । द्वारीं येतां जीवें[4]रक्षणीं । तुम्हीं शस्त्रें[5] खंडावे. ॥५१॥ येणें यश प्राप्त आपणासी । स्वस्थ[6] सौभाग्य राजाज्ञेसी । यशोदक[7] ब्रह्मांडकलशीं[8] । हेलावें[9] कीर्तितरंगें.[10]' ॥ ५२ ॥ ऐशा युक्तीनें धनुर्धारी । अद्वारें[11] पार्षताचे[12] शिबिरीं । प्रवेशला, जैसा शरीरीं । गतायुष्या[13] मृत्युकाळ. ॥ ५३ ॥ भयातें घालूनि पाताळीं । धैर्यतिलक वंदिलें[14] भाळीं । विकारनाशना[15] ज्ञानी, बळी । तेवीं तेथें मिसळला. ॥ ५४ ॥ पार्षताचें विचित्र शिबिर । क्षोभें रिघे[16] आचार्यकुमर; । त्याचें[17] युद्धें श्रमोनी[18] शरीर । निद्रादेवीनें ग्रासिलें. ॥ ५५ ॥ तैं शिबिरीं[19] रिघोनी भारता! । शयनीं देखिलें पार्षता । जेवीं मारूनी मदोन्मत्ता । श्रम मानूनि निजेला. ॥ ५६ ॥ विचित्र रत्नांची संकुळी[20] । मंचक[21] निर्मिला कळाकुशळीं[22] । अनेक द्रव्यांची परिमळी[23] । वेध[24] लागे वसंता. ॥ ५७ ॥ माल्यचूर्णें[25] सुवासचूर्णें । मंचक व्याप्त सुवसनें[26] । पार्षताचें जागृतीठेवणें[27] । निद्रेमाजी

---

१. अगत्यानें, काळजीपूर्वक. २. 'वी-संधानी' असा पाठभेद. ३. 'लोटुनी' असें पाठांतर. ४. जीव वांचविण्याकरितां पळून जाण्यासाठीं जे येतील त्यांस. ५. याचें कर्म 'वैरी'. ६. 'स्वच्छ सौभाग्यत्व' असा पाठभेद. राजाज्ञा=सूड घेण्याविषयींची दुर्योधनाची आज्ञा. ७. यशरूपी उदक. ८. ब्रह्मांड (सर्व जग) रूपी कलश (पात्रविशेष), त्यांत. ९. हालत राहावें. १०. कीर्तिरूप लाटांच्या योगानें. येथें रूपकालंकार आहे. ११. अयोग्य मार्गानें, आडमार्गानें. १२. 'पार्थाचे' असें पाठांतर. १३. ज्या मनुष्याचें आयुष्य संपलें आहे, त्याच्या शरीरांत मृत्यु शिरतो त्याप्रमाणें. ह्या ओवींत सुरेख 'उपमा'लंकार आहे. १४. 'धैर्ये तिलक विंधिला' असा पाठभेद. १५. मनोविकाराचा नाश करण्यासाठीं जसा ज्ञानी त्याप्रमाणेंच पांचाळाचा नाश करण्यास तो बळी तेथें मिसळला (=अश्वत्थामा पांडवशिबिरांत गेला). १६. (शिबिरांत) घुसे, शिरे, प्रवेश करी. १७. पार्षताचें. १८. 'श्रमोनी युद्धाश्रमें' असा पाठभेद. १९. 'तेवीं वैर स्मरोनी' असा अन्यपाठ. २०. समुदाय. २१. पलंग, माचा. 'मंच' असेंही अन्यरूप आहे. २२. कलांत चतुर अशा मनुष्यांनीं. २३. सुवास, सुगंध. २४. छंद, नाद, आवड. वसंतऋतूंत झाडांस नवी पालवी फुटते व फुलें फुलतात व त्यामुळें सुवास सुटतो. अशा कुसुमाकर वसंतास सुद्धां वेध लागला. ह्यावरून धृष्टद्युम्नाच्या शय्यागारांत सुगंधाचा फारच घमघमाट सुटला असावा असें दिसतें. [वसंतऋतुविषयीं विशेष माहितीकरितां मुक्तेश्वरकृत वनपर्व (काव्यसंग्रह)—पृ० १०७ टी० १० पहा.] २५. पुष्पासारखीं सुवासिक चूर्णें (बुक्का, अर्गजा वगैरे). २६. उत्तम वस्त्रांनीं. २७. जागृतावस्थारूपी निधान (ठेवणें=ठेवोलें, खजीना).

हरपलें[1]. ॥ ५८ ॥ तो नरशार्दूळ[2] प्रतापराशी । मृत्यें[3] बांधिला जेवीं पाशीं[4] । कीं निद्रासपें मानसीं । दंश केला नाशातें[5]. ॥ ५९ ॥ त्याप्रती येऊनियां **द्रौणी** । जागृत करी पदीं ताडुनी[6] । तेणें त्वरित प्रतापतरणी[7] । प्रबोधाचळीं[8] उगवला. ॥ ६० ॥ पावोनी जागृतीचें स्थळ । दृष्टी **अश्वत्थामा** सबळ । देखिला अपररूपें[9] काळ । प्राणकर्षणा[10] पातला[11]. ॥ ६१ ॥ क्रोधें उठतां **याज्ञसेनी**[12] । केशाग्रहें[13] वोढी **द्रौणी** । बळें वसुधेवरी पाडोनी । वर्मीं[14] अर्पी घायातें. ॥ ६२ ॥ शक्तिचेष्टेचे[15] संभार । **पार्षताचे** निद्रासागर । बुडवी, तेणें स्मरणवर[16] । दरिद्रता पावली[17]. ॥ ६३ ॥ कंठहृदयीं[18] ताडूनि पद । गर्जत, पशुवधें[19] करी वध[20] । **पार्षत** नखें करी भेद[21] । परंतु **द्रौणी** सोडिना. ॥ ६४ ॥ म्हणे **गुरुपुत्रास**, 'समररंगीं[22] । संग्राम करीं मजसंगीं; । त्यापरी धर्मपुण्यें[23] स्वर्गीं । मी पावेन; प्रतापिया!' ॥ ६५ ॥ **द्रौणी** म्हणे, 'कुळपांसना[24] ! । परमदुष्टा ! गुरुनाशना[25] ! । मृत्युलोकीं तुझिया प्राणा । एक क्षण न ठेवावें. ॥ ६६ ॥ यास्तव शस्त्रघातें[26] मरण । तूतें न मिळे सत्य वचन'. । ऐसें म्हणोनी मर्मस्थान । लत्ताघातें ताडिलें[27]. ॥ ६७ ॥

---

१. सांडलें, हरवलें. २. नरश्रेष्ठ. पुल्लिंगी शब्दांपुढें सिंह, शार्दूल, नाग इत्यादि शब्द किंवा तत्समानार्थक शब्द असल्यास 'श्रेष्ठ' असा अर्थ होतो; जसें नरसिंह, पुन्नाग. 'सिंहशार्दूलनागाद्याः पुंसि श्रेष्ठार्थवाचकाः' इत्यमरः. ३. मृत्यूनें. 'मृत्यु बांधला' असें पाठांतर. ४. पाशांत, जाळ्यांत. ५. नाश करण्याकरितां. ६. लाथ मारून. 'पादताडनीं' असें पाठांतर. ७. प्रतापसूर्य, प्रतापी. ८. जागृतावस्थारूप पर्वतावर. धृष्टद्युम्न जागृत झाला–हा इत्यर्थ. ९. अन्यरूप धारण करणारा. 'देखोनी अमर क्रूर काळ' असा पाठभेद. १०. प्राण हरण करण्यास. ११. 'पावला' असें पाठांतर. १२. यज्ञसेनपुत्र (धृष्टद्युम्न). १३. केश धरून. १४. मर्मस्थानीं. मर्मस्थळ=ज्या ठिकाणीं मारल्यास मनुष्याच्या प्राणांला इजा पोंचण्याचा संभव आहे असें मानवशरीरांतील ठिकाण. [मुक्तेश्वर–वनपर्व (काव्यसंग्रह)–पृ० ३९ टी० १ पहा.] १५. शक्तीचे व्यापार. चेष्टा=चलनवलनादि क्रिया. १६. 'स्मरणचर' असें पाठांतर. १७. 'पावला' 'पावेल' 'पावलें' अशीं पाठांतरें. दरिद्रता स्मरणवर (=स्मरणावर) पावली=स्मृतीला हीनता आली, स्मृतिभ्रंश झाला. १८. 'कटिहृदयीं' 'कंटकहृदयीं' असे पाठभेद. १९. यज्ञांत पशूला मुष्टिप्रहारानें मारितात, शस्त्रानें मारीत नाहींत; त्याप्रमाणें मारून अश्वत्थामा पांचाळाचा वध करूं लागला–असा स्पष्टार्थ. २०. 'बद्ध' असें पाठांतर. मूळांतही 'पशुमारममारयत्' असेंच आहे. (अ० ८ श्लो० १९). २१. जखम. २२. समरंगणांत, समरभूमीवर. २३. क्षात्रधर्मानुसार युद्धांत मरण आल्यामुळें प्राप्त झालेल्या पुण्याच्या योगानें. 'धर्में स्वर्गीं' 'धर्में पुण्यस्वर्गीं' असे पाठभेद. (अध्याय ८।२० पहा.) २४. कुळाधमा! २५. गुरुहतका! २६. शस्त्रघातानें मरण आल्यास स्वर्गप्राप्ति होते, ती न व्हावी म्हणून तुला शस्त्रानें मारणार नाहीं–असा अश्वत्थाम्याच्या बोलण्याचा भाव. २७. 'ताडिला' असें पाठांतर.

पशुप्राय मारितां वीरा । शूर[1] शब्दें व्यापी वसुंधरा[2] । तेणें **पां**चाळांच्या दारा । जागृतीतें पावल्या. ॥ ६८ ॥ राजस्त्रियांचे[3] पाळक । जागृत होऊनि भयानक । विचरत[4] देखोनी अंतक[5] । **द्रौ**णी दृष्टीसी भासला. ॥ ६९ ॥ जिव्हा कुंठित जाली भयें । हृदयीं[6] न स्मरे उपाय । वपु तटस्थ अजाप्राय[7] । काळसर्पाच्या विलोकनें[8]. ॥ ७० ॥ **आ**चार्यसुतें मर्मस्थानीं । **पा**र्षत पूजिला पाददानीं । तेणें देहालागीं सांडोनी । प्राण त्याचा नष्टला. ॥ ७१ ॥ पुढें **द्रौ**णी रथीं बैसला । प्रळयप्रभाकर[9] भासला । अन्यत्र वीरांसी मांडिला । नाश तेणें भुजबळें[10].॥ ७२ ॥ सिंहनादें[11] पूजुनी दिशा । प्रवर्तला रिपुनाशा । रक्षकांसहित राजयोषा[12] । आक्रंदती शोकस्वरें. ॥ ७३ ॥ त्यांच्या स्वरें व्याप्त धरित्री । होतां, **पा**र्षताचे सर्व क्षत्री[13] । जागृत होऊनियां नेत्रीं । विलोकिती प्रळयातें. ॥ ७४ ॥ दृष्टीं देखोनि **भा**रद्वाजा । भयतटस्थ[14] राजभाजा[15] । जेवीं वृकदर्शनें[16] अजा[17] । विस्मयातें पावल्या. ॥ ७५ ॥ लगबगें वीर उठिले । म्हणती, 'येथें काय[18] मांडिलें?' । **द्रौ**णीस देखोनी बरवाळले[19] । नाना शस्त्रें प्रयोजती. ॥ ७६ ॥ सन्मुख येतां वीरसागर[20] । रुद्रास्त्र[21] योजित द्विजवर । तेणें निःशेषें[22] धरेवर । **पा**र्षतसैन्य पाडिलें. ॥ ७७ ॥ पुढें जातां वेगेंसी [23]**द्रौ**णीं । उत्तमौजा[24] देखिला नयनीं । त्याच्या हृदयीं पद ठेवुनी । तोही पशुमारें[25] मारिला. ॥ ७८ ॥ तो नाद जातां **ब्र**ह्मांडीं । युधामन्यू[26] निद्रेसि सांडी । **द्रौ**णी देखतां हृदयकुंडीं । राक्षसरूप मानिला. ॥ ७९ ॥ गदा उचलूनि त्वरित । हृदयीं ताडिला **गु**रुसुत । निद्राश्रयें शरीरप्रांत[27] । श्रमें व्याप्त

---

१. अश्वत्थामा. 'सुरशब्दें' असा पाठभेद. २. पृथ्वी. ३. 'राजश्रियांचे' असा अन्यपाठ. ४. हिकडेतिकडे धावत. ५. यम. अंतक=अंत करणारा, नाशकर्ता. ६. 'मानसीं' असें पाठांतर. ७. शेळीप्रमाणें, मेंढीप्रमाणें. ८. हा अजासर्पाचा दृष्टांत मूळांत नाहीं. ९. प्रयळकाळच्या सूर्यासारखा. 'प्रळयें प्रभाकर' असा अन्यपाठ. १०. बाहुबळानें, स्वपराक्रमानें. ११. भयंकर नादानें. १२. राजस्त्रिया. 'राजजोषा' असें पाठांतर. 'योषा' 'योषित्' 'योषिता' अशीं तीन रूपें आहेत. योषा=जोषा. 'ज' आणि 'य' यांमध्यें अभेद मानतात. 'यजयोः शसयोश्चैव बवयोर्लडयोस्तथा । वदन्त्येषां च सावर्ण्यमलंकारविदो जनाः ॥.' १३. योद्धे, क्षत्रियलोक. १४. भयानें गोंधळून गेलेल्या. १५. राजस्त्रिया. १६. लांडग्याच्या दर्शनानें. 'वृश्चिकदर्शनें' असें पाठांतर. १७. अजा=मेंढ्या. '**अजो** हरे हरौ कामे विधौ छागे रघोः सुते' इति विश्वः ।. १८. 'हें काय येथें मांडिलें' असा पाठभेद. १९. बरळूं लागले, बावरले. २०. वीरसमुदाय. 'वीर्यसागर' असें पाठांतर. २१. रुद्रानें (शंकरानें) दिलेलें अस्त्र. २२. शेषरहित, सर्व. २३. द्रोणपुत्रानें. २४. एक पांचालदेशीय राजा. २५. 'लत्ताप्रहारें' असा पाठभेद. २६. एक पांडवपक्षीय पांचाल. २७. 'श्रमें श्रांत' 'श्रमें प्रांत' अशीं पाठांतरें.

[1]पांचाळांचे. ॥ ८० ॥ त्वरें अश्वत्थामा धांवोनी । [2]आयतकेशांसी [3]धरी [4]पाणीं । क्षोभबळेंसी [5]झिंजाडुनी । पृथ्वीवरी पाडिला. ॥ ८१ ॥ रथाचिया दणदणाटीं । पांचाळ मेळविला सृष्टी । त्या नादाचिया बोभाटीं । वीर जागृती पावले. ॥ ८२ ॥ जैसा [6]शमिता पशु यज्ञीं । कीं [7]परशुधर महावनीं । तेवीं भारद्वाज खड्गपाणी । [8]मार्ग दावित विविधां ॥ ८३ ॥ [9]गुल्मगोळाचिये मध्यगर्भीं । वीरांसी मारी [10]काळक्षोभी । [11]खड्गघातें उसळोनि नभीं । रुधिरोदक वीरांचें. ॥८४॥ [12]न्यस्तशस्त्र, श्रमें वरिले । क्षणामाजी संहारिले । [13]अश्वद्विपरथ खंडिले । पराक्रमें त्या काळीं. ॥ ८५ ॥ निमीळि[14]तनेत्रें पळतां वीर । खड्गें छेदी [15]पादोदर । जेवीं कमळाचा [16]कासार । [17]कुंजर करें मर्दितसे. ॥ ८६ ॥ [18]कर्दळीवनीं [19]प्रभंजन । [20]मकर माजवी गंगाजीवन । तेवीं परशिबिरीं वीरकदन । आचार्यात्मजें मांडिलें. ॥ ८७ ॥ त्या [21]रथशब्दनादावर्तीं । [22]भ्रमत वीर [23]चाप हातीं । ते वेळे [24]द्रौपदेय जागृती । पावले पंच [25]शावक. ॥ ८८ ॥ मारिलें ऐकोनी पार्षतासी । धांवत शेष सोमकेंशीं । [26]शरव्रातें भारद्वाजासी । ताडिते जाले सक्रोध. ॥ ८९ ॥ त्यावरी घोषाचिया श्रवणें । [27]प्रभद्रकेंशीं निद्रा सांडू[28]नि । अगणित बाणांच्या प्रे-

---

१. 'पांचाळ' असें पाठांतर. २. लांब केंसांस. ३. 'धरिला' असा अन्यपाठ. ४. हातानें. ५. झिंजाडणें=झिंजा (केंस) धरून एखाद्यास भुईवर पाडणें; हिसडणें. ६. यज्ञांत पशूला मारण्याचें काम ज्याकडे असतें, त्यास 'शमिता' म्हणतात. 'होमिता' असा पाठभेद. ७. ज्याच्या हातांत परशु (कुऱ्हाड) आहे असा. 'परशुद्ध रमाहवनीं' असें पाठांतर. ८. (यमपुरीचा) रस्ता. ९. गुल्म=सैन्याचा विभाग. प्रत्येक गुल्मांत ४५ पदाति, २७ घोडे, ९ रथ व ९ हत्ती असतात. सैन्याचा तळ किंवा शिबिर, यालाही गुल्मच म्हणतात. गुल्मगोळ=वर्तुळाकार शिबिर. 'गुप्त गोळामध्यें गर्भीं' 'गुल्मगाल्मीमध्यें गर्भीं' असे पाठभेद. १०. यमासारखा प्रक्षुब्ध झालेला (द्रौणी). ११. 'खर्ग' असा पाठभेद. १२. ज्यांनीं शस्त्रें खालीं ठेविलीं आहेत असे वीर. 'न्यस्तशस्त्रें' असें पाठांतर. १३. 'अश्वद्विपरथें' 'अश्वादिकरथ' असे पाठभेद. १४. ज्यांचे डोळे अर्धवट मिटलेले आहेत असे, पूर्णपणें जागृत न झालेले वीर. १५. पाय आणि पोट. १६. सरोवर, तलाव. १७. हत्ती. करें=सोंडेनें. १८. केळीच्या बनांत. १९. जोराचा वारा, वायू. २०. मगर, सुसर. मं विषं किरतीति मकरः । 'नगर' असें पाठांतर. २१. (अश्वत्थाम्याच्या) रथाच्या शब्दनाद–(धडधडाट) रूपी भोंवऱ्यांत. २२. गोंधळून जात होते. 'भ्रमित' असें पाठांतर. २३. 'चापें पहाती' असा पाठभेद. २४. द्रौपदीपुत्र. द्रौपदीस पांच पांडवांपासून पांच पुत्र झाले त्यांचीं नांवें:–'प्रतिविंध्य धर्मराजकुमर । भीमापासाव श्रुतसोम वीर । श्रुतकीर्ति धनुर्धर । अर्जुनपुत्र जाणावा. ॥ ६८ ॥ नकुळवीर्यें शतानीक, । श्रुतकर्मा पांचवा देख । सहदेवतनय राजतिलक । लावण्यगुणीं आगळा. ॥ ६९ ॥' [मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय २१]. २५. शिशु, छावे. २६. शरांच्या समुदायानें. 'शरवातें' असा पाठभेद. २७. प्रभद्रकांसह. मागच्याच ओवींतील 'सोमकेंशीं' (=सोमकांसह) हें रूप याच नमुन्याचें आहे. 'प्रभार्दकेशी' असें पाठांतर. २८. 'सांडणें' असें पाठांतर.

रण । ,

गुरुनं

त्वरें ५. ञा । भ ... ।ाडिला ।

[4]धर्मज. ॥ ९२ ॥ प्रौ ... पां प्रतापी । श्रुतसोम धांवतां कोपी । खड्ग-घायाचिया आक्षेपीं । त्वरें केली [6]भारद्वाजें. ॥ ९३ ॥ प्रासेंसी छेदूनियां भुज । [7]पार्श्वी ताडिला [8]भीमात्मज । भेदूनियां [9]हृदयसरोज । प्राणवपु [10]विखं-डिली. ॥ ९४ ॥ शतानीक रथचक्रें । घेऊनि धांवतां गर्जे [11]वक्रें । त्यातें [12]तोडू-नियां गुरुपुत्रें । [13]त्रिमळानन छेदिलें. ॥ ९५ ॥ कृतवर्मा [14]परिघपाणी । धांवत असे जेथें द्रौणी । जैसा [15]सिंहाचिया हननीं । [16]गजशावक लोटला. ॥ ९६ ॥ येतां देखिला [17]श्रुतकर्मा । पुढती धांवे अश्वत्थामा । [18]परिघ घेऊनि, [19]राजोत्तमा ! । [20]मर्मघायें मारिला. ॥ ९७ ॥ बंधु [21]विकृतानन क्षितीं । पडतां, धांवे श्रुतकीर्ति । धनुष्य वोढोनियां [22]मनोगती । शर असंख्य [23]मोकळिले. ॥ ९८ ॥ [24]चर्में वारू-नियां शर । पुढें धांवे गुरुकुमर । खड्गें [25]संकुंडलें शिर । व्योममार्गे योजिलें. ॥ ९९ ॥ तेधवां शिखंडी प्रभद्रकेंशीं । क्षोभें वेष्टित गुरुपुत्रासी । असंख्य बाणें ताडी त्यासी । चापें झाडुनी; [26]कुरुवरा ! ॥ १०० ॥ क्रोधें व्यापिला [27]कृपी-

---

१. मागें अध्याय १ ओंवी १२१ वरील टीप पहा. २. (क्षात्र) धर्मांच्या विपुल पूजनें–असा अन्वय. 'धर्मांच्या' असें पाठांतर. ३. 'कुक्षिस्थ' असा पाठभेद. ४. 'धर्मराज' 'धर्मात्मज' असे पाठभेद. ५. शस्त्रविशेष. 'पाश' असें पाठांतर. ६. अश्वत्थाम्यानें. 'भारता जैं' असा पाठभेद. ७. पार्श्वभागीं, बरगड्यांवर. ८. भीमपुत्र (श्रुतसोम). ९. 'हृत्सरोज' असें पाठांतर. १०. प्राणापासून शरीराची ताटातूट केली. ११. तोंडानें. १२. 'सांडूनियां' असें पाठांतर. १३. (शतानीकाचें) पवित्र मुख. १४. ज्याच्या हातांत परिघ (लोहदंड, लोखंडी अर्गला) आहे असा. १५. 'सिंहासी पाडुनी' असें पाठांतर. १६. हत्तीचा छावा. १७. 'कृतवर्मा' असें पाठांतर. १८. परिघ=लोहदंड, लोखंडी अर्गला. १९. राजश्रेष्ठा (धृतराष्ट्रा)! २०. मर्मस्थानाला इजा होईल अशा रीतीनें. २१. विकृत+आनन=छिन्नविच्छिन्न झालेलें (घायाळ) मुख आहे ज्याचें असा. २२. अत्यंत त्वरेनें. 'मानसगती' असें पाठांतर. मनोवेगापेक्षां अधिक वेग नाहीं, अशी पाश्चात्यांचीहि समजूत आहे. [मुक्तेश्वर–वनपर्व–(काव्यसंग्रह) पृ. ५९ टी. ३ पहा]. २३. सोडिले. २४. ढालेनें. २५. कुंडलांसह. कुंडल=कर्णभूषण. 'खड्गेंसी कुंडिलें शिर' असा पाठभेद. २६. कुरुश्रेष्ठा! धृतराष्ट्रा! 'कुरवरा' व 'कुरवर' अशीं पाठांतरें. २७. अश्वत्थामा. ह्याच्या आईचें नांव कृपी. 'गुरुसुत' असें पाठांतर.

पुढें

मत्स्यनृपाच 5 |

त्यावरी धांवाना महापा... । निर्मूळ करितां कोल्हाळ[6] । ब्रह्मप्रळयासारिखा. ॥ १०३ ॥ द्रुपदरायाचे पुत्रपौत्र । सुहृदादि जे कां अन्यत्र । तयांलागीं खड्गें गुरुपुत्र । काळपाणीं समर्पी. ॥ १०४ ॥ जेथें जेथें वीरांचीं गुल्में । तेथें धांवोनी वीर विक्रमें । करपादोदरें शिरपद्में । छेदूनि पुन्हा फिरतसे. ॥१०५॥ काळरात्री[10] रक्तनयनी । रक्तमाल्यानुलेपनी । रक्तांबरधरा पाशपाणी । वीरक्षयीं[11] प्रकटली. ॥ १०६ ॥ तुरंगें[12]रथनरकुंजर । पाशीं बांधिले सविस्तर । तेणें विमुक्त कबरीभार[13] । द्रौणीमागें[14] फिरतसे. ॥ १०७ ॥ संग्रामारंभापासून । होतसे कालिकेचें[15] दर्शन । असंख्य भक्षिले वीरगण । भूतग्राम ग्रासिला[16]. ॥ १०८ ॥ ग्रीवामस्तकपाणिचरण । स्कंदहृदयउदरस्थान । कटीजंघावर[17] व्याळ[18]-वारण । छेदूनि पाडी लगबगा. ॥ १०९ ॥ हस्तींचिया प्रेतें[19]वसनें । धरा झांकिली गुरुनंदनें । विशाळ गिरी[20] सहस्रनयनें । जेंवि वज्रें विभांडिले[21]. ॥ ११० ॥ आक्रोश करितां वीरश्रेणी[22] । अकस्मात् आंगीं आदळे[23] द्रौणी । खड्ग[24]घाय

---

१. वायूप्रमाणें, वातवेगानें. वायूचा वेग दरतासास सरासरी ८०।८५ मैल असतो. २. धरून, गांठून. ३. 'करकर्म' असें पाठांतर. ४. शस्त्राच्या तीक्ष्ण भागानें, टोंकानें. ५. विराटराजाचें सैन्य. ६. कोलाहल, मोठा गलबला, हाहाकार. ७. 'अतिमित्र' असें पाठांतर. ८. यमाच्या हातांत. ९. समूह. (मागें ओंवी ८४ वरील टीप पहा). १०. संहाराची रात्र. 'कालरात्री' हें प्रकृतस्थलीं सर्वसंहारक दुर्गेचें एक नांव म्हणून योजिलें आहे. (मूळभारत अ० ८ श्लोक ६९). ११. वीरांचा क्षय करण्याकरितां. १२. 'तुरंग रथीं' असें पाठांतर. १३. केशकलाप, केंस. १४. 'द्रौणीसंगें' असा पाठ मूळाला अधिक मिळता झाला असता. १५. कालिका=सर्व जगाचा संहार करणारी देवी (दुर्गा). ही कालीदेवी सर्व योद्धयांस मारीत सुटली आहे व तिच्या बरोबर अश्वत्थामाही वीरहनन करीत आहे असें भारतीय युद्धाच्या आरंभापासून मरणाऱ्या सर्व वीरांस रात्रीं स्वप्नामध्यें दिसत असे. तीच कालीदेवी प्रगट झाली असें सर्वांस वाटलें. (अ० ८ श्लोक ७२–७५). १६. 'त्रासला' असें पाठांतर. १७. 'कटीजंघा वरवाळण' 'कटीजंघावर वाळ वारण' अशीं पाठांतरें. १८. मदोन्मत्त हत्ती. 'व्यालो दुष्टगजे सर्पे' इति हैमः । १९. प्रेतें हींच वस्त्रें त्यांनीं. २०. पर्वत. इंद्रानें पर्वतांचे पंख तोडिले, अशी कथा आहे. [मुक्तेश्वर–आदिपर्व–(काव्यसंग्रह). पृ० ३३६ टीप २० पहा]. २१. तोडिले, जिंकिले. (धातु–वि+भंज). 'विभांडिला' असें पाठांतर. २२. वीरपंक्ती, वीरसमुदाय. २३. आदळणें (सं० आदलन)=आपटणें, धडका मारणें. २४. 'खर्गघात' असा पाठभेद.

लागतांची प्राणी । [1]रविनंदना पूजिती. ॥ १११ ॥ रथीं बसोनी गुरुतनुजें ।
धनुष्य [2]वोढिलें द्वयभुजें । अनेक शरांचिया [3]नाराजें । ब्रह्मांडदेवता शृंगारी.
॥ ११२ ॥ रथापुढें धांवोनि वेगीं । काळरात्री दावी वीरालागीं; । द्रौणी [4]शं-
रांच्या मार्गीं । [5]यमसदना बो[6]ळवी. ११३ ॥ [7]सन्नध होऊनि मुक्तकेशी । वीर
धांवतां, [8]कालिकेशीं । रथ त्यागुनी [9]असिलतेसीं । द्रौणी [10]पुढें सरसावला.
॥ ११४ ॥ [11]घावें छेदितां, वीरमंडळी । [12]वदेती 'राक्षस आला या स्थळीं.' ।
मळमूत्र करूनि भूमंडळीं । व्याकुळ होऊनि[13] पडताती. ॥ ११५ ॥ वाजी, वारण
बंधनें । तोडूनि, पळताती [14]गर्जनें; । त्यांलागीं [15]खगाच्या प्रमाणें । छेदी धांवूनि
विक्रमें. ॥ ११६ ॥ मांस[16]भक्षक अपार । [17]पातले [18]आनंदें निर्भरें । द्विगुण तमों-
[19]धकार । शिबिरामाजी दाटला. ॥ ११७ ॥ जीवित्वरक्षणा वि[20]कळ । शिबिरद्वारें
[21]काढितां पळ । कृपाचार्य कृतवर्मा सबळ । शस्त्रें [22]छेदिती सकळांतें. ॥११८॥
वि[23]शस्त्र, मुक्तकेश, वित्राण, । [24]कृतांजळी, कंपायमान, । [25]भयाभीत, विस्तीर्णवदन ।
येतां, दोघे मारिती. ॥ ११९ ॥ [26]त्रयस्थानीं शिबिरातें । [27]हुताश लाविला वीरीं
तेथें । तिळ[28]खंडातुल्य वीरांतें । चूर्ण केलें [29]असिधारें. ॥ १२० ॥ [30]तामसी

---

१. सूर्यपुत्रास (यमास). मृत्यु पावती–हा इत्यर्थ. २. 'वोपिलें' असें पाठांतर. ३. हा शब्द ज्ञानेश्वरींतही आलेला आहे. (पहा, ज्ञा० अ० १६ ओ० २४३; अ० १७ ओ० ४२५.) नाराज=नाराच=लोखंडी बाण. 'नारजें' 'नरा जें' अशीं पाठांतरें. ४. 'शरधारांच्या' असा पाठभेद. ५. यमाच्या घरीं, मृत्युपंथास. ६. पाठवी, रवानगी करी. ७. तयार. ८. कालिकेसह. 'मोकळे केशीं' असा पाठभेद. ९. तरवारीसह, तरवार घेऊन. 'भूमीसी' असें पाठांतर. १०. 'पदें' असा अन्यपाठ. ११. 'घोषें' असें पाठांतर. १२. 'वधती राक्षस आलिया स्थळीं' असा अन्य पाठ. १३. 'व्याकुळ पडती भूवरी' असा पाठभेद. १४. गर्जना करीत. 'गडगर्जनें' 'मार्जनें' असे पाठभेद. १५. पक्ष्याप्रमाणें, अर्थात् अत्यंत चपलतेनें. १६. राक्षसपिशाचादि मांसभक्षक. १७. 'भासले' असें पाठांतर. १८. अत्यंत आनंदित. निर्भर=व्याप्त. १९. गाढ अंधकार. 'तमें अंधकार' असा पाठभेद. २०. कलारहित, निस्तेज, भयाभीत. २१. 'काढिला' असा पाठभेद. २२. 'शस्त्रेंसी सावध छेदिती' असा अन्यपाठ. २३. विशस्त्र, मुक्तकेश, वित्राण=शस्त्ररहित, सुटले आहेत केश ज्यांचे असे व अंगत्राण (कवच) रहित. २४. ज्यांनीं हात जोडिले आहेत असे, शरण आलेले. २५. 'भयें भीत' असें पाठांतर. २६. तीन ठिकाणीं. २७. हुतभुक्, अग्नि. 'गुप्तांसी उठवोनि तेथें' असा अन्यपाठ. २८. अश्वत्थामा, कृपाचार्य व कृतवर्मा हे इतके संतप्त झाले होते कीं त्यांनीं पांडवपक्षीय वीरांस मारून त्यांच्या प्रेतांचे तिळाएवढाले तुकडे केले, इतकेंच नाहीं तर त्या तिळाएवढ्या तुकड्यांचीं आणखी बारीक बारीक खंडें पाडिलीं. 'तिलकांडातुल्य' असा पाठभेद. मूळांतही 'तिलकांडवत्' असेंच आहे. २९. तरवारीच्या धारेनें. ३०. अंधकारयुक्त (अंधारी) रात्र.

रात्रि थोर जाली । रक्तसरिता[1] प्रगटली । त्या प्रवाहलोटीं[2] पाडिलीं । वीरप्रेतें अगणित. ॥१२१॥ ऐसें पार्थ नसतां कार्य । केलें दुर्जियासी[4] मेरुप्राय[5] । जागृत नसतां स्मरणसूर्य । मृत्युतमीं लोटिले. ॥ १२२॥ जेथें नित्य कृष्णार्जुन । सत्यवाक्[6], दान्त, ब्रह्मण्य । सर्वभूतानुकंपी[7] जाण । ते अजिंक्य अमरांतें[8]. ॥ १२३ ॥ कृतांजळी, सुप्त[9], मत्त, । विशस्त्र, केशमुक्त, धांवतें[10] । त्यांचा वीरधर्में पार्थ[11]। घात चित्तीं धरेना. ॥ १२४ ॥ अधर्में भारता[12]! आचार्यसुतें । मारिलीं रिपुवीरांचीं शतें । विशेष पेटतां अग्नीतें[13] । जळोनि निर्मोले[14] कित्येक. ॥१२५॥ रुद्र, कराळ, पिंगल, । शैलदंत, रजस्वल, । दीर्घवक्त्र, जटिल[15], । पंचपाद, महोदर[16], ॥१२६॥ विविध रूपांचे राक्षस । रक्ताशनें[17] नृत्य विशेष । करूनि, वदती[18], 'हीन पुरुष[19] । न जाणती या स्वापदातें[20].' ॥ १२७ ॥ शोणितावसिक्त[21] द्रौणी । पंकभूत खड्गेसीं[22] पाणी । जाला जैसा विशाल फणी[23] । अरुणरंगें डवरला[24]. ॥ १२८ ॥ प्रतिज्ञेतुल्य कर्मोद्धार[25] । करूनि जाला विगतज्वर[26] । रिघोनी सुप्तजनशिबिर[27] । उर्वरित निर्दाळिले. ॥ १२९ ॥ पांचाळसृंजयां[28] मारोनी; । अनन्य[29] वरिली प्री-

---

१. रक्ताची नदी. 'रक्तें सरिता' असा पाठभेद. २. जलप्रवाहाच्या ओघांत. लोट=ओघ, पूर. 'प्रवाहें लोटीं' असा अन्यपाठ. ३. कृष्ण, सात्यकी व पांच पांडव हे शिबिरांत नव्हते. कृष्ण त्यांस आपल्याबरोबर दुसऱ्या ठिकाणीं निजण्याकरितां घेऊन गेला होता. (पुढें ओंव्या १३४–१३६ पहा). ४. 'दुर्जयासी' असें पाठांतर. ५. मेरूसारखें, अर्थात् फारच मोठें, दुष्कर. ६. 'सत्यैकदान साधुब्राह्मण' 'सत्य सत्पात्र, साधु, ब्राह्मण' असे पाठभेद. मूळांत 'ब्रह्मण्यः सत्यवाग्दांतः सर्वभूतानुकंपकः' असेंच आहे. (अ० ८।१२३). ७. सर्व प्राण्यांवर दया करणारा. ८. देवांससुद्धां. ९. निद्रित व प्रमत्त. 'सुप्रकेत' 'सुप्रमत्त' 'सुप्तप्रमाण' असे पाठभेद. १०. 'धावन' असें पाठांतर. ११. 'पार्थ जाणुन' असा अन्यपाठ. १२. भरतकुलोत्पन्ना (धृतराष्ट्रा). १३. शिबिरास लाविलेल्या अग्नीतें. १४. मरण पावले. १५. 'सुजटाल' असा पाठभेद. १६. ह्या ओवींत राक्षसांच्या जाती सांगितलेल्या आहेत. (अध्याय ८ श्लोक १३५). १७. रक्त प्राशन केल्यामुळें. 'रक्तासनीं' असें पाठांतर. १८. ह्याचा कर्ता 'राक्षस'. 'वदनीं' असें पाठांतर. १९. दुर्दैवी मनुष्यें. २०. 'श्वापदातें' असें पाठांतर. २१. ज्याच्या आंगावर रक्ताचें सिंचन झालें आहे असा (द्रौणी). 'शोणितावशेष' असें पाठांतर. २२. 'स्वर्गासी प्राणी' असा पाठभेद. पंकभूत=रक्तानें माखून चिखलासारखा बनलेला. रक्तानें माखलेला हात व खड्ग हे अगदीं एक झालेले दिसत होते असें मूळांत वर्णन आहे. २३. सर्प. 'विशाळपर्णी' असें पाठांतर. २४. डवरणें=रंगारणें. (२) पूर्णपणें भरणें. २५. 'कर्मोदार' असें पाठांतर. २६. चिंतारहित, निष्काळजी. २७. सुप्तजनशिबिर रिघोनी (=निजलेल्यांच्या शिबिरांत शिरून) उर्वरित (=शिल्लक राहिलेले [लोक] निर्दाळिले—असा अन्वय. 'सत्व जन' 'साप्त जन' असे पाठभेद. २८. 'स्वजना' असा पाठभेद. २९. 'अजन्य' असा शुद्धपाठ असावा.

तिपत्नी । यशलाभें रथीं बैसोनी । सिंहनाद[1] केला[2]; भूपाळा[3]! ॥ १३० ॥ पुढें उषःकाळीं, कुरुवरा[3]! । हर्षें पातला शिबिरद्वारा । आलिंगोनी द्वयवीरां[4] । उग्र कर्म निवेदिलें. ॥ १३१ ॥ ऐसी विपरीत कालसत्ता । कोण वधी[5]? कौरवनाथा! । येथें पुरुषाच्या मनोरथा । मिथ्या भान[6] जाण पां.' ॥ १३२ ॥ धृतराष्ट्र म्हणे, 'अघटित । कर्म करी आचार्यसुत, । मत्पुत्रविजयासि[7] किमर्थ । मागें नाहीं आचरला?' ॥ १३३ ॥ संजय म्हणे, 'पार्थ सन्निध । नव्हता, श्रीकृष्ण बळें अगाध[8] । तेवींच सात्यकी युद्धदुर्मद[9] । जो अमरांसीहि साधेना[10]. ॥ १३४ ॥ सर्वज्ञ दीनरक्षक लोकीं । तो पंचपांडव ससात्यकी । गेला घेऊनि नदीतटाकीं । रक्षावया सन्मित्रांतें[11]. ॥१३५॥ यास्तव द्रौणीतें जयद्वार । लाधलें, सौप्तिकीं करी संहार;। 'श्रेष्ठदैवें' वीरश्रीवर[12]। वदती[13], 'आजीं हें जालें[14].' ॥ १३६ ॥ करीं घेवोनी यशदान । चालिले जेथें दुर्योधन । यानंतरें निरोपण । अग्र प्रसंगा[15] चामके[16]. ॥ १३७ ॥ व्यासगुरूचे प्रसादें । भारतनिरूपण विश्वंभरवरदें । मुक्तेश्वर करीत परमानंदें । संतसज्जनीं ऐकावें[17]. ॥ १३८ ॥ इति श्रीभारतपर्व सौप्तिकी । गुणरत्नखाणी[18] गुणग्राहिकीं । परीक्षिजे[19], स्नेहहस्तकीं[20] । दान दीजे दीनांतें[21]. ॥ १३९ ॥

---

१. भयंकर गर्जना. २. ह्याचा कर्त्ता 'अश्वत्थाम्यानें' (अध्याहृत). ३. राजा (धृतराष्ट्र). ४. कृपाचार्य व कृतवर्मा यांस. ५. अश्वत्थाम्यानें निजलेल्या वीरांचा वध करावा अशी काळसत्ताच होती, नाहींतर त्यांचा वध करावयास कोण समर्थ होता?—असा भावार्थ. ६. भान=प्रकाश, तेज. मनोरथ निस्तेज असतात (मनोरथांप्रमाणें कार्यसिद्धि घडत नाहीं)—हा इत्यर्थ. ७. दुर्योधनाचा विजय व्हावा म्हणून. ८. बळें अगाध=अत्यंत बलवान्. ९. युद्धाविषयीं ज्याला दुष्ट मद आहे असा. 'बळें दुर्मद' असा पाठभेद. १०. वश होईना, जिंकला जाईना. 'असाध्य' 'असह्य' असे पाठभेद. ११. 'सघशातें' असा अन्यपाठ. १२. हें (सुप्तांचा संहार) आजीं श्रेष्ठदैवें (दैव बलवत्तर असल्यामुळें) झालें, [असें] वीरश्रीवर (वीरश्रेष्ठ) वदती—असा अन्वय. १३. 'आश्चर्य हें जालें हो' 'आजी हे जगले हो' असे अन्यपाठ. १४. येथें मूळांतील आठवा अध्याय संपला. ह्या अध्यायाचे १५९ श्लोक आहेत. त्यांपैकीं बराच पाल्हाळिक भाग गाळून मुक्तेश्वरानें सर्व कथाभाग सुमारें ९० ओंव्यांत आटोपिला आहे. १५. 'अग्रप्रसंगीं' असा पाठभेद. १६. गमन करी, जाई. [हा शब्द मुक्तेश्वराच्या कवितेंत वारंवार आढळतो. वनपर्व—अ० २।९०, अ० ७।१२३ इत्यादि पहा.] १७. 'ऐकावया' असा पाठभेद. १८. 'गुणरत्नग्राही' असें पाठांतर. १९. परीक्षिलें जावें. २०. स्नेह (प्रेम)रूपी हातावर [घेऊन]. 'स्नेहें हस्तकीं' असें पाठांतर. २१. या अध्यायास 'पांचाळसैन्यपांचाळप्रतिविंध्यादिवध' असें नांव एका पोथींत दिलेलें आहे.

## अध्याय तिसरा.[1]

संजय म्हणे, 'सहपांचाळ । पंच द्रौपदीचे बाळ । मारूनियां महाबळ । नृपापाशीं[2] पातले. ॥ १ ॥ प्राणकलाप[3] एकवटोनी । सिद्ध होतांचि[4] प्रयाणीं[5] । ऐसियामाजी यश घेऊनी । आले तिथे महारथी. ॥ २ ॥ भूमीशयन, रुधिरोक्षित[6] । मुखापासाव वमी[7] रक्त; । मांसभक्षणा असंख्यात । श्वापदें असती मिळालीं. ॥ ३ ॥ शालावृकगणक्रव्याद[8] । शिवा[9] मांसाहारी विविध । ज्यांचिया दर्शनें वेध[10] । प्राणियां लागे भयाचा[11]. ॥ ४ ॥ कृच्छ्रीं[12] बुडालें राजरत्न । मांसार्थी[13] स्पर्शतां पक्षिगण । त्यातें निवारी शक्तिक्षीण । किंचित्[14] हस्तकृतीनें[15]. ॥५॥ जैसा स्नेहरहित[16] दीप । तेवीं शुष्कप्राण होतां नृप । विविध चेष्टांचें स्वरूप । गाढ वेदनीं[17] बुडालें. ॥ ६ ॥ तेथें हतशेष[18] त्रयवीर । पातले शोकें आर्तस्वर[19] । शोणितें दिग्ध[20] वैश्वानर । वेदीमाजी[21] जेवीं तिथे. ॥ ७ ॥ राजक्लेश अवलोकुनी । हृदय व्यापिलें दुःखेंकरुनी[22] । रुदन करिती[23], तेणें नयनीं । अश्रुगंगा लोटली. ॥ ८ ॥ राजमुख[24] लिप्त रुधिरें । तें प्रक्षाळिती चुरोनी[25] करें । कृपणातुल्य[26] शोकस्वरें । विलाप करिती ते स्थळीं. ॥ ९ ॥ कृप वदे, 'उपेंद्रासरी[27] । तो हा राजा पडिला रुधिरीं । एकादश[28] चमूच्या शिरीं ।

---

१. ह्या अध्यायांत मूळांतील अध्याय ९—११ यांचा सारांश आला आहे. २. दुर्योधनाजवळ. ३. प्राणसमूह, पंचप्राण. 'प्राणकळा' 'प्राणकलापक' असे पाठभेद. ४. 'होताती' असें पाठांतर. ५. (यमसदनीं) जावयास. ६. ज्याच्या अंगावर रक्त उडालें आहे असा. उक्षण=सिंचन. ७. 'वमित' असें पाठांतर. ८. शालावृक=कुत्रा, कोल्हा, लांडगा—असे तीन अर्थ आहेत. क्रव्याद=राक्षस. ९. भालू. १०. 'व्याध' असें पाठांतर. ११. 'प्राणियांलागीं सभयाचा' असा अन्यपाठ. १२. कृच्छ्र=शरीरपीडा, दुःख, त्रास. १३. मांस प्राप्त व्हावें म्हणून. १४. ह्याचा संबंध 'निवारी'कडे. १५. हात झाडून. 'हंसाकृतीनें' असा पाठभेद. १६. ज्यांत तेल नाहीं असा. १७. दुःसह वेदनांनीं. 'वदनीं' असें पाठांतर. १८. सर्व मरून बाकी राहिलेले. १९. 'आर्तेश्वर' 'अतिश्वर' अशीं पाठांतरें. २०. रक्तानें भरलेले. 'अंध' 'क्षधे (?)' असे पाठभेद. २१. जेवीं वेदीमाजी तिथे वैश्वानर [तेवीं] शोणितें दिग्ध तिघे [भासले] असा अन्वय. रक्तानें भरलेल्या वीरांचें लाल ज्वालांनीं युक्त अशा अग्नींशीं उघड साम्य आहे. 'देवांमाजी जेवीं तिघे' असा अन्यपाठ. २२. 'दुःखवणीं' असें पाठांतर. २३. 'करितां' असें पाठांतर. २४. दुर्योधनाचें तोंड. २५. कुरवाळून, पुसून. 'तें जीवनीं प्रक्षाळिलें करें' 'तें प्रक्षाळिती चारुकरें' असे पाठभेद. २६. कृपणाच्या धनाचें कोणीं हरण केलें असतां त्यास ज्याप्रमाणें दुःख होतें, त्याप्रमाणेंच दुर्योधनरूपी निधान यमानें हरण केल्यामुळें अश्वत्थाम्यादि वीरत्रयांस दुःख झालें—असा भाव. २७. विष्णूसारखा. 'सुरेंद्रासरी' असा पाठभेद. २८. कौरवांच्या बाजूस अकरा अक्षौहिणी सैन्य होतें.

ज्याची आज्ञा मिरवली. ॥ १० ॥ ज्या [1]देच्चिया प्रिय दर्शनीं । यश जोडे जीच्या स्पर्शनीं । [2]प्रियभार्या पतीच्या शयनीं । तेवीं समीप [3]पहुडली. ॥ ११ ॥ ऐश्वर्याभिषिक्त मस्तक । जेथें नित्य [4]कस्तूरितिलक । [5]त्यालागीं आजी [6]पांशुपंक । विपरीत काळें लागला. ॥ १२ ॥ जो सर्व [7]राजयांचा स्वामी । विश्रांतिवृक्ष [8]कुरुकुळकामीं । त्याच्या हननें संतापऊर्मी । आम्हालागीं झोंबली. ॥ १३ ॥ [9]भूतें जैसीं [10]ईश्वरातें । [11]तेवीं जग [12]उपासिती जयातें । तो विपरीत काळपंथें । आजीं विनाश पावला.' ॥ १४ ॥ द्रौणी वदे [13]करूनी रुदना । 'राजा ! धनुर्धराच्या नंदना ! । [14]रामशिष्या ! [15]युद्धीं तुळणा । पावसी [16]धनाध्यक्षाची. ॥ १५ ॥ तूं सर्व धर्मातें जाणता । [17]वासवातुल्य अंगीं सत्ता । त्या तुजलागीं क्षिति[18]नाथा ! । क्षुद्र पापी भीमें[19] मारी. ॥ १६ ॥ धिग् ! धिग् ! धर्माची क्षुद्र बुद्धी। धर्मिष्ठ असोनी [20]अधर्मवादी । भीमें [21]शिरें [22]स्पर्शोनी पदीं । अपकीर्ति माथां घेतली. ॥ १७ ॥ नित्य [23]अच्युताग्रजें, भारता ! । स्तवितां तुझी शक्तिदेवता । जेंवि [24]इंद्रविक्रमें [25]श्लोघ्यता । पावे स्वर्गीं देवगुरू. ॥ १८ ॥ क्षात्रधर्माच्या [26]उपासनें । [27]घेतलीं स्वर्गभोगांचीं दानें । यास्तव [28]कर्मज्ञा ! अंतःकरणें । खेद तुझा न धरिला. ॥ १९ ॥ परंतु धृतराष्ट्र गांधारी । [29]हतपुत्र या धरेवरी । या

---

१. 'गदागदप्रियदर्शनी' असा पाठभेद. [गदागद=अश्विनीकुमार.] २. 'जेवीं भार्या' असें पाठांतर. ३. निजली. मूळांतही हाच दाखला आहे (अ० ९।१३). 'पहिनली' असें पाठांतर. ४. 'तेथें निस्तेज कुरुतिलक' असा पाठभेद. ५. त्या मस्तकाला. ६. धूळ व चिखल. 'पशुपंक' असें पाठांतर. ७. सार्वभौम राजा, चक्रवर्तिराजा. 'राज्याचा स्वामी' असा अन्यपाठ. ८. कुरुकुळाच्या मनोरथांसंबंधीं. ९. 'जगें' असें पाठांतर. १०. शंकरातें, महादेवातें. ११. येथें 'जैसीं–तैसीं' अशा प्रयोगाच्या ऐवजीं 'जैसीं–तेवीं' असा प्रयोग आहे. १२. भजती, सेवा करिती. १३. 'कुरुनंदना!' असा अन्यपाठ. १४. दुर्योधन व भीम हे बळिरामाचे शिष्य. या दोघांस त्यानें गदायुद्ध शिकविलें. १५. 'व्यूहीं' असें पाठांतर. १६. कुबेराची. कुबेराजवळ ज्याप्रमाणें संपत्ति विपुल असते, त्याप्रमाणें युद्धकौशलही तुझ्या अंगीं विपुल आहे–असा स्पष्टार्थ. १७. इंद्राप्रमाणें. १८. राजा (दुर्योधना). १९. 'भीमें मारिलें' असा पाठभेद. २०. अधर्माचरण करणारा. २१. 'भीमसेनें स्पर्शोनि विधी' असा पाठभेद. २२. 'परामर्षूनी' असा अन्यपाठ. २३. अच्युताच्या वडील भावानें (बळिरामानें). २४. इंद्रानें केलेल्या पराक्रमाच्या योगानें. 'इंद्रसभे विक्रम' असें पाठांतर. २५. मोठेपणा, वडिवार. २६. उपासनेच्या योगानें. २७. प्राप्त करून घेतलीं, मिळविलीं. २८. आपलें कर्तव्य जाणणाऱ्या (दुर्योधना). येथें 'कर्मज्ञ' हें विशेषण मुक्तेश्वरानें साभिप्राय योजिलें आहे म्हणून येथें 'परिकरा'लंकार आहे. २९. ज्यांचे पुत्र मारले गेले आहेत अशीं. 'शतपुत्र' असें पाठांतर.

वृद्धांच्या कष्टें अंतरीं[१] । शोकाग्नि बहु पोजळे[२]. ॥ २० ॥ धिग्! कृष्ण! धिग्! अर्जुन! । दुर्मति मिथ्या नाम[३] धर्मज्ञ[४] । ज्यांच्या कर्तृत्वीं श्रवण[५] । त्रासें बधिर[६] होतात. ॥ २१ ॥ धिग्! धिग्! कृतवर्मेसी कृप । धिग्! तेंविच मत्प्रताप । अंचळग्रंथिके[७] अचुक पाप । म्हणवोनि आम्ही वांचलों. ॥ २२ ॥ पूर्वकृत[८] पुण्यें असतीं गांठीं । तरी येतों तुझिया पृष्ठीं[९] । स्वर्गीं सौख्यांचिया[१०] कोटी । एकमेळीं[११] भोगितों. ॥ २३ ॥ मातुळपितयांच्या[१२] समुदायीं । तव प्रसादें[१३] रत्नगृहीं[१४] । सुख भोगिलें, जें स्वप्नींही[१५] । देवीं स्वर्गीं न देखिलें. ॥ २४ ॥ क्रतुमुख्यीं[१६] भूरि-[१७]दक्षिणें । तृप्त केलीं भिक्षुकमनें । त्या प्रसादें[१८] मेघ[१९] जीवनें । देश पाळी सर्वदा. ॥ २५ ॥ त्या तुजसंगें आज आम्ही । न प्रवेशोंच मोक्षधामीं । आतां हीनार्थ[२०] होऊनि, भूमी । अटण[२१] करूं तेवें स्मरणें[२२]. ॥ २६ ॥ दृष्टी न पडतां[२३] तुझें मुख । कैंची शांति आणि सुख? । जेंवि ज्वरितासी[२४] क्षण एक । रुची नेदी षड्रसान्न[२५]. ॥ २७ ॥ आतां ऐकें वचन माझें । स्वर्गीं वडिलांतें[२६] सांगिजे । आचार्यासि वंदें, 'तव आत्मजें । पार्षत अधर्मी मारिला. ॥ २८ ॥ बाल्हिकसैंधवसोम-दत्त-। भूरिश्रव्यादि महारथ । त्यांतें आलिंगूनि कल्याणवृत्त[२७] । पुसें माझ्या शब्दोत्तरें. ॥ २९॥ कृष्ण, सात्यकी, पांच पांडव, । सप्त स्वस्थ, अन्य नाशले[२८] सर्व; । द्रौणी, शारद्वत, यादव[२९], । त्रय आम्ही कौरवांचे. ॥ ३० ॥ द्रौपदीसुत[३०],

---

१. 'पहिले त्या कष्टें युग्मांतरीं' असा अन्यपाठ. २. प्रदीप्त होई. ३. 'नामें' 'नेम' अशीं पाठांतरें. ४. [कृष्णार्जुन] दुर्मति [आहेत], धर्मज्ञ [हें त्यांचें] नांव मिथ्या [होय]—असा अन्वय. ५. कान. कृष्ण आणि अर्जुन यांचीं एकेक कृत्यें अशीं आहेत कीं तीं ऐकावयास लागलें असतां त्रासानें कान बधिर होतात—असा स्पष्टार्थ. ६. 'त्रासबधिर' असें पाठांतर. ७. पद-राच्या गांठीस. ८. पूर्वजन्मीं केलेलीं. ९. पाठोपाठ, मागून. १०. 'स्वर्गसुखाचिया' असा पाठभेद. ११. एकत्र. 'एक वेळीं' असें पाठांतर. १२. 'मातृपितृच्या वचनें पाहीं' असा पाठभेद. १३. कृपेनें. १४. रत्नयुक्त (रत्नांनीं परिपूर्ण) गृहांत; (किंवा) रत्नखचित प्रासादांत. १५. 'सुखें भोगिलीं, जीं देवीं । स्वर्गीं स्वप्नीं न देखिजे' असा अन्यपाठ. १६. मोठमोठ्या यज्ञांत. १७. विपुल दक्षिणेच्या योगानें. १८. 'तव प्रसादें' असें पाठांतर. १९. पर्जन्यवृष्टि करून. २०. अर्थहीन, निराश. अर्थ=हेतू, उद्देश. 'हितार्थ' असें पाठांतर. २१. पर्यटन, भ्रमण, फिरणें. २२ 'त्वत्स्म-रणें' असें पाठांतर. २३. 'पाहतां' असा पाठभेद. २४. तापकन्यास, ज्वरपीडितास. २५. षड्-सान्न रुची नेदी=उत्तम अन्नें सुद्धां बेचव लागतात—असा स्पष्टार्थ. 'षड्स' असें पाठांतर. मधुर, कटु, आम्ल, लवण, तिक्त आणि कषाय—हे षड्स. २६. मूळभारत, अध्याय ९ श्लोक ४३ पहा. २७. कुशलवृत्त, कुशलप्रश्न. २८. नाश पावले. पांडवांकडील सात वीर व कौरवांकडील आम्ही तिघे बाकी राहिलों, बाकीचे सर्व मारले गेले—असा स्पष्टार्थ. २९. कृतवर्मा. ३०. प्रतिविंध्यादि पांच पुत्र (अध्याय २ ओंवी ८८ वरील टीप पहा). 'द्रुपदसुत' असा पाठभेद.

**धृष्टद्युम्न**, । **पांचाळ**, [1]**म**त्स्यशेषसैन्य । या वीरांचें सौप्तिकीं कदन । [2]शिबिरांतरीं हो! केलें. ॥ ३१ ॥ [3]पशुमारें मारोनि **पार्षत** । वीरधर्में सेविला [4]जैतें' । [5]संज्ञा-लाभें **कौर**वनाथ । प्रीतिविशेष पावला; ॥ ३२ ॥ [6]म्हणे, '**भीष्मद्रोण**[7]**कर्णे** कर्मासी । ज्या न [8]केलें त्या **कृपभो**जेंसी । तुवां [9]जीवोनी [10]सेनापतीसी । [11]शिबिरासहित मारिलें. ॥ ३३ ॥ आतां स्वस्थ मनें स्वर्गासी । [12]जातों, असावें पूर्व-कृपेसीं. । [13]पुन्हा भेटी नाहीं' ऐशा भाषीं । मौन्यालागीं अवलंबिलें. ॥ ३४ ॥ **कृ**पें, **भो**जें, **कृ**पीनंदनें । नृप आलिंगिला दीर्घ रुदनें । जेंवि प्राणी [14]देशांतरग-मनें । करावया [15]क्षमिताती. ॥ ३५ ॥ [16]तेधवां नृपें सोडिला प्राण । [17]सुहृदांसि दिधलें शोकदान । आक्रमितां [18]गगनांगण । वीजेसमान प्रकाशे. ॥ ३६ ॥ **कृ**पाचार्यादि त्रयरथी । कौतुकें विस्मय मानिती । प्रकाशमान [19]जाली क्षिती । [20]प्राणतेजें करोनियां. ॥ ३७ ॥ दिव्यगंधें दिव्यवसनीं । दिव्यमालानुलेपनीं । दृष्टीं भासती जेवीं [21]तरणी । [22]एकसरें उगवले. ॥ ३८ ॥ यापरी नृपा! सुरगण । घेऊनि पातले विमान । विचित्र घंटास्वरें गगन । [23]मनोमार्गें चालिले. ॥ ३९ ॥

---

१. 'मत्स्यकेशसैन्य' व 'पांचाळमशकेशसैन्य' अशीं पाठांतरें. २. 'शिबिरासहित म्यां केलें' असा अन्यपाठ. ३. यज्ञांत पशूला मारितात त्याप्रमाणें. 'पशुमारें मारणें' असा प्रयोग संस्कृतग्रंथांत ठिकठिकाणीं आढळतो. 'मया च······प्रविश्यं शिबिरं रात्रौ पशुमारेण मारितः ।' असें मूळांत आहे. [शाकुंतल—अंक ६ पहा]. ४. जय. 'वीरधर्म सेवील जैत्य' 'वीरधर्में सेविले जयसत्य' असे पाठभेद. ५. वृत्तज्ञानाच्या लाभानें, ही माहिती मिळाल्यामुळें. ६. ह्याचा कर्ता 'कौरवनाथ'. ७. 'कर्णेंसी' असें पाठांतर. ८. 'जें न करवे' असा पाठभेद. ९. 'सेवूनि' असें पाठांतर. १०. धृष्टद्युम्नास. 'सेनाप्र-देशीं' असा पाठभेद. ११. 'शिबिरासहित'. ह्याचा अर्थ लक्षणेनें, 'शिबिरांतील सर्व लोकांसह' असा समजावयाचा. हें **'उपादानलक्षणे'**चें ( Metonymy ) उदाहरण आहे. लक्षणेचे मूळ दोन भेदः—**शुद्ध** व **गौणी**. शुद्धेचेही दोन भेद आहेतः—**उ**पादानलक्षणा व **ल**क्षणलक्षणा. [साहित्यदर्पण, परिच्छेद २ पहा]. १२. आतां स्वस्थ मनें स्वर्गासी जातों, पूर्वकृपेसी (पूर्वीप्रमाणें कृपायुक्त) असावें—असा अन्वय. १३. 'स्वस्ति, प्राप्नुत भद्रं वः, स्वर्गे नः संगमः पुनः ।' असें मूळांत आहे. मुक्तेश्व-राची कल्पना याच्या अगदीं उलट आहे. कदाचित् 'न' व 'नः' या शब्दांचा गोंधळ झाला असावा. ऐशा भाषीं=असें भाषण बोलून. 'ऐशा भासीं' असा पाठभेद. १४. प्रवास करावयास निघाला असतां. 'देशागमगमनें' असा पाठभेद. १५. समर्थ होतात. (?) कदाचित् 'श्रमिताती' असा शुद्धपाठ असावा. १६. 'ते समयीं' असें पाठांतर. १७. मित्रांस. १८. आकाशाचें आंगण. (आंगण=घरापुढील प्रदेश, आंगणें.) 'गगनगण' असें पाठांतर. १९. 'जाला' असें पाठांतर. २०. 'प्राणत्यागें' असा अन्यपाठ. २१. (अनेक) सूर्य. 'आकाशसमुद्रं तरतीति तरणिः' आकाशरूपी समुद्र तरून जातो म्हणून सूर्यास 'तरणि' असें नांव पडलें. [मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रह)—पृ. ८३ टीप ३ पहा]. २२. एकदम. २३. मनाच्या चालीप्रमाणें, मनोवेगानें. 'मनांत चिंतलेल्या मार्गानें' असाही याचा अर्थ होऊं शकेल.

भानु[1] उदयाचळीं आरूढे । तेवीं विमान पातलें पुढें । भारतातें सुखसुरवाडें[2] । इंद्रगणीं बैसविलें. ॥ ४० ॥ पुढें घंटाघोषारोळीं । विमान गेलें अंतराळीं[3] । जेवीं पूर्वदिशा त्यागी हेळी[4] । मध्यदिनांतीं[5] चामके[6]. ॥ ४१ ॥ कृपाचार्यादि 'साधु'[7]शब्दें । नृपासी स्तविती विस्मयवादें । पुन्हा पुन्हा नेत्रकुमुदें[8] । निरखोन रथीं बैसले. ॥ ४२ ॥ इतुकें तव पुत्राचें चरित । देखोनी, प्रतप्त[9] शोकार्त । हस्तिनापुरासी[10] धांवत । मी पातलों भूपाळा! ॥ ४३ ॥ तव कुमतीच्या काळकूटीं । निमाल्या द्वयसैन्याच्या थाटी[11] । भोगावया ऐश्वर्यभोगसृष्टी[12] । दुर्योधन गेला पां. ॥ ४४ ॥ मातें ऋषिदत्त[13] दिव्यदृष्टी । ते नष्टली, आतां सत्य गोष्टी । पूर्वज्ञानासी[14] पडली तुटी[15] । प्राकृतभाव[16] बाणला[17].' ॥ ४५ ॥ वैशंपायन म्हणे यापरी । पुत्रज्ञातीवध श्रोत्रीं[18] । नृपें[19] ऐकोनी, हृदयपात्रीं[20] । चिंता[21] येवोन बैसली[22]. ॥ ४६ ॥ त्यां[23] रात्रीमाजी, जन्मेजया[24]! । पार्षतसारथी धर्मराजया–। समीप जावोनी, कर्णालया[25] । वार्ता निरोपी तांतडी. ॥ ४७ ॥ म्हणे[26], 'ऐकें राजाधिराज! । द्रौपद, द्रौपद्यात्मज । निद्रिस्त असतां कृपभोज । घेवोन द्रौणी पातला. ॥ ४८ ॥ नृशंसकर्मीं[27] शिबिरीं । समस्त वीरांतें संहारी । धर्मा! तुझ्या वीरभांडारीं[28] । द्रौणी तस्कर पातला[29]. ॥ ४९ ॥ जेवीं सूर्य झांकी नक्षत्र । तेवीं ध्वंसिले[30] सर्वत्र । व्यग्र असतां भोजपुत्र[31] । मी एकाकी[32] पळालों. ॥ ५० ॥

---

१. सूर्य. २. सुखाच्या सुकाळीं, अत्यंत सुखपूर्वक–सुखाड=(१) सुकाळ, विपुलता; (२) मोठेपणा; (३) स्वतंत्रता. ३. आकाशांत. ४. सूर्य. ५. भर दोनप्रहरीं. ६. चमकतो, चकचकाट करितो. ७. 'धन्य धन्य' ह्या शब्दांनीं. ८. नेत्रकमळांनीं. ९. संतप्त, दुःखित. 'प्रेतेंसी' असें पाठांतर. १०. हें हस्तिनामक राजानें वसविलें म्हणून ह्यास हस्तिनापुर असें नांव पडलें. 'जेथें हस्ती आपण । आपल्या नामें हें पट्टण । वसविलें म्हणोनि सकळ जन । हस्तिनापुर बोलती ॥' [मुक्तेश्वर–आदिपर्व–अ० २१।३३७]. ११. रांगा, समुदाय. १२. ऐश्वर्ययुक्त भोगांची विपुलता. 'सर्वभोगसृष्टी' 'स्वर्गभोगसृष्टी' अशीं पाठांतरें. १३. व्यासांनीं दिलेली. [मागें पृ० १४ टी० पहा]. 'कृपेनें' असा पाठभेद. १४. 'पूर्वागमनासी' असा पाठभेद. १५. कमतरता किंवा वियोग. १६. प्राकृत (अज्ञ, सामान्य) लोकांप्रमाणें भाव (=बुद्धीची स्थिति). १७. 'मानला' 'मातला' असे पाठभेद. १८. कानांनीं. १९. धृतराष्ट्रानें. २०. अंतःकरणरूप भांड्यांत. 'हृदयपत्रीं' असें पाठांतर. २१. 'चिता' असें पाठांतर. २२. येथें मूळांतील नववा अध्याय समाप्त झाला. २३. येथें मूळांतील 'ऐषीकपर्व' नामक पोटपर्वास आरंभ होतो. २४. हा परीक्षितिराजाचा पुत्र. ह्यास वैशंपायनऋषींनें भारत कथन केलें. २५. कर्णपुटाला, कानाला. पाठभेद 'करुणालया.' २६. ह्याचा कर्ता 'पार्षतसारथी.' २७. नीच कर्म करून. 'नृसिंहकर्म करून' असा पाठभेद. २८. वीररूपी कोशांत (खजीन्यांत). २९. 'जाहला पां' असें पाठांतर. ३०. 'विध्वंसिलें सर्वत्रां' असा पाठभेद. ३१. कृतवर्मा, 'भोजपात्र' 'भोज मात्र' अशीं पाठांतरें. ३२. एकटा.

विषलक्षण[1] त्या वार्तेसी । ऐकतां **धर्म** पडे धरणीसी । **सात्यकी** धांवोन वेगेंसी ।
द्वयबाहूनें उचलिलें[2]. ॥ ५१ ॥ **भीमार्जुन माद्री**बाळ । सर्वांसहितें[3] शोकें
विव्हळ । जेवीं देवतरूतें[4] अनिळ[5] । झगटोनियां[6] कांपवी. ॥ ५२ ॥ कृपणगिरा[7]
धर्मसुत[8] । म्हणे, 'दैवकारण विपरीत । शत्रु जिंकिलियां[9] अघटित । पुढें दुःख
पातलें. ॥ ५३ ॥ अर्थप्राप्तीतें दुर्विदगती[10] । ऐसें कुशळ अनुवादती । मी
जय लाधोनि पुढतीं । महा अनर्था पावलों. ॥ ५४ ॥ जे निर्ये[11] बळाचे स्वामी ।
पृष्ठी[12] न दाविती संग्रामीं । ते **द्रौणी**नें नृशंसकर्मी[13] । शयनधामीं[14] मारिले. ॥५५॥
जे **द्रोणा**र्णवातें[15] तरले । विक्रमें **मरु**द्गण[16] भासले । ते राजपुत्र[17] आजीं निमाले ।
प्रमादेंकरून[18] वीर हो! ॥ ५६ ॥ प्रमादापरता दुजा नाश । नाहीं जीवलोकीं[19]
विशेष । येणें अनर्थसरिताधीश[20] । प्राणियावरी येतसे. ॥ ५७ ॥ **भीष्म** रथ-
कुंडीं[21] पावक । जो वीरतृणाचा[22] दाहक । पतंगातुल्य वीर अनेक । रक्षा[23] होवोन
निमाले[24]. ॥ ५८ ॥ त्या युद्धापासून कुमर[25] । स्वस्थ[26] राहिले भाग्यें थोर । आजीं
धांवोन मृत्युव्याघ्र । अचुक कंठीं बैसला. ॥ ५९ ॥ विद्यातपःश्रीचें[27] यश विपुल ।
प्रमत्तातें त्यागी तत्काळ । यालागीं सर्वदा कुशळ[28] । सावधानें वर्तती.
॥ ६० ॥ इंद्रोपम नरराजपुत्र[29] । प्रमादें[30] मारी अमित्र । ऐसें **काळा**चें चरित्र ।

---

१. विषाप्रमाणें कडू. 'विलक्षण' असा पाठभेद. २. सात्यकीनें धर्मास उचलिलें—असा भावार्थ. 'उचलिला' असें पाठांतर. ३. 'संज्ञालाभें शोकें विव्हळ' 'सर्व सालभे (?) शोकविव्हळ' असे पाठभेद. ४. कल्पवृक्षास. 'देवतारूपें' असा अन्यपाठ. ५. वारा. ६. 'प्रकटोनियां' असा पाठभेद. हा कल्पवृक्ष व वायू यांचा दाखला मूळांत नाहीं. ७. दीनवाणीनें, दुःखस्वरानें. ८. धर्मराज. हा यमधर्मापासून कुंतीस झालेला पुत्र. ९. जिंकिल्यावर. १०. दुर्ज्ञेय(=जाणण्यास कठीण) आहे गती जिची अशी. ११. 'निजबळाचे' असें पाठांतर. १२. जे युद्धांत पाठ दाखवीत नाहींत असे, युद्धांतून पळून न जाणारे. १३. अधमपणाचें कृत्य करून. 'निःशंक कर्मी' असा पाठभेद. १४. शयनगृहांत. 'शयनस्थानीं' 'शयनधर्मीं' असे पाठभेद. १५. द्रोणाचार्यरूपी समुद्राला. अर्णव=समुद्र. १६. मरुत् हे वायुदेवता असून, इंद्राचे सहचर व मित्र आहेत. हे फार बलाढ्य आहेत व वेदांत यांना उद्देशून बरींच सूक्तें आहेत. १७. द्रौपदीचे प्रतिविंध्यादि पुत्र. १८. आमच्या प्रमादामुळें, चुकीमुळें. १९. 'मृत्युलोकीं' असा पाठभेद. २०. अनर्थांचा (संकटांचा) समुद्र. 'अनर्थसरिताविष' 'अनर्थसरितावीच' असे पाठभेद. २१. रथरूपी कुंडांतील अग्नि (भीष्म). २२. वीररूपी गवताचा. अग्नि गवतास केव्हांच जाळून टाकितो, त्याप्रमाणें वीरांस झपाट्यासरसा जिंकणारा—असा स्पष्टार्थ. 'जेवीं तरणीचा दाहक' असा अन्यपाठ. २३. राख, राखरांगोळी, नाश. २४. 'मारिले' असा पाठभेद. २५. 'सुकुमार' असें पाठांतर. २६. कुशल, क्षेम. २७. पाठभेदः—विद्यातपःश्री-यश विपुल । अप्रमत्त त्यालागीं सर्वदा सर्वही तात्काळ । सावधानें वर्तती. ॥ 'न हि प्रमत्तेन नरेण शक्यं विद्यातपःश्रीर्विपुलं यशो वा ।' असें मूळांत आहे. (अध्याय १०।२२). २८. चतुर लोक, पंडितजन. २९. प्रतिविंध्यादि राजपुत्र. ३०. 'अप्रमोदें' असें पाठांतर.

जगन्नाशक[1] वीर हो! ॥ ६१ ॥ पुत्रनिधनाच्या श्रवणीं[2] । शोकाग्नीमाजीं याज्ञसेनी । देह दग्ध करील हें मनीं । मातें निश्चयें मानलें. ॥ ६२ ॥ पुत्र, भ्रातृ, पांचाळ पितर । नाशले[3] ऐकोनि सुकुमार । शोकें होवोनी कृश, शरीर । भस्म करील पावकीं.[4]' ॥ ६३ ॥ ऐसा करुणाशब्दीं नकुळा । म्हणे, 'येथें द्रुपदबाळा । वेगीं आणीं[5], नातरी अनळा-। माजीं देह जाळील.[6]' ॥ ६४ ॥ नकुळ आज्ञापोन झडकरी । हतशेषेंसी[7] रिघे शिबिरीं । अगणित रत्नांच्या[8] सरोवरीं । पुत्रप्रेतें देखिलीं. ॥ ६५ ॥ विखंडिलीं रुंडमुंडें[9] । गजाश्वांचीं[10] प्रेतें उदंडें[11] । जेवीं विष्वग्वाताच्या[12] तडाडें । वृक्ष उन्मुळूनी[13] पाडिले. ॥६६॥ त्यांतें देखोनियां नेत्रीं। धर्म आक्रोशें पडे धरत्रीं । जैसा लूनपक्ष[14] पतत्री[15] । पाशामाजीं[16] गवसला. ॥ ६७ ॥ पुत्रपौत्रस्वजन[17] । स्मरोनि, करी घोर रुदन । त्यालागीं सुहृदीं शांतवोन । 'शोकें[18] त्यागीं' प्रार्थिती[19]. ॥ ६८ ॥ तेच समयीं आदित्यवर्णी[20] । नकुळेंसी[21] रथीं याज्ञसेनी । उपप्लव्यातें सांडोनी । विनाशभूमीसि आणिली. ॥ ६९ ॥ दृष्टी देखोनि पुत्रप्रेतें । कर्दळी जैसी वातघातें[22] । तेवीं कृष्णा[23] शोकगर्तें । पतन पावली मूर्च्छित. ॥ ७० ॥ तमोध्वस्त[24] सहस्रपाणी[25] । होतां, म्लानमुख पद्मिनी[26] । तेवीं शोकें पद्मलोचनी । विवर्णवर्णपद्मानना[27]. ॥ ७१ ॥ धरेसी पडतां सुलोचनी । भीम धांवे शुभांगदपाणी[28]। द्वयबाहूनें याज्ञसेनी । उच-

---

१. 'जगनाश करवी हो' असा अन्यपाठ. २. पुत्रमरणवार्ता ऐकतांच. ३. नष्ट झाले. 'नासले' असें पाठांतर. ४. अग्नींत. ५. 'आणिसी तरी' असा अन्यपाठ. ६. 'घालील' असें पाठांतर. ७. बाकी राहिलेल्या मंडळीसह. ८. मृतवीरांच्या अंगावरील रत्नें इतस्तत: पडलीं होतीं—असा इत्यर्थ. ९. धडें आणि शिरें. रुंड=डोक्याशिवाय शरीराचा खालचा भाग. १०. हत्तीघोड्यांचीं. ११. पुष्कळ. १२. सर्व दिशांनीं वाहणाऱ्या वाऱ्याच्या, चक्राकार भ्रमणाऱ्या वाऱ्याच्या. 'विदिग्वाताच्या' 'दिग्वायोच्या झडझडाडें' व 'दिग्वाताच्या झडाडें' असे पाठभेद. १३. मुळापासून उपटून. 'उद्धाणें' असें पाठांतर. १४. कापिले आहेत पंख ज्याचे असा. लून=कापलेला. पाठभेद:—'लुचुन पक्ष.' १५. पक्षी. पतत्र (पंख) आहेत ज्याला तो=पतत्री. १६. जाळ्यांत. १७. 'पुत्रभ्रातृपौत्र स्वजन' 'पुत्रपौत्रादि स्वजन' अशीं पाठांतरें. १८. शोकाचा त्याग करा, अशी प्रार्थना करिती. 'शोकत्याग' असें पाठांतर. १९. येथें मूळांतील दहावा अध्याय संपला. २०. सूर्यासारख्या तेजस्वी. २१. 'नकुळासहित' असें पाठांतर. २२. वाऱ्याच्या सोंसाट्यानें. मूळांतही हीच उपमा आहे. (अ० ११।६). २३. द्रौपदी. २४. राहूनें ग्रासलेला. तम=राहू. २५. सूर्य. ज्याला हजार हात (किरणें) आहेत तो. 'सहस्रकीर्णी' असें पाठांतर. २६. कमलिनी. २७. निस्तेज झालें आहे मुखकमल जिचें अशी. विवर्ण=निस्तेज, फिकट. २८. सुंदर आहेत अंगदें ज्याच्या हातांत असा. पाठभेद:—'गदापाणी'.

लोनियां [1]आश्वासीत. ॥ ७२ ॥ रुदनस्वरें **पांडवभार्या** । बंधुसहित **धर्म**राजया । म्हणे, 'श्रेष्ठभाग्यें ऐश्वर्या । मनोरथां पावलासी? ॥ ७३ ॥ **सौ**[2]भद्रादि बाळशावक । त्यांलागीं न स्मरसी क्षणैक । मानोनी राज्यलाभसुख । मानस [3]वज्रासी तुळिलें. ॥ ७४ ॥ राज्य वोपोनी अनुजांतें । [4]दुःखसंगें घेवोन [4]मातें । प्रवेशें [5]महारण्यातें । संतापशांति करावया. ॥ ७५ ॥ [6]यदर्थी राज्यभोगार्थ । इच्छिजेती, ते सुकुमार सुत । मृत्यु पावले, आतां स्वार्थ । जगीं निंद्य होईल. ॥ ७६ ॥ माझी हतभाग्यपदवी । बुडत असे दुःखार्णवीं । [7]भ्रातृपुत्ररत्नठेवी । [8]**द्रौ**णिमकरें ग्रासिली. ॥ ७७ ॥ काळानुरूप [9]बाळचेष्टा । स्मरतां, शोकाग्नि वपुकाष्टा । [10]जाळी, यास्तव [11]नरश्रेष्ठा! । मुहूर्त प्राण न राहे. ॥ ७८ ॥ मद्बंधु पडले धरेसी । आतां कैसेनी राज्य [12]इच्छिसी?। [13]महाकाननातें न सेविसी । तरि मी त्यागीन प्राणातें. ॥ ७९ ॥ **द्रौ**णी [14]असतां जीवंत । माझा शोकाग्नि नव्हे शांत । यालागीं धांवोनि त्वरित । प्राणावेगळा [15]करावा. ॥ ८० ॥ आतां दर्भास्तरणीं त्वरित । प्राणदानें पूजीन **कृ**तांत । **उ**पप्लवीं ऐकतां हे [16]मात । पुत्रदर्शना जातसें. ॥ ८१ ॥ पापी [17]कृतकर्माचें फळ । न पावतां **द्रौ**णी [18]कुटिल । प्राण त्यागोनी तात्काळ । [19]शव वोपीन तुम्हातें.' ॥ ८२ ॥ एवं [20]**भ**गवतीतुल्य [21]शेषीं । बैसली, नृपा! प्रायोपवेशीं । प्राण सांडोनी क्रोधेंसीं । पुत्रामागें जावया. ॥ ८३ ॥ **धर्म** म्हणे, 'सर्वज्ञकुशळे! । वचन ऐकें वो! राजबाळे! । तव पुत्र क्षात्रधर्मबळें । स्वर्गलोकासी पावले. ॥ ८४ ॥ आतां [22]विषादवातें शोकाग्नी । न [23]वाढवीं शुभकल्याणी! । **द्रौ**णी गेला दूर [24]गहनीं । तो [25]नाटोपे कवणातें.' ॥ ८५ ॥

---

१. अश्वासन देता झाला. २. सुभद्रापुत्रादि, अभिमन्यू वगैरे. ३. वज्रासारखें कठीण अंतःकरण केलेंस–असा भावार्थ. ४. दुःखासह मला. येथें **'सहोक्ति'** नामक अलंकार आहे. जेथें चमत्कार वाटण्याजोगा सहभाव वर्णिलेला असतो तेथें **'सहोक्त्य'**लंकार होतो. 'दुःखें संगें' असें पाठांतर. ५. 'महावनीं' असा पाठभेद. ६. ज्यांच्याकरितां. ७. ठेवी=ठेव, ठेवणें, भांडार, खजीना. ८. अश्वत्थामारूपी मगरानें. 'मत्स्यकें' असें पाठांतर. ९. बाळलीला. १०. 'जाली' असा पाठभेद. ११. 'नरवीरश्रेष्ठा' असें पाठांतर. १२. 'करिसी' असा पाठभेद. १३. 'महावनातें' असा अन्यपाठ. १४. 'ऐकतां' 'ऐकोनी' असे पाठभेद. १५. 'न करा कां?' असा अन्यपाठ. १६. पुत्रनिधनवार्ता. १७. 'कृतवर्म्याचें' असें पाठांतर. १८. दुष्ट, अधम. १९. प्रेत. २०. भगवती=पार्वती. पार्वती ही दक्षप्रजापतीची मुलगी. दक्षानें एकदां एका मोठ्या यज्ञास प्रारंभ केला. त्या यज्ञास त्यानें शंकर व पार्वती यांस वगळून इतरां सर्वांस बोलाविलें. पार्वती तो यज्ञ पाहावयास आमंत्रणाशिवाय दक्षाच्या घरीं गेली. तेथें गेल्यावर दक्षानें तिचा अपमान केला, म्हणून तीस राग येऊन तिनें योगाग्नि चेतवून त्यांत स्वदेहाचा त्याग केला–अशी कथा आहे. २१. अखेरीस, शेवटीं. २२. दुःखरूपी वायूनें. २३. 'पेटवीं' 'वाढवितां' असा पाठभेद. २४. अरण्यांत. 'गगनीं' असें पाठांतर. २५. आटपणार नाहीं, पाठलाग केला असतां गांठणार नाहीं.

नेत्र क्षाळोनी अश्रुजीवनीं । कोपें जाज्वल्य याज्ञसेनी । जेवीं दक्षाच्या विना-शेनीं[1] । हरप्रमदा[2] कोपली. ॥ ८६ ॥ म्हणे[3], 'जन्मारंभापासोनी । द्रौणीच्या मस्तकीं[4] असे मणी । जेवीं शेषाचिया शिरःस्थानीं । पद्म[5] सर्वदा; पार्थिवा![6] ॥८७॥ निर्दाळोनी गुरुनंदना । तो मणी आणीं[7] मज दर्शनीं[8] । येणें माझ्या जीवित्वजीवना । संताप सांडोन पळेल.' ॥ ८८ ॥ पुढें[9] कोपवी वृकोदरा । म्हणे, 'क्षात्रधर्मा अंतरा[10] । स्मरोनियां, शोकसागरा–। माजीं मातें तारावें. ॥ ८९ ॥ देवेंद्र मारी वृत्रासुरातें[11] । तेंवि निर्दळीं पापकर्मातें[12] । तुझिया पराक्रमाच्या तुळणेतें । पुरुष घालितां न मिळेती[13]. ॥ ९० ॥ तुझें पूर्वशूरत्व[14] श्रवणें । ऐकिजेती, नाशिलीं व्यसनें[15] । वनीं हिडिंबाच्या[16] हननें । बंधूंसीं माता[17] रक्षिली. ॥ ९१ ॥ वारणावतीं[18] गृहदहनीं । द्वीपें[19] जालासी वीर तरणीं[20] । कीचक[21] मातें घाली व्यसनीं । प्रत्यक्ष तुवां मारिला. ॥ ९२ ॥ पौलोमीतें[22] रक्षी वासव । कीं जानकीतें रक्षी राघव[23] । तेंवि तुझें कर्मवैभव । द्रौणिहननीं दाखवीं. ॥ ९३ ॥ सुखलक्षण[24]-सुमनांजळी । समर्पी माझिया शिरकमळीं[25] । श्रेष्ठ होवोन भूमंडळीं । कीर्तिदुंदुभी ताडिजे[26].' ॥ ९४ ॥ प्रियामुखयंत्रींचा[27] गोळ । हृदयीं भेदितां, महाबळ । क्रोधें स्पर्धा[28] धरूनि तात्काळ[29] । विचित्र रथीं बैसला. ॥ ९५ ॥ नकुळासी करोनी

---

१. दक्षानें पार्वतीचा अपमान केला म्हणून शिवपार्षद वीरभद्रानें दक्षयज्ञाचा विध्वंस करून, त्यासही मारिलें–अशी कथा आहे. २. पार्वती. ३. हें द्रौपदीचें भाषण आहे. ४. मस्तकीं. ५. पद्म-राग(?), नऊ रत्नांपैकीं एका जातीचें रत्न. ६. धर्मराजा! ७. 'आणावा' असें पाठांतर. ८. मला दाखविण्याकरितां, अश्वत्थाम्याचा नाश केला अशाविषयीं माझी खात्री होण्याकरितां. ९. 'पुढतीं' असें पाठांतर. १०. मनांत, अंतःकरणांत. ११. मुक्तेश्वरकृत वनपर्व (काव्यसंग्रह). पृ० ५० टी० १७ पहा. १२. 'निर्दाळोनी पापकर्मियातें' असा पाठभेद. १३. 'न मिळे' असें पाठांतर. १४. पूर्वीं शूरपणाचीं केलेलीं कृत्यें. १५. संकटें. १६. मुक्तेश्वर–आदिपर्व–अ० ३७ पहा. १७. बंधूंसह माता. 'बंधुसीमा' असा पाठभेद. १८. येथें लाक्षागृहकथेकडे कविकटाक्ष आहे. ही कथा मुक्तेश्वरकृत–आदिपर्व–अध्याय ३५।३६ यांत आहे, ती वाचकांनीं पहावी. १९. बेट, आधार. 'दीप झालासी वीर तरणी' असा पाठभेद. २०. तारण्यांत. २१. मुक्तेश्वरकृत विराटपर्व–अध्याय ३ पहा. २२. मुक्तेश्वर–वनपर्व–अध्याय १० पहा. २३. रामानें रावणास मारून सीतेचें रक्षण केलें=ही कथा सुप्रसिद्धच आहे. २४. सुखलक्षण (सुखाचें चिन्ह) हीच पुष्पांजली. 'सुलक्षणें' असा पाठभेद. २५. 'शिरोत्पळीं' असें पाठांतर. उत्पल=कमल. २६. वाजवावी. 'किती दुंदुभी' असें पाठांतर. २७. प्रिया (द्रौपदीचें) मुख (तोंड) हीच तोफ, त्या तोफेंतील गोळा. २८. ईर्षा, इरई, अभिमान. 'स्वर्धा वरूनि' असा पाठभेद. २९. 'तरूकाळ' (?) असें पाठांतर.

सारथी । अश्व प्रेरिले मानसगती[1] । द्रौणिवध धरूनि चित्तीं । बळसागर लोटला. ॥ ९६ ॥ द्रौणिरथचक्रपदवी[2] । धरोनी[3] धांवे प्रतापरवी । सिंहनादें परिपूर्ण उर्वी[4] । वीर्य[5] आगळें दावितु. ॥ ९७ ॥ विश्वंभरांघ्रिपद्मभ्रमर[6] । विनवी मुक्तेश्वर कविकिंकर । कथा चाले तो बडिवार[7] । संतसज्जनसंगतीचा. ॥ ९८ ॥ इति श्रीसौप्तिकपर्व । श्रवणें दोषांसी पराभव । जेंवि वज्रघातें[8] वासव । छेदीत शिखरें गिरींचीं. ॥ ९९ ॥

---

## अध्याय चवथा.[9][10]

वधावया आचार्यबाळ । भीम धांवे महाकाळ । ते वेळीं धर्मासी गोपाळ[11] । लागवेगें जाणवी[12]. ॥ १ ॥ 'तवानुज[13] पुत्रशोकें । द्रौणी वधावया क्षोभेंतवकें[14] । गेला, त्यालागीं ऐकें । सत्वर गुह्य; भूपाळा! ॥ २ ॥ जेणें सागरांबरांचें[15] होय दहन । ऐसें ब्रह्मशिरोस्त्र[16] द्रोण । पार्थ जाणोनी प्रियदर्शन[17] । समर्पी[18] विद्याभ्यासीं. ॥ ३ ॥ हें ज्ञात[19] होतां कृपीतनया । क्रोधें जल्पे[20]; निजपितया । म्हणे, 'मी सर्व गुणांची क्रिया । तुझा पुत्र जाणें पां. ॥ ४ ॥ ब्रह्मशिरोस्त्र मातें किमर्थ । नेदूनि, पृथापुत्र पार्थ । ताता! पूजिला? हा भावार्थ । तुझा अपूर्व दिसताहे.' ॥ ५ ॥ क्षोभें[21] व्याप्त होतां नंदन । स्नेहें शांतवी कृपीरमण । म्हणे 'पुत्रा! तुझें लक्षण । सदा चंचळ असे पां. ॥ ६ ॥ आपण ग्रासितां महद्व्यसनें[22] । अस्त्रातें न प्रयोजणें; । धैर्यधर्मी विपुल ज्ञानें । हृदयीं हें

---

१. मनाच्या वेगानें, अत्यंत त्वरेनें. २. अश्वत्थाम्याच्या रथाच्या चाकाच्या खुणा (ह्या खुणांस 'चाकोऱ्या' किंवा 'चकारी' असें म्हणतात). ३. 'धरू धांवे' असा पाठभेद. ४. पृथ्वी. ५. 'वीर' असें पाठांतर. ६. विश्वंभरबोवा हें मुक्तेश्वराच्या पित्याचें नांव. ७. मोठेपणा. ८. इंद्रानें आपल्या वज्रानें पर्वतांचे पंख तोडिले, अशी कथा आहे. ९. ह्या अध्यायास 'धर्मद्रौपदीविषादयोग' असें नांव हस्तलिखित पोथींत दिलेलें आहे. १०. ह्या अध्यायांत मूळांतील बाराव्या अध्यायापासून शेवटच्या म्हणजे अठराव्या अध्यायापर्यंतच्या सात अध्यायांचा सारांश आला आहे. ११. श्रीकृष्ण. १२. कळवी, समजावी. १३. तुझा धाकटा भाऊ (भीम). 'तुवां तुज' असें पाठांतर. १४. क्रोधाच्या आवेशानें, रागाच्या तावानें. 'द्रौणिवधा क्षोभें तडके' असा अन्यपाठ. १५. समुद्र व आकाश यांचें. १६. ब्रह्मशिरस् नांवाचें अस्त्र, ब्रह्मास्त्र. १७. आवडता. १८. ह्याचा कर्त्ता 'द्रोण.' १९. माहीत, ठाऊक. 'ज्ञान' असें पाठांतर. २०. बडबड करी. 'क्रोधजालें' असा पाठभेद. २१. रागानें. 'क्षुधे' असें पाठांतर. २२. मोठ्या संकटांत पडलों तरी.

रक्षिताती.[1] ॥ ७ ॥ तूं चंचल बुद्धीचा वेर[2] । यास्तव अयोग्य हें अस्त्रगव्हर[3]; । श्वेतवाहन[4] क्षमासागर[5] । तो युद्धधर्मातें जाणतो.' ॥ ८ ॥ एवं रूक्ष[6] पितृवचनीं । शोकें[7] धरेसीं पडे द्रौणी; । तेधवां धर्मा ! काम्यकवनीं[8] । तुझें वास्तव्य बंधूंसीं[9] ॥ ९ ॥ द्रोणें द्रौणीसी संबोखुनी । तोषविला अस्त्र देउनी । पुढें द्वारकांपुरपाटणीं[10] । एक वेळे पातला. ॥ १० ॥ एकमेकांतें आलिंगुनी । मातें बोले हास्यवदनीं । पूर्वी द्रोणें पुरश्चरणीं[11] । अगस्तिऋषी तोषविला. ॥ ११ ॥ देवगंधर्वीं जें पूजिलें । तें ब्रह्मशिरोस्त्र प्राप्त[12] झालें; । तेणें मातें उपदेशिलें । पुत्रलोभें, माधवा ! ॥ १२ ॥ तें ब्रह्मशिरोस्त्रनाम । तुजप्रती देतसें उत्तम । याच्या पालटें[13] तीक्ष्ण भीम[14] । चक्र समर्पी मजलागीं.' ॥ १३ ॥ ऐसी त्याची श्लाघित[15] वाणी । ऐकोनि वदलों, 'ऐक द्रौणी[16] ! । देवगंधर्व मनुष्यश्रेणी । शंतांश[17] माझा न पावती. ॥ १४ ॥ हें धनुष्य, गदा, चक्र, शक्ती । इच्छिसी तरी उचलीं हातीं' । 'तथास्तु' वदोनी दुर्मती । गर्वाभिमानें पुढारला. ॥ १५ ॥ सव्यपाणीनें[18] धरितां चक्र । चलन न पावे अणुमात्र[19] । जेवीं हिमाचळाचें गात्र । मशक कैसें उत्पाटिती[20] ? ॥ १६ ॥ पुढें दक्षिणपाणी[21] लाविला । परंतु यत्न निर्फल गेला । तेणें द्रौणी दुर्मन[22] जाला । लज्जा बैसली जिव्हारीं[23]. ॥ १७ ॥ श्रमें पडला धापावर्ती[24] । तेधवां धिक्कारिला; भूपती[25] ! । 'उमानाहो[26] कैलासपती । तोषविला अर्जुनें. ॥ १८ ॥ त्यातुल्य मातें प्रियतर । पुरुष नाहीं पृथ्वीवर ।

---

१. धैर्यधर्मानें व गाढ ज्ञानानें [सुज्ञ लोक] या अस्त्राचें रक्षण करितात. पाठभेदः—धर्मधैर्य विपुल ज्ञान । ते हृदयीं हे रक्षताती. ॥ २. पति. तुझी बुद्धि चंचळ (अस्थिर) आहे—असा भावार्थ. ३. अस्त्राचा उपदेश, शिक्षण. गव्हरणें=सांगणें. ४. अर्जुन. ५. 'क्षेमसागर' असा पाठभेद. ६. कठोर. ७. 'शोकधरेसी' असें पाठांतर. ८. पांडव वनवासांत असतांना काम्यकवन हस्तिनापुराजवळच होतें असें दिसतें. [मुक्तेश्वर वनपर्व (काव्यसंग्रह), पृ० १७ टी० ५ पहा]. ९. बंधूंसह. १०. 'पट्टणीं' असें पाठांतर. ११. पुरश्चरण=मंत्र सिद्ध व्हावा म्हणून त्या मंत्राचा अमुकसंख्याक जप करावा इत्यादि मंत्रशास्त्रामध्यें अनुष्ठान सांगितलेलें असतें तें. १२. द्रोणाचार्यांस मिळालें. १३. बद्दल, ऐवजीं. १४. भयंकर. १५. गौरवयुक्त. १६. 'ते ऐक श्रवणीं' असा पाठभेद. १७. पाठभेदः—संतोष. १८. डाव्या हातानें. 'सव्य' ह्याचा अर्थ प्रचारांत 'उजवा' असा समजला जातो परंतु कोशांत 'डावा' असा अर्थ दिलेला आहे. १९. यत्किंचित्‌ही हालेना. २०. 'उपटीती' असा पाठभेद. २१. उजवा हात. पाठभेदः—दक्षिणभागी. २२. खिन्न. 'दुश्चित' असें पाठांतर. २३. अंतःकरणांत. २४. श्वासाच्या भोवऱ्यांत. फार श्रमामुळें श्वास लागला—असा इत्यर्थ. २५. राजा (धर्मा) ! २६. उमापति (शंकर).

सुहृद, कलत्र, पितृ, कुमर, । माझा अर्जुन; ब्राह्मणा! ॥ १९ ॥ तुजऐसा त्याचे हृदयीं । अणुमात्र [1]अभिलाष तो नाहीं । श्रेष्ठमहिमा न जाणोनी अपायीं । [2]बळें मूर्खा! प्रवेशसी. ॥ २० ॥ ब्रह्मचर्यव्रतें थोरें [3] । मी द्वादश संवत्सर । तपासि [4]तपलों पितर । जेथें [5]शिववल्लभेचा. ॥ २१ ॥ तेजस्वी [6]दुजा सनत्कुमार । तेवीं प्रद्युम्न प्राप्त कुमर । तेणेंहि माझें दिव्य चक्र । याचिलें नाहीं अद्यापी. ॥ २२ ॥ [7]गद, सांब, राम, श्वफल्क । द्वारकावासी [8]वृष्ण्यंधक । यांच्या हृदयीं [9]भावार्थपंक । तुजऐसा मिळेना. ॥ २३ ॥ भारताचार्यनंदना! । चक्र [10]नुंचलवे बळहीना। तें धरावया अंतःकरणा । कैसें मूढत्व योजिसी?' ॥ २४ ॥ लज्जा पावोनी द्रौणी प्रार्थी । म्हणे, 'स्वामी! माझे चित्तीं । चक्रलाभें [11]विबुधपंक्ती । एकसरें [12]दमाव्या. ॥२५॥ [13]अपजय घडे आपणा । यास्तव [14]याचितों सुदर्शना । दुर्घट शक्ती वेंचितां [15]मना । दुर्लभ चक्र मानलें. ॥ २६ ॥ आतां क्षमेचिया द्वारा । माझा अपराध यदुवीरा! । सांठवीं.' ऐसें युधिष्ठिरा! । वदोनी [16]वनें प्रवेशे. ॥ २७ ॥ तो दुरात्मा चपळ क्रूर । ब्रह्मशिरोस्त्राचा ईश्वर । त्यापासोनि वृकोदर । लागवेगें [17]रक्षावा.' ॥ २८ ॥ ऐसें रमामुखपद्मभृंग । वदतां, धर्में करूनि वेग । विचित्र रथ [18]अरुणरंग । अच्युताचा आणविला. ॥ २९ ॥ केतुचिन्हीं [19]कौद्रवेयारी । काळचक्रातुल्य [20]भूमीवरी । [21]धर्मानुज श्री-

---

१. लोभ, दुसऱ्याची वस्तु प्राप्त करून घेण्याची इच्छा. २. मुद्दाम, हट्टानें, जाणूनबुजून. ३. 'ब्रह्मचर्य महाघोर' असें पाठांतर. ४. रुक्मिणीस पुत्रप्राप्ति व्हावी म्हणून कृष्ण व रुक्मिणी यांनीं हिमालयपर्वतावर जाऊन बारा वर्षेपर्यंत तपश्चर्या केली—अशी कथा आहे. 'तपासि पातलों श्वशुर । जेथें अपर्णावल्लभाचा' असा अन्यपाठ. ५. शिवप्रियेचा. येथें 'हिमालय' असें न म्हणतां वळसा घेऊन 'शिववल्लभेचा पितर' असें म्हटलें आहे, म्हणून येथें **'पर्यायोक्ति'** अलंकार आहे. ६. 'जैसा' असें पाठांतर. ७. गद=वसुदेवाला रोहिणीपासून झालेला मुलगा. सांब=जांबवतीपुत्र. ह्याच्याच पोटांतून निघालेल्या मुसळाच्या योगानें सर्व यादवांचा नाश झाला. राम=बळिराम. श्वफल्क=हा वृष्णी नांवाच्या यादवाचा मुलगा. याची बायको गांदिनी व मुलगा अक्रूर. ८. वृष्णी+अंधक. [मुक्तेश्वर–वनपर्व–(काव्यसंग्रह), पृ० ४३ टीपा ३।४ पहा]. ९. कपटभावरूपी चिखल. १०. उचलत नाहीं. ११. देवांचे समुदाय. १२. दमन कराव्या, जिंकाव्या. १३. 'अजय करी' असा अन्यपाठ. १४. 'चिंतीं' असा अन्यपाठ. १५. दुर्घट शक्ति वेंचितां (=मिळवीत असतां, मिळविण्याच्या खटपटींत असतां,) दुर्लभ (मिळण्यास कठीण असें) चक्र (सुदर्शन नामक चक्र) मना मानलें (=मनांत भरलें, पसंत पडलें.)—असा सार्थान्वय. १६. 'अरण्य' असें पाठांतर. १७. येथें मूळांतील बारावा अध्याय संपला. 'रक्षावया' असें पाठांतर. १८. लाल आहे रंग ज्याचा असा, लाल रंगाचा. १९. गरुड, सर्पांचा शत्रु. (काद्रवेय=कद्रुपुत्र, सर्प.) २०. 'उर्वीवरी' असें पाठांतर. २१. अर्जुन. 'धर्मानुजेंसी' असें पाठांतर.

हरी । लागवेगें बैसले. ॥ ३० ॥ जेवीं [1]अश्विनीदेवेंसी वासव । तेवीं धर्मानुजेंसीं माधव । [2]प्रतोद मारोनियां अश्व । [3]मनोजवें प्रेरिले. ॥ ३१ ॥ करितां भीमाचा पाठिलाग । गर्जे जैसा [4]प्रळयमेघ । वाजी धांवतां टाकी वेग । [5]वात आपुल्या गमनाचा. ॥ ३२ ॥ प्रळयकाळींचिया कोपें । पुढें भीम जातां नाटोपे । तिघे आक्रोश करूनि प्रतापें । [6]फिरफिरूनी पाचारिती. ॥ ३३ ॥ श्रवणीं येतां सुहृदवाणी । भीम नाइके अव्हेरूनी । वेगें नकुळासी आज्ञापुनी । [7]क्षोणीं रथ योजिला. ॥ ३४ ॥ द्रौणी जातां भागीरथीतीरीं । [8]आव्हानिला गिरागजरीं । तेणें भीमासि देखूनि [9]सत्वरी । [10]ईषिकां मंत्रें मंत्रिली. ॥ ३५ ॥ '[11]अपांडवी ब्रह्मगोळ । हो!' ऐसें अपरकाळ । चिंतोनियां [12]दीप्तिकल्लोळ । ईषिकास्त्र प्रयोजिलें. ॥ ३६ ॥ काळांतकप्रळयासम । [13]ईषिकापावकें व्यापिलें व्योम । सर्व लोकीं भरला [14]धूमें । [15]ब्रह्मांडदाहो [16]भाविती. ॥३७॥ अग्नि भ्रमतां नभोदरीं । [17]दाशार्ह पार्था सावध करी । म्हणे, 'भूतरक्षणा झडकरी । अस्त्रें अस्त्र [18]टाळावें.' ॥ ३८ ॥ केशवआज्ञे किरीटमौळी । सत्वर पातला [19]भूमंडळीं । सशरधनुष्य बाहुबळीं । वोढी आकर्णमर्यादा. ॥ ३९ ॥ गुरुद्रोण नमस्कारुनी । '[20]बंधूसीं स्वस्थ असो द्रौणी' । या संकल्पें [21]पाकशासनी । तदा अस्त्रातें मंत्रीत. ॥ ४० ॥ त्वरें योजितां नभोमार्गें । ज्वाळा निघती अनेक मार्गें । जैसा [22]युगांताग्नि स्वर्गें । आक्रमीत दग्धावया. ॥ ४१ ॥ तंव द्रोणपुत्राचें अस्त्र । नभीं [23]हेलावे जैसा सागर । सहस्रावधी धरेवर । उल्कापात मांडला. ॥४२ ॥ [24]महद्भय भूतकुळा । शब्दें व्योमीं ज्वाळमाळा । गिरिवनद्रुमेंसीं, नृपाळा! । पृथ्वी कांपे [25]सभयें. ॥४३॥

---

१. मूळांतही हीच उपमा आहे (अ० १३।७). २. चाबूक. 'प्रतोद स्मरोनियां' असा अन्यपाठ. ३. कल्पनेच्या वेगानें. अत्यंत शीघ्र गतीनें. ४. प्रळयकाळच्या मेघासारखा. ५. वाऱ्याच्या वेगापेक्षां घोड्यांचा वेग ज्यास्त होता–असा इत्यर्थ. ६. पुन्हापुन्हा. 'फीर फीर' असा अन्यपाठ. ७. पृथ्वीवर. ८. बोलाविला. ९. 'त्वरे' असें पाठांतर. १०. दर्भाची काडी. 'ईषिकामंत्र मंत्रित्वा' असा पाठभेद. ११. पांडवरहित. पांडवांचा निःपात होवो–हा इत्यर्थ. १२. प्रदीप्त, तेजस्वी. हें 'ईषिकास्त्रा'चें विशेषण. १३. ईषिकेपासून उत्पन्न झालेल्या अग्नीनें. १४. 'भ्रम' असें पाठांतर. १५. सर्व ब्रह्मांडाचें भस्म होतें कीं काय असें सर्व लोकांस वाटलें–हा इत्यर्थ. १६. येथें मूळांतील तेरावा अध्याय संपला. १७. कृष्ण. १८. परिहार करावा, निवारण करावें. १९. जमिनीवर. रथांतून खालीं उतरला–असा भावार्थ. २०. 'बंधूसहित' असा पाठभेद. २१. अर्जुन [पाकनामक राक्षसास शासन करणारा (इंद्र), त्याचा पुत्र]. २२. प्रळयकाळचा अग्नी. २३. हाले, हेलकावे खाई. २४. 'महद्भूतें' असें पाठांतर. २५. 'त्या भयें' असा अन्यपाठ.

त्या तेजार्णवाच्या पोटीं । बुडाल्या जनाच्या भ्रुकुटी । रविचंद्रभा[1] व्योमपोटीं । हारपोनि गेल्या त्यामाजीं. ॥ ४४ ॥ प्रळय भरतां ब्रह्मांडीं । महर्षि पातले तांतडीं । ज्यांच्या कीर्तिवल्लीच्या विरूढीं[2] । जग सदा संतुष्ट. ॥ ४५ ॥ ऐसे नारदद्वैपायन[3] । भूतहितीं[4] सर्वधर्मज्ञ । आंगकांतीनें हुताशन । घृतावदानीच[5] जिंकिती. ॥ ४६ ॥ ते दिव्यास्त्राचे मध्यभागीं । उभे राहिले, रौद्ररंगी । तेज पसरतां भूस्वर्गीं । शमवायाकारणें[6]. ॥ ४७ ॥ ऋषि वदती आक्रोशस्वरें । 'शूर[7] हो! अस्त्रें अविचारें । योजिलीं, येणें मर्त्यशरीरें[8] । एकसरें दग्ध होतील.' ॥ ४८ ॥[9] तेजें व्यापिलें ब्रह्मगोळा । तेवींच ऋषी देखुनी डोळां । पार्थे अस्त्र, नरशार्दूळा[10]! । प्रतिसंहारिलें सत्वर. ॥ ४९ ॥ अंजळी जोडूनि पाकशासनी । मुनींस[11] पूजी शब्दसुमनीं । म्हणे, 'या दिव्यास्त्रासमानीं । तदस्त्रातें म्यां योजिलें. ॥५०॥ तुमची आज्ञा वंदूनि[12] भोळां । उपसंहरिलें[13] अस्त्रानळा । पापकर्मे द्रौणी सकळां । पीडी, त्यातें वारिजे[14].' ॥ ५१ ॥ ऐसें वदोनी वीरश्रीरमण । करी अस्त्राचें आकर्षण । जेवीं योगी अंतःकरण । नेमस्थानीं निमिळी[15]. ॥ ५२ ॥ या ब्रह्मास्त्राच्या तुंडीं[16] । होय ब्रह्मांडाची राखोंडी[17] । समुद्र शुष्क होऊनियां सांडी । जीवित्वकळा[18] आपली. ॥ ५३ ॥ जो नित्य विषयां[19] निरूपे । त्यातें हें कदा नाटोपे । मस्तकीं बैसोनियां हरपे[20] । पिंडदग्ध पेटातुल्य[21]. ॥ ५४ ॥ पार्थ सत्यव्रतधर । ब्रह्मचारी[22], विमळ, शूर । विनाशापासूनी सत्वर । भूतग्राम रक्षिला. ॥ ५५ ॥ पुढें

---

१. सूर्य व चंद्र यांचा प्रकाश. २. वाढीमुळें, वृद्धीच्या योगानें. विरूढणें=(१) वाढणें. (२) उगवणें. ३. व्यास. ४. प्राणिमात्राच्या हिताविषयीं. ५. तुपाच्या आहुती ज्यांत पडत आहेत असा. ६. 'ते होमावयाकारणें' असा पाठभेद. ७. 'सुर' असें पाठांतर. ८. 'मृत्युशरीरें' 'मृत्यें शरीरें' अशीं पाठांतरें. ९. येथें मूळांतील चौदावा अध्याय समाप्त झाला. १०. नरश्रेष्ठा (धृतराष्ट्रा). ११. नारद व व्यास यांस. 'ऋषींस' असें पाठांतर. १२. आज्ञा शिरसा मान्य करून. १३. 'उपसंव्हानिलें' असें पाठांतर. १४. 'वारिलें' असें पाठांतर. १५. ज्याप्रमाणें योगी अंतःकरणाच्या सर्व मनोवृत्ति ईश्वरव्यतिरिक्त सर्व पदार्थांपासून आकर्षण करून घेऊन नेमस्थानीं (नेमलेल्या ठिकाणीं, ईश्वराच्या ठिकाणीं) स्थापन करितो, त्याप्रमाणें—असा भावार्थ. 'जेवीं योग अंतःकरण । समस्तानीं नेमिलीं.' असें पाठांतर. १६. तुंड=शस्त्राची तीक्ष्ण बोथी किंवा धार. १७. रक्षा, राख, नाश. 'राखुंढी' असें पाठांतर. १८. जीवनकळा, पाण्याचें अस्तित्व. १९. विषयांना पाहतो, विषयांचें चिंतन करितो. पाठभेद :—'विषयानुरूपें,' 'विषयानरूपें.' २०. नाश पावे. २१. पिंड=शरीर. प्रेताबरोबर जळलेल्या पटा(वस्त्रा)प्रमाणें. २२. 'ब्रह्मास्त्रचारीं' व 'ब्रह्मास्त्राचा' अशीं पाठांतरें.

तेजंतरणी[1] महर्षी । वेगीं पातले द्रौणीपाशीं । वदती, 'विश्वरक्षणासी । अस्त्र आकर्षी सत्वर.' ॥ ५६ ॥ द्रौणी दीनमुखें द्वैपायना । वदे, 'स्वामिया! प्राणरक्षणा । अस्त्र योजिलें, भीमसेना । निर्जीवें[2] करावया. ॥ ५७॥ येणें कपटदांगें,[3] मुनी! । धार्तराष्ट्र[4] पाडिला रणीं । ऐशियाचिया आयुष्यगहनीं[5] । हा काळाग्नि चेतविला.[6]॥५८॥ अनुमंत्रिलें[7] अनुतेजातें । अपांडवी करणें क्षितीतें । अस्त्र योजिलें, परंतु मातें । न करवे उपसंहार.[8] ॥ ५९ ॥ आजीं प्राणधनापासुनी । पांडव विध्वंसितों, मुनी!' । हें ऐकोनी महामुनी[9] । क्षोभें[10] द्रौणीस जाणवी. ॥ ६० ॥ 'या ब्रह्मास्त्राच्या मंत्रोपचारें । पार्थ तोषविला त्वत्पितरें[11] । सर्वज्ञानें[12] धृतिशरीरें[12] । त्यातें भाग्य सर्वदा[12]. ॥ ६१ ॥ धैर्यें दुजा मैनाकपर्वत । याचा कैसा करिसी घात? । अस्त्राकर्षणासी औघात[13] । तरी कासया योजिलें? ॥ ६२ ॥ तुझी[14] अधर्म प्राणज्योती । पांडव हरूं इच्छिती[15] चित्तीं । परंतु जीवित्वें[16] रक्षणें[16] युक्तीं[16] । शीर्षमणीतें अर्पावें.' ॥ ६३ ॥ द्रौणी म्हणे, 'भगवान् ऋषी! । या कौरवांच्या[17] रत्नकळसीं[18] । वस्तू न मिळे, जे तुळणेसी[19] । माझ्या मणीलागीं पावे. ॥ ६४ ॥ येणें भयशस्त्रव्याधी । क्षुधातृषातस्करउपाधी । या मणीच्या आश्रयें न बाधी । तो कैसा म्यां सोडावा? ॥ ६५ ॥ यानंतरें आकर्षूनि[20] युक्तीं । इषिकास्त्र रक्षीं क्षिती । पांडवांचे पाडें[21] माझी शक्ती । उपसंहारणीं[22] निर्बळ. ॥ ६६ ॥ अस्त्रघातें गर्भपतन । होईल; ऐसें तंव भाषण । करूनि, आतां मणीचें[23] दान । पुढें तव आज्ञे[23] होतसे.' ॥ ६७ ॥ व्यास म्हणे, 'हेचि बुद्धी । करूनि, गर्भालागीं

---

१. सूर्याप्रमाणें तेजस्वी. २. 'निजीविल्व' असें पाठांतर. ३. कपटरूपी अरण्याच्या योगानें, कपटानें—हा इत्यर्थ. ४. धृतराष्ट्रपुत्र (दुर्योधन). ५. आयुष्यरूप अरण्यांत. ६. प्रदीप्त केला. ह्या ओंवीच्या उत्तरार्धांत सुरेख **'रूपक'** आहे. ७. 'आमंत्रिलें' असें पाठांतर. ८. 'उपसंवाहना' असा अन्यपाठ. ९. व्यासमुनी. १०. क्रोधानें. 'क्षोभ' असें पाठांतर. ११. तुझ्या पित्यानें (द्रोणाचार्यानें). १२. पूर्ण ज्ञानामुळें व धैर्ययुक्त शरीरानें त्यातें (=त्या अर्जुनाला) सर्वदा भाग्य [प्राप्त होणार]. १३. आघात=दुर्दैव, कमतरता, अशक्तता. १४. 'तुझिया' असें पाठांतर. १५. 'इच्छिसी' असें पाठांतर. १६. (स्वत:चें) जीवित युक्तीनें वांचवावें. १७. 'पांडवांनीं जीं रत्नें व कौरवांनीं जें धन मिळविलें असेल तें ह्या मण्याशीं तुलना करण्यास योग्य नाहीं' असें मूळांत आहे (अ० १५, श्लो० २८ पहा). १८. खजिन्यांत, जामदारखान्यांत. १९. बरोबरी करी. २०. अन्वयार्थ:—यानंतरें (आतां यापुढें) [जर] युक्तीं (=युक्तीनें) इषिकास्त्र आकर्षून [मी] क्षिति रक्षीं (=रक्षूं म्हणेन) [तरी] पांडवांचे पाडें इ०. २१. प्रमाणें, सारखी. २२. 'उपसंवाहनीं' असें पाठांतर. २३. आपल्या आज्ञानुसार शिरोमणि पांडवांस द्यावयास तयार आहे—हा इत्यर्थ.

छेदीं.' । [1]येरें 'तथास्तु' वदोनि शब्दीं । अस्त्र वेगीं आ[2]ज्ञापिलें. ॥ ६८ ॥
कृष्ण म्हणे, 'पापवेशा ! । विराटसुता पार्थस्नुषा । तिच्या [3]व्रताची प्रशंसा ।
आकर्णावी कर्णद्वयें. ॥ ६९ ॥ उपप्लवीं [4]उत्तरा वास । करितां, पातला
[5]द्विजेंत्रेश । म्हणे, 'कल्याण, [6]तुझा वंश । क्षीण परंतु वाढेल. ॥ ७० ॥
गर्भपतन पावेल क्षितीं । यास्तव होईलें परीक्षिती । तो वश करूनि [8]त्रि-
जगती । [9]साधुवृंद पाळील.' ॥ ७१ ॥ ऐसें वदतां चक्रपाणी । कोपें तप्त
जाला द्रौणी । म्हणे, 'मिथ्या [10]नेमितं मद्वाणी । कैसी करिसी पाहें पां ?
॥ ७२ ॥ [11]उत्तरअनुजेचा गर्भ । कैसा रक्षिसी ? [12]मोझा क्षोभ । तुझा पांडवीं
कृपालोभ । आजीं कळला; केशवा !' ॥ ७३ ॥ प्रत्युत्तर वदे इंदिराकांत ।
'[13]अमोघ [13]परमास्त्रपात । होऊनि गर्भपात [14]मृत्युवात । दीर्घायुषी होईल. ॥ ७४ ॥
तूं पापविष्ठाभक्षक काक । सत्यजीवित्वाचा घातक । तस्मात् पापरूप [15]निष्टंकें ।
कृमीसमान भोगिसी. ॥ ७५ ॥ तीन सहस्र वर्षे [16]धरेसी । कोठें गुप्त, कोठें
[17]भ्रमसी । साह्यरहित वनवासी । दीनप्राय; अधर्मिया ! ॥ ७६ ॥ शोणितदुर्ग-
धियें । स्रवती, कां[18]तराश्रयें । कठिण व्याधीचिया घायें । [19]स्थिरें कोठें न रा-
हसी. ॥ ७७ ॥ [20]वैरांटीसुत परीक्षिती । होईल ज्याची [21]प्रबळ कीर्ति । तूतें
विलोकितां दुर्मती ! । [22]वेदव्रतीं राहील. ॥ ७८ ॥ कृपाचार्याच्या गुरुकृपें । पा-
वेल [23]शस्त्रास्त्राचीं [24]द्वीपें । तो धर्मात्मा [25]वसुधा प्रतापें । [26]षष्टि वर्षे पाळील.

---

१. अश्वत्थाम्यानें. २. येथें मूळांतील पंधरावा अध्याय संपला. ३. पातिव्रत्याची. ४. उत्तरा ही
विराटकन्या व अर्जुनपुत्र अभिमन्यूची भार्या होय. ५. येथें खरा पाठ 'द्विजेश' असावा. मूळांत
'व्रतवान् ब्राह्मण' असें आहे (अध्याय १६ श्लो० २ पहा). ६. 'तुज' असें पाठांतर. ७. 'नामें'
असा पाठभेद. ८. स्वर्ग, मृत्यु व पाताळ ह्या तीन जगांचा समुदाय. ९. सज्जनसमूह. 'साधुव्रतें'
असें पाठांतर. १०. अढळ, नियमयुक्त. हें 'वाणी'चें विशेषण. 'निमित्य' असा अन्यपाठ. ११. उत्त-
राच्या (विराटपुत्राच्या) धाकट्या वहिणीचा, उत्तरेचा. १२. पांडवीं माझा क्षोभ (व) तुझा
कृपालोभ आजीं कळला, असा अन्वय. 'माझ्या कोपें' असें पाठांतर. १३. या श्रेष्ठ अस्त्राचें पतन
अपरिहार्य आहे. १४. मृत्युवात (?). येथील खरा पाठ 'मृतजात' असा असावा. 'गर्भपात
होऊन, जन्मतःच मृत झालेला तो गर्भ चिरायुषी होईल' हा ओवीच्या उत्तरार्धाचा भाव.
१५. निश्चयपूर्वक, पूर्णपणें. १६. पृथ्वीवर. १७. भटकत फिरशील. १८. वनाचा आश्रय करून,
वनांत. १९. शांतमनानें, स्वस्थ. २०. उत्तरेचा मुलगा. 'अभिमन्युसुत' असें पाठांतर. २१. 'प्रळय-
कीर्ति' असा पाठभेद. २२. वेदोक्तव्रताचा आश्रय करून. 'वेदवृत्तीसी राहिला' असा पाठभेद.
२३. 'शास्त्राचीं' असा पाठभेद. २४. प्रदेश, समुदाय. २५. पृथ्वी. २६. साठ.

॥ ७९ ॥ अस्त्रतेजें दग्धनष्टा[1] । स्थापीन जीवित्वप्रतिष्ठा । माझ्या कर्तृत्वाची चेष्टा । सत्वर पाहें लोचनीं.' ॥ ८० ॥ व्यास म्हणे, 'ब्राह्मणहृदय[2] । नाहीं तुझें, तऱ्ही निश्चय । आमुच्या युक्तीचें चातुर्य । स्वमतें अनादरिसी कां ? ॥ ८१ ॥ तरि कृष्णोक्तीच्या शापशरीं[3] । दुःखें भ्रमसी भूमीवरी । रक्तपू ये शरीरीं । क्षुद्रका[4] ! या आग्रहें.' ॥ ८२ ॥ दुःखशोकें, नरदेवा[5] ! । द्रौणी मणी अर्पी पांडवां । खेद वारूनि, हृदयार्णवा । संतापलहरी धांवती. ॥ ८३ ॥ नृशंस[6] त्यागुनी आक्रोशें । जान्हवीतटी[7], उत्तर[8] दिशे । गेली, महावनीं प्रवेशे । सिंहव्याघ्र ज्यामाजीं. ॥ ८४ ॥ विरक्तीं[9] विटंबिला कांम[10] । उत्तमीं दुर्दशिला[11] अधम । कीं क्रोधनाशनीं उपशम[12] । शांतीसंगें विराजे; ॥ ८५ ॥ तेवीं द्रौणीची सुरतपत्नी[13] । विटंबोनी घेतला मणी । ज्याच्या प्रकाशें तेज धरणी–। तळीं सोज्वेळ[14] होतसे. ॥ ८६ ॥ कृष्णद्वैपायन[15] नारद । चौघे बंधूंसीं मुकुंद । पातले ज्या ठायां सखेद । द्रौपदी प्रायोपवेशी[16] ते. ॥ ८७ ॥ ते मदनानंद[17] कनककर्दळी । वोथरे[18], दुःखशोकानळीं । बैसली, जैसी शैलबाळी[19] । पूर्वी दक्ष[20]-यज्ञातटीं. ॥ ८८ ॥ द्वितीय[21] पांडव बळियोद्धा[22] । तेजस्वी मणी ठेवूनि पुढां । म्हणे, 'चतुरे! आजीं मूढा । कठिण शिक्षा योजिली[23]. ॥ ८९ ॥ जीवें सोडोन अश्वत्थामा । मणी हरिला, धरिली क्षमा । कृष्णसमवेत राया धर्मा । समाधानें

१. अस्त्रतेजानें दग्ध होऊन नष्ट झालेल्यास. २. 'ब्रह्महृदय' असें पाठांतर. ३. 'चापशरीं' असा पाठभेद. ४. नीचा, अधमा. ५. राजा (धृतराष्ट्र) ! ६. दुष्ट, दुर्जन. 'शंस' व 'संशय' अन्यपाठ. ७. 'जान्हवींत' असें पाठांतर. ८. 'केला महारण्यीं प्रवेश' असा अन्यपाठ. ९. विरक्त=ऐहिक भोग्यपदार्थांच्या ठिकाणीं आसक्त नाहीं असा पुरुष. १०. भोग्यपदार्थांच्या ठिकाणीं असलेली वासना. ११. दुर्दशा केली. १२. मनोनिग्रह, इंद्रियें ताब्यांत ठेवणें. ह्या ओंवीचें जनकत्व मुक्तेश्वराच्या उज्ज्वल प्रतिभेकडेच आहे. १३. (त्या मण्याविषयींची) आसक्तिरूपी भार्या. १४. 'सोज्वलता' असें पाठांतर. १५. व्यासांचा जन्म यमुना नदींतील द्वीपांत झाल्यामुळें त्यांस द्वैपायन असें म्हणतात. व्यासांचा अंगवर्ण कृष्ण (काळा) असल्यामुळें त्यांस कृष्णद्वैपायन असेंही अन्य नाम आहे. १६. अन्नपाणी वर्ज करून प्राणत्याग करावयास तयार झालेली. १७. मदनाला आनंद देणारी व जणुं काय सोन्याची कर्दळी (केळ) अशी (द्रौपदी). अत्यंत लावण्यवती असा स्पष्टार्थ. 'मदन नंद कनक दृष्टी (?)' असें पाठांतर. १८. वोथरे=वोठरे, रागानें टवकारून पाही (?). १९. पर्वतकन्या (पार्वती). २०. मागें अध्याय ३ ओंवी ८३ वरील टीपा पहा. २१. भीम. २२. बलाढ्य, बळवान्. २३. 'लाविली' असें पाठांतर.

विलोकीं. ॥ ९० ॥ यातें जल्पसी,[1] 'राज्यलोभें । तुम्ही सांडवलेती क्षोभें'[2] । परंतु प्रभाकरप्रभे[3] । शीतळत्व[4] कैसें पावेल? ॥ ९१ ॥ लावण्यगुणाचे तरंगिणी![5] । मणिरहित केला द्रौणी.' । संतोषलाभें याज्ञसेनी । म्हणे, 'अनृणी[6] जालासी. ॥ ९२ ॥ हा परम तेजस्वी मणी । बांधीं आपुले[7] शिर:स्थानीं.' । येरें प्रियेच्या वचनीं । मस्तकीं धरितां शोभला; ॥ ९३ ॥ रवी[8] उदयाचळीं । शिवमस्तकीं रश्मिमाळी[9] । तेंवि भीमसेन महाबळी । विचित्र दृष्टांत पावला. ॥ ९४ ॥ पुत्रशोकालागीं कृष्णा । सांडोनि, उठली आसना;[10] । धर्मराज यदुनंदना । परम शोकें विचारी.[11] ॥ ९५ ॥ 'पापी क्षुद्र अशुभबुद्धी । तो द्रौणी रात्रीं सर्वांसी वधी । हें अपूर्व हृदयारविंदीं । माझ्या वाटे रे! माधवा! ॥ ९६ ॥ जेणें[12] द्रोणाचा केला नाश । त्याचा द्रौणी[13] करी ग्रास । येकांगेंसीं[14] शिबिरीं प्रवेश । करोनी, सर्वही मारिले.' ॥ ९७ ॥ वासुदेव[15] कुरुनरेशा । म्हणे, 'आकर्णी या रहस्या[16] । द्रौणी शरण देववृषा[17] । जावोनी पांचाळ मर्दिले. ॥ ९८ ॥ त्या शिवस्वरूपाची महिमा । मी जाणतसें, भूपाळोत्तमा! । जगद्व्यापक पुराणकर्मा[18] । आदिमध्यांत[19] भूतांसीं. ॥ ९९ ॥ भूतसर्जनवेळे[20] । त्यातें

---

१. 'म्हणसी' असा पाठभेद. २. क्षोभें सांडवलेती=रागानें तुम्हांस सोडिलें. तुमच्यामधील आवेश (सूड घेण्याची इच्छा) नाहींशी झाली, तुम्हांला राज्यलोभच श्रेष्ठ वाटतो (मागें अ० ३ ओंव्या ७३।७४ पहा) इत्यादि द्रौपदीच्या भाषणास उद्देशून हें भीम बोलत आहे. ३. सूर्याच्या तेजास. ४. थंडपण. ५. 'तारांगणीं' असा पाठभेद. ६. माझी इच्छा पूर्ण करून (अश्वत्थाम्याच्या मस्तकांतील मणि आणून देऊन) माझ्या ऋणांतून मुक्त झालास—असा द्रौपदीच्या भाषणाचा भावार्थ. ७. तो मणि द्रौपदीनें धर्माला आपण मस्तकावर धारण करण्याकरितां दिला असें मूळांत आहे (अ० १६, श्लो० ३४–३६ पहा). कदाचित् मूळांत 'राजा' असें पद असल्यामुळें मुक्तेश्वरानें त्याचा 'धर्मराजा' असा अर्थ केला नसेल. श्रीधरांनीं 'पांडवप्रतापां'त [अध्याय ५३ ओवी ८३] पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—'यावरी तो द्रौपदीनें मणी । दिधला धर्मराजयालागुनी । मुकुटीं बांधिला तेच क्षणीं । जैसा गगनीं चंद्रमा. ॥'. पंतही श्रीधरस्वामीप्रमाणेंच वर्णन करितात. [ऐषीकपर्व—अध्याय ३, गीति २१ पूर्वार्ध पहा]. ८. ह्या ओवीच्या पूर्वार्धांतील दोन्ही उपमा मुक्तेश्वराच्या स्वतःच्याच आहेत. ९. चंद्र. १०. (प्रायोपवेशन करण्याकरितां आसन घालून बसली होती त्या) आसनावरून. ११. येथें मुळांतील सोळावा अध्याय समाप्त झाला. १२. ज्या धृष्टद्युम्नानें. १३. 'द्रौणीनें केला ग्रास' असें पाठांतर. १४. एकट्यानेंच. १५. वसुदेवसुत (कृष्ण). १६. गुप्त गोष्टीला, मर्माला. १७. 'सदाशिवास' व 'देवेशा' अशीं पाठांतरें. १८. 'पूर्णकर्मा' असें पाठांतर. ह्या ओंवीचा अन्यपाठ:—'या शिवस्वरूपाची महिमा । जगव्यापक पूर्णकामा । नकळेची देवा पुरुषोत्तमा । आदिमध्यांत भूतांसी. ॥'. अनुशासनपर्वांत शंकराचें असेंच वर्णन आहे:—'ज्ञानैश्वर्य अचिंतित,' ज्या म्हणती, 'आदिमध्यपर्यन्त.' । मोरोपंत, अनुशा० पर्व, ३।३९. १९. प्राणिमात्राचा आदि, मध्य व अंत असा (महादेव). २०. सृष्टि उत्पन्न करण्याचे वेळीं. 'विसर्जनाचे वेळे' असा पाठभेद.

[1]सत्यलोकपाळें । देखोनियां नयनोत्पळें । भूतोत्पत्ति आज्ञापिली. ॥ १०० ॥ भूतांचे गुणदोष । उदकीं प्रवेशे [2]हरितकेश । पुरश्चरणीं स्थापूनि मानस । दीर्घकाळ राहिला. ॥ १०१ ॥ विलंबीं गुंतला ईश्वर; । [3]भूतसर्जना विश्वपितर । पुरुष नेमोनियां अपर । आज्ञापीत भूतोत्पत्ती. ॥ १०२ ॥ [4]तो प्रार्थित स्वपितरातें । म्हणे, 'जळीं निवास शिवातें । जरी अग्रज नसे मातें । तरी प्रजांस निर्मीन.' ॥ १०३ ॥ पिता म्हणे 'तुजपरता । अग्रज नाहीं, निर्मीं भूतां.' । तेणें आज्ञा वंदोनि माथां । प्रजोत्पत्ति मांडिली. ॥ १०४ ॥ भूतग्राम [5]चतुर्विध । स्रष्टा निर्मीत [6]सुबुद्ध । पुढें प्रजांसी क्षुधाव्याध । पीडा करी अपार. ॥ १०५ ॥ ते हे स्रष्टा भक्षूं धांवतां । तेणें [7]प्रार्थिला विश्वपिता । तो म्हणे, 'यांची क्षुधादेवता । [8]वृत्ति देऊनि पूजावी.' ॥ १०६ ॥ ते वेळीं अन्नौषधी लोकपाळें । [9]चराचरीं सबळ निर्बळें । नेमिलीं, [10]तैसीं वृद्धि कुळें । पावतीं झालीं [11]स्वयोनी. ॥ १०७ ॥ ऐसा भूतग्राम वृद्धि पावला । पुढें [12]मर्याद श्रेष्ठ नाशिला; । तेचि समयांतरीं पातला । जळा सांडूनि ईश्वर. ॥ १०८ ॥ [13]बहुरूपधारी वृद्धी प्रजा । देखोनि, तीव्रता क्रोधतेजा । धरेवरी, [14]धराराजा! । लिंग बळें [15]आफळिलें. ॥ १०९ ॥ तें भूमी तिष्ठतां तैसेंची । क्रोध शमवीतसे [16]विरिंची । म्हणे, 'लिंगताडणरुची । किमर्थ [17]क्रोधांची सेविली?' ॥ ११० ॥ [18]लोकगुरू गुरूप्रती । म्हणे, 'प्रजांच्या सृजार्थी । म्यां तपोतेजाच्या आवर्ती । देह दंडिलें आपुलें. ॥ १११ ॥ हें लिंग प्रजोत्पत्तीतें । निर्मिलें, उत्पत्ति भूतभूतातें । जाली, यास्तव [19]हर्षसरितें । विषया द्वयकरें रोधिलें.' (?) ॥ ११२ ॥ ऐसें वदोनी [20]जगत्पती । क्रोधें धरी जाज्वल्य कांति । तपोयोगें, [21]हिमवंतपर्वतीं ।

---

१. ब्रह्मदेवानें. २. 'व्योमकेश' असा अन्यपाठ. ही ओंवी ज्या श्लोकाचें भाषांतर आहे, तो हा :–**हरिकेश**स्तथेत्युक्त्वा भूतानां **दोषदर्शिवान्** । दीर्घकालं तपस्तेपे मग्नोम्भसि महातपाः ॥ ३. विश्वपितर (ब्रह्मदेव) भूतसर्जना (प्राणिमात्राची उत्पत्ति करण्याकरितां) अपर (अन्य) पुरुष नेमोनियां भूतोत्पत्ति आज्ञापीत (भूतोत्पत्ति करण्याविषयीं आज्ञा करिता झाला)–असा सान्वयार्थ. ४. अन्य पुरुष. ५. चार प्रकारचा भूतग्राम. अंडज, जारज, स्वेदज आणि उद्भिज्ज–अशी चतुर्विध सृष्टी. ६. श्रेष्ठ आणि सुबुद्ध (बुद्धिमान्) हीं भूतग्रामाचीं विशेषणें. ७. 'प्रार्थीत' असा पाठभेद. ८. वृत्ति=उपजीविकेचें साधन. ९. 'बलिष्ठांना दुर्बळ आहारवृत्तीस्तव नेमिले' असा मूळांतील भाव आहे. १०. 'तेणें' असें पाठांतर. ११. आपापल्या योनींत. १२. येथें कांहीं अपपाठ असावा. 'मर्यादासेतु' असा तर पाठ नसेलना? १३. 'बहुरूप धरी बुद्धी' असा पाठभेद. १४. पृथ्वीपते (धर्मराजा). १५. आपटिलें. १६. ब्रह्मदेव. १७. क्रोधयुक्त, रागानें. १८. 'लिंगगुरू' असें पाठांतर. १९. अत्यानंदानें. सरिता=नदी. २०. महादेव. २१. मूळांत 'मुंजवत' असें पर्वताचें नांव दिलेलें आहे.

विमन[1] होऊन चालिले. ॥ ११३ ॥ पुढें देवेंयुगीं[2] देवीं । यज्ञ आरंभिला फैळ[3]-भावी । यैज्ञस्थानीं[4] यज्ञद्रवीं । भोगार्हातें[5] पूजिलें. ॥ ११४ ॥ यथातथ्य रुद्र-स्थाना । कळतां न कळे, नरभूषणा ! । देवीं भागाची कल्पना । वर्जे[6] केली, त्या ठायीं. ॥ ११५ ॥ ज्ञानीं जाणोनी व्योमकेश । पातला धरूनि धनुष्य । संगें यज्ञ यैज्ञवेश[7] । कल्पांतरूप संक्षोभे. ॥ ११६ ॥ तेणें धरादेवी पर्वत । कंपायमान विश्वपात[8] । सुटला तारालोकप्रांत । तमोदकीं बुडाला. ॥ ११७ ॥ भास्करसोम आकाशीं । न दिसे, नष्टत्व दिशांसी । रुद्रें हृदयीं यैज्ञरूपासी[9] । तीक्ष्णबाणें ताडिलें. ॥ ११८ ॥ तेणें मृगरूपें यज्ञ । पळे सांडोनियां तें स्थान । अंतिक्रमोनियां[10] गगन । ऊर्ध्व मार्गें गेला पां. ॥ ११९ ॥ भ्रमित जाले वृंदा-रक[11] । हृदयीं शिरकला[12] परम धाक । सवित्र्याचे[13] बाहू त्र्यंबक । छेदोनियां भगनेत्र[14] भंगितू; ॥ १२० ॥ धनुष्यकोटीनें त्रिनयनें । पाडिले पूषाचे दशन, । ते समयीं यज्ञांगें जाण । दिशामार्गें पळताती. ॥ १२१ ॥ धनुष्यकोटीनें देवां रोधी[15] । तेधवां बाणें चापासि छेदी; । यज्ञासहित देववृंदीं । स्तवितां, प्रसन्न जाला पां. ॥ १२२ ॥ सवित्यासि वोपिले पाणी[16] । भगा पूजिलें नेत्रदानीं । पूषा तोषविलें दशनीं[17] । पुन्हा यज्ञ मांडिला. ॥१२३॥ समस्तासी भाग कल्पिलें । तेणें भुवन स्वस्थ जालें । त्याच्या वरदलाभें मारिलें । अश्वत्थाम्यानें तवात्मजा. ॥१२४॥ पांचाळसैन्यीं[18] अन्य शूर । शिवकृपे मारी कृपीकुमर । ईश्वरप्रसादें मेरुगिरिवरें[19] । मशक वाहील मस्तकीं. ॥ १२५ ॥ एवं ईश्वरमाहात्म्य ज्ञानी । जाणोनि वरी शांतिपत्नी । त्याच्या प्रसादें द्रौणायनी[20] । यश घेवोन पळाला.' ॥ १२६ ॥

---

१. विमनस्क, खिन्न. येथें मूळांतील सतरावा अध्याय संपला. २. कृतयुगांत. मूळांत 'देवयुग संपल्यावर' असें आहे. ३. फळदायक. ४. 'यज्ञ स्थापुनी' असा पाठभेद. ५. हविर्भागांचा ज्यांना अधिकार आहे अशा देवतांना. 'भगवानातें' व 'भग हातें' अशीं पाठांतरें. ६. देवांनीं रुद्रदेवतेस यज्ञभाग न देण्याचा विचार केला—असा इत्यर्थ. ७. प्रत्यक्ष यज्ञ यज्ञपुरुषाचें रूप धारण केलेला. ८. 'विश्वघात' असें पाठांतर. ९. यज्ञपुरुषाच्या हृदयावर बाण सोडिला असा इत्यर्थ. १०. 'आक्रमोनियां' असा पाठभेद. ११. देव. १२. 'संचारला' असें पाठांतर. १३. सविता हा यज्ञांतील सोतृ म्हणजे सोमरस काढणारा होता. १४. भग व पूषा ह्या दोन्ही वैदिक देवता आहेत. पैकीं भग हा धनाचा स्वामी आहे, व पूषा हा पशु व इतर प्रकारची संपत्ती यांचा स्वामी आहे. या दोन्ही देवता पुढें आदित्यरूपीच मानण्यांत आल्या आहेत. १५. महादेवानें धनुष्यकोटीनें सर्व देवांचा विरोध केला (अध्याय १८।१८). १६. हात, बाहू. १७. 'दशन देऊनि' असें पाठांतर. १८. 'पांचाळेंसी' असा अन्यपाठ. १९. मेरूएवढ्या पर्वतश्रेष्ठास. २०. द्रोणपुत्र (अश्वत्थामा). ह्या अध्यायास 'भूतोत्पत्तिद्रौणिनिर्भत्सना' असें नांव एका पोथींत दिलेलें आढळतें.

## उपसंहार.

यापरी जन्मेजया! भूपति! । 'सौप्तिक' पावलें समाप्ति । पुढें 'स्त्रीपर्वा'ची स्थिती । कर्णनेत्रीं विलोका. ॥ १ ॥ अष्टादशाध्यायीं जगद्गुरू । वदला व्यास 'सौप्तिक' विस्तारू । तोचि धरोन ग्रंथाधारू । मीहि वदलों गुरुकृपे. ॥ २ ॥ अष्टशत सप्तति श्लोक । व्यासकृत पर्वसौप्तिक । त्याच्या श्रवणें पुण्यत्र्यंबक । अघअंधकार नाशती. ॥ ३ ॥ ग्रंथश्रवणाच्या औषधीं । त्रास मानोन संतापव्याधी । जाती, ऐसें व्यासवैद्यीं । प्रमाण स्थापोनि रूढविलें. ॥ ४ ॥ इति श्रीसौप्तिकपर्वणि । लीलाविश्वंभरश्रीगुरुचरणीं । वदली मुक्तेश्वराची वाणी; । काव्य सज्जनीं परिसावें. ॥ ५ ॥

---

१. यावरून मुक्तेश्वरांनीं स्त्रीपर्व लिहिण्याचें खास मनांत आणिलें होतें असें ठरतें, व कदाचित् सर्व भारत त्यांच्या हातून मराठींत उतरलें गेलें असेल, असें अनुमान करण्यासही जागा होते. २. अष्टशत=८०० व सप्तति=७०. अष्टशतसप्तति श्लोक=आठशें सत्तर श्लोक. मुक्तेश्वरांजवळील सौप्तिकपर्वाच्या पोथींत ८७० श्लोक होते, हें उघड आहे. सांप्रत गणपत कृष्णाजी यांच्या मुद्रालयांत मुद्रित झालेल्या सौप्तिकपर्वांत अठराच अध्याय आहेत, परंतु ग्रंथसंख्या ८०३ आहे—यावरून मुक्तेश्वराजवळ असलेली पोथी ह्या पोथीहून जरा निराळीच असावी, असें दिसतें. परंतु आमच्या जवळील हस्तलिखित संस्कृत सौप्तिकपर्वाच्या पोथींत मात्र बरोबर आठशें सत्तरच श्लोक आहेत. ३. 'व्यासकृत्य' असें पाठांतर. ४. पाप व अज्ञान. 'अवघे अंधकार' असा पाठभेद. ५. औषधीच्या योगानें. ६. व्यासऋषि हेच वैद्यबोवा, त्यांनीं. 'व्यासें वेदी' असें पाठांतर. ७. (१) प्रचारांत आणिलें. (२) वाढविलें. ८. मुक्तेश्वर आपल्या मातापित्यांचा नामनिर्देश 'लीलाविश्वंभर' ह्या सामासिकपदानें नेहमीं करितो. ९. 'सज्जुनी' असें पाठांतर. १०. ह्या पर्वाच्या दोन पोथ्या रा० रा० वि० का० राजवाडे, बी. ए., यांनीं आम्हांस दिल्या; व एक पोथी रा० रा० लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए., यांनीं पाठविली. तशीच रा० रा० वि० ल० भावे, बी. एस्. सी., यांच्याकडूनही एक शुद्ध केलेली प्रत आली. अशा एकंदर चार प्रति आम्हांस मिळाल्या. त्यांपैकीं एकीच्या शेवटीं असा समाप्तिलेख आहे:—'शके १७०१ विकारी नाम संवत्सरे, मार्गशीर्ष वद्य ७ सप्तमी, बुधवार तृतीय प्रहरीं, हस्ताक्षर पांडुरंग भास्कर हरिदास वास्तव्य तळेगांव दाभाडियाचें. ॥'

## ४. शुकरंभासंवाद.[1]

'तुज[2] कामाक्षीचेनि[3] वरें । कामनाजाणीव[4] अंगीं भरें । मग अविकारी[5] विकारभरें अवतरे । इंद्रियासनीं भोगार्थ. ॥ १ ॥ सुरतासनाची हे डाक[6] । तुंज[7]पायीं वाजतां देख । घुमों[8] लागे अधिकाधिक । लोळती लोक तुंजपायीं[9]. ॥ २ ॥ म्हणोनि त्रैलोक्यवेधके! । त्रैलोक्यक्षोभकारके! । तेंपसोमकांत[10] उदकें । मुखेंदुकिरणीं करिताती'. ॥ ३ ॥ ऐशिया अमृतोपम वचनीं । रंभा[11] गौरवी वज्रपाणी[12] । सखियांसहित अप्सरगणीं । तेणें येरी संतुष्ट. ॥ ४ ॥ शक्र[13]वाक्येंदुरश्मिस्पर्शें । रंभा[14]वदनकुमुद विकासे । हस्त जोडणीयाचेनि मिसें[15] । संकोचलीं कर[16]पद्में. ॥५॥ विनय[17] चर्चोनि शरीरीं । रंभा वचन[18]वाटोगारीं । सुरेंद्रश्रोत्रलिंगावरी । पूजा बांधी संभ्रमें[19]. ॥ ६ ॥ म्हणे, 'आज्ञा देईं सुरनाथा! । कवणा विघ्न करूं आतां? ।

---

१. हें प्रकरण महाभारतांत सांपडत नाहीं. परंतु ओंवी ४५९ हींत 'पुढें व्यासाचा संवाद । पुत्रपित्याचा विवाद' असा उल्लेख आला आहे, आणि व्यास व त्याचा पुत्र शुक यांचा संवाद शांतिपर्वाच्या २३१–२५५ अध्यायांत आहे. तसेंच एक ब्राह्मण व त्याचा पुत्र मेधावी यांचा संवादही वरील पर्वाच्या २७७ व्या अध्यायांत आहे. शिवाय या प्रकरणाच्या हस्तलिखित प्रतीच्या अंतींही 'इति श्रीमहाभारते शांतिपर्वणि शुकरंभासंवादो नाम तृतीयोऽध्यायः' असा लेख आहे. ह्यासाठीं आम्हीं 'शुकरंभासंवादा'चा समावेश महाभारतांतील प्रकरणांत केला आहे. २. हें रंभेस उद्देशून इंद्राचें भाषण आहे. 'तुज' ह्या सर्वनामावरून हें पद्य ह्या प्रकरणाच्या आरंभींचें नाहीं, हें स्पष्टच आहे. ३. कामाक्षी नामक देवीचे. ४. इच्छारूपी ज्ञान. 'कामना आंगीं जाणीव भरें' असा पाठभेद. ५. ज्याला विकार नाहीं तो, विरागी, वैराग्यपूर्ण. 'अविकार विकारीं अवतरे' असा अन्यपाठ. ६. कांहीं जातींच्या शूद्रांत मृताचे तेराव्या दिवशीं 'डाक' नांवाचें वाद्य वाजवितात. हें वाद्य चामड्याचें असून, डमरूच्या आकाराचें, पण त्याहून बरेंच मोठें असतें. हें वाजूं लागलें ह्मणजे कोणाच्या तरी अंगांत वारें येतें, व तो मृताच्या इच्छा शिल्लक राहिल्या असल्यास, त्यांचा फाडा वाचतो. येथें रंभा ही सुरतासनाची डाक घुमूं लागली ह्मणजे लोकांच्या अंगांत शृंगाराचें वारें भरतें व ते तिच्याजवळ येऊं लोळूं लागतात, असें वर्णन आहे. ७. 'पराच्या पायीं अडकतां' असें पाठांतर. ८. घुमणें=वाद्यादिकांच्या नादास बाहेर जावयास अवकाश न सांपडल्यामुळें आंतल्याआंत परिपुष्टता पावणें, प्रतिध्वनि होणें. ९. 'तिजपायीं' असा अन्यपाठ. १०. सोमकांत=चंद्रकांत. 'तपसोमकांताचिया उदकें' असें पाठांतर. ११. रंभेला. १२. इंद्र. १३. इंद्राचें वाक्य हेच चंद्राचे किरण, त्यांच्या स्पर्शानें. १४. रंभामुखकमल. कुमुद= चंद्रविकासी कमल. १५. मिषानें, निमित्तानें. १६. हस्तकमळें. 'मुखपद्में' असा पाठभेद. १७. नम्रता. १८. वाटोगार किंवा वाटोगर हें एक प्रकारचें सुवासिक फूल आहे. पुढें ओंवी १८० पहा. १९. (१) सन्मानपूर्वक, आदरानें. (२) हौशीनें, आवडीनें.

स्वर्गा येती त्यांच्या पंथा । अर्गळ[1] होऊनि राहूं? ॥ ७ ॥ घालूं नेमिष्ठांवरी[2] धाडी? । पाडूं योगियांच्या[3] मुरकुंडी? । तपश्चर्येची पोतडी[4] । हिरोनि आणूं या ठायां? ॥ ८ ॥ माझ्या देहाचें वोढण[5] । आड असतां, तुम्हां विघ्न । स्वप्नींही परि नाहीं जाण । दुश्चित्त मन कां करिसी?' ॥ ९ ॥ ऐकोनी रंभेच्या वचना । हर्ष न संटे[6] शक्रमना । आज्ञा देऊनी सुरांगना । शुकाश्रमा पाठविली[7]. ॥ १० ॥ म्हणे, 'वेगीं जाय सुभद्रे[8]! । मदनांगनेसम[9] सुंदरे! । मदनमेखले[10]! मनोहरे! । जेथें वसे तो तपी[11]. ॥ ११ ॥ तया शुका क्षोभवीं बळें । तपा विघ्न करीं वहिलें । समाधि भंगोनी, कामकळे[12] । भुलवोनि करीं आपैसा[13]. ॥ १२ ॥ जैसा निरपेक्ष अयाचित । तोही द्रव्यार्थ होय भ्रमित । कां, तत्वनिष्ठ विवेकवंत । गुरुत्वमानें[14] नाचवीजे; ॥ १३ ॥ तयापरी व्यासतनया । मोहोनि आणीं इया ठाया । जैसें पूर्वी उर्वसीया[15] । विश्वामित्रीं[16]लागोनी.' ॥ १४ ॥ ऐशीं शचीवराचीं वचनें । रंभेनें केलीं कर्णभूषणें । मग शुकमोहार्थ[17] उत्साहमनें । निघती झाली तात्काळ[18]. ॥ १५ ॥ आरूढली दिव्य विमानीं । तेजें लोपले द्वादश तरणी[19] । रत्नमाळा, घंटा, किंकिणी[20] । वरी ढळती[21] चामरें. ॥ १६ ॥ उपमेरहित पुष्पकीं[22] शोभा । शिखरें, गोपुरें, ध्वजस्तंभा । पताका झळकती त्या प्रभा[23] । विद्युल्लता

---

१. अडसर, अटकाव. 'मार्गार्गेळा' असें पाठांतर. २. तपोनिष्ठावर. धाड घालणें=हल्ला करणें. ३. 'यतींचिया' असा अन्यपाठ. मुरकुंडी पाडणें=मोहादिकांचे योगानें निर्बळ करून पाडणें. ४. (पैशांची) पिशवी, गांठोडें, ठेव. 'तपश्चर्येचीं पोतडीं । हिरोनि आणूं तयांचीं' असा अन्यपाठ. ५. वोढण=वोडण=ढाल. ६. न संटे=न मावे, राहीना, आवरेना. ७. 'पाठवीत' असें पाठांतर. ८. शुभांगे. ९. रतीसारखी. १०. मेखला=कमरपट्टा. ११. 'जेथें वसतो तपिया' असा अन्यपाठ. १२. कामशास्त्रांतील कुशलतेच्या योगानें. १३. आपलासा. 'आपैता' असें पाठांतर. १४. मोठेपणानें, श्रेष्ठपणानें, लौकिकाच्या लालचीनें. १५. उर्वशीनें. ह्या देवांगना इंद्राचें एक कोमल शस्त्र असून त्यांच्याकरवीं तो आपली नाजुक कामगिरी सदा करवितो, असें वर्णन ठिकठिकाणीं आढळतें. १६. विश्वामित्राच्या तपास उर्वशीनें विघ्न केलें अशी कथा कोठें प्रसिद्ध नाहीं. त्याच्या तपास विघ्न करण्याकरितां इंद्रानें मेनकेस पाठविलें होतें—अशी कथा आहे. [मुक्तेश्वर—आदिपर्व—अध्याय १५ ओंव्या ११२–१४७ पहा.] १७. 'शुकविग्रहा' असा अन्यपाठ. शुकविग्रहा=शुकाशीं लढण्याकरितां. १८. 'तत्काळीं' असें पाठांतर. १९. तरणी=सूर्य. हे बारा आहेत:—धाता, मित्र, अर्यमा, शक्र, वरुण, अंशुमान्, भग, विवस्वान्, पूषा, सविता, त्वष्टा आणि विष्णु. हे सर्व चालू मन्वन्तरांत कश्यपऋषीपासून अदितीच्या पोटीं जन्मलेले बारा पुत्र होत. २०. क्षुद्रघंटिका, घागऱ्या. २१. 'पाहाळें ढळती चमराचीं' असा पाठभेद. पहाळें=पहाडें, मोठमोठ्या रांगा. २२. विमानांत. २३. प्रभेनें, तेजानें.

लज्जित. ॥ १७ ॥ पैजा बोलोनी शुभानना । प्रतापें चालिली ऋषिकानना । [1]बाळा, मुग्धा, प्रौढांगना । नाना कन्या समवेत. ॥ १८ ॥ [2]हस्तिनी, चित्रिणी, शंखिणी । चांपे[3]गोरटिया पद्मिनी । षोडशवर्षा [4]सुरतासनीं । कुशल कळा जाणत्या. ॥ १९ ॥ [5]कैटकें मांडिलीं शुकावरी । म्हणोनि [6]कामाचीं [7]दळें नारी । साह्य घेतल्या झुंझारी । वैराग्याशीं भिडती ज्या. ॥ २० ॥ वस्त्रें नितंबीं [8]वेष्टिलीं । तेंचि [9]दुर्गें [10]पन्नासिलीं । पुढें निरिया त्याची [11]पौळी । [12]कडेलागीं [13]लगटा. ॥ २१ ॥ चरणीं गर्जती [14]नूपुरें । तींच वाजलीं [15]रणतुरें । [16]योगाभ्यासिया भे[17]दरें । तया ध्वनी सुटताती. ॥ २२ ॥ रक्त रंगाचीं [18]कराग्रें । तींच मिरवती [19]खड्गाकारें । नयनकटाक्षाचेनि शरें । नेमें विंधिती [20]नेमियां. ॥ २३ ॥ उदरीं [21]त्रिवळीचिया रेखा । तेचि कटारा खोंविल्या देखा । [22]पांखरांचीं [22]कुळें ऐका । [23]खेटकाकारें शोभती. ॥ २४ ॥ कठिण कुंचाग्र [24]अणियाळी । तेचि भालियाची [25]फळी । हृदयें नरांचीं कोंवळीं । विदारिती कौतुकें. ॥ २५ ॥ अंगीं चंदनाची उटी ।

---

१. बाळा, तरुणी (=मुग्धा), प्रौढा, वृद्धा, असे स्त्रियांचे वयपरत्वें चार प्रकार आहेत. बाला स्यात्षोडशाब्दा, तदुपरि तरुणी त्रिंशतिर्यावदूर्ध्वं, प्रौढा स्यात्पंचपंचाशदवधि, परतो वृद्धतामेति नारी । (रतिरहस्य). २. हस्तिनी, चित्रिणी, शंखिणी व पद्मिनी असे स्त्रियांचे चार प्रकार त्यांच्या सौंदर्यादि गुणांवरून कामशास्त्रकारांनीं वर्णिले आहेत. [कुक्कोककृत रतिरहस्य–प्रथम परिच्छेद पहा.] ३. चांफ्याच्या (चंपकपुष्पाच्या) कळीसारख्या गौरवर्ण. ४. कामशास्त्रांत. ५. सैन्यें, फौजा. ६. नारी (स्त्रिया) हीच मदनाची सेना. ७. लढवय्या, शूर. ८. 'वेढिलीं' असें पाठांतर. ९. किल्ले. १०. सुशोभित केलीं, शृंगारिलीं. ११. तट. 'निरियाची पौळी' असें पाठांतर. १२. कमरेभोंवतीं. १३. लागलेली. 'क्रीडेलागीं लागटा' असा पाठभेद. १४. पैंजण, चाळ. १५. रणवाद्यें. १६. 'योगाभ्यासीं भेवुरें । तया ध्यानीं सरताती' असा अन्यपाठ. १७. कांपरीं, चळकांप. १८. बोटें. 'करारें' असें पाठांतर. करारें=कर+आरें=हस्त+अंकुर=कोमल हात, करपल्लव. 'आर' हा शब्द ज्ञानेश्वरींतही आढळतो. ज्ञानेश्वरी, १४।१६,१५।७९ व १५।१८४ पहा. १९. तरवारीप्रमाणें. २०. तपोनिष्ठांस. २१. संस्कृत कवींच्या स्त्रीविषयक वर्णनांत रोमलतिका व त्रिवली यांचें नेहमीं वर्णन आढळतें. त्रिवली म्हणजे पोटाला पडणाऱ्या तीन सुरकुत्या किंवा घड्या. रोमलतिका म्हणजे केशपंक्ति. ह्या दोन्ही स्त्रियांच्या उदरभागीं असणें हें शुभचिन्ह जाणून कवींनीं तसें वर्णन केलेलें आढळतें. २२. कृपावलोकनाची मालिका, प्रेमार्द्रदृष्टि (?). 'पाखियाचीं कुडें येका' असा पाठभेद. २३. ढालीप्रमाणें. २४. अणीदार, तीक्ष्ण. २५. फळी=फळ=भाला, बर्ची, इत्यादिकांस जें लोखंडी पातें बसवितात तें.

तेंच वज्रकवच नेहटीं[1] । कस्तुरी रेखिली ललाटीं । तेचि टोप[2] बाणले. ॥ २६ ॥ भंगावया तपोदुर्गें । गजभार[3] प्रेरिला[4] अनंगें । मौंजीं[5] मुखरिणी[6] निजांगें । रंभा मिरवे मृगाक्षी. ॥ २७ ॥ तुरें दुंदुभीचे घोष । भेरी गर्जविती[7] आकाश । रागोद्धारी विणे सुरस । श्रुती[8] देती सुस्वर. ॥ २८ ॥ यावेगळीं अप्रसिद्धें[9] । वाद्यें वाजती नानाविधें । सुरस अमृताचे स्वादें । गंधर्व गायन करिताती. ॥ २९ ॥ ताळमृदंगाच्या मेळीं । नृत्य करिती सप्त[10] तोळीं । राग आलाप गदारोळी[11] । विनोद करिती परस्परें. ॥ ३० ॥ सरिसा[12] वसंत कुसुमाकर[13] । परिमळें भरे अंबरें[14] । आणिक नाना विघ्नाकार[15] । देखतां विकार[16] उपजविती. ॥ ३१ ॥ मैथुन करिती क्षणक्षणा । तया पक्षियांचीं युग्में जाणा । करीं घेऊनी दिव्यांगना । हास्य करिती विनोदें. ॥ ३२ ॥ हंस हंसिणींच्या प्रेमें । मांथा[17] कुरवाळिती संभ्रमें । रमों लागती सकामें । सुवर्णपक्ष पसरोनी. ॥ ३३ ॥ दोन मर्कटें दोहीं करीं । मध्यें सोडिती[18] एक वानरी । दोघे रमतां दों प्रकारीं । कौतुकें नारी हांसती. ॥ ३४ ॥ एकीचे[19] हातीं कस्तुरीमृगें । मुखा मुख लावोनि दोघें । सुरतसुखालागीं स्वांगें[20] । मृग मृगीतरी वोळघती. ॥ ३५ ॥ एकीचे हातीं चित्रीव[21]

---

१. नेहटीं=पहा, समजा. नेहटणें=निरखणें, पाहाणें. २. टोप=शिरस्त्राण. (हें डोक्यास तरवारीचा वगैरे घाव लागूं नये म्हणून घालतात. हें धातूचें केलेलें असतें). ३. हत्तींचा समुदाय. ४. 'पेलिले' असें पाठांतर. ५. (गजभारा) मध्यें. ६. प्रमुख, पुढारी. ७. 'गर्जतसे' असें पाठांतर. ८. कानांस. 'श्रुती देती काहाळ' असा अन्यपाठ. काहाळ=काह्ळ=एक प्रकारचें वाद्य. ९. 'अर्यसिद्धें' असा पाठभेद. अर्यसिद्धें=उत्तम, चांगलीं. (?) १०. सप्त सुरांत. ह्या सप्त सुरांचीं नांवें:—निषाद, ऋषभ, गांधार, षड्ज, मध्यम, धैवत आणि पंचम. हे सात स्वर तंत्रीपासून व कंठांतून उत्पन्न होतात. ह्या स्वरांविषयीं सविस्तर विवेचन भारतीय 'नाट्यशास्त्र' अध्याय २८ यांत आहे, तें पाहावें. [मुक्तेश्वर—सभापर्व (काव्यसंग्रह) पृ० ११ टी० १७ पहा.] ११. मोठी गर्जना, गदगद हंसणें, गडबड. १२. समागमें, जवळ. १३. पुष्पांची खाण. वसंत ऋतूंत नाना प्रकारच्या फुलांस बहार येऊन जिकडे तिकडे सुगंध सुटतो, म्हणून त्यास 'कुसुमाकर' असें म्हणतात. वसंत हा मदनाचा जिवलग दोस्त होय. कोणत्याही पुरुषाला आपल्या जाळ्यांत ओढावयाचें असलें, तर मदन वसंतासह त्याच्याकडे जातो, अशी समजूत आहे. शंकरास कामातुर करण्यास जेव्हां मदन जाऊं लागला, त्या वेळीं त्यानें आपणास साहाय्य करण्याविषयीं वसंतास विनंति केली होती, असें वर्णन 'कुमारसंभवांत' आहे. १४. आकाश. १५. 'विधिकर' असें पाठांतर. १६. कामादिकांपासून मनोवृत्ति चंचल होऊन जी पीडा होते ती. १७. 'माना' असें पाठांतर. १८. 'सोडिली' असें पाठांतर. १९. 'येकीच्या करीं' असा पाठभेद. २०. स्वतः, स्वेच्छेनें. 'चांगें' असें पाठांतर. २१. चित्रयुक्त. 'चित्रीव' हें विशेषण 'कोरीव, ग्विरीव' वगैरे विशेषणांच्या वर्गांतील आहे. पाठभेदः—विचित्र.

पट । चौऱ्यांयशीं [१]आसनांचे प्रगट । मैथुनें लिहिलीं, जीं वीट । वैराग्यातें उपजविती. ॥ ३६ ॥ एकीं उघडे [२]टाकिले कुच । एकीं मुक्त केले कच्छ । एकीं फेडुनी [३]आहाच । वस्त्रें केलीं परौतीं. ॥ ३७ ॥ सुरतासनाची घडमोडी । एक दाविती [४]कडोविकडी । ऐशा विघ्नरूपाचिया [५]कोडी । रंभा घेऊनी पातली. ॥ ३८ ॥ [६]ताळतंत्राचा निर्घोष । गीत गायन करिती सुरस । जेथें वसे शुकयोगीश । तें [७]पुण्यारण्य टाकिलें. ॥ ३९ ॥ तेथें पवित्रतेचेनि तरुवरें । [८]दांगें लागलीं अपारें । ज्याचें नाम [९]घेतां हरे । शीण [१०]तापपापाचा. ॥ ४० ॥ जैसा वनदेवतांचा [११]मेळा । तैसें व्यापिलें वना [१२]सकेळा । किंवा [१३]शक्तीचिया [१३]स्थळा । [१४]कोढीं [१५]कुब्जीं वेढिजे. ॥ ४१ ॥ ममता [१६]लोपी [१७]आत्मप्रभे । [१८]कार्पण्य विटंबी [१९]यशशोभे । [२०]नाना सत्याचें सामर्थ्य दंभें । आच्छादिजे ज्यापरी. ॥ ४२ ॥ तैसें व्यापुनी सर्व वना । शोधीत आल्या तया [२१]स्थाना । त्यातें [२२]वेढोनी अंगना । पहात ठेल्या समस्त. ॥ ४३ ॥ [२३]शुकाभोंवत्या कामिनी । जैशा रत्यर्थ याचकिणी । शुक योगियांचा शिरोमणी । कैसेनि पावे [२४]भ्रमातें ? ॥ ४४ ॥ श्रीरामासन्मुख [२५]शूर्पनखा । उभी व्हावया [२६]निर्नासिका । तैशापरी ते [२७]पुढारीं शुका । रंभा उभी [२८]सखियांशीं. ॥ ४५ ॥ कीं [२९]मोहेंमाहेरींची देवी । कामुकाचे नवस पुरवी । अळंकार

१. कामशास्त्रांतील आसनें (बंध), त्यांनीं युक्त (असे पट). यांविषयीं विशेष माहितीकरितां मुक्तेश्वर–सभापर्व (काव्यसंग्रह) पृ० १३ टी० ११ पहा. २. 'घातले' असें पाठांतर. ३. वरवर, वरच्यावर. ४. खुबीदार, पांचपेंचांचीं व गूढ भापणें. ५. कोटी. ६. झांजा व तंतुवाद्यें यांचा. 'तालपत्राचा' असें पाठांतर. ७. 'पुण्यवन' असें पाठांतर. ८. अरण्यें. ९. 'ऐकतां' असें पाठांतर. १०. 'तापसाचा' असा अन्यपाठ. ११. समुदाय. १२. 'तेथें विचरे वनदेवतामेळ । तैसें वेढिलें वन सकळ । जेविं का शक्तीचें स्थळ । कोढीं कुब्जीं व्यापिलें. ॥' असा अन्यपाठ. १३. जागृत देवस्थानाला. शक्ति=ईश्वराची योगमाया, देवी. १४. ज्यांला कुष्टरोग झाला आहे अशा लोकांनीं. १५. कुबड्या लोकांनीं. देवीची उपासना केली असतां कुष्टरोगादि अंगविकार नाहींसे होतात, अशी समजूत मुक्तेश्वराच्या काळीं प्रचलित असावी, असें वाटतें. १६. लोपवी, झांकी. १७. स्वतेजास, आपल्या शौर्यास. १८. कृपणता. १९. कृपणतेच्या योगानें यश आणि शोभा हीं दोन्हीं प्राप्त होत नाहींत–हा इत्यर्थ. २०. किंवा, अथवा. (मागें पृ० ८८ टी० २३ पहा.) २१. 'शुकाच्या स्थाना' असें पाठांतर. २२. घेरून, सभोंवतीं जमा होऊन. २३. 'शुकासभोंवत्या' असें पाठांतर. २४. भ्रम=अस्थिर मनोवृत्ति, चंचलता. २५. ही रावणाची बहीण. हिचें लक्ष्मणानें नाक कापिलें–अशी कथा आहे. [मुक्तेश्वर–वनपर्व–अध्याय १५ ओंव्या ७५–८०, (काव्यसंग्रह) पृ० २९४.] २६. जिचें नाक कापलें गेलें अशी, नासिकारहित. २७. शुकापुढें. 'योगिया शुका' असें पाठांतर. २८. सख्यांसह. २९. 'ते महाकामेश्वरी देवी' असा अन्यपाठ.

त्याली, तेणें रवी । [१]झांकोळला अंबरीं. ॥४६॥ [२]नागवुनी सुरांच्या [३]श्रेणी । हरि-
तलीं [४]मनोलक्षणनाणीं । तीं सांठवितां [५]हृदयस्थानीं । तेणें आलें [६]जडत्व. ॥४७॥
सांठविलीं तीं [७]सांडती क्षणीं । यालागीं [८]कंचुकीगोणी–। माजी [९]दाटोनी [१०]कसणी ।
विरडें [११]कशी [१२]सुबद्ध. ॥ ४८ ॥ मन्मथोत्सवें मदोन्मत्त । अक्षय तारुण्य [१३]हेलावत ।
कामदृष्टी अवलोकीत । चेंडू झेलीत [१४]सुमनाचे. ॥ ४९ ॥ श्वेत कृष्ण [१५]इक्षुदंड ।
झाडी [१६]तैसा [१७]कामकोदंड । मस्तक [१८]तुकीतसे ब्रह्मांड । उणें मानूनी सौंदर्या.
॥ ५० ॥ जे जे [१९]दिशे न्याहाळी । ते ते [२०]जळे [२१]कामानळीं । ऐसा न दिसे कोणी
[२२]बळी । ज्या काम नुपजे देखिल्या. ॥ ५१ ॥ देव, दानव, गंधर्व, ऋषी, । ब्राह्मण,
महात्म्ये, तपोराशी, । लागतां कामबाणाचे [२३]पाशीं । [२४]पिसे होती [२५]तात्काळ. ॥ ५२ ॥
जिच्या कटाक्षाच्या घायीं । [२६]हुंबतं घायाळ झाले हृदयीं । त्यांतें [२७]उपाय तिसरा
नाहीं । [२८]दुःखशमनार्थ तिजविना. ॥ ५३ ॥ एक [२९]अधरामृतपान । तेंच [३०]रसराज-
सेवन । कुचालिंगन तें लेपन । औषधीचें [३१]वरौतें. ॥ ५४ ॥ असो, ऐशिया-
परी रंभा । धरोनि दांभिकतेची शोभा । शुक छळावयाच्या लोभा । पुढां उभी
विनोदें. ॥ ५५ ॥ [३२]अवलोकी ती शुकाची स्थिती । तो जितेंद्रिय [३३]सत्वमूर्ति ।
चर्चिली निष्ठेची [३४]विभूती । तेणें सर्वांग शोभलें. ॥ ५६ ॥ ब्रह्मरसें [३५]वोतिलें ।
तैसें तेज मुखास आलें । [३६]निश्चयेंकमंडलीं भरलें । ज्ञानोदक सर्वदा. ॥ ५७ ॥

---

१. आच्छादित झाला, तेजहीन झाला. २. नागवणें=द्रव्यहीन करणें, लुटणें. ३. पंक्ति, समूह. ४. मनोवृत्तिरूप नाणीं (पैका, द्रव्य). ५. 'तेणें भरिले कुचकुंभ दोन्ही' असा अन्यपाठ. ६. जडपणा, भार. 'म्हणोनि आलें जडत्व' असें पाठांतर. ७. खालीं पडती. 'सांठविलें तें सांडेल क्षणीं' असें पाठांतर. ८. कंचुकी (चोळी) हीच गोणी, त्या गोणींत. ९. रेटून, चेपून. 'दाटुनियां' असें पाठांतर. १०. कसावयाची दोरी, चोळीचा बंद. ११. आंबळी, घट्ट बांधी. १२. अगदीं घट्ट. १३. उचंबळे, हाले, तरंगे. १४. 'कुसुमाचे' असें पाठांतर. १५. ऊंस. एका देवीच्या वर्णनांत तिचें 'ऐक्षव कोदंड' असल्याचें वर्णन आहे. १६. 'झाडी-तसे' असें पाठांतर. १७. मदनाचें धनुष्य. १८. मस्तक तुकणें=मस्तक डोलविणें, अमुक गोष्ट आपणास मान्य आहे असें दर्शविणें. 'तुळीतसे' असें पाठांतर. १९. 'जे जे दिशा उजू न्याहाळी' असा अन्यपाठ. २०. 'भरे' असें पाठांतर. २१. कामाग्नीच्या योगानें. २२. बळवान्, समर्थ. २३. 'पिशीं' असें पाठांतर. २४. वेडे, पिशाच्चासारखे. २५. 'तत्क्षणीं' असें पाठांतर. २६. विव्हळतात, कुथतात. पाठभेदः–बहु. २७. 'प्रकार' असें पाठांतर. २८. 'निववावया' असा पाठभेद. २९. चुंबन. ३०. उत्तम औषधाचें सेवन. ३१. वरून, बाहेरून. ३२. 'अवलोकितां' असें पाठांतर. ३३. सत्वगुणानें युक्त, मूर्तिमंत सत्वगुणच. ३४. भस्म. ३५. वोतणें=ओतणें=धातूचा रस सांच्यांत ओतून प्रतिमादिक निर्मिणें. 'ब्रह्मरसाचें वोतिलें' असें पाठांतर. ३६. निश्चयरूप कमंडलूंत.

सत्य, धृती, अलोभ, क्षमा, । ऐशी तपोगुणमहिमा। दिधली नसे, तया गरिमा[1] । नाहीं[2] आथिलेपणाची[3]. ॥ ५८ ॥ संकल्पप्राण[4] मनोमृगाचा । गेलिया, निर्विकल्प त्वचा । त्यावरि विदेही तो साचा । पद्मासनीं[5] निश्चळ. ॥ ५९ ॥ '**कृष्णोहमस्मि**'[6] बोध सतत । तेंची कृष्णाजिन[7] उपवीत[8] । मेखळा गाढ[9] दृढ व्रत । मुद्रा[10] मिरवी शांभवी. ॥ ६० ॥ उत्पत्तिविनाशाचीं पातीं[11] । विचारें सारोनी परौतीं[12] । अविनाश नासाग्रीं[13] निरूती । दृष्टि ठेविली निजलक्षीं. ॥ ६१ ॥ परतत्त्वीं[14] लय[15] मनाचा । तेणें उदय प्रसन्नतेचा । संगीं परम धारणेच्या । कुशासनीं[16] मिरवत. ॥ ६२ ॥ अगाध सत्वें सत्वाथिला[17] । ऐसा रंभेनें देखिला । कामदृष्टी[18] अवलोकिला । कटाक्षबाण[19] सज्जोनी. ॥ ६३ ॥ अनुपम्य लीळा लक्षोनि[20] नयनीं । रंभा परम आश्चर्य मानी । "वयें[21] धाकटा परि हा महामुनी । तपोज्ञानें अतिवृद्ध. ॥ ६४ ॥ कीं श्रीतुळशीचें रोप जैसें । दृष्टी पाहतां सान[22] दिसे । परि पवित्रपणें मस्तकीं बसे[23] । विश्ववंद्य **विष्णूच्या;** ॥ ६५ ॥ तेंवि वयासी नाहीं चाड[24] । ज्ञान वसे तोचि वाड[25] । वांचोनि बाभळेचें खोड । काय करावें बहुकाळींचें[26]? ॥ ६६ ॥ असो; ऐसाही जरी जाला । तपोवैराग्यें थोरावला[27] । तरी 'मी जिंकीन' यया बोला । आन[28] नाहीं सर्वथा. ॥ ६७ ॥ पुण्याचें अक्षोभ्य[29] बळ । एकली निंदा करी विकळ[30] । कीं कोटिदानाचे असंख्य

---

१. मोठेपणा. 'दिधली नाहीं' असें पाठांतर. २. 'तया' असें पाठांतर. ३. आथिलेपणा= भाग्य, थोरपण. ४. संकल्परूप प्राण. ५. योगाभ्यासांतील कमळाकार आसनावर. ६. कृष्णः अहं अस्मि=मी कृष्ण आहें.–'सोहमस्मीति' असा अन्यपाठ. ७. हरिणाचें कातडें. ८. जानवें. 'तोचि कृष्णाजिनी उपवीत' असा पाठभेद. ९. दृढव्रत हीच गाढ (बळकट) मेखळा (कमरपट्टा). 'गाढली' असें पाठांतर. १०. मुद्रा=समाधि, ध्यान. शांभवी=शंभू (शंकरा)च्या ठिकाणीं. मुद्रेचे शांभवी, भूचरी, खेचरी इत्यादि अनेक प्रकार आहेत. ११. डोळ्यांच्या पापण्या. १२. दूर, एकीकडे. 'परतीं' असें पाठांतर. १३. नाकाच्या टोंकाकडे. योगसाधन करावयास मनाची व शरीराची स्थिति कशा प्रकारची पाहिजे हें 'भगवद्गीतें'त सांगितलेलें आहे, तें जिज्ञासू वाचकांनीं अवश्य पाहावें [भगवद्गीता–अध्याय ६ श्लोक १३।१४]. 'अविनाश नगरी' असें पाठांतर. १४. ब्रह्माच्या ठायीं. १५. तादात्म्य, तद्रूपता. १६. दर्भासनीं. १७. सत्वगुणयुक्त, सत्वस्थ. १८. सकाम दृष्टीनें. १९. नेत्रकटाक्षरूपी बाण. 'मदनबाण' असें पाठांतर. २०. 'पाहातां' असा पाठभेद. २१. 'म्हणे' असा अन्यपाठ. २२. लहान. २३. 'वसे' असें पाठांतर. २४. गरज, जरूर. २५. थोर, श्रेष्ठ. 'तेंचि वाड' असें पाठांतर. २६. फार दिवसांचें, जुनें. २७. थोर झाला, श्रेष्ठत्व पावला. २८. अंतर, फरक. येथें 'आन' ह्या विशेषणाचा उपयोग नामाप्रमाणें केला आहे. 'मी शुकाला जिंकीन' हें माझें भाषण अन्यथा होणार नाहीं–असा रंभेच्या बोलण्याचा भावार्थ. २९. 'अक्षोभ' असें पाठांतर. ३०. कलाहीन, निस्तेज.

मेळ । निष्ठुर वाक्यें विध्वंसी; ॥ ६८ ॥ तेंवी शुकाचे नेम गहन[1] । भंगोनि, क्षोभवीन मदन । माझिया भोगापुढें तृण । वैराग्य, मानितें, केरीन."[2] ॥ ६९ ॥ ऐसा धिंवसा[3] धरोनि चित्तीं । बोलती झाली शुकाप्रती । तें अनुपम निरूपण श्रोतीं । एकेचित्तें[4] परिसावें. ॥ ७० ॥ 'अहो! सकळ मुनींच्या नाथा! । ज्ञानें-वैराग्यऐश्वर्यवंता![5] । मिनल्या[6] सुकृताच्या सरिता । तपोनिधी! तुजलागीं. ॥७१॥ तुझिया कीर्तीचा सुगंध । विश्वीं[7] फांकिला विशद[8] । यालागीं पावोनियां बोध । मी मधुकरी[9] पातलें. ॥ ७२ ॥ आर्त[10] जनांचा पारिजात[11] । ऐकोनि, आले अभाग्यवंत[12] । भाग्यतेचें आतिथ्य[13] । तुवां केलें पाहिजे. ॥ ७३ ॥ सकळां अभ्यागतचि गुरू[14] । म्हणोनी उचितें[15] आदरू । ऐसा धर्ममार्गींचा विचारू । आलियातें[16] करावें. ॥ ७४ ॥ आसनाभावें[17] तृणासन । अन्नाभावें[18] उदकदान । हेंही न टिके[19], तरी वचन । अमृतोपम बोलावें. ॥ ७५ ॥ तरी सांगें योगींद्रा! महाऋषी! । कोण कामना वसे मानसीं? । निर्वाण[20] तपश्चर्या ऐसी । कोण[21] कोळ मांडिली? ॥ ७६ ॥ वय तरी नव्हे वैराग्याचें । दिसे कर्तव्य अविचाराचें । शिकविलें तें न मनी[22] कोणाचें । ते दुराग्रहाचे सांगाती[23]. ॥ ७७ ॥ जीवात्म्याचे ऐक्यसोसें[24] । परतत्वाचें ध्यानपिसें । न करीं[25] इंद्रियांचे निःशेषें । सर्व यामाजी जाणावें. ॥ ७८ ॥ हें भोजनेंवीण अचवणें[26] । कीं कर्दळी न फळतां खांडणें[27] ।

---

१. दुर्ज्ञेय, फार कठीण. २. 'मानी ते रंभा' असा पाठभेद. ३. भरंवसा, निश्चय. ४. 'येकाग्रचित्तें' असें पाठांतर. ५. 'ज्ञानैश्वर्य–उत्तमोत्तमवंता' असा अन्यपाठ. ६. जमल्या, एकत्र झाल्या. ७. जगांत. ८. उघड, स्पष्ट. ९. भ्रमरी (भुंग्याची मादी). १०. दुःखी. ११. कल्पतरु, इच्छिलेलें फळ देणारें झाड. १२. 'ऐकोनि आले अभ्यागत । अभ्यागताचें आतिथ्य । केलें तुम्ही पाहिजे. ॥' असा अन्यपाठ. १३. भाग्यदानरूपी सत्कार. १४. अतिथी हा सर्वांचा गुरु (=सन्मान्य, पूज्य) होय. अर्थसादृश्यः– गुरुरग्निर्द्विजातीनां, वर्णानां ब्राह्मणो गुरुः । पतिरेको गुरुः स्त्रीणां, सर्वस्याभ्यागतो गुरुः ॥ 'अभाग्यांत' असें पाठांतर. १५. योग्य. १६. प्रत्येक येणाऱ्यास (अतिथीस). 'करावें' ह्या क्रियापदाचें कर्म 'आतिथ्य.' १७. चांगलें आसन नसेल तर. 'आसना थावें' असें पाठांतर. १८. अन्न नसेल तर. १९. हेंही नसेल तर. 'देहीं नेटकें' असा पाठभेद. याच अर्थाचा संस्कृत श्लोकः–तृणानि भूमिरुदकं वाक् चतुर्थी च सूनृता । एतान्यपि सतां गेहे नोच्छिद्यन्ते कदाचन ॥ २०. अत्यंत घोर. २१. केव्हांपासून. २२. न मनी=मानीत नाहीं, मान्य करीत नाहीं, ऐकत नाहीं. २३. ते दुष्ट हट्टाचे सोबती. २४. जीवात्म्याशीं आपलें ऐक्य व्हावें ह्या इच्छेनें. सोस=तृष्णातिशय; उत्कंठा. २५. 'न करीं इंद्रियार्थाचे निरोपें । संयमीचें, साजणें!' असा अन्यपाठ. २६. हात धुणें. २७. तोडणें, कापून टाकणें. 'कदळीनें फळ खांडणें' असा पाठभेद.

शुष्क नदीचें पोहणें । वाळुवंटीं पैं जैसें. ॥ ७९ ॥ न पेरितां जाण शेती । शिमग्यावीण शंखावती[1] । प्रसूतिसमयाची ओर्ती[2] । कुमारीतें[3] ज्यापरी; ॥ ८० ॥ तेवीं[4] ये दशे संन्यासविधि[5] । न घडे, सांडी हे उपाधी[6] । गुंह्यगोष्टी[7] बोल सुबुद्धी । जे जिव्हारीं[8] वसतसे.' ॥ ८१ ॥ मात[9] ऐकूनि रंभेची । मांदी[10] देखोनि स्त्रियांची । म्हणे, 'आजि[11] भ्रांतीची । विपरीत कांहीं दिसताहे.' ॥ ८२ ॥ ऐसें नावेक[12] विचारिलें । ज्ञानदृष्टी अवलोकिलें । 'माझिया तपा विघ्न मांडिलें । हें जाणवलें[13]' सर्वज्ञा. ॥ ८३ ॥ 'रंभा धाडिली अमरनाथें । ते छळावया आली मातें' । ऐसें जाणोनि[14] निश्चितार्थें । बोलता झाला तियेसी. ॥ ८४ ॥ शुक म्हणे, 'सुखवल्लभे ! । नंदनवाटिकेचे[15] रंभे ! । दिव्यकंदर्पकर्पूरगर्भे ! । शृंगारकेळीं[16] केळवसी[17]. ॥ ८५ ॥ ते[18] केळी उपडोनी समूळीं । टाकिलीसे मरुस्थळीं[19] । जेथें जनवार्ता कर्णभूतळीं[20] । विरूढलीं[21] तृणेंचि दुर्लभ. ॥ ८६ ॥ हें घोरारण्य भयानक । विलासियां दुःखदायक । तृषातुरां न मिळे उदक । तेथें आहारार्थ कैं लाहे[22]? ॥ ८७ ॥ ऐशा क्लेशरूप ठाया । तूं आलीस कवणा कार्या ? । कल्याण आहे कीं सुरालया[23] । सुरांसहित इंद्राचें ? ॥ ८८ ॥ दैत्यदानवीं नेदितां त्रास । अमरावती न होतां वोस[24] । तुवां सांडोनि स्वर्गवास । किमर्थ येथें आलीसी ? ॥ ८९ ॥ कवणा प्रयोजना[25]कारणें । तुज येथवरि झालें

---

१. शंखावती=शंख करिती, बोंबा मारिती. येथें मुक्तेश्वरानें 'शंख' या नामावरून 'शंखवणें' असा नवीन अकर्मक धातु उत्पन्न केला आहे असें दिसतें. मुक्तेश्वरास नामधातूंची फार आवड आहे. चमत्कारणें, नमस्कारणें, भस्मणें इत्यादि अनेक नामधातु मुक्तेश्वराच्या कवितेंत मधून मधून चमकतात. २. हौस, आवड. ३. लहान मुलीस, अविवाहित स्त्रीस. ४. 'तेंच' असें पाठांतर. ५. काम्यकर्मांचा त्याग. ६. लचांड, त्रास. 'न घडे हे दंभोपाधी' असा अन्यपाठ. ७. गुप्त गोष्टी, हितगुज. ८. अंतःकरणांत, हृदयांत. ९. वार्ता, हकीकत. १०. समुदाय, मेळा. ११. आजि (आज) भ्रांतीची (भ्रमाची, मायेची) कांहीं विपरीत (विलक्षण तऱ्हा) दिसताहे.— असा अन्वय. 'अति भ्रांतीची' असा पाठभेद. १२. क्षणभर. १३. ज्ञात झालें, माहीत झालें. १४. 'बोलोनि' असें पाठांतर. १५. नंदनवन नामक वाटिकें(बागे)तील रंभे (केळी). १६. शृंगाररूपी केळीं. १७. लोंगर टाकून पसवितेस. १८. 'कोणें' असें पाठांतर. १९. वाळवंटांत, निर्जल प्रदेशांत. २०. 'कर्णवार्तेची कर्णभुली' असा पाठभेद. २१. विरूढणें=उगवणें, वाढणें. 'विरूढी तृणाची' असा अन्यपाठ. जेथें वाढलेल्या गवताचें नांवसुद्धां लोकांच्या कानीं पडत नाहीं—असा ओंवीच्या उत्तरार्धाचा अर्थ. २२. कैं लाहे=कोठून मिळणार ? अर्थात् कांहीं मिळणार नाहीं, असा इत्यर्थ. २३. सुर+आलय=देव+राहण्याची जागा=स्वर्ग. २४. ओस, उजाड, निर्जन. २५. कारणासाठीं.

येणें ? । माझा आश्रम कथिला कोणें । निष्कारण द्वेषियें ? ॥ ९० ॥ म्हणसी महारोगें पीडिलें । तें वैद्यातें शोधी वहिलें । अर्थापासीं स्वार्थार्थिलें । धांवे तंव उचित. ॥ ९१ ॥ तैशी धरोनी जे भावना । तूं आलीस यया वना । ते वंध्या वेलीच्या सुमना-।सारखी निर्फळ जाण,वो ! ॥ ९२ ॥ चंद्रमंडळ भरलें अमृतें । परि तें मृगजल मानवांतें । पाताळधन निर्दैवातें । मृत्तिकेसरी कां न म्हणावें ? ॥ ९३ ॥ पैं वो ! जें अप्राप्त आपणा । तें नाहींच ऐसें जाणोनि मना । कां सुख न द्यावें ? वासना । वाढविणें सखेदू. ॥ ९४ ॥ तैसा तुझा वो ! संकल्प । तो माझ्या ठायीं निर्फळरूप । मी वैराग्यचंपकविटंप । तव कामनाभ्रमरीये. ॥ ९५ ॥ जेणें सर्पे दंशिलें तूतें । त्याच्या विषउतारातें । धन्वंतरी नाहीं येथें । मागें, पुढें, आतांही. ॥ ९६ ॥ ऐसें जाणोनि निःशेषें । न धरीं निराशेची आस । म्हणशी वन पहावयाचा हर्ष । धरूनी येथें आलीयें, ॥ ९७ ॥ तरी सुखें अवलोकीं नयनीं । परि चिरकाळ दुःख पावसी मनीं । म्हणसी ऐसीये कठिण स्थानीं । तूं कैसा वसतोसी ? ॥ ९८ ॥ तरी ऐक रंभे ! सावधान । भूतां भयासुर नव्हे मसण । विषकीटका विष जीवन । जें का गमे मरण दे सर्वां. ॥ ९९ ॥ तैसा मी येथें जाण, । तुज संगेंवीणें न गमे क्षण; । मी निश्चळ, तुझें मन । दाही दिशा धांवत. ॥ १०० ॥ म्यां सांडिली कामाची चाड ।

१. निष्कारण द्वेषी=निष्कारण (कारणाशिवाय) जो द्वेष करितो असा (वैरी). २. 'शोधीत जाय' असें पाठांतर. ३. स्वार्थार्थिलें (स्वार्थ, स्वहित साधणें हीच ज्याची इच्छा आहे, तें) अर्थापासीं (द्रव्याकडे) धांवे (हापापून येतें) तंव (तों, तर) उचित (योग्य) होय. ४. इच्छा, हेतू. ५. ज्याप्रमाणें वंध्या वेलीस फुलें येत नाहींत, त्याप्रमाणें तुझ्या भावनेसही फळें येणार नाहींत (तुझा हेतू परिपूर्ण होणार नाहीं)–असा स्पष्टार्थ. ६. पाण्याचा आभास, खोटें पाणी. ७. दुर्दैवी मनुष्यास. 'निर्द्रव्यातें' असा पाठभेद. ८. मातीप्रमाणें. ९. दुःखदायक, खेदयुक्त. १०. वैराग्यरूपी चांफ्याच झाड. ११. कामनारूपी भ्रमरीला. चांफ्याच्या झाडावर भुंगे बसत नाहींत, कारण चंपकपुष्पांचा सुवास त्यांस आवडत नाहीं, अशी समजूत आहे. येथील चंपक वृक्ष व भ्रमर यांचा हा दृष्टांत मुक्तेश्वराच्या सहृदयत्वाची साक्ष देतो. १२. 'डंखिलें' असें पाठांतर. १३. वैद्यराज. १४. भूतभविष्यवर्तमानकाळीं. १५. पूर्णपणें. 'जाण निःशेष' असें पाठांतर. १६. To hope against hope. हें इंग्रजी वचनही हुबेहूब या वचनाची प्रतिमाच आहे. १७. 'आलीयें' हें 'आलें' किंवा 'आल्यें' ह्याचें मुक्तेश्वराच्या वेळचें रूप. १८. भयंकर. १९. प्राणरक्षणार्थ साधन, अन्न. २०. ह्या तपोवनांत. 'येकाकी' असा पाठभेद. २१. (मनुष्यांच्या) सोबतीशिवाय. २२. स्थिरचित्त. २३. 'धांडोळी' असा अन्यपाठ. धांडोळणें=धुंडाळणें, भटकणें. २४. पर्वा, जरूर, आवड.

तूतें सर्व भोगांचें कोडें[1] । यालागीं मज हें स्थान गोड । अति अवघड तुजलागीं. ॥ १०१ ॥ जो भाव धरोनी पोटीं । मज पाहसी कुटिळदृष्टी[2] । तो अर्थ न लभे, हिंपुटी[3] । जीव न करीं सर्वथा. ॥ १०२ ॥ आतां आलीस जेणें पंथें । तेणें मार्गें शीघ्र परतें, । काळक्रमणा[4] व्यर्थ येथें । कार्येंवीण कां कीजे?' ॥ १०३ ॥ ऐसें शुकाचें निष्ठुर वचन । रंभेसी वाटलें उदासीन । जैसें असाध्य रोगियालागून । निराशा वैद्यें दाविली. ॥ १०४ ॥ पुढती वदे मधुर वाणी । 'अन्यायेंवीण महामुनी ! । वोखटें[5] मानूनियां मनीं । काय ऐसें बोलिजे[6]? ॥ १०५ ॥ मी काय बोलिलें अनुचित । संक्षेपें[7] सांगतसें हित[8] । तितुकें[9] भावितां विपरीत । दुराग्रहेंकरूनी. ॥ १०६ ॥ मोक्षवस्तीची[10] वासना । धरूनी दुराशा[11] ब्राह्मणा[12] ! । यया घोर दारुण वना-।माजी एकटे वसतसां. ॥ १०७ ॥ हे नाना दुःखापदा[13] । व्यथेनें विंधिती रोगव्याध[14] । देहीं शोक संताप खेद । वाढी[15] धरिती आगळी. ॥ १०८ ॥ आधींच शैत्याची धरणी[16] । त्यावरी हिमकाळाची[17] मिळणी । होतां, देहाच्या अंगणीं[18] । व्याधी घालिती गोंधळ. ॥ १०९ ॥ वायू वाजतां झडझांडाडें । स्पर्शतां अंगीं वात चढे[19] । गात्रें होती[20] लांकडें । बळें चाळितां[21] न चळती. ॥ ११० ॥ तृषे न मिळे जीवनें[22] । तेथें भुकेला[23] कैचें अन्न? । ऐसें त्रास देतें स्थान । कैसेनि मन स्थिरावे[24]? ॥ १११ ॥ स्थिर न होतां अंतःकरण । कैसें लागे स्वरूपीं[25] ध्यान? । यालागीं स्वस्थ[26] चित्त तें साधन । बुद्धि ब्रह्मीं मिळावया[27]. ॥ ११२ ॥ चित्त तैंच होय स्वस्थ । जैं भोग[28] भोगुनी तृप्त । एरवीं तुंबा[29]

---

१. हौस, कौतुक. २. वक्र दृष्टीनें, वक्र कटाक्षांनीं. ३. दुःखित, कष्टी. ४. 'परी काळहरणा व्यर्थ येथें । काजेंवीण कां करिसी? ॥' असा अन्यपाठ. ५. वाईट, वांकडें. ६. 'बोलतसां' असें पाठांतर. ७. अगत्यपूर्वक, आग्रहानें. ८. 'स्वहित' असें पाठांतर. ९. 'जितुकें भावितसां' असा पाठभेद. १०. 'मोक्षवस्तूची' असें पाठांतर. ११. ज्या आशेची सिद्धि होणें दुरापस्त अशी (मोक्षप्राप्तीची) आशा, दुष्प्राप्य इच्छा. १२. 'धरूनि आलें दुराशा ब्राह्मणा' असा पाठभेद. १३. 'हे नाना दुःखाचे अपशब्द । वेदने विंधिती रोगव्याध' असा अन्यपाठ. १४. रोग हेच व्याध (पारधी). १५. वृद्धि. 'वोढी' असें पाठांतर. १६. पृथ्वी. 'शैत्यें हे धरणी' असा पाठभेद. १७. शीत काळाची. 'हिमकराची' असा पाठभेद. १८. 'रंगणीं' असें पाठांतर. १९. 'वाढे' असें पाठांतर. २०. 'होऊनि' असें पाठांतर. २१. चलनवलनादि व्यापार सुरू करावयाचा प्रयत्न केला तरी. २२. पाणी, जल. 'तृषा सुटल्या न मिळे जीवन' असा पाठभेद. २३. 'भुकेल्या' असें पाठांतर. २४. 'स्थिर होय' असा पाठभेद. २५. ब्रह्माच्या ठिकाणीं. २६. 'यालागीं स्पष्ट साधन' असा अन्यपाठ. २७. तदाकार व्हावयास. २८. 'जैं भोगभोक्तृत्व' असा अन्यपाठ. २९. भोंपळा. 'येरवीं जळीं बुडविला त्वरित । तुंबा उसळोनि ये वरौता' असा अन्यपाठ.

बुडविला त्वरित । उसळोनी ये वरिता. ॥ ११३ ॥ तैसें मन प्रपंचीं धांवे । साधक पश्चात्तापीं भोंवे । जैसें विवर्ती पडलें तें न पवे । ये थडी, ना ते थडी. ॥ ११४ ॥ कुशाग्रींचें आसन । कीं कंपित पद्मजीवन । तैसें निश्चळ नव्हे मन । बुद्धि ऐकें तैसीच. ॥ ११५ ॥ शरीरदंडनादि तप । ब्रह्मचर्यव्रतसंकल्प । वनवासादि खटाटोप । सांडी संतापदायक. ॥ ११६ ॥ वाक्य माझें ऐक आतां । प्रसन्न व्हावया सुव्रता! । मी आलें, ऐसें चित्ता । सुनिश्चयें मनीं मानीं तूं. ॥ ११७ ॥ भला गा! भला महाप्राज्ञा! । उत्तम वर देईन दाना । जे आवडी असेल मना । तें सुखें मागें मजलागीं. ॥ ११८ ॥ तुझ्या वाक्यसुमनापाठीं । सिद्धिफळाची होय भेटी । म्हणोनि अपेक्षा गोड पोटीं । असेल ते त्वां प्रगटणें. ॥ ११९ ॥ पृथ्वीमंडळामाझारीं । अनर्घ्य द्वीपद्वीपांतरीं । राजकन्या ज्या सुंदरी । गुणलावण्यसमर्था; ॥ १२० ॥ पुष्करद्वीपींच्या पुष्करनयना । श्वेतद्वीपींच्या चंद्रवदना । प्लक्षद्वीपींच्या आरक्तचरणा । अतिप्रवीणा कामशास्त्रीं; ॥ १२१ ॥ कौल्मषद्वीपींच्या हस्तिणी । क्रौंचद्वीपींच्या चित्रिणी । शाकलद्वीपींच्या शंखिणी । व्यांळस्तनी नवयौवना; ॥ १२२ ॥ सिंहलद्वीपींच्या पद्मिणी । दक्षिणदेशींच्या नौंचणी । उत्तरदेशींच्यौ महागायनी । गुर्जरिणी अतिगौरा; ॥ १२३ ॥ ऐशा कुळजा भूपकन्या । चतुर सुरतीं परममान्या । त्या देईन, भाग्यधन्या! । नित्य भोगार्थ तुजलागीं. ॥ १२४ ॥ जरि म्हणसील या मानविणी । तरि पाताळींच्या नागपद्मिणी । शृंगारिल्या अनर्घ्य

---

१. मोक्षप्राप्ति व्हावी म्हणून योगसाधन करणारा. २. गिरक्या खातो. पाठभेदः–भांवें. ३. पाण्याच्या भोंवऱ्यांत. ४. थडी=कांठ, किनारा. ५. कुश=दर्भ. 'सूच्यग्रींचें' असें पाठांतर. ६. 'पद्मावरिल जीवन' असा पाठभेद. पद्म=कमळ. ७. स्थिर, शांत. ८. 'तैसें आश्चर्य मानून । बुद्धि ऐकें तत्वतां' असा पाठभेद. ९. हे सुव्रता! मी प्रसन्न व्हावया आलें–असा अन्वय. १०. अगदीं खात्रीपूर्वक. ११. सिद्धि=कोणत्याही गोष्टीची परिपूर्णता किंवा प्राप्ति. १२. इच्छा, हेतु. १३. 'मोठी' असें पाठांतर. १४. मौलवान्. 'अनर्घ्य रत्नें' असा पाठभेद. १५. निरनिराळ्या बेटांत. पृथ्वीवर सप्तद्वीपें आहेत, अशी समजूत होती. ह्या द्वीपांचीं नांवें पुढें आलींच आहेत. १६. पुष्कर=कमळ. १७. प्लक्ष=पळस. 'कुशद्वीपींच्या' असें पाठांतर. १८. 'शाल्मलद्वीपींच्या' असा पाठभेद. १९. 'हंसिणी' असें पाठांतर. २०. पुष्टस्तनी. 'पीनस्तनी' असें पाठांतर. २१. नायकिणी, कलावंतिणी, नाचणाऱ्या स्त्रिया. २२. 'उत्तरखंडींच्या' असें पाठांतर. २३. उत्तम गाणाऱ्या. 'महागाणी' असा पाठभेद. २४. 'गुज्जरणी' असें पाठांतर. २५. उत्तम कुळांतील. २६. 'सुमान्या' असें पाठांतर. २७. 'मानव' शब्दाचें स्त्रीलिंग. [हा शब्द मुक्तेश्वरकृत वनपर्व. अ० ६ ओं. ९६ हींतही आहे.] २८. 'गुंडिल्या' असें पाठांतर.

रत्नाभरणीं । त्याही आणीन तवाझें. ॥ १२५ ॥ तेणें तृप्त[1] नव्हे मन । तरी स्वर्गमांदूसेचीं[2] रत्नें । जीं श्रवणींच[3] दावितां, मदनें । सकाम कीजे क्लीबांतें[4]. ॥ १२६ ॥ गंधर्वकन्या अतिसुकुमारा । विद्याधरी, दिव्याप्सरा । तुज देईन, या उत्तरा । झणीं अन्यथा मानिसी. ॥ १२७ ॥ याहूनि ऐश्वर्य अधिक । सुखागार[5] इंद्रलोक । तेथें राहोनि अनेक । भोग स्वेच्छ[6] भोगणें. ॥ १२८ ॥ जैशा आवडती मना । अभुक्ता[7] कीं नवयौवना । देवकन्या विचक्षणा[8] । क्रीडें सुखें तयांशीं. ॥१२९॥ कांहीं कल्पिसी संदेहो[9] । उधार[10] बोलणें, कृत्रिम स्नेहो । तरी रोकडा[11] माझा देहो । तुज म्यां भोगार्थ दिधला. ॥ १३० ॥ दिव्यवस्त्रें, स्रक्[12], चंदन । गीत, तांबूल, अमृतपान । आसनशयनादि संपूर्ण । भोग मजशीं भोगीं तूं. ॥ १३१ ॥ जेव्हां पाहिजे जें जें वैभव । तें तें तत्काळ पुरवीन सर्व । आतां ऊठ[13], देई खेंव[14] । अतिप्रीतीनें[15] मजलागीं. ॥ १३२ ॥ संशय सांडोनी मनीं । माझे संगीं इंद्रभुवनीं । चिरकाळ क्रीडें[16] महामुनी ! । नाना सुखें अनुभवीं. ॥ १३३ ॥ अथवा सत्यलोकाआंत । कां, वैकुंठीं वसें गा ! सत्य । शिवसदनीं ऐश्वर्यवंत । होईं सरी[17] शिवांचे. ॥ १३४ ॥ अथवा लौकिकभोगाची कांहीं । वांच्छा वसतसे हृदयीं । तरी पृथ्वीतार्टीचें वाण घेईं । कीर्तिदीपें सोज्वळ. ॥ १३५ ॥ चक्रवतीचें[18] बासिंग । भाळीं बांधोनी सुभग[19] । धरणीबोहलें[20] अभंग[21] । होईं पती सतीचा[22]. ॥ १३६ ॥ एवं तुज जो जो वल्लभ[23] । तो तो कृतार्थ करीन लाभ । आतां कामकार्पण्यलोभ[24] । सांडोनि उठीं गा ! झडकरी.'

---

१. 'तेणेंही तृप्ति न कीजे मनें' असा पाठभेद. २. स्वर्गरूपी पेटींतील. मांदुस=पेटी. ३. ज्यांचीं नुसतीं नांवें ऐकिलीं असतां (पाहिल्याशिवाय)–असा स्पष्टार्थ. ४. नपुंसकांतें. ५. सुख+अगार=सुखाचें घर. 'सुखाच आगर' असा पाठभेद. आगर=मळा, शेत. ६. आपल्या इच्छेस वाटेल त्याप्रमाणें. 'स्वेच्छया' असाही पाठ आहे. ७. ज्यांचा कोणींही उपभोग घेतला नाहीं अशा स्त्रिया, बाला. [हा शब्द मुक्तेश्वराच्या कवितेंत कोठें कोठें आढळतो; मूर्खांचीं लक्षणें–ओंवी ६९; आदिपर्व. अ० १३ ओंवी १०२ पहा.] ८. धूर्त, शाहाण्या. ९. संशय, किंतू. १०. उधार बोलणें=मनापासून जें बोलणें नव्हे, तें. ११. खरोखर, प्रत्यक्ष. १२. फुलांची माळ. १३. 'आतां उठोनि' असें पाठांतर. १४. आलिंगन, मिठी. खेंव=क्षेम. १५. 'परी प्रीतीनें' असें पाठांतर. १६. 'विचरें' असा पाठभेद. १७. शिवाप्रमाणें, शंकरासारखा. १८. चक्रवती=चक्रवर्ती=सार्वभौम राजा. 'चक्रवृत्तींचें' असें पाठांतर. १९. चांगलें, शुभ, रमणीय. २०. पृथ्वीरूप बहुलें. २१. अक्षय, चिरकाळ. २२. ही कोण सती? रंभा आपणास किंवा इतर अप्सरांस सती (साध्वी) म्हणत आहे असें वाटतें. २३. आवडता, प्रिय. हें 'लाभा'चें विशेषण. २४. कामपूर्ति करून घेण्याविषयीं कृपणतेची इच्छा, अर्थात् कामेच्छा पूर्ण करून न घेण्याविषयींची आतुर इच्छा. 'कामनाकार्पण्य' असें पाठांतर.

॥ १३७ ॥ ऐसी अनुवादली रंभा । जैसी मातंगगृहाची शोभा; । परी सदाचारीं आर्त लोभा । पैहावया नुपजेची. ॥ १३८ ॥ कीं वारांगनेचा शृंगारू । नव्हे उत्तमा मोहकरू । कुबेराचा सुवर्णमेरू । निरपेक्षा तृणतुल्य; ॥ १३९ ॥ कीं वोकोनि टाकिजे अन्न । तें अत्यंत गोडीनें चाटी श्वान । निर्मळें अवलोकितां आपण । वांती उपजे विशेष; ॥ १४० ॥ तैसें रंभेचें बोलणें । शुकें वाळोनी सांडिलें मनें । जैसा अनामिकाचा ब्राह्मणें । पाक दृष्टी नाणिजे. ॥ १४१ ॥ यापरि तिचें ऐकोनी वचन । कंटाळलें शुकाचें मन । मग प्रत्युत्तर वदे आपण । अति गंभीर विवेकी. ॥ १४२ ॥ 'रंभे! तुझा वाग्जल्प । वृथा श्रम करिसी पाप । सन्निपाताचा प्रलाप । तैसा मज वाटतो. ॥ १४३ ॥ सुरापानें झाला मत्त । यद्वा तद्वा बडबडीत । सर्पे दंशिला तो म्हणत । अत्यंत गोड कडूतें. ॥ १४४ ॥ सवें चोर जाणितल्यावरी । कोण त्याचा विश्वास धरी? । काय न जळे वैश्वानरीं? । तेथें प्रमाण कायसें. ॥ १४५ ॥ तैसे हे तुझे घातक बोल । स्वहितसुरसें निरस फोल । तुझी बुद्धि जाली बाळ । बोलूं नेणें म्हणूनियां. ॥ १४६ ॥ आतां पुढती हेंचि बोलणें । मजसन्मुख बोलसी वदनें । तरि

---

१. भाषण करिती झाली. २. मांगाच्या घराची. ३. सदाचाऱ्याच्या मनांत लोभाविषयीं इच्छा उत्पन्न होईना. आर्त=इच्छा, हौस. 'आरत लोभा' असें पाठांतर. ४. वेश्येचा. ५. श्रेष्ठ जनांस. ६. मेरूपर्वताइतकें सुवर्ण, सर्व संपत्ति. ७. 'अपेक्षारहिता' असा पाठभेद. ८. 'निस्पृहस्य तृणं जगत्' ही कव्युक्ति प्रसिद्धच आहे. ९. आपण होऊन, आपोआप, सहज. १०. वाळणें=निषिद्ध समजणें, तिरस्कारणें. ११. महाराचा. १२. स्वयंपाक. 'कूप दुरूनि वाळिजे' असा अन्यपाठ. कूप=विहीर, आड. १३. विचारवान्. 'विवेकें' असें पाठांतर. १४. त्रिदोष होऊन विषम ज्वरांतील वायूच्या तारेमधील बडबड. १५. दारू पिऊन. १६. 'कां सुरापानें झाला मत्त । अद्वातद्वा बडबड करीत । सर्पें डंखिला तो म्हणत । अत्यंत गोड विषातें. ॥' असा ह्या ओंवीचा अन्यपाठ आहे. १७. ज्याला सर्प चावला असेल, त्याला कडू व तिखट पदार्थ खावयास दिले असतां, ते गोडच लागतात—असें म्हणतात. १८. पाठभेद:— 'काया.' १९. अग्नीत, विस्तवांत. २०. प्रत्यंतर, पुरावा, भरंवसा. २१. स्वहितरूप उत्तम रसानें (रसासंबंधें, रसाचे बाबदींत) निरस (रसहीन) व फोल (अर्थरहित, व्यर्थ). २२. 'शाहाणीव' असें पाठांतर. २३. बालिश, मूर्ख. २४. 'बोलों नेणसी म्हणोनियां' असा अन्यपाठ. २५. ह्या ओंवीनंतर आमच्याजवळील हस्तलिखित प्रतींत पुढील तीन ओंव्या आढळतात:— 'कृत्रिम चातुर्यचित्रीं वस्त्र । आहाच वरी वेढिलें, आंत छिद्र । कुटिलता काळिमा जे अपार । कंडू उद्भव पापाचा ॥ १ ॥ जेथें जगाचीं स्थूळ छिद्रें । दोष द्रवती निंदाहरें । तऱ्ही अग्नि शमेना आदरें । उंच पाय टाकिसी. ॥ २ ॥ ऐसा ठाव जो कां गूढ । तो या शब्दा करवें उघड । पसरूनि दावितां, निवाड । दृष्टी पडिलें अंतरींचें. ॥ ३ ॥.'

तें निर्फळ [1]हो तुझें वचन । हाचि शाप तूजसी. ॥ १४७ ॥ संसाराचा घे-उनी त्रास । म्यां मांडिला योगाभ्यास; । [2]तो त्रास कैसा, जैं क्लेश । जन्ममरण भोगितां? ॥ १४८ ॥ योनिद्वारें जन्मा आलों । [3]मैसणमार्गें मरोनि गेलों । जावोनि मेलेचि देह पावलों । पावोनि मेलों पुनरपी. ॥ १४९ ॥ शीतोष्ण, [4]क्षुधा, तहान, । गर्भवासाचे कष्ट दारुण । अनेक जन्मीं अनेक जाण, । साहों न शकें ते साहिले. ॥ १५० ॥ ऐकें रंभे! यथार्थ मात । सांप्रत म्हणजे या जन्मांत । [5]अनुताप उपजला अद्भुत । दुःख [6]स्मरोनी मागिलें. ॥ १५१ ॥ पुढती न पवें जन्ममरण । ऐसें [7]निष्काम [8]साधन । साधीतसें [9]मोक्षसदन । परमात्म्यातें पावावया. ॥ १५२ ॥ नाहीं स्वर्गसुखाची [10]आर्ती । नाहीं अमरपदाची प्राप्ती । इंद्रें भय घेऊनि चित्तीं । व्यर्थ तूतें पाठविलें. ॥ १५३ ॥ [11]संडलें प्रेताचें [12]पिशितें । [13]पूयकृमिदुर्गंधिभरित । तें श्वान सेवी त्वरायुक्त । भयें [14]देखे सभोंवतें. ॥ १५४ ॥ तेथें [15]भूपही देखतां दृष्टी । ऐसी भावना करी पोटीं । माझें [16]आ-मिष न्यावया निकटीं । येतसे [17]लवलाहें. ॥ १५५ ॥ तैसे इंद्रादिक [18]म्हणसी श्रेष्ठ । परी ते [19]स्वर्गमर्कट । तपोधन देखोनि, दुष्ट । छळण करीती [20]अपभयें. ॥ १५६ ॥ तैसाची सत्यलोकींचा महिमा । कर्में गुंतला मुख्य ब्रह्मा । तेथें निष्कर्म [21]सायुज्यब्रह्मा । कोण [22]विश्राम पावेल? ॥ १५७ ॥ [23]शिवलोकींचिये वस्ती । शिवपदींही [24]जीवित्वस्थिती । सारखी कर्मक्लेशसंपत्ती । [25]दिसेंत असे विचारें.

---

१. होवो. 'तरि तें निर्फळ होतू सुजाणे!। हाचि श्रापू तयासी' असा अन्यपाठ. २. पाठभेदः— तो त्रास कसा जे का क्लेश । ३. 'मरणमार्गें' असें पाठांतर. ४. भूक. ५. पश्चात्ताप. ६. 'सारोनी' असें पाठांतर. ७. फलेच्छाशून्य. 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' ह्या गीतोक्तींत वर्णिल्याप्रमाणें. ८. 'निजसाधन' असें पाठांतर. ९. 'क्षेमसदन' असें पाठांतर. १०. हौस, आवड. ११. कुसलेलें, नासलेलें. 'सांडिलें' असा पाठभेद. १२. मांस. १३. पू+किडे+घाण यांनीं युक्त (मांस). १४. 'पाहे' असें पाठांतर. १५. राजा. 'तेथें भूपाळही देखत दृष्टीं' असा अन्यपाठ. १६. मांस. १७. जलदीनें, घाईनें. १८. 'म्हणती' असें पाठांतर. १९. स्वर्गांतील माकडें. २०. अपगतभयें, निर्भयपणानें. 'अपभय' याचा 'अस्थानीं भय, निष्कारण भय' असाही अर्थ संभवनीय आहे. 'चेष्टा करिती आप भयें' असा अन्यपाठ. २१. कर्मशून्य अशा सायुज्य-(मोक्ष)रूपी ब्रह्माच्या ठिकाणीं. २२. विश्रांति, विसांवा. या ओंवीचा अन्यपाठः—'ऐसाचि सत्यलोकींचा महिमा । कर्में भूतळा ये मुख्य ब्रह्मा । तेथें निष्कर्म सायुज्य धर्मा । कोण विश्राम पावले? ॥ १ ॥.' २३. 'कैलासलोकाची' असें पाठांतर. २४. 'शिव पाहीं जडत्वस्थिती' असा पाठभेद. २५. 'असे दिसती विचार' असा अन्यपाठ.

॥ १५८ ॥ शत्रुमित्र या परिपाठीं । जीवाचे ठायीं विषमदृष्टी । तरी शिवाचिये लेलाटीं । तृतीयनेत्रवैषम्य. ॥ १५९ ॥ जीव आसक्त स्त्रीसंगीं । गौरी शिवाचे अर्धांगीं । सखी गंगा उत्तमांगीं । मिरवी, हें विशेषें. ॥ १६० ॥ जीवासि जठरीं क्षुधाग्नि पोळी । शिव तीं ठायीं जळे ज्वाळीं । उदरीं, नयनीं, कंठनाळीं । अहोरात्र पोळेंत. ॥ १६१ ॥ त्रिगुणरजें माखिला जीऊ । चिताभस्में लेपिला शिऊ । जीवाहुनी शिवीं बहु । दिसे उपाधी कर्माची. ॥ १६२ ॥ जीव व्यवसायी उदरापुरता । शिवासि त्रैलोक्याची चिंता । ऐशा शिवलोकाची आस्था । नुपजे मज कल्पांतीं. ॥ १६३ ॥ विष्णूसही तैशीच परी । सोंगें घेवून नानाप्रकारीं । अर्धरात्रीचे अवसरीं । बहुरूपी खेळ संपादी. ॥ १६४ ॥ मग डोलें लावूनि युगानुयुगीं । देतसे भक्तांच्या वोळेंगी । दैत्य न भजती, त्यांचे जगीं । पुतळे पायीं मिरवती. ॥ १६५ ॥ म्हणोनि मायेच्या हातातळचीं । तिन्ही बाळकें हीं गुणांचीं । शंका प्रबळ बागुलाची । दाविती, लपविती अव्यक्तीं. ॥ १६६ ॥ यालागीं निर्भय ब्रह्मपद । याचेचि प्राप्तीचा मज वेध । येर हें सेवितां उन्माद । अतिखेद विनाशत्व.' ॥ १६७ ॥ ऐसें बोलिला शुक वरिष्ट । जैसा अमृतनदीचा पोट । रंभा विषलता कडुवट । सेवितां नेये मधुरते. ॥ १६८ ॥ परिस लाविला खापरीं । कैसेन ये सुवर्णसरी ? । वेतें वाढला मलयगिरी । कैसेन ये चंदनत्व ? ॥ १६९ ॥ इक्षुदंडर-

---

१. अमुक मित्र व अमुक शत्रु अशा प्रकारच्या भेदभावाच्या प्रघातानें. हें शिवाचे ठिकाणीं तृतीय नेत्राची विरूपता असण्याचें कारण. २. मस्तकीं. ३. 'शेखीं' असें पाठांतर. ४. डोक्यावर. उत्तमांग=मस्तक, डोकें. ५. 'मिरवी तेथें हा विशेष' असा पाठभेद. ६. तीन ठिकाणीं. (१) पोटांत क्षुधाग्नि असल्यामुळें, (२) कंठांत हालाहल (विष) प्राशन केल्यामुळें व (३) डोळ्यांत अग्नि असल्यामुळें. ७. 'पोळपतू' असें पाठांतर. पळपणें=पेटणें, जळणें. ८. सत्व, रज व तम, हे त्रिगुण; ह्या त्रिगुणरूप धूळीनें. ९. त्रास, दगदग, लचांड. १०. प्रकार, स्थिति. ११. 'धर्मरात्रीचे' असें पाठांतर. १२. 'बहुत' असें पाठांतर. १३. नोकझोंक, खुबी. १४. वोळगी=वोळगें=सेवा. १५. पुतळे पायीं मिरवणें=पुतळे करून पायांस बांधणें, तुच्छ मानणें. हाच शब्दसमूह मुक्तेश्वरानें अन्यत्र योजिला आहे. [विराटपर्व–अध्याय २ ओंवी ५० पहा.] १६. तळहातावरील, ताब्यांतील. १७. ब्रह्मा, विष्णु व महेश हीं तीन बाळकें. १८. त्रिगुणांनीं युक्त. १९. (आपणास) अव्यक्तस्वरूपीं लपविती. २०. 'विनाशत्वें' असें पाठांतर. २१. प्रवाह, ओघ. २२. मधुरते नये=मधुरपणा धरीना. २३. सोन्याची बरोबरी. २४. 'वेल वाढे पां मलयगिरी । कैसेंनि चंदन होईल' असा अन्यपाठ. २५. ह्या पर्वतावर चंदनाचीं अरण्यें आहेत, अशी प्रसिद्धी आहे. २६. उंसाचे रसाचे पाण्यांत.

साचे नीरीं । लावियल्या विषवल्लरी[1] । पालट नव्हे, तैसीपरी । पाखंडीया[2] सत्संगें. ॥ १७० ॥ अमान्य करोनी शुकवचना । रंभा म्हणे, 'ऐक ब्राह्मणा ! । शृंगारशास्त्रीं न होवोनि शाहाणा । वंचलासी[3] सुखातें. ॥ १७१ ॥ विषयेंद्रियां[4] घालोनी जोडी[5] । नेणसी शरीरसुखाची गोडी । स्त्रीसंगाची अर्ध घडी । क्लेश नाशी जन्माचे. ॥ १७२ ॥ प्रत्यक्ष विषयसुखाचें कनक । सांडी-तांक्षणीं नाडिले मूर्ख । मोक्षदेहें नाशाची राख । मागती भीक तीलागीं. ॥ १७३ ॥ भरली अमृताची कनकवाटी । हातींची सांडोनि, करंटीं[6] । धांवती मृगजळापाठीं; । तैसी गोष्टी वैराग्या. ॥ १७४ ॥ ऐक[7] विषय इंद्रियां पावे । तें सुख सर्वेंद्रियें भोगावें । सर्वेंद्रिय भोगासवें । तें सुख दैवें सभाग्या. ॥ १७५ ॥ आधींच नरदेह अनर्घ्य रत्न । विशेषें[8] तारुण्यपरिसाचे[9] गुण । जोडलें बहुत सुकृतेंकरून[10] । परि परीक्षकहीना सांपडलें. ॥ १७६ ॥ अजारक्षका[11] अविचारा । हातीं पडलिया[12] हिरा । तेणें रक्षावया तया क्षेत्रीं[13] । यमनियमीं गोफणिलें[14]. ॥ १७७ ॥ आयुष्याचिये तातडी । तारुण्यदशाचि सुखाडी[15] । भोग भोगी चढोवडी[16] । धन्य तो एक दैवाचा. ॥ १७८ ॥ वसंतमासीं मनोहर । वना पातला कुसुमाकर[17] । पुष्पजाती देती संभार । उचितें[18] नाना सुमनांचे. ॥ १७९ ॥ जाईजुई, राजसेंवती, । मंदार, वाटोगरे[19], मालती, । चंपक, पांटला[20], पारिजाती, । वोट[21] पाहती

---

१. विषाच्या वेली. 'वाढली काचकुहिरी' असा पाठभेद. २. पाखंडी मनुष्यामध्यें साधुजनांच्या संगानें कांहीं फरक होत नाहीं, हा इत्यर्थ. ३. अंतरलास, आंचवलास. ४. विषय व इंद्रियें यांची. विषय=उपभोग घ्यावयाच्या वस्तू. इंद्रियें=विषयांचा उपभोग घ्यावयाचीं साधनें. ५. गांठ. ६. दैवहीन प्राणी. तुच्छता किंवा हीनत्व दर्शविण्याकरितां नपुंसकलिंगी प्रयोग केला आहे. ७. ही ओंवी आमच्याजवळील हस्तलिखित प्रतींत नाहीं. ८. विशेषेंकरून. ९. 'तारुण्यपरिसाचा गुण' असा पाठभेद. १०.पुण्याच्या योगानें. ११.विचारशून्य मेंढपाळाच्या. १२. 'हातीं सांपडलें अचतुरा' असा अन्यपाठ. १३. शेतास, (पक्षीं) शरीरास, नरदेहास. 'इदं शरीरं कौंतेय ! क्षेत्रमित्यभिधीयते.' [भगवद्गीता—अ० १३।१.] येथें 'तपोक्षेत्रा' असा अन्यपाठ. १४. गोफणींत घालून भिरकावून दिलें, दगडासमान मानून फेंकून दिलें. एखादा मूर्ख शेतकरी हिऱ्याला गारगोटी मानून गोफणगुंड्याऐवजीं त्या हिऱ्याचा शेताची राखण करण्याकडे उपयोग करितो, तसा कामशास्त्राची माहिती नसलेला पुरुष सुंदर स्त्रीरत्न यमनियमादि साधनांच्या योगानें दूर भिरकावून देतो,—हा ओंवीचा भाव. यमनियम=दोरीचे वेढे, गांठी वगैरे. (पक्षीं) योगसाधन. १५. सुखसमृद्धि. १६. चढाओढीनें, ईर्षेनें. १७. वसंतऋतु. १८. पुष्पजाती नाना सुमनांचे (फुलांचे) संभर (समुदाय) उचित (नजराणे) देती—असा अन्वय. १९. बटमोगरा (?). २०. रक्तवर्ण लोध्रपुष्पाचें झाड. २१. 'पाट वाहाती' असें पाठांतर.

परिमळें. ॥ १८० ॥ तैशी [1]पुष्पवती प्रमदा । देखोनि [2]वल्लभ चढे अत्यानंदा ।
मग संघटे सुरतयुद्धा । [3]तैसें भ्रमरा होतसे. ॥ १८१ ॥ किंवा [4]उमाधवाचे पूजे ।
वना माधवें केलें [5]बिजें । पुष्पांजळी वोपिती सहजें । वनस्पती [6]भूलिंगीं. ॥ १८२ ॥
नारिंगी आणि [7]क्षीरबोरी । साखरनिंबोणिया रसभरी । फळें दावोनी अंतरीं ।
आठव देती स्तनांचे. ॥ १८३ ॥ आम्रफळें बिल्वफळें । कठिन वर्तुळ ताळ-
[8]फळें । [9]स्त्रीस्तना जिहीं त्येजिलें । तें आठवोनी पडताती. ॥ १८४ ॥ जिहीं
तारुण्यदशेचीं कौतुकें । वर्जिलीं कुचालिंगनसुखें । त्यांच्या हृदयींचीं स्मरोनि
दुःखें । पक्व दाळिंबें [10]उकलेलीं. ॥ १८५ ॥ तेथें [11]रमणीय सरोवरें । आच्छा-
दिलीं [12]पद्मिणीपत्रें । कामिनीअधरामृत [13]अधरें । जेंवी लोपलें [14]जनदृष्टी. ॥ १८६ ॥
भ्रमराचिये श्रुतीवरी । कोकिळा गाती रागोद्धारीं । मृदंगशब्दें [15]जळलहरी । [16]तीरीं
आंदोळती सुताळें. ॥ १८७ ॥ तया ताळावरी [17]स्वानंदें । मयूर नाचती आनंदें ।
हे देखोनि हृदय [18]विंधे । [19]पुष्पधन्वा [20]निजशरीं. ॥ १८८ ॥ मंडप [21]शोइले [22]केत-
कीदळीं । स्तंभीं लाविल्या कर्पूरकदळी । कुंडें भरलीं सुपरिमळीं । वाळियांचीं
घमघमीत. ॥ १८९ ॥ माजी सुमनांचिया सेजा । दाट घालोनियां [23]वोजा ।
कर्पूरोदकें [24]सिंपोनि, माजा । मन्मथातें आणिती. ॥ १९० ॥ कंठीं [25]आपाद
सुमनहार । सुमनांचीं वस्त्रें विचित्र । [26]वेष्टुनी कामिनींचा भार । मध्यें [27]विलोसी

---

१. रजस्वला, तरुण. 'पुष्पवनीं' असें पाठांतर. २. पति, भ्रतार. 'वल्लभो दयितेऽध्यक्षे सल-क्षणतुरंगमे' इति कोशः. ३. 'तेवीं षट्पदा होतसे' असा पाठभेद. ४. शंकराचे. ५. गमन. ६. पृथ्वी हीच महादेवाचें लिंग त्यावर. ७. 'द्राक्षी' असें पाठांतर. ८. पाठभेदः—'ताळ-कौळें.' कौळें नारिंग नांवाचें एक फळ आहे. ९. जिहीं स्त्रीस्तना त्यजिलें (=ज्यांचें स्त्रीस्तनांशीं साम्य नाहीं), [तीं] तें आठवोनी [खालीं] पडताती. स्त्रियांचे स्तन कठिणपणांत, वर्तुळाकारांत किंवा सरसत्वांत आपल्याहून श्रेष्ठ आहेत, हें पाहूनच जणूं काय आम्रफळें, बिल्वफळें, व ताडफळें केवळ लज्जित होऊन खालीं गळत होतीं, हा ओंवीचा भाव आहे. १०. 'उललिया' असें पाठांतर. ११. 'रमणीक' असें पाठांतर. १२. कमलपत्रांनीं. १३. ओंठाच्या योगानें. १४. लो-कांच्या नजरेपासून. 'जें वोपिलें जनदृष्टी' असा पाठभेद. १५. पाण्याच्या लाटा. १६. (सरोव-राच्या) कांठावर. १७. 'विनोदें' असा पाठभेद. १८. विंधी, भग्न करी. १९. मदन. २०. 'निजकरीं' असा अन्यपाठ. २१. 'शिवले' असा पाठभेद. २२. केतकीच्या दळांनीं (पा-नांनीं). 'केतकीतळीं' असें पाठांतर. २३. स्वच्छतेनें, नीट व निर्मळ. २४. 'सिंपिती' असा अन्यपाठ. २५. पायांपर्यंत रुळणारे पुष्पहार. २६. 'वेढुनी' असें पाठांतर. २७. 'विलासें' असें पाठांतर.

विराजे. ॥ १९१ ॥ तेथें एकी बाळस्तनिया । कुसुमकळिया ऐशीया अणिया[1] । निघती जैशा चांदणिया । गौरपणें दिसताती. ॥ १९२ ॥ एकीचीं जैशीं सिंगी-फळें[2] । कठिण आणि वर्तुळें । सुरंग नारिंगाचीं युगळें । तैसे एकीचे मिरवती. ॥ १९३ ॥ एकीचे जैशीं राजबेलें । एकीचे जैसे पुष्पझेले[3] । बचके धरितां अणियाळे[4] । कनककलशासारिखे. ॥ १९४ ॥ कंटकहीन कनकफळें[5] । एकीचीं अर्कफळें[6] जावळें[7] । एकीचे स्थूळ नारिकेळें[8] । करिकुंभासारिखे[9]. ॥ १९५ ॥ सिंधुशत्रूचें[10] जन्मस्थान । तैसे एकीचे पीन[11]स्तन । मदें भावोनी करीन[12] । शुंडा घालीत स्वानंदें. ॥ १९६ ॥ कंदुक मढियेले मुक्तजाळीं[13] । तैसीं एकीचीं बा-टोळीं । तैंगटियेलीया[14] कांचोळी । हारावळी त्यावर्त्या[15]. ॥ १९७ ॥ स्त्रीकदं-बाच्या[16] तर्के । इंदुची उगवला ऐसीं मुखें । दर्पणपद्मांचीं कौतुकें । कवीश्वर साम्य बोलती. ॥ १९८ ॥ नयन नव्हती, चपळ मीनें[17] । कुमुद म्हणों[18] कीं मदनबाण । जिकडे करिती संधान । त्यजती प्राण नरमृगें[19]. ॥ १९९ ॥ सुवर्ण कलशाचीं[20] युग्में । उरोज[21] भासती गुच्छोत्तमें । किंवा पक्षबळाचे गरिमें । उड्डाण व्योमीं करिजेती. ॥ २०० ॥ द्वादश[22] आंगीं अळंकारीं । भासती सौदामिनीचिये[23] सरी । किंवा नक्षत्रांचिया हारी[24] । कनकवल्ली[25] शोभती. ॥२०१॥ शाल्मलीतरूचीं[26] कुड्मळें । किंवा कटुक कटीफळें[27] । वृंदावनाहूनि[28] वर्तुळें । क-

---

१. टोकें, बोंडी. (कुचचुचूक.) २. सिंगीफळें म्हणजे पोफळें असावीं. शृंगारिन्=पोफळी. 'पुगीफळें' असा पाठभेद. ३. पुष्पगुच्छ. ४. अणकुचीदार. ५. धोतऱ्याचीं फळें. ६. रुईचीं फळें. ७. जुळीं, दोन. ८. नारळ. ९. हत्तीच्या गंडस्थळाप्रमाणें. १०. सिंधु (समुद्र)+शत्रु=अगस्त्यऋषि, त्याचें जन्मस्थान=कुंभ. कुंभाकार स्तन होते-असा इत्यर्थ. ११. पीन=पुष्ट. १२. करि+ईन=मोठा हत्ती. १३. मोत्यांच्या जाळीनें. १४. वर्खानें मढविला. चोळ्यांवर चमक्या, कशिदा किंवा खडी काढविण्याचा प्रघात अद्याप प्रचारांत आहे. १५. या ओंवीचा पाठभेदः-कंचुकी मढिली मुक्तजाळीं । तैसे एकीचे कंचुकमेळीं । शोभती मुक्तप्रवाळीं । हारावळी त्यावरौत्या. ॥ १६. स्त्रीसमुदायाच्या. 'कंदुकाच्या' असा अन्यपाठ. १७. मासे. १८. 'म्हणोनी' पाठांतर. १९. मनुष्यरूपी हरिणें. 'घेती प्राण जपकांचे' असा अन्यपाठ. २०. 'कळसाचीं' असें पाठांतर. २१. स्तन. २२. द्वादश आंगें कोणतीं? २३. विजेप्रमाणें. २४. ओळी, रांगा. 'हिरी' असें पाठांतर. २५. सुवर्णलता. 'कनकवल्लरी' असा अन्यपाठ. २६. शेवरीच्या झाडाच्या कळ्या. 'कुचमंडळें' असें पाठांतर. २७. कटी=लांबट मिरीं. 'किंवा कंदुक कुंटीफळें' असा अन्यपाठ. २८. कंवडळाहून.

ठिण युगुळें दाटलीं. ॥ २०२ ॥ वनिताहृदयीं[1] कुंभलक्षणें । मदनाचें सर्वस्व ठेवणें । कस्तुरीमुद्रिका[2] खुणे । वरी कसणें चोळीचें. ॥ २०३ ॥ किंवा लागेल[3] जैनदृष्टि । म्हणोनि सृष्टिकर्ता परमेष्टी । अंजन[4] घेवोनियां स्वबोटीं । लेप केला मुखाब्जीं[5]. ॥ २०४ ॥ किंवा जैनदृष्टिकाळिमा[6] । पाहोनि जाली स्तनयुग्मा । योगियांची शापमहिमा[7] । लज्जावसनीं निघाली. ॥ २०५ ॥ ऐसीं स्त्रियांचीं कुचयुगुळें । जो आपुलेनी वक्षःस्थळें । निरंतर मर्दोनि मवाळें[8] । गाढालिंगन न करीची; ॥ २०६ ॥ प्रमदावक्षःस्थळ शाळुंखा । पयोधर पिंडी त्या सुरेखा । स्वहस्तें चंदन लावोनि जो कां । हृदयनिवेदन[9] न करीची; ॥ २०७ ॥ देहस्थ आत्मया[10] शिवाचा कोप । होवोनि हाचि घडे शाप । जो जपतपादि संताप । जांचणी[11] मांडी देहाची; ॥ २०८ ॥ संभोगक्रीडेच्या काळीं । हस्तद्व[12]-याच्या निमेळीं । जो खेळूनि स्तनाची चेंडूफळी । हारी नाणी[13] वनितांतें; ॥२०९॥ जो स्त्रियांपुढें मोडिलें[14] । म्हणोनि त्यांहोनि हीन बोलिला । सेखीं[15] नपुंसकेंही जिंकिला । पुरुषत्व असोनि अभागी[16]. ॥ २१० ॥ ऐसीं[17] यौवनाचे ठायीं । सौख्य न भोगी कांहीं । [18]तो जितेंद्रिय जैसा अही[19] । वायु भक्षी विवरस्थ[20]. ॥ २११ ॥ धिग् धिग् त्याचें जौलें[21] । धिग् धिग् त्याचें अभ्यासिलें । जळो तयाचें तप, जें फळलें । देहदंडण दुःखेंसीं. ॥ २१२ ॥ तृणाचा कृत्रिमपुरुष[22] । [23]क्षेत्रीं उभा रक्षीत पीक । त्या साच मानिती जंबुक[24] । परि नव्हे सजीव नि-र्धारें. ॥ २१३ ॥ तेंवि तयाचा वृथा देहो । प्रेतांहूनि[25] अधिक पां हो । जो कांतासंगीं नेघे लाहो । विषयभोग सुखाचा.' ॥ २१४ ॥ ऐसी रंभा बोललिया-

---

१. स्त्रियांच्या हृदयाच्या ठिकाणीं कुंभाचीं (घटाचीं) सर्व लक्षणें दृग्गोचर होतात.• तीं लक्षणें कशीं तर स्त्रीहृदयाचे ठिकाणीं मदनाचें सर्वस्व ठेवलेलें असतें व घटामध्यें सामान्यजन द्रव्यादि ठेवितात—असा स्पष्टार्थ. २. मुद्रिका=मुद्रा, शिक्कामोर्तब. ३. दृष्टि लागणें=दृष्टिबाधा होणें, दृष्ट पडणें. ४. काजळ. ५. मुखकमळास. ६. जनदृष्टि हीच काळिमा (काळेपणा). पाठभेदः—किंवा जनदृष्टि तोची काळिमा । पाहों जाले स्तनयुग्मा । ७. 'ज्ञानमहिमा' असा पाठभेद. ८. मृदु, कोमळ. ९. हृदयाचें अर्पण. 'हृदयीं वंदन' असा अन्यपाठ. १०. आत्मारूपी शिवाचा. ११. त्रास, दुःख. १२. 'हस्त चौगुणा क्रिडोनि बळी' असा पाठभेद. १३. जो वनितांतें हारी नाणी=जो स्त्रियांस जिंकीत नाहीं, त्यांचा पराजय करीत नाहीं. १४. विन्मुख झाला, ज्यानें हार खाल्ली असा. १५. शेवटीं, अखेरीस. १६. दुर्दैवी. 'अभोगी' असा अन्यपाठ. १७. 'ऐशा वनाचे ठायीं' असा अन्यपाठ. १८. 'जो' असें पाठांतर. १९. सर्प, साप. २०. बिळांत राहणारा, (पक्षी) गुहेंत राहणारा. 'वनस्थ' असा पाठभेद. २१. जालेपण, उत्पन्न होणें, जन्मास येणें. २२. बुजगावणें, बाहुलें. Scare-crow. २३. 'शेतीं' असा पाठभेद. २४. कोल्हा. २५. 'प्रेतही नव्हे पा वाहो' असा पाठभेद.

वरी । शुक [1]आश्चर्यहास्य करी । म्हणे, '[2]कैसी भ्रमचक्रीं । पडिली असे [3]अविद्या.
॥ २१५ ॥ [4]बोले तितुकें विपरीत । जैसें [5]वोडंबरीचें वित्त । विषा नाम ठेवूनि
अमृत । सेवा म्हणे पुढिलांतें. ॥ २१६ ॥ [6]कीं [7]मैंदाचें साजणें । कीं पारिधी-
याचें [8]आळवणें । किंवा कंठभूषणा [9]अर्पणें । उचित काळसर्पाचें. ॥ २१७ ॥
तैसी रंभेची वचनोक्ती । जे [10]सांच मानिती चित्तीं । ते प्रत्यक्ष आत्मघाती ।
नाहीं यदर्थी संदेहो. ॥ २१८ ॥ वाग्निश्चय नरकाचा । इहीं उत्तरीं होय
साचा । जिहीं मनातें [11]पोकळ पांचां । [12]विषयांहातीं दीधलें; ॥ २१९ ॥ मोक्ष-
रवीच्या दर्शनदृष्टी । जिहीं फोडिली आपुली [13]विचारदृष्टी । जे साच मानोनि या
गोष्टी । हांव धरती भोगार्थ.' ॥ २२० ॥ [14]ऐसीं निश्चयी श्रीशुक । बोलता
झाला निजविवेक । जेणें [15]विषयकामनापंक । [16]शोषोनि जाय श्रोत्यांचा. ॥ २२१ ॥
'रंभे! ऐक यथार्थ बोला । तो एक येथें जितेंची [17]मेलों । जो नरदेह पावोनि
वहिला । आत्मसाधन न करीची. ॥ २२२ ॥ तें कैसें [18]लक्षण म्हणसी । तरी
ऐक सांगेन तुजपाशीं । [19]नित्यानित्यविवेक ज्यासी । [20]नेणवेची अज्ञानें. ॥२२३॥
इंद्रियें करूनी [21]मांर्जारें । राखे [22]विषयमूषकद्वारें । उघडे विषयीं अविचारें । तोंड
[23]शुची [24]वारितां. ॥ २२४ ॥ तेथें क्षमा, संतोष, विवेक । चौथा साधुसंग देख ।

---

१. 'आश्चर्ये हास्य' असें पाठांतर. २. 'भ्रमाचिया चक्रीं' असें पाठांतर. ३. अज्ञानमूर्ति (रंभा). ४. 'बोल तितुके' असा अन्यपाठ. ५. गारुडीविद्येच्या योगानें उत्पन्न केलेलें वित्त (द्रव्य). वोडंबरी=गारुड्याची मंत्रविद्या. ६. 'अथवा' असें पाठांतर. ७. मैंद=फांसेपारधी, मनुष्यास मोहपाशांत घालून लुटणारा, ठक. साजणें=मैत्री. ८. आळवणें, प्रसन्न करण्याची खटपट करणें. 'सुशील वर्तणें' असा अन्यपाठ. ९. नजराणा, देणगी. १०. खरी. 'साचार' असें पाठांतर. ११. अर्थरहित, व्यर्थ. हें 'विषयां'चें विशेषण. १२. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पंचविषय. १३. विचाररूपी दृष्टी ज्यांनीं फोडिली=जे विचारांध (विचारशून्य) झाले असे. १४. 'ऐसेनि निश्चयें' असें पाठांतर. १५. विषयेच्छारूपी पंक (चिखल). १६. 'वोहोटोनि' असा अन्यपाठ. वोहोटणें=ओहोटणें, कमी होणें. १७. जीवंत असूनही मेल्यासारखा. १८. 'तों तूं क्लीबलक्षण म्हणसी' असा अन्यपाठ. १९. नित्य (शाश्वत) आणि अनित्य (अशाश्वत) वस्तूविषयीं विचार करणारा (योगी). २०. (सामान्य लोकांस) अज्ञानामुळें ओळखतां येत नाहीं—असा भावार्थ. 'नेणें वचनीं अज्ञान' असा पाठभेद. २१. मांजरें. २२. विषयरूपी मूषकांच्या (उंदिरांच्या) योगानें. २३. शुची (पवित्र पुरुषानें) वारितां (निषेध केला तरी) अविचारें (अविचारानें) विषयीं (विषयांचे ठायीं) तोंड उघडे (उघडतो, विषयप्राप्तीस्तव खटपट करितो)—असा सार्थान्वय. २४. 'तोंडें स्तुती वारितां' असा अन्यपाठ.

हे मोक्षद्वारींचे निष्टंकें । द्वारपाळ अर्जिले. ॥ २२५ ॥ त्यांशीं वोळखी असे जया । माजी प्रवेश होये तया । त्यांतें नोळखे जो प्राणिया । तो भवगर्तें लोटिजे. ॥ २२६ ॥ म्हणोनि तोचि ये संसारीं । ज्ञानहीन प्रेतशरीरी । अमंगळ विषयविष्ठेवरी । तनु पाळी शूकरन्यायें. ॥ २२७ ॥ धिग्धिग् तयाचें श-

---

१. खरे, पक्के. ओंवी २२४ व ओंवी २२५ यांच्यामध्यें हस्तलिखित प्रतींत पुढील ओंव्या आढळतात:–'अज्ञान दरिद्री अभागी । कुश्चळतेची रक्षा आंगीं । अलक्ष नेणोनी अधर्ममार्गीं । अवगती जो कुबुद्धित्वें. ॥१॥ सरिसें अवमानाचें श्वान । मुंके नेमिष्ट देखोन । ऐसे जीत पाषाण । मनुष्यदेहीं मृतरूप. ॥२॥ ज्ञाना बोलिजे तत्वार्थ । जेणें ज्ञेयरूप होय ज्ञाता । जैसा वन्ही आलिंगितां । काष्टपणा मुकीजे. ॥३॥ तें ज्ञान जिहीं जोडूनि निरुतें । शीलगुण म्हणिजे त्यातें । तो अवमानत्वादि गीतें (?) । धनरूपें बोलो जे. ॥ ४ ॥ आणीक जे मोक्षनगरा गेले । भवस्वर्ग अल्हाटे वेगळे । धर्मपंथ ते बोलिले । श्रेष्ठ गेले त्या ठाया. ॥ ५ ॥ सुनिश्चयाचेनि बळें । अष्टांगयोगाचेनि मेळें । सायुज्यश्रीचें ठाकिलें । राजद्वार साधकीं. ॥ ६ ॥.' २. 'आपुले' असें पाठांतर. ३. 'जालिया' असा पाठभेद. ४. 'असे' असें पाठांतर. ५. संसाररूपी खड्ड्यांत. गर्त=खळगा, खाडा. ६. 'विषयें वेष्टिलें वरी' असा अन्यपाठ. ७. डुकराप्रमाणें. ह्या ओंवीनंतर आमच्या पोथींत पुढील ओंव्या आहेत:–'ज्ञानांतराचें व्याख्यान। पुढती परिसें तूं विचक्षण । ज्ञानविज्ञानसंपन्न । त्यांसि हे खूण आकळे. ॥ १ ॥ तरी अनाचार तेंचि कर्म । त्याहूनि श्रेष्ठ सकाम धर्म । सकामाहूनि निष्काम । ऐक ऐसें जाणणें. ॥ २ ॥ कर्माहूनि श्रेष्ठ भजन । सगुणाहूनि निर्गुण । भक्तीपरिस श्रेष्ठ ज्ञान । अद्वैत गहन त्यामाजी. ॥ ३ ॥ ज्ञानकर्म उपासनाभेदू । कांडत्रय जो कां वेदू । त्याहूनि उपनिषद्भागू । विशदू कळसू ऐसें जाणिजे. ॥ ४ ॥ शैववैष्णवगाणपत्य–। सौरशाक्तादि समस्त । त्यांत हरिहरांचे भक्त । अभेद देखणें आगळें. ॥ ५ ॥ आगमसांख्यमीमांसक । बौद्ध चार्वाक नैय्यायिक । भट्टप्रभाकर क्षपणिक । नाना दर्शनवादिये. ॥ ६ ॥ यांत वेदांता वडिल मान । ऐसें जाणणें तेविं ज्ञान । पाखांडवाद मताभिमान । हेंचि अज्ञान बोळखिजे. ॥ ७ ॥ सामान्य शास्त्राहुनी येथें । अधिकता अध्यात्मशास्त्रातें । जेवीं स्वामिदर्शनाहूनि मृत्य । वाराणशीस आगळा. ॥ ८ ॥ ऐसीं ज्ञानांतरें पाहतां । श्रवणमनननिदिध्यासता । चित्त लिगटतां तत्वतां । सुशीलगुण प्रकटती. ॥ ९ ॥ वाचाळ होय वाक्शून्य । दाटूनि जडत्व मिरवे प्राज्ञ । महोद्योगी आपण । होय आळसी उदासीनत्वें. ॥ १० ॥ क्रोधी होय परम शांतू । शृंगारिया होय विरक्तू । लोभिया होय लोभातीतू । सुशीलगुण या नांवें. ॥ ११ ॥ धर्मसत्यदमशमतप । अमात्सर्य आर्जवरूप । लज्जा उपजे देखोनि पाप । सबाह्य निर्लेप शुचित्वें. ॥१२॥ तितिक्षा, अनुशय, यश । दानधृति, स्मृति, अभ्यास । अहिंसा, शांति, विरक्ति जे नाश । करी संसार दुःखाचा. ॥ १३ ॥ ऐसे शीलगुण चढोवोढी । अनायासें जोडिती जोडी । तंव धर्मपंथांतरीं मागाडी। विचारबुद्धी शोधिते. ॥ १४ ॥ तेथें निश्चय ऐसा ठेवीं । चित्स्वरूपीं आवडी गोवीं । हाचि श्रेष्ठ धर्म सर्वीं । तत्ववादीं कथिलासे. ॥ १५ ॥ सत्संग धर्म निःसंगता । निःसंगें निर्मोहता । निर्मोहत्वें निश्चिंतता । जीवन्मुक्तता अमरत्वीं. ॥ १६ ॥ ऐसिये धर्मपंथांतरीं । दृष्टी पडे मोक्षांतरीं । सालोक्यसामीप्यसारूप्यावरी । काळसत्ता दुर्धर. ॥ १७ ॥ चौथा सायुज्याच्या ठाया । निर्गुणत्वें

रीर । धिग्धिग् तयाचें ऐश्वर्य थोर । जळो तयाचें राजमंदिर । आत्मविचार जेथें नाहीं. ॥ २२८ ॥ धिग्धिग् तयाचें शाब्दिक [१]ज्ञान । धिग्धिग् तयाचें [२]दांभिक भजन । धिग्धिग् त्याचें तामस मन । [३]स्फितीचें ध्यान जैयाहातीं. ॥ २२९ ॥ आत्मसाधनीं सावध । वृथा न [४]दवडिती निमिषार्ध । याती पवित्र, कुळशील शुद्ध । [५]तयाचेंची त्रैलोक्यीं. ॥ २३० ॥ ते [६]होत अवमानिले [७]सधनीं । ते होत निंदिले दुर्जनीं । ते होत सांडिले स्त्रीजनीं । विषयीं [८]निर्जोडे म्हणवोनी. ॥ २३१ ॥ ते असोत गुरुत्वें हीन । ते असोत [९]शिष्यधर्माविहीन । नेणोत शास्त्रव्याख्यान । वेदाध्ययन [१०]सांगिकं. ॥ २३२ ॥ परी [११]तेचं श्रेष्ठ निश्चित । ते अक्षयी कीर्तिवंत । जे आत्मविचारीं जागृत । ते [१२]निर्द्वंभूत प्रपंचीं. ॥ २३३ ॥ आत्मानंदामृत रसाळ । सेवोनि ज्याचें चित्त निश्चळ । [१३]आत्मचर्चातांबुळ । निष्ठा रंगे मुखपद्मीं.' ॥ २३४ ॥ उदारपणें [१४]मेघनाथ । [१५]स्थळास्थळ न विचारीत । तैसा रंभेप्रति परमार्थ । [१६]समदर्शनी शुक वदे. ॥ २३५ ॥ तितुकें [१७]अयुक्त मा-

---

वसवी माया । म्हणोनि अविनाश ब्रह्म तया । मोक्ष हें नाम बोलिजे. ॥ १८ ॥ तैंचि अष्टांग योगांतरीं । ध्यानाचिये निजमंदिरीं । समाधिशेजेच्या अरुवारीं । उन्मनीसंगसुख भोगूं. ॥ १९ ॥ हें न भोगिती जे प्राणिये । नेणती परमार्थाची सोये । सांगितला विवेक हृदयें । नातळतीचि अकुमाळ. ॥ २० ॥ नरदेह ऐसें वरिष्ठ । परमार्थभोगाचें ताट । त्यांत विषयविष्ठा दुष्ट । भरतां चिळस न मानिती. ॥ २१ ॥ अग्निसर्प खाय रितें तोंड । तेवीं भोगाचे कष्ट काबाड । निर्फल परी लागले गोड । मूढबुद्धी मूढातें. ॥ २२ ॥ चर्मिकाऐसें चित्त सकाम । शिश्न विखणें करी उदीम । दारोपस्थ सरक्तचर्म । मवाळणी टोंचिती. ॥ २३ ॥ नाना शिश्न वोढाळ दारा । दारोपस्थ रिक्त तोबरा । तोंडीं चाटितां आदरा । लाळा भरणीं सांडीत. ॥ २४ ॥ कीं स्त्रीयोनी मूत्रोदकाचे कूपीं । भग्न पोहरा लिंग निक्षेपी । तो थितें जळ सांडूनि पुनरपी । संकोचला ये बरौता. ॥ २५ ॥ ऐसेनि कर्में देहीं । भोगभिक्षार्थ भणंग पाहीं । चित्त मन करूनि डोहीं । कामिनी भंगी मुदलें. ॥ २६ ॥ छेदूनि वैराग्याचें घ्राण । उघडे पाडिलेसे लोभदशन । कृत्रिम रंगें दंभेंकरून । काट दिधला वरौता. ॥ २७ ॥ तेणें विमानूनि श्लाध्यता । आयुष्य नाशी इंद्रियां अर्थी । तो प्रेतप्राय जीवें जीता । सर्वही वृथा तयाचें. ॥ २८ ॥.'

१. 'ध्यान' असें पाठांतर. २. मोठेपणाचें. ३. 'जे होती' असा अन्यपाठ. ४. 'न करिती' असा अन्यपाठ. ५. 'तयाचेनी' असें पाठांतर. ६. होवोत. ७. धनवान् लोकांनीं. ८. न जोडणारे, विषयप्राप्ति करून न घेणारे. ९. 'ते असोत कां सेवेहीन' असा पाठभेद. १०. षडंगांनीं युक्त. वेदांचीं सहा अंगें आहेत, त्यांचीं नांवें:–'शिक्षा कल्पो व्याकरणं निरूक्तं छंदसां चयः । ज्योतिषामयनं चैव वेदांगानि षडेव तु. ॥'. ११. 'ये रितीचे' असें पाठांतर. १२. निर्द्विस्थ. (प्रपंचापासून विरक्त.) १३. 'आत्मनिरूपणतांबूल' असें पाठांतर. १४. पर्जन्य. १५. चांगलें अथवा वाईट स्थान. 'सुस्थळकुस्थळ' असा अन्यपाठ. १६. सर्व भूतांच्या ठायीं ज्याचा समभाव आहे असा पुरुष. [भगवद्गीता. अध्याय ५।१८ पहा. १७. अयोग्य. 'तितुकें ऐकूनि अयुक्त वेरी' असा पाठभेद.

नूनि येरी । विवाद मांडला प्रत्युत्तरीं । जैशी परिव्राजकावरी[1] । राजदासी संघटे[2]. ॥ २३६ ॥ वेदांतीयाशीं पाषांडीतर्क[3] । भागवताशीं[4] तंडे कोकें । परम पंडिताशीं मूर्ख । तेंवि रंभा[5] शुकाशीं[6]. ॥ २३७ ॥ ऐसेनी[7] अविचारें सुरवधू । शुकाशीं करी वितंडवादू । तोचि पुढले श्लोकीं विशदू[9] । अर्थ परिसा आर्त[10] हो ! ॥ २३८ ॥ रंभा[8] म्हणे, 'महामुनी ! । व्यर्थ कासया शिणवा वाणी ? । वळोनी शब्दांच्या श्रेणी । निरंजनीं[11] रचितसां. ॥ २३९ ॥ त्याचा काय उपयोग सांग । वृथा सांवरीची[12] दांग[13] । कीं मारवाडींचे[14] सुरंग । तांबुल जैसे बोलाचे. ॥२४०॥ किंवा विजयादशमीचे[15] दिवशीं । सुवर्ण म्हणती शमिकेसी[16] । किंवा 'मंगळ' भौमासी[17] । शब्दारोप[18] पैं जैसा. ॥ २४१ ॥ तैशीं[19] तुझीं हीं वचनें । शुक्तिकारजताचीं[20] भूषणें । जे साचार[21] मानिती मनें । ते सोहाणे[22] तुजऐसे. ॥ २४२ ॥ जाळिला कामहुताशनें[23] । त्या वैराग्यरश्मीच्या[24] उष्णें । निववीला[25], हें बोलसी वचनें । जेंवि अमर[26] विषपानें. ॥ २४३ ॥ तपोक्लेशीं[27] झाले तप्त । त्यांस निववावया येथ । संभोगच्छाया आणि अमृत । कामिनीच्या अधरींचें. ॥ २४४ ॥ तेही अधर

---

१. संन्याशाशीं. २. बरोबरी करी, तोंडास तोंड देई. ३. नास्तिकमतवाद्याचे तर्क. ४. भगवद्भक्तासीं. ५. कामशास्त्रज्ञ (कामुक). ६. 'कृष्ण क्रीडेसारिखा येक । चोर पांचाळी म्हणे मी ।' असा पाठभेद. ७. ह्या ओंवीचा अन्यपाठ असा आहे:—'ऐसेनि शुकेंसी करी वितंडवादू । तोचि पुढिले श्लोकीं विशदू । सांगेन कथाप्रबंधू । अर्थ ऐका चतुर हो ! ॥ १ ॥.' ८. देवस्त्री (अप्सरा). ९. स्पष्ट. १०. उत्सुक, ज्यांस फार उत्कंठा आहे ते लोक. ११. परब्रह्माचे ठिकाणीं. १२. सांवरीच्या झाडांचें लांकूड इमारतीच्या कामास येत नाहीं, व ह्या झाडाच्या कापसाच्या गाद्या वगैरे करीत नाहींत म्हणून सांवरीच्या झाडांचें अरण्य निरुपयोगी होय. १३. अरण्य, रान. १४. मारवाडांत मिन्याचें काम करून हुबेहुब रत्नांचे रंग उठवितात, पण तीं जशीं खरोखर रत्नें नसतात त्याप्रमाणें, भासमय. 'बोलाचे तांबूल' व 'मनचे मांडे' हे प्रयोग समानार्थक दिसतात. 'बोलाचाच भात । बोलाचीच कढी ।' इत्यादि तुकारामाचा अभंग प्रसिद्धच आहे. १५. दसऱ्याचे दिवशीं. १६. शमी नामक वृक्षाचे पानांस. १७. मंगळ भूमीचा (पृथ्वीचा) पुत्र म्हणून त्यास 'भौम' असें नांव आहे. १८. मंगळ हा पापग्रह असून, त्यास मंगळ (शुभ) असें नांव आहे, हा केवळ शब्दारोप आहे, वस्तुस्थिति नव्हे—असा इत्यर्थ. १९. 'कीं विजयादशमीचे दिवशीं । सुवर्ण म्हणती मृत्तिकेसी । अथवा महाराष्ट्रदेशीं । लक्ष्मी म्हणिजे रक्षेतें ॥' असा अन्यपाठ. रक्षा=राख. हल्लीं महाराष्ट्रांत केराला लक्ष्मी म्हणण्याची वहिवाट आहे. परंतु राखेला लक्ष्मी म्हणण्याचा प्रघात आढळांत नाहीं. २०. शिंपांच्या ठायीं जी रुप्यासारखी चकाकी असते तिचीं. 'रजतशुक्तिकेचीं' असें पाठांतर. २१. खरीं. २२. 'सारिखे' असें पाठांतर. २३. कामाग्नीनें. [जो] कामहुताशनें (कामरूपी अग्नीनें) जाळिला (पोळला) त्या वैराग्यरश्मीच्या उष्णें निववीला—असा अन्वय. २४. वैराग्यकिरणांच्या. २५. शांत केला, थंड केला. २६. मरणरहित. 'जेवीं कां धांवणें विषयांनीं ।' असा अन्यपाठ. २७. 'तपोवनीं' असें पाठांतर.

अतिकोमळ । सुरंग[1] जैसें बिंबफळ[2] । दंतपंक्ती देती झळाळ । फांके परिमळ बोलतां. ॥ २४५ ॥ वेळा[3], लवंगा, दिव्य, कर्पूर, । मुक्तचूर्ण[4], केतकीखैदिर[5], । जातिफळें[6], जातिपत्र, । पूंगीफळें[7] सोलींव. ॥ २४६ ॥ नागलतिकापर्णोत्तमें[8] । जैशीं तैगटें[9] घडिलीं हेमें । ऐसी त्रयोदशगुणीं[10] कामें[11] । तांबूल मुखीं सर्वदा. ॥ २४७ ॥ तेणें सुरंग सुपरिमळ[12] । वदन जाहलें रक्तोत्पळ[13] । तेथें आपुलें मुख अळिकुळ[14] । होऊन चुंबन जो न करी. ॥ २४८ ॥ कस्तूरीतिलकांकित नि-[15]टिळीं । मस्तक मेळवोनि भाळीं । हस्त ठेवोनि कुचकमंडळीं । भोगकाळीं सं-[16]भ्रमें. ॥ २४९ ॥ मग[17] अधरामृताची वाटी । बळें लावितसे वोठीं[18] । जो रस न घे दांटोदाटी[19] । अमृतासाठीं [20]जो नये. ॥ २५० ॥ चुंबोनि अधर धरोनि दशनें[21] । सोडितां मरण नें[22] मने मनें । तो अरण्यशवासारिखा जाणें । हें सुख नेणे म्हणोनियां. ॥ २५१ ॥ आत्मानुसंधानाच्या शूळीं । ज्यासि[23] रोविलें सर्व काळीं । यमनियमाचे कावुळीं[24] । रक्तमांस आटिलें.' ॥ २५२ ॥ ऐशीं रंभेचीं उत्तरें । जैशीं सोज्वळ सुरापात्रें[25] । शुक सेवितां श्रोत्रकरें[26] । विटाळ मानी अंतरीं. ॥ २५३ ॥ मग सुधूत[27] मनवसन[28] । भिजवोनि होईल सचैल[29] स्नान । ऐसें वाक्य वदे सज्ञान[30] । देहदूषणलक्षणीं. ॥ २५४ ॥ 'बरळे[31]! ऐक निर्धारें । देह खोंचिजे[32] जेंवी शस्त्राग्रें[33] । तेथें वर्षाव कीजे रुधिरें । घाव पडे

---

१. उत्तम रंगानें युक्त. २. (पिकलेलें) तोंडलें. ३. वेलदोडा. 'वेळालवंगादि' असें पाठांतर. ४. मोत्यांचा चुना. चूर्ण=चुना. ५. केवड्याचा कात. ६. जायफळें व जायपत्री. ७. सुपारी. 'पुगीखंडें सोलिवें' असा अन्यपाठ. ८. नागवेलीचीं (विड्याचीं) उत्तम पानें. ९. तगटें=तकटें, वर्ख. १०. त्रयोदशगुणांनीं युक्त. त्रयोदश गुणः—कटु, तीक्ष्ण, उष्ण, मधुर, क्षार, कषाय, वातघ्न, कफनाशन, कृमिहर, दुर्गंधिनाशन, मुखभूषण, शुद्धिकरण आणि कामसंदीपन. ११. आवडीनें किंवा कामामुळें, सुरतेच्छेमुळें. १२. 'सुगंधें परिमळें' असा पाठभेद. १३. रक्तकमळ. १४. भ्रमरसमुदाय. १५. कपाळास. १६. आदरपूर्वक. १७. 'मम' असें पाठांतर. १८. ओठास. 'बळें लावूनियां होटीं' असा अन्यपाठ. १९. मुद्दाम, जाणूनबुजून. २०. जो रस अमृताच्या सांठ्यांत (सरोवरांत, हौदांत इ०) येत नाहीं (लाभत नाहीं). 'जो न ये साठीं पीयूषाच्या' असा पाठभेद. २१. दांतांनीं. २२. 'मानी मरण उणें' असा पाठभेद. २३. 'शिर' असा अन्यपाठ. २४. कावळ्यांनीं. २५. 'सुपात्रें' असें पाठांतर. २६. कर्णरूप हस्तानें. २७. अत्यंत पवित्र. २८. मनरूप वस्त्र. 'साधूत्तम न वासना' असा पाठभेद. २९. वस्त्रासह. चैल=वस्त्र. ३०. ज्ञानी, पंडित. ३१. आडमाप बोलणारे स्त्रिये! मूर्खे! ३२. खोंचणें=जखमी करणें. ३३. 'विषयशस्त्राग्रें' असा अन्यपाठ.

बीभत्स. ॥ २५५ ॥ तो प्रतिदिनीं प्रक्षाळिजे । नूतन औषधीपिंड दीजे । तऱ्हीं च निकें[2], येरवीं माजे[3] । पूय, दुर्गंधी, कृमिजाळ. ॥ २५६ ॥ त्या घायाचें सुरंग वदन । चुंबात्रया कांक्षीत[4] मन । त्याहोनि कश्मल[5] तें आन । सांग कोणतें संसारीं? ॥ २५७ ॥ तेंवि हीं मुखादि रंध्रें । स्रवति लाळरक्तमूत्रें । ते क्षाळूनि दुर्गंधि हरे[6] । तांबूलगंधादि लेपितां[7]. ॥ २५८ ॥ विचारितां[8] स्त्रियेचा देहो । नरकपंक[9] मूत्रडोहो । फुटेल म्हणोनि बळें पाहा हो! । चर्मत्वचेनें बांधिलें[10]. ॥ २५९ ॥ उद्योगसायास[11], ममता । मूर्खत्व, पापलुब्धता[12] । अशौच[13], अलाज, निर्दयता । इहीं गुणीं विवळे[15].' ॥ २६० ॥ रंभा तिरस्कारली चित्तीं । बोललेंचि बोले पुढती[16] । जैसा कोढी[17] आपुला हाती[18] । वारंवार लक्षीत.॥२६१॥

---

१. मनास चिळस वाटेल असा, घाणेरडा. २. बरें. ३. सुकाळ पावणें, मस्त जास्त होतात. माजणें=विवक्षित मर्यादेपेक्षां अतिशयित पुष्टि पावणें. 'मानिजे' असें पाठांतर. ४. इच्छी. ५. पाप, दुष्कृत्य. ६. नाहींशी होते. ७. 'तांबूलगंधलेपनें' असा अन्यपाठ. ह्या ओंवीपुढें हस्तलिखित प्रतींत पुढील ओंवी आढळते:—'तें भगद्वारीं लिंग सूयिजे । मुखें मुखलाळ चाटिजे । आणि वर्णाचार सुसेविजे । तिन्हीं सारखीं जाण पां.' ८. विचार करून पाहिला असतां. ९. 'नरककूप' असा पाठभेद. १०. ह्या ओंवीनंतर पुढील ओंव्या आढळतात:—'ऋतुशोणिताचा लोट । तुंबळलिया फुटती पाट । योनी सांडवा उद्भट । चुळचुळाट कृमिकुंड. ॥ १ ॥ तेथें स्व (?) पिकविते कामिक साळी । स्थूळ लिंगाचीं मुसळें काळीं । माजी दाडूनि मोकळीं । वाट करीति पिकार्थ. ॥ २ ॥ एकीं हात टेंकोनि वरी । दृष्टी घालिजे भीतरी । येणें जाणें जन्मांतरीं । यान्चि द्वारीं म्हणऊनियां. ॥ ३ ॥ भगापासूनि स्तनाचीं टेंकें । तोंडवरी डोहो भरला नरकें । तेथें विचरती जे नर देखे । कृमिजंतस्वरूप. ॥ ४ ॥ हे काय श्वानविष्ठेची उंडी । हे कृमिकुळाची शेणवडी । हे स्मशानवन्हीची सगडी । चित्तशय्या पहुडलिया. ॥ ५ ॥ हें मोहखलाचें मातेरें । आधिरोगाचें वाखरें । अविद्याहातींचें पोतेरें । विषयगोमयें माखलें.' ॥ ६ ॥' ११. 'अनृतसाहसममता' असा पाठ असता तर बरें झालें असतें. येथें 'उद्योगसायास' ह्याचा अर्थ 'रिकामी उठाठेव' असा समजावा. १२. 'पुन्हां पांचवें' असें पाठांतर. १३. अपवित्रता, मलीनपणा. १४.ही ओंवी पुढील संस्कृत श्लोकाचें रूपांतर आहे:—'अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभिता । अशौचं निर्दयत्वं च स्त्रीणां दोषाः स्वभावजाः॥' १५. विवळणें=प्रकाशणें, स्पष्ट करणें. 'इहीं दोषीं वसविते' असा अन्यपाठ. ह्या ओंवीनंतर हस्तलिखित प्रतींत पुढील तीन ओंव्या आढळतात:—'या लवणाचें पात्र करीं । काळढगाचे सरोवरीं । भोगार्थ करितां भरोभरी । क्षणामाझारी विनाश ॥ १ ॥ कीं हे कर्पूराची हांडी । ठेविली काळाग्नीच्या कुंडीं । माजी भोगांची परवडी । रांधूं म्हणती ते मूर्ख. ॥ २ ॥ ऐसिया स्त्रीदेहाचे ठायीं । मोहें आसक्त झाला पाहीं । तो दुर्जीव प्रेतदेही । संदेह नाहीं या बोला. ॥ ३ ॥.' १६. 'बोलिलीच बोलें पुढती' असा अन्यपाठ. १७. कुष्टरोगी. १८. हात.

नाक काढलिया सहसा । आपला भाव न सांडी ऐडसा[2] । खांडण[3] केलिया गो-पुच्छा । नव्हे पालटी निजगुणा. ॥ २६२ ॥ यापरी ते निर्जरनारी[4] । प्रत्युत्तरें शृंगारशास्त्रीं । देती झाली, जीं अंतरीं । विकार करिती अविवेका[5]. ॥ २६३ ॥ 'अनर्घ्य वस्त्राची कंचुकी । जडली अमूल्य रत्नमाणिकीं । पत्रवेली सोडिल्या कनकी । चित्रविचित्र परिकरा[6]. ॥ २६४ ॥ पंखियांवरी[7] मनोहरें । मुक्ताफळांचीं मयूरें । राजहंस, शुक, चकोरें । अतिसुंदरें मिरवती. ॥ २६५ ॥ जडित मोतियांची जाळी । बिरडें कसिलें कनककमळीं । चंदनमृगमदाचे[8] मेळीं । वर लेपिला अर्गजा. ॥ २६६ ॥ सुरतसंग्रामीं शीणला । मग भुजपंजरीं वहिला । मेजऐसीये पहुडला । हृदयडोल्हारा तुजऐसा. ॥ २६७ ॥ कीं मजऐसीये हृदयमाचा[10] । तुजसारिखा नर दैवाचा । उशीसी[11] करूनि उभय कुचां । सुखनिद्रा अनुभवी. ॥ २६८ ॥ तोचि एक धन्य येथ । सार्थक केलें तेणेंचि जीवित । जो क्रीडाकौतुकें[12] काढीत । वेळ कामिनीसुखसंगें. ॥ २६९ ॥ जन्मोनि जननीचे[13] पोटीं । या सुखाची भेटी गोष्टी । स्वप्नींहि नेणे तो ह्या सृष्टीं । प्रेताहूनी कनिष्ठ. ॥ २७० ॥ व्यर्थ नासारंध्रींचा रोम । व्यर्थ उष्ट्रपृष्ठींचें[14] गुल्म[15] । व्यर्थ अजाकंठींचें[16] चर्म । 'स्तन' हें नाम जयाचें. ॥ २७१ ॥ जवादीजनिताचे[17] वृषण । भूपमौळीं बैसती सन्मान[18] । काय करावे लंबायमान । रासभाचे पैं जैसे. ॥ २७२ ॥ तैसा तो एक संसारीं[19] । दरिद्रसंगीं पडिला कुहरीं[20] । लोक देखोनि पळे दुरी । दिवाभीतांसारिखा[21].' ॥ २७३ ॥ ऐसी धिःकारूनि[22] रंभा । बोले, तरी हृदय क्षोभा । शुकाचें न पवेची, मग शुभा[23] । वचनीं उत्तर

---

१. नाकांतील शेंबूड. २. सर्पांचा विकार (पडसें). ३. छेदणें, तोडणें. ४. देवस्त्री (रंभा). ५. विवेकशून्य पुरुषास. 'अविवेकें' असें पाठांतर. ६. सुंदर. ७. [चोळीच्या] पाखांवर (बाजूंवर). ८. चंदन आणि कस्तुरीचे. 'मृगनाभीचे' असा पाठभेद. ९. 'मग सुखेंसी' असा अन्यपाठ. १०. हृदयरूपी पर्यंकावर. माचा=पलंग, मंचक. ११. 'शिसें' असें पाठांतर. १२. 'जो क्रीडाकौतुकें फेडित । कंचुकीकच्छ सुखभोगा' असा अन्यपाठ. १३. ह्या ओंवीशीं 'नारीपीनपयोधरोरुयुगुलं स्वप्नेऽपि नालिंगितं । मातुः केवलमेव यौवनवनच्छेदे कुठारा वयम्. ॥' इत्यादि भर्तृहरीची उक्ति [वैराग्यशतक ११] समानार्थक आहे. १४. उंटाच्या पाठीवरील. १५. गांठ (मदार). १६. बकऱ्याच्या गळ्यांतील. १७. जवादीमांजराचे. जवादी=जवादें=जवादी मांजराची कस्तूरी, मार्जारकस्तूरिका. ह्या ओंवीसारखीच एक ओंवी मुक्तेश्वराच्या सभापर्वांत आहे:—'जवादी बिडालाचें वृषण । मस्तकीं खोंविती श्रीमंतजन । रासभाचे लंबायमान कर्ण । कोणी हातें नातळे. ॥' [सभापर्व—अ० ५।६०]. १८. सन्मानपूर्वक. 'जाण' असें पाठांतर. १९. संसारांत, जगांत. २०. गुहेंत, दरींत. २१. घुबडाप्रमाणें. २२. धिक्कार करून, तिरस्कारपूर्वक. २३. हितकारक.

देतसे. ॥ २७४ ॥ 'जीवें सजीव हा नरदेहो । त्या देहार्थ भोगसंग्रहो । तें देह दर्दुर[1] जालें पाहा हो ! । काळसर्पाचे आननीं. ॥ २७५ ॥ कमळदळा-वरील जळ । तैसें जीवित अतिचंचळ । कीं गिळिजे[2] नवनीताचा[3] कवळें । त्याहोनि शीघ्र विनाशे. ॥ २७६ ॥ हेमाभरणें रत्नादिक । जिहीं डहुळिलें[4] चित्तोदक । तेंही क्षणिक जैसी रेख । व्योमीं इंद्रधनुष्याची. ॥ २७७ ॥ काळानळाचे चुलींत वेगें । सुपुष्ट[5] सुरूप शरीरवांगें[6] । लाविलें तें निमिषार्ध न लगे । तंव होयॆ शीतळ[7] विकारी. ॥ २७८ ॥ आणि शुक्ल बीजेचें चांदणें । तैसें तारुण्य पाहुणें । जातां, वार्द्धक्यमेहुणे[8] । हांसवीत या जीवा. ॥ २७९ ॥ आतां संभोगाचे जे भोग । कृपणाचें धन[9] सांग । वंध्यासुताचें उत्तमांग[10] । व्योमकुसुमीं[11] तुरंबिजे[12]. ॥ २८० ॥ कीं अंवसेचे चंद्रामृतें । चित्रचकोरें होतीं तृप्तें । मृगजळाचेनि ह्रदोदकें[13] केडतें । छायापुरुषा न्हाणिजे[14] ? ॥ २८१ ॥ तैसें शरीर मिथ्या समूळीं । तेंही काळाचे दंष्ट्रेतळीं । चपळ विषयांची हे तों फळी[15] । खेळावया सुख कोण ? ॥ २८२ ॥ जो करी देहाची भावना । तो मोहमल्हारीचा सूणा[16] । असतां[17] नरत्व सोडोनि जाणा । श्वानपणा मिरवीत. ॥ २८३ ॥ विषयहळदीचें कुट[18] । त्या नांव ठेवी भंडार श्रेष्ठ । तेणें ममतेचें ललाट[19] । चर्चोनि फिरे भुंकत. ॥ २८४ ॥ तरी मृत्यूऐसा व्याघ्र । मुख पसरोनि समोर । तेथें विषय हिरवंटाचार[20] । देहधेनूतें केंवि रुचे ? ॥ २८५ ॥ ऐसेपरी दुर्लभ देह । परमार्थाचें जोडतें[21] गेह । जाणोनि आत्मसाधनीं स्नेह । धरोनि स्वहित जो न करी; ॥ २८६ ॥ तो कल्पद्रुमाचे वाटिके[22] । बैसोनि अभाग्य इच्छी भिके । कामधेनु धिःकारी[23] दुःखें । रुचिकालागीं[24] दुहितसे. ॥ २८७ ॥ पहुडोनि चिंतामणीच्या[25] घरीं । म्हणे मी एक दीन भिकारी[26] । व्यर्थ

---

१. बेडूक. 'दुर्धर' असें पाठांतर. २. लोण्याचा. ३. घांस. ४. गढूळ केलें, हालविलें. 'डहुळिजे' असें पाठांतर. ५. चांगलें धष्टपुष्ट व सुंदर. ६. शरीररूपी वांगें. ७. शीतळ (विकारशून्य) [शरीर] विकारी (विकारयुक्त) होय—असा अन्वय. ८. वृद्धावस्था हेच मेहुणे (बायकोचे भाऊ). ९. 'तें कृपणाचें शरीरें सांग' असा अन्यपाठ. १०. मस्तक. ११. आकाशपुष्पानें, खपुष्पानें. १२. तुरंबणें=सूंगणें. १३. जलाशयांतील पाण्यानें. ऱ्हद=डोह, लहान जलाशय. १४. 'छायापुरुषें नाहिजे' असें पाठांतर. १५. समुदाय. 'हांतोफळी' असें पाठांतर. १६. कुत्रा. १७. 'असतें नरत्व सांडूनि' असा पाठभेद. १८. चूर्ण, पूड. १९. मस्तक. २०. हिरवा चारा. चार=हिरवें कोवळें गवत. २१. जोडणारें, प्राप्त करून देणारें. २२. वाटिकेंत, उद्यानांत. २३. 'कामधेनूचे काम दुःखें' असा अन्यपाठ. २४. रुचिक=रुईच्या झाडाचा चीक. २५. चिंतामणि=इच्छित वस्तू प्राप्त करून देणारा मणि. २६. 'दरिद्री' असें पाठांतर.

वांचोनि काय करी । ये संसारीं? [1]हतदैवा! ॥ २८८ ॥ पेरिस घेवूनियां करीं । बळें घांशीत खापरीं । गुण नव्हे, मग झुगारी । पाषाण म्हणवोनी हातींचा. ॥ २८९ ॥ तैसा नरदेह तत्वतां । [3]अवचट [4]लाहे पुण्यवंता । जेथें ईश्वरप्राप्ति पाहातां । हातातळीं [5]आतुडे. ॥ २९० ॥ तो विसरोनि कार्यार्थ । वाढवोनि विषयस्वार्थ । आयुष्य नाशी जो स्त्रीजित । जीवन्मृत जाणावा. ॥ २९१ ॥ मोहभ्रमाचे [6]वोहळीं । मिथ्या ऐश्वर्य [7]हरळी । विषयरसें अतिरसाळी । मूढमती [8]जवळी [9]खर जैसा. ॥ २९२ ॥ ते श्रुति[10]आढ्यतेचे भावीं । देखोनि प्रमदा गाढवी । पुरुषरासभ [11]वोढवी । नव्हे आडवी [12]लोटितां. ॥ २९३ ॥ ऐसीये [13]रासभीमागें । जे धांवती विवेकत्यागें । जीवें लाज सांडोनी आंगें । 'थू थू' जगें त्यां म्हणिजे. ॥ २९४ ॥ [14]चर्मकाचें चर्म जैसें । जमलें पाणी पिऊन पोसे । सेविलेचि विषय तैसे । सेवितां विकृती न मानिती. ॥ २९५ ॥ ऐसी जीवन्मृताची कहाणी. । असो; काय बोलावी वदनीं?' । रंभा [15]खोंचोनि अंतःकरणीं । [16]काय उत्तर देतसे. ॥ २९६ ॥ मग बोलली त्याहूनि अधिक । विस्तारीत विषयसुख । अनुवाद करितों [17]नावेक । श्रोतेजनीं परिसावा. ॥ २९७ ॥ 'सखोल नाभी अतिगंभीर । जैसें लावण्यसरोवर । वरी त्रिवळी सुंदर । श्यामोदकी सुरसरिता. ॥ २९८ ॥ जैसें हिमालयाचें युगुल । तैसें स्तनद्वय वर्तुळ । उंच गौर सुशीतळ । स्पर्शतां निववीत [18]संतापा. ॥ २९९ ॥ तया कुचयुग्मांतरीं । [19]रम्य रमणीय [20]पाठारीं । तपें तपती निरंतरीं । मनें आसक्त पुरुषांचीं. ॥ ३००॥

---

१. दुर्दैवी. 'हतदैवें' असें पाठांतर. २. ह्याच्या स्पर्शानें लोखंडाचें सोनें होतें, अशी समजूत आहे. ३. अकल्पित, अचानक. ४. प्राप्त होतो. 'लाभे' असें पाठांतर. ५. आतुडणें=प्राप्त होणें, हातीं लागणें. ६. ओहळांत, जलप्रवाहांत. ७. हिरवा चारा. 'हरियाळी' असा पाठभेद. ८. 'मूढ ती जवळी' असें पाठांतर. ९. गाढव. १०. गृहस्थाश्रम वेदसंमत आहे अशा अभिमानबुद्धीनें 'बृहदारण्यकोपनिषदा'च्या सहाव्या अध्यायाच्या चौथ्या ब्राह्मणांत पुत्रोत्पत्तीबद्दल मंत्र वगैरे दिले आहेत, त्यांवरून 'श्रुतिआढ्यतेचे भावीं'च्या अर्थातील खोंच सहज लक्ष्यांत येईल. 'सुनीव अढ्यतेची आडवी' असा पाठभेद. आडवी=अटवी, अरण्य. ११. 'वाढवी' असें पाठांतर. १२. ह्या ओंवीपुढें खालील ओंव्या आढळतात:—'ग्रासवास अर्थमेळें । स्तुतिशब्दें सैर बोकाळे । पुच्छकच्छ करी मोकळे । वळें खेंकाळे रमावया. ॥ १ ॥ जेव्हां चारा नलगे तोंडीं । रागें वदळा पैं झाडी । वर्मस्पर्श हृदय फोडी । घाली आढी पादपुच्छा. ॥ २ ॥' १३. 'ऐशिया रासभा मागमागें' असा अन्यपाठ. १४. चांभाराचें. १५. खोंचणें=कोणी कोणाचें वर्म काढल्यामुळें त्यानें तात्काळ भग्नोत्साह होणें. १६. 'प्रत्युत्तर देतसे' असा पाठभेद. १७. क्षणभर, थोडेंसें. १८. 'संताप' असें पाठांतर. १९. 'रमें' असें पाठांतर. २०. पाठार=पर्वतावरील सपाट मैदान.

जैसे कर्पूरकर्दळीचे स्तंभ । तैसें जानुद्वय स्वयंभ । चीर उकलितां सुप्रभ । गौरपणें भुलवी जें. ॥ ३०१ ॥ कटिमंडित रत्नमेखळा । तें तेज दावी नाभी-तळा । तयाअंतरीं गुह्यस्थळा । दैवाआगळा तो देखे. ॥ ३०२ ॥ अधरें न चुंबिती अधरा । करें न शिवती पयोधरा । गुप्त नलिनीमदनमंदिरा । रेतपाटा न लाविती. ॥ ३०३ ॥ स्त्रीमुख न चुंबिती जे वोष्ठ । ते भग्न भाजनाचे कांठ । कुच न मर्दिती ते कर थोटे । मोडियेले येरवींच. ॥ ३०४ ॥ लेपोहातीं दिधलें शस्त्र । काय पुरुषार्थ करील थोर । तैसें त्याचें कामागार । निर्व्यापार लडबडी. ॥३०५॥ छत्रीविण फिरवी दंडु । गडी नसतां खेळे चेंडू । न गाळितां इक्षुदंडू । लांट पडिली काननीं. ॥ ३०६ ॥ कीं लोळिकेवीण घांट। वृषभकंठीं देतसे कष्ट । तैसे पुरुष अवयव श्रेष्ठ । न विचारीत त्यां हेतू.' ॥ ३०७ ॥ ऐसे रंभेचे घोखटे । शब्द ऐकतां मन विटे । कर्णरंध्रीं घालोनि बोटें । अधोवदनी निश्चळ. ॥ ३०८ ॥ मग विचारूनी प्रत्युत्तर । देता झाला चतुरेश्वर । जेणें शृंगाररससागर । दिसे मृगजळासारिखा. ॥ ३०९ ॥ ज्ञान-वैराग्यनिरूपण । मागां बोलिला विचक्षण । त्याहूनि विस्तारें गहन । निजज्ञान प्रगटिलें. ॥ ३१० ॥ 'बुद्धिबोधा होय मिळणी । चित्तचैतन्या बुंजावणी । अहंता राहे सोहंपणीं । मन उन्मनीं तल्लीन. ॥ ३११ ॥ या उभयांचा सं-योग । तया म्हणिजे **योग** । ते संसारीं सुखसंभोग । तें योगांतर जाणिजे. ॥ ३१२ ॥ कीं '**तत्**' पद ऐसें बोलिजे **शिवा** । '**त्वं**' पद ऐसें जीवा । दोघे येती

---

१. मांड्या. २. चकचकित, तेजस्वी. 'सप्रभ' असें पाठांतर. ३. मेखळा=कंबरपट्टा. 'कटिमंडळा' असा अन्यपाठ. ४. ज्याचें दैव श्रेष्ठ आहे तो, सुदैवी. ५. या ओंवीनंतर पुढील ओंव्या आहेतः—'एका जैसे कूर्मपृष्ठी । तैसे पाहातां दिसती दृष्टी । येकें गजाची माथोटी । तया ऐसे भरींव ॥ १ ॥ येके जैशीं अश्वत्थदळें । सुरंग वर्णें अतिकोमळें । दर्शन करी सुतकाळें । सुभग भगें भोक्तिया. ॥ २ ॥ ऐसिया गुह्यागुह्य गृहीं । आपलेंनि गुह्येंद्रिय पाहीं । न भोगितांचि पुरुष कांहीं । ते प्रेतदेही जाणावे. ॥ ३ ॥' ६. 'न सेविती' असा पाठभेद. ७. 'रेतपाट न चालविती' असा अन्यपाठ. ८. फुटक्या भांड्याचे. ९. चित्राच्या हातांत. 'लेपाहातींचें हतियार' असा अन्यपाठ. १०. उंसाचा रस काढावयाच्या घाण्यांत जें उभें लांकूड फिरत असतें तें. ११. ओखटे, त्रासदायक. १२. 'शब्द स्पर्शतां शुक विटे' असा अन्यपाठ. १३. खालीं मान घालून. १४. असत्य, मिथ्या. १५. 'मग' असें पाठांतर. १६. गूढ. 'त्याहूनि सर्वज्ञ गहन । अनुभवज्ञान प्रगटितू' असा अन्यपाठ. १७. ऐक्य, तादात्म्य. १८. सलोखा, समजूत. १९. मीच ब्रह्म असा जो भाव, त्याचे ठायीं. २०. ब्रह्मस्वरूपीं लीनतेची मनाची स्थिति. जागृति. स्वप्न, सुषुप्ति (गाढ झोंप), तुर्या व उन्मनी असे मनाच्या अवस्थेचे पांच प्रकार आहेत. २१. 'सारसी' असें पाठांतर.

ऐक्यभावा । तें '**असि**' पद [1]बोलिजे. ॥ ३१३ ॥ दोघांचिये मिळतिये संधी । लाधे [2]महत्त्वानंदसमाधी । तेचि योगांत बुद्धी । आत्मविदां मानली. ॥ ३१४ ॥ तेही [3]कळा करूं उघडी । उकलूं [4]गुह्याची घडी । गुणग्राहक जोडी । जो जें स्वरूप ऐकतां. ॥ ३१५ ॥ ऐका '**तत्**' पद तो ईश्वर । तो जाणावा द्विप्रकार । माया शबळ [5]ब्रह्मविकार । हा [6]वाच्यार्थ तिहींचा. ॥ ३१६ ॥ मायाविनिर्मुक्त निष्कंप । सत्यज्ञानानंदस्वरूप । तोचि लक्ष्यार्थ [7]निर्लेप । परमात्म्याचा जाणिजे. ॥ ३१७ ॥ '**त्वं**' पद तो जीव सहजे । तोही [8]द्विधा जाणिजे । [9]वाच्य लक्ष्य हे बोलिजे । उभय अंश तयाचे. ॥ ३१८ ॥ स्थूल सूक्ष्म दोन्ही देह । परिवेष्टुनी चैतन्य राहे । तोचि वाच्यार्थ म्हणिजे पाहे । सबळ अंश जीवाचा. ॥ ३१९ ॥ देह [10]द्विधां विनिर्मुक्त । प्रत्यक् [11]चैतन्य निर्धूत । तोचि बोलिजे लक्ष्यार्थ । जीवात्म्याचा निर्धारें. ॥ ३२० ॥ जीवेश्वराचे लक्ष्यांश दोनी । निवडोनि, करावी [12]मेळणी । जैसें **गंगायमुनेचें** पाणी । ऐक्यवादें समरसे. ॥ ३२१ ॥ प्रतिबिंब निजबिंबातें पाहे । तंव बिंबत्व अंगीं लाहे । दर्पणीं गिळलें तरी आहे । [13]प्रतिमुख निज मुखीं. ॥ ३२२ ॥ कीं महदाकाश घटाकाश । मिळविले हे बोली [14]वोस । लहरी आणि क्षीराब्धीस । [15]वेगळीक असेना. ॥ ३२३ ॥ ऐसी [16]उभयांश बळोपाधी । त्याग करोनि [17]विषयबुद्धी । अखंड ऐक्यत्वें अनादी । जाणोनि, होती कृतकृत्य. ॥ ३२४ ॥ तें अखंडित कैसें काय ? । तरी विजातीय स्वजातीय । [18]स्वगतवादी भेदत्रय । यारहित अखंड ते. ॥ ३२५ ॥ विजातिभेदरहित । म्हणिजे निष्प्रपंच निर्धूत । स्वजातिभेदातीत । त्या [19]आन भेद असेना. ॥ ३२६ ॥ स्वगत[20]भेदांतीत म्हणिजे । ब्रह्मीं ब्रह्मत्व [21]विसरिजे । जैसें [22]सैंधव सिंधु होइजे । वेगळेपण नुरवूनी. ॥ ३२७ ॥ तो नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, । सत्यस्वभाव, निर्गु-

---

१. 'योगरूप' असें पाठांतर. २. 'लाधे महानंदसिद्धी' असा अन्यपाठ. ३. शास्त्र (योगशास्त्र). ४. 'उकलूनि गुह्यांतराची घडी' असा अन्यपाठ. ५. 'ब्रह्म सविकार' असें पाठांतर. ६. शब्दांचा सांकेतिक अर्थ. शास्त्रकारांनीं अर्थांचे तीन प्रकार सांगितले आहेतः—वाच्यार्थ, लक्ष्यार्थ, आणि व्यंग्यार्थ—[मुक्तेश्वर सभापर्व (काव्यसंग्रह.)—पृ० १०१ टीप ४ पहा]. ७. शुद्ध. ८. 'द्विविध' असें पाठांतर. ९. 'वाचोनि लक्ष हें' असा अन्यपाठ. १०. 'द्विविध' असें पाठांतर. ११. 'प्राक्चैतन्य' असा पाठभेद. १२. 'मेळवणी' असें पाठांतर. १३. 'प्रतिमुखा सन्मुख' असा पाठभेद. १४. खोटी, व्यर्थ. १५. भेद. 'जवनिक असे आडवी' असा पाठभेद. १६. 'उभयग्रांस' असें पाठांतर. १७. 'भेदबुद्धी' असें पाठांतर. १८. 'स्वयातीभेदय' असा पाठभेद. १९. 'आत्मभेद' असा अन्यपाठ. २०. 'भेदरहित' असें पाठांतर. २१. 'वोसरिजे' असा पाठभेद. २२. मीठ. 'जैसा सैंधवें समुद्र होइजे । वेगळेपणा विरवूनी' असा अन्यपाठ.

णवंत, । निरावेव[1], सर्वगत, । निष्कळंकस्वरूप. ॥३२८॥ तो अवस्थात्रयातीत । असंगब्रह्मैवाहमस्मीति । योगी योगांतरें पावती । सहजानंदें समाधी हे.॥३२९॥ निरामय[2] मायातीत । सर्वकल्पनाव्यतिरिक्त । तया अंतरीं अनंत । सुखसंवाद साधका. ॥ ३३० ॥ तया सुखासी नाहीं अंत । यालागीं बोलिजे अनंत । ज्याचा अणुमाळ[3] स्पर्शतां वात । संसारभाव[4] विसरिजे. ॥ ३३१ ॥ ज्या सुखाचेनि स्वानंदें[5] । विषयभोगाचीं आस्पदें[6] । सार्वभौमादि[7] महेंद्रपदें । विरस मानिलीं विरक्तीं[8]. ॥ ३३२ ॥ पृथु[9]पुरूरवा[10]युधिष्ठिर[11]–। जडभरतादि[12] नृपवर । राज्य सोडोनि अपार । गेले वना[13] वीतरागें. ॥ ३३३ ॥ ज्या सुखाच्या प्राप्तीलागीं । जाले सर्पव्याघ्रसंगी[14] । वैराग्याचे प्रबळ[15] आगीं[16] । इंद्रियें करिती इंधनें[17]. ॥३३४॥ महायोगाचे सागर । गोष्पदप्राय मानिती नीरें[18] । अवघड तपाचे डोंगर । उडोनी मागां सांडिले[19]. ॥ ३३५ ॥ ऐशा सुखाचेनि बोधें[20] । ठावीं नव्हती देहद्वंद्वें । म्हणोनि आघात प्रल्हादें । न लेखितां[21] साहिले. ॥ ३३६ ॥ जया सुखसिंधूचा लोट । भरोनि बुडवी मनाचा घट । इंद्रियेंद्वारीं[22] उत्कंठ । सुखानंद वोसंडे[23]. ॥ ३३७ ॥ अष्टौ भावांचीं[24] भूषणें । अंगीं बाणती अभिन्नें । तुर्येचेनी[25] आलिंगनें । प्रपंच पुरता[26] पौरुषें[27]. ॥ ३३८ ॥ तेथें स्वदेहाची विस्मृती । तेचि स्वरूपाची[28] स्मृति । लाज पळाली मागुती । ठावी न पडे कैं गेली? ॥ ३३९॥ तेथें सुरतनदीच्या पैलेकुळीं[29] । रेतप्रवाह ऐलपाळी । सुख उपजे सर्व काळीं ।

१. निरवयव, निराकार. २. रोगरहित. ३. अणुमात्र, किंचित्. ४. 'संसारभया' असा अन्यपाठ. ५. 'सुखस्वादें' असें पाठांतर. ६. स्थानें, किंवा साधनें. 'अपशब्दें' असा पाठभेद. ७. 'सर्व भोगादि' असा अन्यपाठ. ८. विरक्त पुरुषांनीं. ९. हा वेनराजाचा पुत्र. हा पृथ्वीचा पहिला राजा होय–अशी समजूत आहे. १०. मुक्तेश्वरकृत वनपर्व (काव्यसंग्रह) पृ. ११५ टी. ९ पहा. ११. धर्मराज. १२. भरतानें जडचर्यांगीकार केला म्हणून त्यास 'जडभरत' असें नांव पडलें. [भागवत–स्कंध ५]. १३. 'पुरुष वीतरागी' असा अन्यपाठ. १४. संगी=मित्र. १५. 'सबळ' असें पाठांतर. १६. आगींत, अग्नींत. १७. सर्पण, जाळण्याचीं लांकडें. १८. 'नर' असें पाठांतर. १९. 'सांडिती' असें पाठांतर. २०. 'वेधें' असें पाठांतर. २१. पर्वा न करितां, न गणितां. २२. 'इंद्रियशब्दद्वारीं' असा पाठभेद. २३. वोसंडणें=ओसंडणें. (उत्=बाहेर; संडणें=सांडणें=वाहणें) ऊत येणें, भरती येणें. २४. 'स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः । वैवर्ण्यमश्रुप्रलयौ अष्टौ भावाश्च सात्विकाः ॥' हे अष्टभाव. २५. ही मनाची चवथी अवस्था. २६. 'परता' असें पाठांतर. २७. खुंटे, तुच्छ होई. २८. लाज पावली मागुती । ठावी न पडे कैं गती । तें वैराग्य निकें आलिया. ॥' असा अन्यपाठ. २९. पलीकडच्या तीरावर. 'तेथें सुतनदीच्या वेलफुली' असा अन्यपाठ.

सुखें इंद्रिय कोंदाटे[1]. ॥ ३४० ॥ समाधिरतीचा संभ्रम । कामिनीसंगावीण निष्काम । आल्हाद उपजे तो निरुपम । विदेहावस्था सर्वदा. ॥ ३४१ ॥ कीं परमार्थनिद्रेच्या आर्धीं । प्रपंच जागराची समाधी । भाव उपजे तो संवादीं । गुप्त असे सर्वदा. ॥ ३४२ ॥ तेव्हां दृश्यद्रष्टादर्शनपणें । सच्चिदानंद भासे तेणें । जैसे दाळिंबाचे[2] दाणे । एकरसें गोठले. ॥ ३४३ ॥ ना तरी द्राक्षांचिये घडीं । भेदली अभेद एक गोडी । इक्षुदंडाचिये भिन्न कांडीं । स्वाद वसे अभिन्न. ॥ ३४४ ॥ तैसा [3]त्रिपुटीचेनि मिसें । ब्रह्मानंदचि कोंदला[4] मुसे । ऐशा सुखाचे दिवसें[5] । अविद्याराती हरपली. ॥ ३४५ ॥ जे सुख सेवोनि म्हणती सुखी । ते वृत्ति विरे सुखोदकीं । तैं सौख्यांत हे विवेकी । ब्रह्मनिष्ठ[6] बोलिजे. ॥ ३४६ ॥ त्या निराकुला नाहीं अवधी[7] । जैसा कल्पांतीं उदधी । अंत पहातां[8] वेदीं । 'नेति'[9] म्हणोनि परतती जे. ॥ ३४७ ॥ अथवा मायाआवरणातीत[10] । सर्व अवस्थेव्यतिरिक्त । कीं निराकुल म्हणिजेत । तयारहित परमात्मा. ॥ ३४८ ॥ ज्ञानें चिन्मात्रैक स्फुरण । तद्रहित जें निजभावशून्य । तें ज्ञानांतर [11]सुविज्ञ । दैवागळें सेविती. ॥ ३४९ ॥ सेवन म्हणिजे ऐशी युक्ती । 'सोऽहमस्मि'[12] या [13]वृत्ती । परमात्म्याचिया स्वरूप होती । कीटकीभृंकुटीचे[14] न्यायें. ॥ ३५० ॥ कीं नाना पंथीं एक स्थान । नाना [15]उद्योग एक धन । साधिजे तैसें स्वरूप जाण । वाखाणिलें बहु शब्दीं. ॥ ३५१ ॥ एवं विशेषणीं बहुतीं । आत्माचि प्रतिपादिला ग्रंथीं । जैसीं सोयरिकेचीं नातीं । पुरुषनामें[16] भिन्नभिन्न. ॥ ३५२ ॥ तया अनुपम आत्मकनका । न पडे वाचकाची टीका[17] । तरी बोलिजे जैसें अर्का[18] । चित्रामाजी [19]रेखिजे. ॥ ३५३ ॥ मुक्यानें केलें अमृतपान । वृक्षमुळीनें सेविलें जीवन । तें न सांगतां[20] अमरपण । सेंपल्लवें[21] जग जाणे.

---

१. पूर्णपणें भरून जाई. २. 'दाळिंब फळाचे' असें पाठांतर. ३. ध्येय, ध्याता व ध्यान—ही त्रिपुटी. ४. 'आला मुसे' असा पाठभेद. ५. सूर्यानें. 'सुदिवसें' असें पाठांतर. ६. 'अनुभवनिष्ठीं' असा अन्यपाठ. ७. मर्यादा. ८. 'त्याचें आरत पहा वेदीं' असा अन्यपाठ. ९. न+इति=असें नव्हे. 'नेतिवादीं परतीजे' असें पाठांतर. १०. 'मायावर्णातीत' असें पाठांतर. ११. सुज्ञ, पंडित. १२. स+अहं+अस्मि= तो मी आहें. १३. मनोवृत्ति. 'या आवर्तीं' असें पाठांतर. १४. कुंभारीण नांवाची एक जातीची भुंगुटी ही आपल्या घरट्यांत लहान किड्यास नेऊन त्याला टोंचून टोंचून आपल्या रूपास पोंचविते त्याप्रमाणें. 'कीटकभ्रमरीचे' असें पाठांतर. १५. 'उद्यमीं' असें पाठांतर. १६. एकाच मनुष्यास निरनिराळ्या नात्यांस अनुसरून काका, मामा, भाऊ, इत्यादि नांवें देतात त्याप्रमाणें. १७. स्पष्टीकरण (?). 'वाचकां चेटिका' असा पाठभेद. १८. सूर्यास. १९. 'वोते' असें पाठांतर. २०. 'नसतां' असा पाठभेद. २१. पल्लव (पानें) असल्यामुळें.

॥ ३५४ ॥ तेंवि अनुभवाची खूण । अनुभवी जाणती विचक्षण[1] । बोधितां न बोधिती, अज्ञान । ते पाषाण नरदेही. ॥ ३५५ ॥ येवूनियां नरदेहा[2] । येणें ज्ञानें देहसंदेहा[3] । न खंडिती ते भवडोहा-। माजी पडले चिरकाळ. ॥ ३५६ ॥ एके मरणें न खंडे मरण । म्हणोनि मृतांतर हें वचन । सर्वदा प्रेतप्राय जाण । ज्ञानजीवन ज्यां नाहीं. ॥ ३५७ ॥ आत्मज्ञान जालें जया । ऐसें, **'पंडित'** म्हणती[4] तया । जे न भुलती भोगविषया[5] । स्त्रीसंगादि कल्मषीं[6]. ॥ ३५८ ॥ स्त्रीदेह चर्माची कोथळी[7] । भरली नरकपूयकृमिजाळीं[8] । अधोद्वारीं सदाकाळीं । अधोवातें उघडलें. ॥ ३५९ ॥ जैसी पायखोल घाणीची मोरी[9] । भरणाश्रय अमेध्यनीरीं[10] । तैसा द्रव योनिद्वारीं । म्हणोनि सदा अशौच. ॥ ३६० ॥ अस्थिर म्हणजे न लागतां क्षण । तंव पालटे नव तारुण्य । जरेनें[11] देतां आलिंगन । होय जर्जर[12] मर्कटी. ॥ ३६१ ॥ चर्मपात्र द्विधा भिन्न । अपानोद्वारें[13] जडलें जाण । त्या लागीं वेंचिती धन । ते मूढ जन संसारीं. ॥ ३६२ ॥ विष्ठामूत्राचें भोजन[14] । जाणोनि रमेना ज्याचें मन । ते पंडित विचक्षण । मोक्षसदनीं ठाकती[15]. ॥ ३६३ ॥ स्त्रीच्या देहीं दोषदृष्टी । देखिजे जैसें विवेकनिष्टीं । तसेंच आत्मदेहानिकटीं । विचारवंतें पाहिजे[16]. ॥ ३६४ ॥ नरदेहींचें तारुण्य प्रबळ । तरंगभंगींहूनी[17] चंचळ । होवोनी नासती जलकल्लोळ[18] । तैसी चंचळ धनलक्ष्मी. ॥ ३६५ ॥ कीं तृणाचे[19] अग्रीं जळबिंदु । पडतां न लगे क्षणपादु[20] । तसा स्त्रीसंगाचा[21] आनंदु । रेतपातीं[22] लवमात्र. ॥ ३६६ ॥ दर्पण[23] धरोनि कोनवडा[24] । त्यावरि ठेवूनि निसरडा[25] । पडतां वेळ लागे केव्हडा[26] ? । वीर्यस्खलन त्यों[27] वेगें. ॥ ३६७ ॥ कळे न कळे ऐसा संतोष । होवोनि, नासतां

१. 'सुविज्ञ' असें पाठांतर. २. 'मनुष्यदेहा' असें पाठांतर. ३. 'ज्ञानसंदेहा' असें पाठांतर. ४. 'म्हणिजे' असें पाठांतर. ५. 'लोभविषया' असें पाठांतर. ६. पापांच्या ठिकाणीं. 'कष्मळीं' असें पाठांतर. ७. पोतें, पिशवी. ८. 'नरकमूत्र' असें पाठांतर. ९. 'पायखोळणी मोहरी' असा अन्यपाठ. १०. अपवित्र, घाणेरड्या पाण्यानें. 'आमध्य नारी' असें पाठांतर. ११. वृद्धावस्थेनें. १२. 'जरी' असें पाठांतर. १३. 'अपानद्वारीं' असें पाठांतर. १४. पात्र, भांडें. १५. जाऊन पोंचती. १६. पाहिलें पाहिजे, पाहावें. १७. तरंग=लाटा. १८. पाण्याच्या लहरी. 'चपळ जळ' असा पाठभेद. १९. गवताचे टोंकावर. 'तृणाग्नि पडतां' असा पाठभेद. २०. क्षणाचा पाद (चौथा भाग), अत्यंत अल्प काळ. 'क्षणार्धपादू' असें पाठांतर. २१. 'स्त्रियांचा' असें पाठांतर. २२. 'वीर्यपातीं' असा पाठभेद. २३. आरसा. 'दर्प करोनि' असा पाठ आदर्श पुस्तकांत होता. २४. तिरकस, वांकडा एका अंगावर. २५. 'त्यावरी उडीदानि सरडा' असा पाठभेद. २६. 'जेव्हडा' असें पाठांतर. २७. 'त्या योगें' असा पाठभेद.

न लगे निमिष । शेखीं दुःख उरे अशेष । महापुण्यक्षय केरी. ॥ ३६८ ॥ वृश्चिकनांगीवरी मधुबिंदु । देखोनि धांवे बुद्धिमंदु[3] । चाखों[4] जातां खेदु । भोगी[5] आला अपार. ॥ ३६९ ॥ नां[6] तरी खड्गाचिये धारे । साखर माखिली, ते पामरें । चाखों जातां, जिव्हा चिरे । सुख केउतें कळेना. ॥ ३७० ॥ तैसें स्त्रीसंगें जें सुख । तें आडनांवमात्र देख । विषें मरण तैसें दुःख । प्राप्त होय निर्धारें. ॥ ३७१ ॥ स्त्रीरमणीं[7] होय सुख । तें मिथ्या नेणती मूर्ख । स्त्रीचा[8] संगमात्र देख । होतां, तोष तेथें नाहीं. ॥ ३७२ ॥ शिवणीमाजी योनिस्थान । तेथें बिंदूचें आगमन । होतां, कंडू उद्भवे गहन । 'मैथुनानंद' ज्या म्हणती.॥३७३॥ योनीबिंदूची भेटी । सरतां देहीं आल्हाद उठी । तैं दोन्हीं स्थानें पुरुषानिकटी । बुजती[11] पोटीं कळाविद[12]. ॥ ३७४ ॥ म्हणूनि तिळतुल्य सुखाचिये चोडें[13] । सुकृत नासे **मेरू**एवढें । जाणोनि स्त्रीदेह दोषभांडें । नातळती[14] सज्ञान[15].॥३७५॥ विष्ठा सूकरासीच[16] गोड । श्वानासि स्वादिष्ट हाड । तैसा विषयासक्तमूढ[17] । तो लोलुप स्त्रीसंगा.' ॥ ३७६ ॥ ऐशीं वचनें **शुक**मुखीं । निघालीं, जैसा वर्षाव पीयूषी[18] । परी तीं अपमानासारिखीं । **रं**भेच्या मनीं मानलीं. ॥ ३७७ ॥ मग राहोनि[19] उत्तर देत निर्गुंती । 'मागां दूषिल्या त्याहूनी मी परती[20]' । ऐसें विस्तारित अर्थी[21] । श्लोकसंकेत बोलता. ॥ ३७८ ॥ **रं**भा म्हणे, '**यो**गिराया ! । तुवां दूषिल्या मानुषी जाया । तयांसारिखी माजी काया । नव्हे, हें काय नेणसी? ॥ ३७९ ॥ वस्तुवस्तूसी अंतर बहुत । ऐसें जाणती परीक्षावंत । एऱ्हवीं कुरूप स्वरूपवंत । गर्भांध[23] काय ओळखे? ॥ ३८० ॥ **उच्चैः**श्रवा रवीचे रथीं । द्वय सहस्र आगळे द्वय शतीं । दोनी योजनें व्योमपंथीं[24] । निमिषार्धें जो क्रमी. ॥ ३८१ ॥ तयाऐसे माझे घोडे । ऐसें नर जो बोले तोंडें । तयातुल्य आन[25] वेडें । कोण असे त्रैलोक्यीं? ॥ ३८२ ॥ काळखड्गाऐसी विळी । किंवा

१. संपूर्ण, दरोबस्त. २. 'क्षयकारी' असा पाठभेद. ३. मूर्ख. 'मुकुटमंदु' असा अन्यपाठ. ४. 'चाटूं जातां दुःखखेदु' असा पाठभेद. ५. अनुभवा. 'भोग' असें पाठांतर. ६. 'कां तीव्र' असा पाठभेद. ७. 'स्त्रियां रमतां' असा अन्यपाठ. ८. 'स्त्रियांचा स्पर्श' असा पाठभेद. ९. 'संसारीचे देहीं' असा अन्यपाठ. १०. 'स्तनीं' असा अन्यपाठ. ११. चमकतात, घाबरतात. १२. शास्त्रवेत्ते. १३. आवडीमुळें. 'निवाडें' असें पाठांतर. १४. स्पर्श करीत नाहींत. १५. 'ज्ञानिये' असें पाठांतर. १६. डुकरास. १७. 'तैसा कामासक्तमूढ । तो भुलला स्त्रीमांसा' असा अन्यपाठ. १८. अमृतमय. १९. थोडा वेळ थांबून. २०. खरोखर, युक्तीनें. २१. निराळ्या प्रकारची. २२. 'अती' असें पाठांतर. २३. जन्मापासून आंधळा. २४. आकाशमार्गानें. 'अधिक पंथीं' असें पाठांतर. २५. अन्य, दुसरें. 'अनावडें (अनाडी)' असा पाठभेद.

असिलतेसारखी पळी । गेजवेलीसीं भिडे कोहळी । कीं तत्रा तैसा दर्पण ? ॥ ३८३ ॥ ऐरावती देवेंद्राचा । समुद्रमथनीं उद्भव ज्याचा । तो वनकुंजरासमान साचा । म्हणे तो कैाय विवेकी ? ॥ ३८४ ॥ चंदन चढे देवनिढळा । एक काष्ठ पडे पायखोळा । कल्पतरूसम बाभळा । कीं केळें तैसे रुईदोडे ? ॥ ३८५ ॥ अश्वत्थ लावूनि गंगातीरीं । प्रदक्षिणा करिती पुरुषनारी । त्यांचे संकल्प क्षणमाझारीं । सिद्ध होती प्रत्यक्ष. ॥ ३८६ ॥ आणि लाविलें मद्योदकाचें कोष्ठ । स्रवती मोव्हीचेच लोट । तयाऐसा तरुवरिष्ठ । हरिवृक्ष केंवि सांगें ? ॥ ३८७ ॥ माणिक, मुक्ता, पाच, पेरोज, । नीळ, वैडूर्य, पुष्कराज । गोमेद, प्रभाकर, मरगज, । पद्मराग, महामणी, ॥ ३८८ ॥ परिस, चिंतामणी, ज्या म्हणती । तेही एक पाषाणजाती । म्हणोनि गारेसाठीं देती । ते मूर्ख कीं शहाणे ? ॥ ३८९ ॥ भरित जांबुनदाच्या तगटें । पालवीं मुक्ताफळें चोखटें । ऐशा दिव्यांबरेशीं रंगटें । काय तुळणेतें पावे ? ॥ ३९० ॥ करोनी शरीराचा चुना । शत यागांचा तांबूल जाणा । देवुनी उर्वशीच्या स्तना । स्पर्शावया अधिकार. ॥ ३९१ ॥ आणिक एक कैपर्दिकेचे चाडे । कच्छ फेडुनी रिघे फुडें । त्या मनुष्यदारेचेनि पाडें । दिव्यांगनी केंवि होती ? ॥ ३९२ ॥ उदार, धीर, पवित्र, ज्ञानी, । दयाशीळ, यशस्वी जनीं, । शापानुग्रहसमर्थ, महामुनी । मूर्त अवतार विष्णूचे. ॥ ३९३ ॥ कृपण, अधीर, दोषी, मूढ, । विश्वपीडक, अकीर्तिकाबाड, । आचारभ्रष्ट, पाषांडी, जड, । मुख्य अधिकारी नरकाचे. ॥ ३९४ ॥ एकाचे नामें जळती दोष । दर्शनें जोडे सोधकां मोक्ष । ऐसे महानुभाव पुरुष । संगें लोकां सुखकारी. ॥ ३९५ ॥ एकाचे स्मरणें पाप-

१. तरवारीप्रमाणें. २. नागवेल. 'गजवेल' या नांवाचें एक भातही आहे. 'गजवेली तैसी काहाळी' असा अन्यपाठ. ३. जंगली हत्तीसारखा. ४. 'म्हणती तो केवीं' असा अन्यपाठ. ५. देवांच्या मस्तकीं. ६. 'बैसे' असें पाठांतर. ७. पायखान्यांत, शौचकूपांत. ८. रुईचीं फळें. ९. पिंपळाचें झाड. १०. 'भोंवत्या भोंवती नरनारी' असा अन्यपाठ. ११. 'होवोनी' असें पाठांतर. १२. मद्योदकाचें काष्ठ म्हणजे शिंदी, ताड वगैरे झाडें. 'घट' असें पाठांतर. १३. दारूचे. 'मद्याचेच' असें पाठांतर. १४. हरिचंदननामक वृक्ष. 'हरिवृक्ष तुळावा' असा अन्यपाठ. १५. 'जे हे' असें पाठांतर. १६. दगडांच्या जाती. १७. भरलेलें, शृंगारलेलें. १८. सोन्याच्या. १९. वस्त्रानें, जरीनें. २०. पदरांत. २१. उत्तम, चांगलीं. २२. जुनें फाटकें वस्त्र. २३. कवडीच्या. 'एक परीचे जाडे' असा पाठभेद. २४. समान, सारखी. २५. 'देवांगना' असा पाठभेद. २६. शाप देण्यास किंवा कृपा करण्यास समर्थ. २७. 'दोषे' असें पाठांतर. २८. अपकीर्तिरूप कावाड (ओझें) वाहणारा. 'अकीर्ति बाड' असा पाठभेद. २९. 'सिद्धिका' असें पाठांतर. ३०. 'सुखप्राप्ति' असें पाठांतर.

प्राप्ती । दर्शनें नरकासी निश्चयें नेती । संगें पाडिती दुःखावर्ती । ते अधम उत्तम कैसेनी? ॥ ३९६ ॥ एक प्रतापें जिंकिती क्षिती । एक हरविती वडिलांची वृत्ती[1] । एकातें म्हणती चक्रवर्ती । एक भक्षिती कोरान्न[2]. ॥ ३९७ ॥ एक सुपुत्र कुळातें तारी । एक पूर्वजां पाडी अघोरीं । म्हणोनि अधम पुरुषा सैरी[3] । नाहीं जाणा निर्धारें. ॥ ३९८ ॥ विष्णुतीर्थें वैकुंठ जोडे । सुरापानीं रौरवीं पडे । दोन्ही उदकें ऐकापाडे[4] । म्हणतां मूढ नाडले. ॥ ३९९ ॥ [5]मंदाकिनी आणि [6]वैतरिणी । सारिख्या म्हणती पापी प्राणी । जगें नाहिजे जान्हवीजीवनीं । कर्दमनदीतें[7] नातळती. ॥ ४०० ॥ म्हणोनी वस्तुवस्तूसी पाहें । अंतर महदंतर आहे । ऐसें जाणे तोचि लाहे । 'चतुर' नाम विलोकीं[8]. ॥ ४०१ ॥ तेंवि आम्ही देवांगना । पुण्यावेगळ्या न भेटों[9] कवणा । मानवीच्या[10] देहदूषणा । काया अमुच्या नातळती[11]. ॥ ४०२ ॥ प्रत्यक्ष पाहीं माजें रूप । दिव्य देहीं लावण्यदीप । येथीचें सुरतसुख अमूप । तें स्वानुभवें जाणावें. ॥ ४०३ ॥ हे आनंदरसाची कूपिका[12] । गोडी आणी सर्व सुखा । आधीं चाखोनियां अधरपीयूषा । प्रतीति[13] पाहें ययाची. ॥ ४०४ ॥ मग ग्राहक होई शरीरा । संतोष देईन तनुअंतरा[14] । मातें अव्हेरितां चतुरा ! । महाहाणीस मान.' ॥ ४०५ ॥ ऐसी रंभा अनुवादली[15] । परी शुकानें धिःकारिली[16] । जैसा नृसिंहउपासक[17] बळी । महाभूतीं छळिजेना[18]. ॥ ४०६ ॥ पुढती तिच्या कर्णकुंभा । भरिता झाला वैराग्यअंभा[19] । ज्या तिरस्कारें लाजोनि रंभा । हृदय फाडी आपुलें. ॥ ४०७ ॥ शुक म्हणे, 'रंभे! देखें[20] । कामें पुरुष झाला मूर्ख । वरी वरी लावण्य सुरेख । कामिनीचें देखोनी. ॥ ४०८ ॥ चाफेगोरटी सुकुमारी । डोळस श्यामांगी सुंदरी । वंदनीं[21] कुंकुमकेशरी । उटी साजिरी

१. उपजीविकेचें साधन. २. 'येक आजन्म कोराञी' असा अन्यपाठ. ३. उपमा. ४. एकसारखींच. ५. गंगानदी. ६. यमलोकांतील नदी. ७. 'कर्मनदीतें' असें पाठांतर. ८. 'त्रैलोकीं' असा पाठभेद. ९. प्राप्त होत नाहीं, मिळत नाहीं. 'भेटणें' ह्याचा 'प्राप्त होणें, मिळणें' अशा अर्थी प्रयोग नागपुराकडे करण्याचा प्रघात आहे. १०. मनुष्यस्त्रीच्या. 'मानिनीच्या' असें पाठांतर. ११. स्पर्श करीत नाहींत. १२. कांचेची शिशी. १३. अनुभव. १४. तनु (शरीर) व अंतर (अंतःकरण) ह्यांस. १५. भाषण करिती झाली, बोलली. १६. 'परी शुकें धिःकारीच बोली' असा अन्यपाठ. १७. नरसोबाचा भक्त. १८. ह्यांप्रमाणें मुक्तेश्वराच्या काळींही भूतबाधा झाल्यास तिच्या निवारणार्थ नरसोबाची सेवा करणाचा प्रचार बराच प्रचलित असावा, असें दिसतें. १९. वैराग्यरूपी जल. २०. 'ऐक' असें पाठांतर. २१. 'चंदन' असें पाठांतर.

दिसतसे ॥ ४०९ ॥ कस्तूरी रेखिली निटिळा[1] । त्यावरी जडित भांगटिळा[2] । मुक्ताहार[3] मिरवे गळां । दिव्याभरणें शोभती. ॥ ४१० ॥ ऐसें[4] वरी वरी देखतां डोळां । अधोद्वारीं सुटती[5] लाळा । तृष्णासर्पिणी[6] गुह्यबिळा । तोंड घाली लवलाहें. ॥ ४११ ॥ परि विचारें सारोनि चीरें[7] । अंतर न पाहतीच पामर । घायमुखासम[8] छिद्र । रक्त स्रवे सर्वदा. ॥ ४१२ ॥ दुर्गंधीचें जन्मस्थान । संयोगाचेनि मिषें जाण । चित्त, वित्त, आयुष्य, हरण । हारोनि सांडी पुरुषाचें ॥ ४१३ ॥ म्हणसी मानविनी कनिष्ठ । आपुलें देह वरिष्ठ । हें बहुतांचें उच्छिष्ट ताट । घोंगायलें[9] विकारीं[10]. ॥ ४१४ ॥ खरकटलिया पात्राचे कांठ । चोहटां[11] चाटिती श्वानांचे थाट[12] । तैसे स्वर्गांगनेचे वोंठ । स्वर्गा[13] जौल्यानें[13] चुंबावे. ॥ ४१५ ॥ देवळीं मांडिली भेरी[14] । बडवितीया कोण निवारी । तैसी वक्षःस्थळाची परी[15] । आवडे तेणें मर्दावें. ॥ ४१६ ॥ कीं वाकळ[16] पडे वाटेवरी । ते काठीनें उचलिजे वाटसरीं[17] । तसी नितंबवस्त्राची परी[15] । उघडिल्या[18] नाहीं निषेध. ॥ ४१७ ॥ बाळसमुदायाचे[19] साळे[20] । दगड[21] कमाविले वाटोळे[21] । ते उचलावे पुरुषें[22] सबळें[22] । तसेपरी कुचयुग्म. ॥ ४१८ ॥ उखळ रोंविलें[23] धर्मशाळे । भलती कांडी भलत्या वेळे । तैसें कामालय मोकळें । स्वर्गकामें यजिती[24] त्यां. ॥ ४१९ ॥ कीं ग्रामद्वारीं मांडिले खोडे । अन्यायीपायीं[25] सुदती[26] देवडे[27] । तरी तृप्ति न मानुनी[28] तोंडें । उघडें असिजे सर्वदा. ॥ ४२० ॥ तैसें बहुतीं बहुत काळ । सेवसेवूनी केलें शीतळ[29] । तरी भोगित्यापुढें उतावेळ । सन्मुख सदा

१. कपाळास. २. भांगामधील शेंदुराची चिरी. 'त्यावरी भांगटिळा जडिला' असा पाठभेद. ३. मोत्यांचा हार (माळा). ४. 'ऐशी' असें पाठांतर. ५. 'सुटली' असें पाठांतर. ६. 'कृष्णसर्पांण' असा पाठभेद. ७. वस्त्र. ८. घाय=जखम, क्षत. ९. बुजबुजलें. १०. मनोविकारांनीं. ११. चवाठ्यावर. 'हटां' असें पाठांतर. १२. समुदाय. १३. स्वर्गास जाणाऱ्यानें, ज्यास स्वर्गसुखप्राप्तीची इच्छा झाली त्यानें. १४. नगारा. १५. प्रकार, स्थिति. १६. गोधडी. १७. प्रवाशानें. १८. 'उघडिल्या' असें पाठांतर. १९. मुलांचे. 'सळ करितियाचे' असा अन्यपाठ. सळ=वैर, आग्रह, अभिमान. २०. पाठशाळेंत. २१. ह्या दृष्टांतावरून मुक्तेश्वराच्या काळीं शाळेंतील मुलांस लिहिण्यावाचण्याबरोबरच कसरत शिकविण्याचा प्रघात असावा, असें म्हणावयास हरकत नाहीं. अशा प्रकारचे दगड अजूनही कोठें कोठें, विशेषत: होळीचे चव्हाठ्यावर आढळतात. २२. बळवान् पुरुषानें. २३. 'मांडिलें' असा पाठभेद. २४. स्वर्गप्राप्ति व्हावी ह्या हेतूनें यज्ञयागादि करणाऱ्यांस. २५. अपराध्याच्या पायांत. २६.चढविती, घालिती. २७.देवडीवर. २८. 'तरी तृप्त न होऊनि' असा पाठभेद. २९. 'थल' असा अन्यपाठ. थल—थलथलीत, सैल.

पसरलें. ॥ ४२१ ॥ [1]नरकार्णव भयानक । भोंवतें [2]वडवाग्नीचें मुख । पुरुष-वीर्य [3]सिंधूदक । नित्य सेवितां [4]शमेना. ॥४२२॥ भग भडाग्नीच्या [5]आहें । जानु-द्वय करपलें पाहें । [6]त्यावरी आच्छादिलें आहे । रम्या वस्त्रें करोनी. ॥ ४२३ ॥ ऐशी 'नारी' यया [7]नांवीं । [8]पुरुषउन्मादलता जाणावी । [9]स्वर्गमोक्षसुखा आडवी । [10]मार्गागळा अवघड. ॥ ४२४ ॥ कळे स्त्रीदेहीं नरक पूर्ण । कळे [11]भोगियां [12]भवबंधन । न कळे कां पां तेथेंच मन । [13]जाणोनिच लुब्धलें ॥ ४२५ ॥ स्त्रीदेह नरकसमुद्र । जाणोनि, तेथें रमती नर । ते नरकरूपी घोर संसार । [14]कैशी परी तरतील? ॥ ४२६ ॥ जेथें जन्म, तेथें रमती, । [15]हे संसारिकांची रीती । विष्टामूत्रद्वारीं रमती । ते कृमिरूप [16]निर्धारें.' ॥ ४२७ ॥ ऐसें छी! छी! करोनी देखा । निंदितां रंभा चढली [17]तवका । मग करिती झाली काय, ऐका । जन्मेजया! श्रोते! हो! ॥ ४२८ ॥ [18]शुकशब्दउल्का शिवतां श्रोत्रीं । रंभा पोळली [19]जिव्हारीं । तें शल्य काढावया बाहेरी । फाड करी स्वहृदयाचा. ॥ ४२९ ॥ दोहीं करींचीं दाही नखें । उदरीं रोवोनियां [20]निकें । द्विभाग करून म्हणे, 'देखें । निर्मळ कीं हें [21]कश्मळ.' ॥ ४३० ॥ [22]मौक्तिकशुक्तीचीं पुटें । उकलितां अंतरीं चोखटें । कर्पूरकेळीचे गो-मटे । सारे पदर सोलिल्या. ॥ ४३१ ॥ [23]ऐसें जठर चिरोनी बोटीं । म्हणे, '[24]गुणग्राहका! लक्षीं दृष्टीं । छेदिल्या नाहीं रक्तवृष्टी । व्यथामात्र असेना. ॥ ४३२ ॥ हें [25]विद्यारत्नवेरागर । निर्मळतेचा क्षीरसागर । सुगंधाचा [26]मलया-

१. 'नरक उदर' असा अन्यपाठ. २. वडवाग्नि हा समुद्रांत राहून जल शोषण करणारा अग्नि आहे. [मुक्तेश्वरवनपर्व (काव्यसंग्रह)–पृ० १३ टीप १० व पृ० २९ टी० १३ पहा]. ३. समुद्राचें जल. 'सिद्धोदक' असें पाठांतर. ४. ह्या ओंवीनंतर हस्तलिखित प्रतींत पुढील ओंवी आढळते:–'फुटोनि खार जाली हाडी । माजी पडिलें गाळूनि सांडी । तेथें विष्ठामूत्र तोंडीं । लाळ गळे सर्वदा. ॥' ५. उष्णतेनें, आंचेनें. ६. 'यापरी' असा अन्यपाठ. ७. 'नारी' या नांवाची. ८. पुरुषांस उन्मत्त करणारी लता (वेल). ९. 'स्वर्गभोग-सुखाची' असा अन्यपाठ. १०. दाराचा अडसर, रस्त्यांतील अडचण. ११. उपभोग घे-णाऱ्यास. १२. संसारबंधन. १३. 'जाणोनि नाच' व 'जाणा नेणाच लाधलें' असा पाठभेद. १४. 'कैसेनी तरोनि जातील' असा अन्यपाठ. १५. 'हा!' असें पाठांतर. १६. 'संसारें' असा पाठभेद. १७. आवेशास, त्वेषास. १८. शुकमुनीचे शब्द ह्याच उल्का. १९. मर्म-स्थानीं. २०. खरोखर. 'तिखें'=तीक्ष्ण–असा अन्यपाठ. २१. अपवित्र. २२. 'जैसीं माणीकाशि-पांचीं' असा अन्यपाठ. २३. 'ऐसें जठरांचेनि बोटीं' असा पाठभेद. २४. 'हें गुणगर्भ न्याहाळीं दृष्टी' असा अन्यपाठ. २५. विद्यारूपी हिऱ्यांची खाण. २६. मलयपर्वतावर उत्पन्न होणारा चंदन.

गर । कीं [1]भांडार कळांचें.' ॥ ४३३ ॥ अंतरीं पाहे शुक योगींद्र । दिव्य [2]कपोतें कृष्णागर । [3]वा चंदनें नव केसर । [5]चोखें [6]जवादीमृगनाभी. ॥ ४३४ ॥ ऐशीया परिमळाची पेटी । उघडली, ते देखतां दृष्टी । परम आश्चर्य वाटलें पोटीं । देहीं रोमांच ऊठले. ॥ ४३५ ॥ [7]सात्विकभावें पातला दये । नेणे [8]विकल्प, भेद, भय; । कन्या अथवा देखिजे माय । तैसें जालें ते काळीं. ॥ ४३६ ॥ मग काय; बोले उत्तर । [9]परिसोत श्रोते चतुर । जेणें होय निरुत्तर । वितंडवाद दोहींचा. ॥ ४३७ ॥ शुक म्हणे 'ऐक जननी ! । माझे पूर्वकर्माची काहाणी । द्वादश वर्षें [10]नरकयातनीं । [11]मातृगर्भी वसिन्नलों. ॥ ४३८ ॥ विष्ठामूत्राचा [12]दो-थर । जठराग्नीची [13]आहे थोर । जंतु[14] दुर्गंधी अपार । नाकींतोंडीं संचरती. ॥ ४३९ ॥ अत्यंत [15]संकोचता ठाय । पसरूं न शकें हातपाय । उबाऱ्यानें कोंडलों पाहें । अधोवदनें [16]जांजावलों. ॥ ४४० ॥ ऐसीं [17]चतुर्विंशति अयनें । घटिका युगाचे समान । म्यां भोगिलीं [18]आदानें । गर्भवासीं अपार. ॥ ४४१ ॥ हें जरी [19]जाणवतें [20]अळुमाळ । तरी तुझे पोटीं होतों बाळ । येथेंच वसतों [21]अनंत काळ । निर्मळ गर्भी सुखरूप. ॥ ४४२ ॥ तुजसारिखी [22]पावतों माता । तरी कां पावतों दीर्घ व्यथा ? । गेली गोष्टी व्यर्थ आतां । आठवोनी फळ काय ? ॥ ४४३ ॥ ते हे महाहानीसमान । मी मानितों येथें[23] जाण । चुकी पडलीया [24]शेखीं मन । पश्चात्तापें तळमळी.' ॥ ४४४ ॥ ऐकुनी शुकाचे अनुवादा । रंभा कांपिन्नली गदगदां । अश्रु लोटती [25]नयनारविंदा । [26]स्वेदकंप सर्वांगीं. ॥ ४४५ ॥ [27]अवचट पाय लागला [28]लिंगीं । नेणतां अपमानिला योगी । तयाचा [29]पस्तावा

---

१. खजिना. 'भार कळांचें' असें पाठांतर. २. पारव्या रंगाचा. 'दिव्य पाता' असें पाठांतर. ३. किंवा. ४. 'वा बनश्रीगंध नवकेशर' असा अन्यपाठ. ५. उत्तम, शुद्ध. ६. कस्तूरी. ७. मागें ओंवी ३३८ वरील टीपा पहा. 'साह्नी भावें पातले दये' असा अन्यपाठ. ८. शंका, किंतू. 'जवीं विकल्पभेदाची भोय' असा पाठभेद. ९. 'ते परिसतु एक चतुर' असा अन्यपाठ. १०. 'नरकपतनीं' असा अन्यपाठ. ११. 'मूत्रभागीं' असें पाठांतर. १२. मोदक इत्यादि पदार्थ वाफेनें शिजविण्याकरितां पात्रांत पाणी घालून त्यांत जें कांहीं गवत, पानें इत्यादिकांचा थर घालितात तो, दादरा. १३. ज्वाला. 'अही' असें पाठांतर. १४. 'जंतु किडे कृमी अपार' असा पाठभेद. १५. संकुचित, अरुंद, लहान. १६. गांजलों, त्रासलों. 'अधोमुख जाचावें' असा अन्यपाठ. १७. चोवीस मासषट्कं, १२ वर्षें. १८. कष्ट, संकटें. 'पतनें' असें पाठांतर. १९. 'जाणतों' असें पाठांतर. २०. अणुमात्र, किंचित्. २१. 'चिरकाळ' असें पाठांतर. २२. 'जोडिती' असा पाठभेद. २३. येथें. २४. शेवटीं. 'सांतीं' असा अन्यपाठ. २५. नयनकमळीं. २६. स्वेद=घाम. 'खेदकंपू' असें पाठांतर. २७. अचानक, न जाणतां. २८. महादेवाच्या लिंगास. २९. पश्चात्ताप. 'तया प्रस्तावाच्या अंगीं' असें पाठांतर.

होय अंगीं । शांरें[1] भरे सुमनाचे. ॥ ४४६ ॥ तैसें जालें तयेचिया जीवा । बोलावया न वळे जिव्हा । नेणीव[2] घेतीयापुढें[2] सर्वा । पृच्छा[3] जैशा पौरुषती[4]. ॥ ४४७ ॥ तेणें निरुत्तर जाला वाद । गर्भी सांठविला पुढिला शब्द । युक्तिप्रयुक्तीचा कंद । खाणोनि परंता[5] सांडिला. ॥ ४४८ ॥ प्रसूतीनंतर तारुण्य सरे । वि[6]शाखांतीं मेघ विरे । गीत परतोनियां भरे । गाणारहृदयीं ललितांतीं[7]. ॥ ४४९ ॥ कीं शांति पावलिया क्रोधीं । युद्धीं जालिया सामसंधी[9] । मार्गी जातां महोदधी । [10]पांथिक जैसा [11]पांगुळे. ॥ ४५० ॥ कीं गुरुदर्शनें विरे[12] संसारू । विवेक खंडी पापाचारू । तैसा शुकवाक्यें विचारू[13] । सर्व हरपला रंभेचा. ॥ ४५१ ॥ मुकली अभिलाषाची नदी । प्रगट जाली निष्कामबुद्धी । मग स्तुति मांडिली शुकशब्दीं[14] । श्रीशुकाची ते ऐका. ॥ ४५२ ॥ म्हणे, 'आश्चर्य त्रिभुवनीं । एवढा अक्षोभ्य[15] महामुनी । नाना परी मोहितां मनीं । विकार नेघे[16] तिळतुल्य. ॥ ४५३ ॥ योगीयांचा तूं परम ईश । [17]यतींमाजी परमहंस । त्रैलोक्य चराचरीं[18] पुरुष । तुजतुल्य नाहीं; विप्रेंद्रा! ॥ ४५४ ॥ सुरासुर, पैं गंधर्व, । सिद्ध[19], विद्याधर सर्व, । पाताळपन्नग[20] आणि मानव । जितेंद्रिय संन्यासी; ॥ ४५५ ॥ कंदमूळफळाहारी, । शुष्कपर्णाशनी[21], अनीरी[22], । ऊर्ध्वपादीं[23], अधोवक्त्रीं, । वायु भक्षिती तपस्वीये; ॥ ४५६ ॥ तेही मातें देखतां त्वरित । कामें होती विव्हळ[24] बहुत । म्हणोनि तुजपाडें[25] सत्य । तूंचि एक, ऋषिवर्या !

---

१. शहारें, थरकांप, कांटा. २. मुद्दाम अज्ञान प्रगट करणाऱ्यापुढें. नेणीव=अज्ञान. ३. प्रश्न, शंका. ४. खुंटती, तुच्छ होती. ५. पलीकडे, दूर. ६. अश्विनी, भरणी इत्यादि नक्षत्रांपैकीं एक. ७. ललिताचे वेळचीं पदें, अभंग वगैरे म्हटल्यानंतर. ८. 'सरलिया' असें पाठांतर. ९. सख्य, मैत्री. [मुक्तेश्वर–सभापर्व (काव्यसंग्रह)–पृ० २५ टी० १० पहा]. १०. प्रवासी. ११. पांगुळा होई. १२. 'सरे' असें पाठांतर. १३. शुकाच्या तपाचा भंग करण्याचा विचार. १४. पोपटाच्या स्वरानें, गोडवाणीनें. १५. क्षोभविण्यास अशक्य, मोहाच्या आटोक्यांत येत नाहीं असा. १६. 'नोहे' असें पाठांतर. १७. 'योगियांमाजी' असें पाठांतर. परमहंस=अत्यंत उच्च पायरीचा यती. यतींचे चार प्रकार आहेतः– 'चतुर्विधा भिक्षवस्ते कुटीचकबहूदकौ । हंसः परमहंसश्च योऽत्र पश्चात् स उत्तमः ॥' १८. 'त्रैलोकीं साचार तूंचि पुरुष' असा अन्यपाठ. १९. 'यक्ष' असें पाठांतर. २०. पाताळांतील नाग. २१. सुकलेलीं पानें भक्षण करणारा. २२. जलप्राशन न करणारे. २३. वर पाय व खालीं तोंड करून. २४. 'विव्हळभूत' असा अन्यपाठ. २५. तुझ्यासारखा. येथें **'अनन्वय'** नांवाचा अलंकार आहे. [मुक्तेश्वर–सभापर्व–(काव्यसंग्रह)–पृ० ५० टीप २ पहा].

॥ ४५७ ॥ सकळ योगियांत[1] योगसिद्धी । तुजचि लाधली[2] त्रिशुद्धी[3] । सहन-शीळ तुझी[4] बुद्धी । तूंचि एक, मुनिराया! ॥ ४५८ ॥ माझिया कटाक्षांचे शर । लागतां, भेदले सुरवर[5] । ते शर हाणतां रोमाग्र । वक्रता तुझें न पवेची.' ॥ ४५९ ॥ ऐशी गर्जूनियां[6] गिरा[7] । उभारोनी दक्षिण[8] करा । शुकाचिया वैरा-ग्यधीरा । रंभा वर्णी आगळें[9]. ॥ ४६० ॥ 'मेरू सांडील स्वस्थान । विदेशीं[10] नेऊं येईल सदन । भूतळा सेवील उडुगण[11] । ध्रुव[12] तो होईल अध्रुव[13]. ॥४६१॥ भूगोळ[14]प्रदक्षणेलागीं । मंदराचळ निघेल वेगीं । हिमगिरीचे आंगीं[15] । आटों शके सुरसरिता[16]. ॥ ४६२ ॥ पूर्वेचा चळेल[17] सूर्य । घटीं कोंडिला जाईल वाय[18] । शब्दासरिसा[19] वरुणालय[20] । मागें मागें फिरवूं ये. ॥ ४६३ ॥ परी शुकाचा नेम

१. 'योगार्चा' असें पाठांतर. २. 'साधली' असें पाठांतर. ३. निश्चयेंकरून. ४. 'मनन-शीळ सत्वबुद्धी' असा अन्यपाठ. ५. 'सुरासुर' असा पाठभेद. ६. 'गर्जतां' असें पाठांतर. ७. वाणी. ८. उजवा. ९. फार, पुष्कळ. १०. परदेशास, अन्यस्थानीं. ११. नक्षत्रें, तारे. १२. ध्रुवाचा तारा. १३. चंचल, अस्थिर. आजपर्यंत ध्रुवतारा अचल असून तो कधींही बदलत नाहीं, अशी समजूत होती. परंतु ती समजूत चुकीची आहे. ह्याविषयीं पुढील उतारा वाचण्याला-यक आहे:—'ध्रुवताऱ्याचें अध्रुवत्व—सांप्रतकाळीं लघु ऋक्षाचे पुच्छाग्रांतील ठळक ताऱ्यास ध्रुवतारा म्हणतात. हा खस्थ ध्रुवबिंदूपासून सुमारें दीड (एक अंश सव्वीस कला) अंशावर आहे. परंतु संपातांचे विलोमगतीमुळें सदैव एकच ध्रुवतारा न राहतां तो कालगतीनें बदलत असतो. ताऱ्यांचे नकाशांत कदंब मध्य कल्पून तेवीस अंशांचे त्रिज्येनें वर्तुल काढिलें असतां त्या वर्तुल परिघाचे आसपास जे ठळक तारे असतात त्यांस कालगतीनें ध्रुवत्व कांहीं काळपर्यंत प्राप्त होतें. संपाताची विलोमगती दरसाल सुमारें पन्नास विकला असल्यामुळें वर सांगितलेल्या वर्तुल परिघांत फिर-ण्यास खस्थ ध्रुवबिंदूस सुमारें २५८६८ वर्षें लागतात. यामुळें ज्या ताऱ्यास एकदां ध्रुवत्व प्राप्त झालें त्यास तें पुन्हा २५००० वर्षांपूर्वी प्राप्त व्हावयाचें नाहीं. अठरावे शतकाचे पूर्वार्द्धांत ब्राडलेनामक इंग्लिश ज्योतिषी होता, तेव्हां ध्रुवताऱ्याचें खस्थ ध्रुवबिंदूपासून अंतर दोन अंशां-हून अधिक होतें. हल्लीं दीड अंश आहे, तें कमी कमी होत होत अर्धा अंश होईल. नंतर सांप्रतच्या ताऱ्याचें ध्रुवत्व नष्ट होईल. सुमारें ४००० (३९७०) वर्षांपूर्वी कालियांतील ग्यामा नामक ताऱ्याकडे ध्रुवत्व होतें. त्या काळीं ग्यामानामक ध्रुव ताऱ्याचें खस्थ ध्रुवबिंदूपासून अंतर तीन अंश, ४४ कला व २५ विकला (३°४४′२५″) होतें. आजपासून सुमारें १२००० वर्षांनंतर स्वरमंडळांतील अभिजित् नक्षत्र हें ध्रुवतारा होईल.' [निबंधमाला—अंक. ३२ पृ. ३१—३२, कै० **ज. बा. मो**डक यांचें पत्र]. १४. पृथ्वीप्रदक्षणा करण्याकरितां. १५. उष्णतेंत. 'अंगीं' असें पाठांतर. १६. गंगानदी. १७. 'पूर्वे चाळती सोमसूर्यो' असा अन्यपाठ. १८. वायू. १९. आज्ञा होतांच. 'शब्दासारिखा' असें पाठांतर. २०. समुद्र.

अचळ । कल्पांतीं नोहे चंचळ । हें त्रिसत्य वाक्य निर्मळें । ऐकती त्यां निज मोक्ष.' ॥ ४६४ ॥

---

## उपसंहार.

सरला रंभेचा अनुवाद । पुढें व्यासाचा संवाद ।
पुत्र पित्याचा विवाद । ऐकतां बोधू ये भेटी. ॥ १
जाणें नेणें मी यया । कळस वाहिला तृतीयोध्याया ।
ध्वज बांधला दत्तात्रेया । दर्शनें मोक्ष जेंगातें. ॥ २
अर्चित कैवल्याचा दानी । यालागीं नाम 'चिंतामणी' ।
सायुज्यमुक्ती तयाचे चरणीं । मुक्तेश्वर तेथ मागे. ॥ ३

---

१. 'हे सत्य त्रिसत्य विमळ' असा अन्यपाठ. २. व्याख्यान, भाषण. ३. शांतिपर्व–अध्याय २३१–२५५ पहा. ४. शांतिपर्व–अ. २७७ पहा. ५. 'ऐकती त्यां निजमोक्ष' असा अन्यपाठ. ६. 'जें माम्या' असें पाठांतर. ७. ह्या उल्लेखावरून 'रंभाशुकसंवाद' हा मुक्तेश्वरकृत शांतिपर्वाचा तिसरा अध्याय असावा, असें स्पष्ट होतें. ८. 'ध्वजा बांधिली' असें पाठांतर. ९. अत्रीचा पुत्र दत्त. हें जनार्दन व एकनाथ यांचें आराध्य दैवत होतें तसेंच मुक्तेश्वराचेंही होतें. १०. 'दर्शनें सुख जयातें' असा अन्यपाठ. ११. कैवल्याचा (मोक्षाचा) दानी (दाता)=मोक्षदायक. १२. 'म्हणोनी नामें' असा अन्यपाठ. १३. चिंतिलेली वस्तू प्राप्त करून देणारा मणि. १४. 'सांगतसे' असें पाठांतर. 'इति श्रीमहाभारते शांतिपर्वणि शुकरंभासंवादो नाम तृतीयोऽध्यायः ॥ प्रसंग ३ ॥–संपूर्णमस्तु ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥' असा समाप्तिलेख एका हस्तलिखित प्रतींत आहे. ह्या प्रकरणाची एक पोथी आम्हांस रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, बी. ए. यांनीं मिळवून दिली, याबद्दल आम्ही त्यांचे फार आभार मानितों.

# २. श्रीकृष्णचरितविषयक प्रकरणें.

## ५. गजेंद्रमोक्ष.

(ओंव्या.)

वसंतमासाचे अंतीं । उष्णकाळ रवितप्तीं । गज कुटुंबेंसी तृषार्थी । गंडिकेप्रती पातला. ॥ १ ॥ गज जाऊनि उदकाआंत । शुंडे उदक घेऊनि प्राशीत । नक्रें[2] येऊनि अकस्मात । शुंडा[3] करकमळ[4] घातला. ॥ २ ॥ सर्व[5] नदींप्रति जाय । परी गंडिकेसी न जाय । अंत पावतां विसरता होय । होणार गतीसारिखें. ॥ ३ ॥ उभी राहतां होणार गती । ज्ञाते तेचि पावती भ्रांती[6] । ब्रह्मादिक हे नेणती । होणार गतीसारिखें. ॥ ४ ॥ म्हणोनि टाकिलें[7] जळ । उदकामाजी करी खेळ । नक्रें येऊनि तात्काळ । शुंडा करकमळ घातला. ॥ ५ ॥ वोढी काढितां[8] बाहेरी । नक्रें नेला जळाभीतरीं । दोघे भांडती पूर्व वैरी[9] । अति आक्रोशें[10]करूनियां. ॥ ६ ॥ मग अवघीं[11] एकवटोनी[12] । गंडिकेतीरीं उभीं राहुनी । स्त्रीपुत्रादीकरोनी । नानापरी रुदताती. ॥ ७ ॥ मग म्हणती एकमेकांशीं, । 'श्रीदेवें वांचविलें आम्हांसी । जाऊं आपुल्या आश्रमासी । ईश्वरें रक्षिलें म्हणोनी. ॥ ८ ॥ मुख्य नायका[13] झालिया निःपात[14] । आम्हीं काय करावें येथ । पुरला आयुष्याचा[15] अंत । त्यांहीं निजधाम टाकिलें. ॥ ९ ॥ आतां जाऊं आपुल्या आश्रमा । पुढें जाऊनि करूं संसारकाळक्रमा । वडिलांचिया

---

१. हें प्रकरण श्रीमद्भागवत–स्कंध ८ अध्याय २–४ ह्यांच्या आधारानें लिहिलेलें आहे. गजेंद्र हा इंद्रदमन नांवाचा राजा होता. एकदां अगस्त्यऋषी ह्या राजाच्या भेटीस गेले होते, त्या वेळीं राजानें ह्यांचा योग्य रीतीनें आदरसत्कार न केल्यामुळें, ऋषीनें त्यांस शाप दिला–अशी कथा आहे. २. नक्र हा मूळचा हूहू नामक एक गंधर्व होता. त्यानें दवेलऋषी गंगेंत स्नान करीत असतां, थट्टेनें त्यांचा पाय धरून ओढला, यामुळें ऋषीनें त्यास 'नक्र होशील' असा शाप दिला–अशी कथा आहे. ३. सोंडेला. ४. येथें कदाचित् 'करकवळ' असा पाठ असावा. करकवळ=हाताचा कवा, हाताची मिठी, हाताची वेंघ. गजेंद्राची सोंड नक्रानें ओढली–हा इत्यर्थ. ५. 'सर्व निदीं' असा कांहीं ठिकाणीं पाठ आहे. परंतु तो अपपाठ दिसतो. ६. भ्रम, अज्ञानाचें पटल. ७. (?) 'ठाकिलें' असा तर पाठ नसेलना? जळ ठाकिलें=पाण्याजवळ जाऊन पोंचला. ८. [सोंड] बाहेर काढितां [नक्र आंत] वोढी (ओढी)—असा अन्वय. ९. मागील जन्मांतील वैरी. पूर्वजन्मांतील वैराचें कारण माहीत नाहीं. १०. आवेशानें. ११. स्त्रीपुत्रादि. १२. जमून, गोळा होऊन. १३. (कुटुंबांतील) मुख्य पुरुषाचा. १४. नाश. १५. ज्यांच्या आयुष्याचा अंत पुरला (=पुरा झाला, घडला) त्यांहीं–असा अन्वय.

कुळधर्मा । तया नेमा न चुकावें.' ॥ १० ॥ ऐसें धरूनियां चित्तीं । सकळ गेलीं आश्रमाप्रती । दुर्घट दुःखाचे आवर्ती । गजेंद्रातें सांडुनियां. ॥ ११ ॥ मग गजेंद्र तो बोभाये । तंव धांवण्या कोणीच न ये; । 'व्यर्थ स्त्रीपुत्राची सोये। भ्रांतिमय मी जालों. ॥ १२ ॥ आतां पाहें कृष्णा! कमळनयना! । तूंचि धांव गा! जनार्दना! । माधवा! मुकुंदा! मधुसूदना! जगज्जीवना! विश्वेशा! ॥ १३ ॥ सर्वेही सुखाचे अंतीं । मज सोहिरीं मिळालीं होतीं । नाहीं मज आजिचे अंतीं; । उपेक्षिलें दयाळा! ॥ १४ ॥ आतां मज कोणी नाहीं । कृपेनें अवलोकूनि पाहीं । आजी भासलें, सर्वेही । व्यर्थ, ऐसें मनातें. ॥ १५ ॥ संसारसंपत्तीचे काळीं । तुझा आठव न ये हृदयकमळीं । विपरीत होतां, वनमाळी!। आठव ते काळीं होतसे. ॥ १६ ॥ झालिया भाग्याचा उदयो । म्हणे मी कर्त्ता होय । वोहट झालिया, तुझे पाय । सर्वदा ध्याय मानसीं. ॥ १७ ॥ एवं आपदा झालियाविण । नातुडती तुझे चरण । कीं करावें योगसाधन । प्राप्ती संपूर्ण पैं तूझी. ॥ १८ ॥ परि मज खातो वैरी । धांव, पाव, गा! श्रीहरी!। तुजवांचोनि संसारीं । नाहीं मुरारी! सोडविता.' ॥ १९ ॥ ऐसी गजेंद्र करितां स्तुती । श्रवण झाली, श्रीपती । कळवळोनी कृपामूर्ती । ते समयीं उठीला. ॥ २० ॥ सुखसदनीं द्वारकाभुवन । मुनिजनाचें विश्रामधाम । ऐसिये स्थळीं मधुसूदन । सुखस्वानंदें क्रीडतसे. ॥ २१ ॥ आपण बैसोनि वृंदावनीं । मुनी तोषविती कीर्तनीं । नारदतुंबर उभे राहोनी । गायन करिती सुस्वरें. ॥ २२ ॥ मुनिजनाचें ध्येयध्यान । कीं देवांचें देवतार्चन । ऐकतां भक्तांचें दीनवचन । सर्वदा त्यातें नुपेक्षी. ॥ २३ ॥ गजेंद्र गंडिकेभीतरीं । उपेक्षिला सहोदरीं । म्हणोनी हृदयीं श्रीहरी । प्रेमेंकरुनी आठविला. ॥ २४ ॥ ऐकोनि गजेंद्राचें दीनवचन । स्वयें धाविन्नला जनार्दन । जेथें गजेंद्रनक्रग्रहण । शीघ्र तेथें पातला. ॥ २५ ॥ येरीकडे गजेंद्र-। शुंडासि झोंबला नक्र । तेणेंकरूनि जर्जर । शरीर झालें गजाचें. ॥ २६ ॥ ऐसें पाहोनि भगवंतें । कृपा उपजली तेथें । उडी मारूनी घातला हात । धरावया दोवांतें. ॥ २७ ॥ दोघे काढूनि बाहेरी । नक्र हाणोनि चक्रीं । धरोनी गजेंद्रातें करीं । विमानावरी बैसविला. ॥ २८ ॥ गजेंद्र घालुनि वि-

१. भोंवऱ्यांत. २. मोठ्यानें ओरडे, प्रार्थना करी. धांवण्या=रक्षण करण्यास. ३. मूढ, मायापाशांत गुरफटलेला. ४. येथें मूळांतील तिसऱ्या अध्यायास सुरवात होते. ५. भाग्याचा वोहट (ओहटी, उतार, निखार, नाश) झाला असतां. ६. प्राप्त होत नाहींत. ७. विश्रांतिस्थान. ८. 'सहोदर' हा शब्द येथें 'संबंधी जन, नातलग' ह्या अर्थी योजिलेला आहे. ९. गजेंद्र व नक्र यांची पकड किंवा मिठी. १०. चक्रानें. सुदर्शन चक्र हें एक श्रीकृष्णाचें आयुध होतें.

मानीं । हरी चालिला घेवोनी । तें नक्रें पाहोनि नयनीं । हास्य करोनि बोलिला. ॥ २९ ॥ 'ज्याणें केलें तुझें स्मरण । तो पावला दिव्य विमान । ज्यासी झालें तुझें दर्शन । त्याणें बंधन पोवावें? ॥ ३० ॥ सकळ दुःखाचें निर्दळण । करावया तुझें नामस्मरण । तें तुजें प्रत्यक्ष जालिया दर्शन । पावलों मरण तत्काळीं. ॥ ३१ ॥ आतां तूं चाल वहिला । परंतु माजा घात केला । मी जालों जळावेगळा । अंत आला मज आजी. ॥ ३२ ॥ तुझ्या दर्शनाचा लाभ । मातें घडला जी! दुर्लभ.' । ऐसें ऐकतां श्रीवल्लभ । केला लोभ तयातें. ॥ ३३ ॥ करें स्पर्शोनि नक्रातें । विमानीं बैसविला त्यातें । दोघे घेऊनि संगातें । वैकुंठासी चालिला. ॥ ३४ ॥ देवोनि आपली स्वरूपता । द्वारपाळ केले उभयतां । श्रीवत्सलांच्छन सर्वथा । नेदी भक्तां आपुल्या. ॥ ३५ ॥ भक्तां साह्य श्रीभगवंत । तारी आपुले निजभक्त । मुक्तेश्वराचें चित्त । हरिचरणीं सर्वदा. ॥ ३६ ॥

---

## ६. हनुमंताख्यान.

### (गरुडगर्वपरिहाराख्यान.)

(ओव्या.)

गरुडसत्यभामेचा अभिमान । विशेष वाढला जाणोन । काय करिता झाला नारायण । तें तूं परीस रोया! ॥ १ ॥ गरुडासि ह्मणे मधुसूदन । 'पाहों इच्छीतसें हनुमान । तयालागीं त्वां जाऊन । शीघ्र आणावें, बळिवंता! ॥ २ ॥ रामअवताराचे अंतीं । भेटला होता मारुती । तयासि बोलिलों

---

१. येथें मूळांतील चौथा अध्याय सुरू होतो. २. अर्थात् बंधन पावूं नये–हें अपेक्षित उत्तर. ३. आपल्याबरोबर. ४. ब्रह्मरूपता, परमात्म्याचे ठिकाणीं लीनत्व. ५. देत नाहीं, टाकीत नाहीं, बिसंबत नाहीं. ६. ह्या प्रकरणाची हस्तलिखित प्रत आम्हांस आमचे मित्र कै० नारायणराव केळकर यांनीं मिळविलेल्या पोथ्यांत सांपडली. रा. केळकर यांस ही प्रत कोणाकडून मिळाली होती, हें समजण्यास मार्ग नाहीं याबद्दल आम्हांस फार वाईट वाटतें. ७. ह्या प्रकरणांत वर्णिलेला कथाभाग श्रीमद्भागवतांत आढळत नाहीं. श्रीधरस्वामींनीं आपल्या 'हरिविजया'च्या ३१ व्या अध्यायांत हा कथाभाग वर्णिला आहे. तसेंच अनंतकवीनेंही ह्या कथानकावर एक छोटेखानी काव्य रचिलें आहे. ८. एक. ९. हा राजा कोण? परीक्षिति काय? १०. येथें 'पाहणें' ह्या क्रियापदाचा ज्या अर्थी उपयोग केला आहे, तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. पाहणें=भेटणें, to see. ११. ह्या चरणाचा अन्वय दोन प्रकारचा करितां येईल:–(१) मी (कृष्ण) हनुमान(मारुतीस) पाहूं इच्छीतसें. किंवा (२) हनुमंत [मातें] पाहों इच्छीतसे.

निरुतीं । कृष्णअवतारीं भेटी देईन. ॥ ३ ॥ सागरांचे पैल प्रांतीं । हृदयीं धरूनि राममूर्ति । पद्मासन घालुनियां, चित्तीं । अखंड मातें ध्यातसे. ॥ ४ ॥ रामावांचूनि आणिकांतें । सर्वथा 'न मनीं निश्चितें । जैसी पतिव्रता पुरुषातें । जीवें भावें न विसंबे. ॥ ५ ॥ भक्तांमाजी तो अग्रणी । योगियांचा शिरोमणी । जितेंद्रियत्वचरणीं । तोडर गर्जे मन्मथ. ॥ ६ ॥ ज्याचें नाम घेतां वदनीं । पातकें जळती अंतःकरणीं । त्याचे उपकारें मी दंडपाणी । भार जालों अवनीचा. ॥ ७ ॥ तो लक्ष्मणाचा प्राणदाता । संजीवनी आणुनी तत्वता । ख्यात केली, जगा देखतां । रावणा लाज लाविली. ॥ ८ ॥ काय वानूं तयाचा पराक्रम । दृष्टि देखिला गुणोत्तम । तूं अनुभवी परम । पुरुषार्थ पैं बळाचा. ॥ ९ ॥ तो हनुमंत वायुकुमर । नेणसी त्याचा बडिवार । मी जाण त्याचा किंकर, । दृढनिर्धार तो भक्त. ॥ १० ॥ तो साक्षात् रुद्रावतार । हा अकरावा शंकर । हें आयकोनी पक्षीश्वर । मनीं विकल्प मानिला. ॥११॥

१. खरोखर. २. साता समुद्रांपलीकडे. ३. मानीत नाहीं, भजत नाहीं. ४. भ्रताराते. 'पुरुष' शब्दाचा उपयोग 'आपला पति' ह्या अर्थी मुक्तेश्वरानें अनेक ठिकाणीं केला आहे. ५. अग्रगण्य, श्रेष्ठ. ६. शिरोभूषण, श्रेष्ठ. ७. [ज्याच्या] जितेंद्रियत्वचरणीं मन्मथ तोडर गर्जे—असा अन्वय. ज्या मारुतीच्या जितेंद्रियत्वाच्या पायीं मदनरूपी नूपुर गर्जत असे म्हणजे ज्या मारुतीच्या जितेंद्रियत्वानें मदनाला किंवा त्याच्या पुतळ्याला तिरस्कारपूर्वक आपल्या पायाला बांधिलें आहे. तोडरीं बांधणें किंवा घालणें (=नक्षा उतरणें, दासानुदास बनविणें) ह्या शब्दसमूहाचेंच मुक्तेश्वरांनीं येथें रूपांतर केलें आहे. ८. दंडपाणि=दंड (शासनदंड, राजदंड) धारण करणारा. हें एक न्यायाचें द्योतक चिन्ह आहे. मी राजदंड धारण करणारा (न्यायान्यायाचा निर्णय करणारा असूनही) त्याच्या (हनुमंताच्या) उपकारराशीपासून मुक्त होण्यास समर्थ नाहीं, यामुळें मी 'भुईस भार' झालों—हा इत्यर्थ. कवीचा आशय उपकारराशीची महती दाखविण्याचा आहे. ९. लक्ष्मणास रावणाची शक्ति लागली तेव्हां मारुतीनें द्रोणाद्रि आणून, त्यावरील संजीवनीनामक औषधीच्या योगानें त्यास सजीव केलें; अशी कथा आहे. [वाल्मीकिरामायण—युद्धकांड—सर्ग १०१—१०२ पहा]. १०. ख्याति, कीर्ति. ११. 'रावणा लाज लाविली' ही वाक्यरचना चिंतनीय आहे. १२. वर्णू. १३. बळाचा पुरुषार्थ=सामर्थ्याचा उत्कर्ष, बळाचा मूर्तिमंत पुतळाच. १४. मोठेपणा. १५. सेवक, दासानुदास. १६. निश्चयी, एकनिष्ठ. हें 'भक्त'चें विशेषण. १७. मारुति हा रुद्राचा अवतार होय. १८. अकरा रुद्रांचीं नांवें:—'मृगव्याध सर्प निर्ऋती जाण । अजैकपाद अहिर्बुध्न। पिनाकी ईश्वरू कपाळी दहन । भव स्थाणु अकरा हे. ॥ ५३ ॥' [मुक्तेश्वर—आदिपर्व—अध्याय १४.] १९. गरुडानें. येथें 'पक्षीश्वरें' असा शब्द पाहिजे परंतु यमकपोषणार्थ कवीनें विभक्तिप्रत्ययाचा लोप केला आहे. २०. विपाद.

ह्मणे, 'समर्थाची करणें सेवा । परमकठिण[1] लघु जीवा । लक्ष्मीवंतासि पर्वा । पैं कोण्हाची असेना. ॥ १२ ॥ त्यासी कोणी नाहीं नाथ । तो स्वतंत्र रमाकांत । त्यासी नलगे सेवक दूत । तो सकळांहि वेगळा. ॥ १३ ॥ मज वानराप्रति पाठविणें । हें [2]अनुचित कोण्ही नेणे? । 'निकें' ह्मणोनि क्रोधें [3]सत्राणें । उड्डाण केलें पक्षीश्वरें. ॥ १४ ॥ क्षीरसमुद्र, क्षारसिंधु । [4]पक्षें उल्लंघिले पैं [5]मंदू । क्षीराब्धि आणि [6]विशदू । साही समुद्र उल्लंघिले. ॥ १५ ॥ [7]साही समुद्रांपरता । मारुती बैसला होता । आसन घालुनि तत्वता । रामनाम स्मरतसे. ॥ १६ ॥ सूर्योदयीं सारुनी स्नान । जंववरी पावे मध्यान्ह । तंववरी श्रीरामचरण । हृदयीं ध्यान न विसंबे. ॥१७॥ गरुड जाऊनि निकट उभा । तेणें सकळ जीवां देतसे शोभा । देखोनी आंगींची प्रभा । वनचरें भयभीत. ॥ १८ ॥ मग हाक देऊनियां प्रबळ । उभा राहिला सबळ । [8]दोन्ही पिटूनियां करतळ । 'उठीं वानरा!' म्हणतसे. ॥ १९ ॥ लक्ष्या नाणी अंजनीतनुज । हृदयीं ध्यातसे रघुराज । ऐकोनियां गरुडाचा [9]गजबज । मेरू जैसा ढळेना. ॥ २० ॥ मागुती गरुड बोले वाणी । 'तूज पाचारितो चक्रपाणी । उठीं वहिला चाल झडकरुनी । उशीर न लावीं, मर्कटा!' ॥ २१ ॥ [10]येरें बहुत क्षमा केली । रामनामीं वृत्ति गुंतली । वामांगीं सीतामाउली- । सहित ध्यातो श्रीराम. ॥ २२ ॥ गरुडें धरूनी हस्तक । उठविला कपिनायक । येरें कर पसरूनियां देख । वोपिता झाला [11]चंडकण. ॥२३॥ तेणें लागली [12]भोंवरी । भ्रमित झाला गगनोदरीं । मग प्राणसंकटें मुरारी । हृदयकमळीं स्मरिन्नला. ॥ २४ ॥ गगनमार्गें फिरत फिरत । तंव पातला द्वारकेआंत । सिंहासनीं [13]उपविष्ट श्रीकृष्णनाथ । तयासन्मुख पडियेला. ॥ २५ ॥ अधोमुख लज्जित । मुख न दाखवी सभेआंत । मग पुसता झाला वृत्तांत । मधुसूदन गरुडासी. ॥ २६ ॥

---

१. अत्यंत कठिण. 'सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः' [भर्तृहरि–नीतिशतक श्लोक ५८] हें कविवचन प्रसिद्धच आहे. २. मला वानराकडे पाठविणें हें अनुचित आहे, असें कोण जाणत नाहीं? अर्थात् सर्व जाणतात–हा भावार्थ. 'पडत्या आकाशासी धीर । बळें देणार मी पक्षींद्र । त्या मज पाठवितां आणावया वानर । हेंचि अपूर्व वाटतें ॥ १०१' [हरिविजय–अध्याय ३१]. ३. जोरानें. ४. पक्षें=पक्ष्यानें, गरुडानें. 'पक्षें' हें 'पक्षी' शब्दाचें तृतीयेचें एकवचनी रूप चिंतनीय आहे. ५. मदानें, गर्वानें. ६. गोड्या पाण्याचा समुद्र. विशदू=विशद, पवित्र, शुद्ध. ७. सहा समुद्रांपलीकडे. ८. टाळी वाजवून–हा इत्यर्थ. ९. गडबड. १०. मारुतीनें. ११. थप्पड, चपाटी. १२. भोंवळ आली, चक्कर आली. १३. बसलेला.

'काय झालें बा ! कैथन ?' । येरु खेदें करीतसे रुदन । मग सैन्मानुनीयां श्रीकृष्ण । 'शिणलासी मम वत्सा !' ॥ २७ ॥ गरुड बोले सखेद शब्द । 'जरी अंतरीं होता क्रोध विषाद । तरी येथेंचि मारणें हा विधि । हे तों नीत स्वामीची. ॥ २८ ॥ मज वानराकरवीं दंड । प्राप्त केला जी उदंड । आतां प्राणा त्यागीन दृढ । वनप्रयाण करीन.' ॥ २९ ॥ कृष्ण म्हणे, 'विहंगोत्तमा ! । तूं नेणसी वानराचा महिमा । तो साक्षात्कार (?) उमा-। श्रीशंकरू.॥३०॥ तयाचा दाखवावया पुरुषार्थ । म्हणोनि धाडिलें तुज तेथ । तेथें वर्तला जो वृत्तांत । तो सांग रे ! मज वहिला.' ॥३१॥ मग बोले पक्षीश्वर, । 'नाम घेतां यादववीर । अति क्षोभला वानर । प्रळयानळासारिखा. ॥ ३२ ॥ हस्तें करितां मजला ताडण । तेणें पावलों द्वारकापट्टण । देखिले श्रीचरण । क्लेशनाशन स्वामीचे.' ॥ ३३ ॥ कृष्ण म्हणे, "चुकी पडली । 'कृष्ण' अक्षरें कां उच्चारिलीं ? । घेतां श्रीरामनामावळी । लोटांगणें तुज येता. ॥ ३४ ॥ आतां पुढती जाई वहिला । रामनाम ऐकवीं त्याला । मग वंदील पाउलां । हनुमंत तुझ्या." ॥ ३५ ॥ गरुड म्हणे, 'नेवजें स्वामी ! । देखतां वानरक्रोधऊर्मी । शंका अद्भुत अंतर्यामीं । पाउलें माझीं न चलती.' ॥ ३६ ॥ तंव कृष्ण ह्मणे, "आग्रह न करीं. । वदें 'श्रीराम पाचारी'." । मग गरुड निघाला झडकरी । धाके अंतरीं प्रबळ. ॥ ३७ ॥ दुरूनि देखिला अंजनीतनुज । म्हणे, 'नीघ वहिला, पाचारी तुज । अयोध्यावासी रघुराज । भेटीलागीं इच्छीत.' ॥ ३८ ॥ तंव रघुनाथनाम ऐकोनि कानीं । अश्रू लोटले तयाचे नयनीं । धांवोनि लागला गरुडाचे चरणीं । लोटांगण घातलें. ॥ ३९॥ 'कोठें माझा रघुराज ? । तो मज दाखवीं तेजःपुंज । कोठें आहेत ते अनुज ? । भरत आणि शत्रुघ्न. ॥ ४० ॥ कोठें माता जानकी ? । जीचें नाम घेतां मुखीं । उद्धरती[12] महापातकी । [13]अगमोगमीं ब्रह्महत्या. ॥ ४१ ॥

---

१. वर्तमान, हकिकत. २. मग श्रीकृष्ण [गरुडातें] सन्मानुनियां 'मम वत्सा शिणलासी' [असें म्हणे]—असा अन्वय. ३. विकल्प, कपट, कुढाभाव. ४. विधि, प्रकार. वर्णनसादृश्यः—'...... जरी क्रोध आला होता तुम्हा । तरी मज येथें मेघश्यामा । शिक्षा करावी होती स्वहस्तें. ॥ १२७॥ मज वानराहातीं मार । करविला आजी प्रचंड थोर ॥ २२८ ॥ [हरिविजय—अध्याय ३१]. ५. पुष्कळ. ६. लवकर. ७. प्रळयकालच्या अग्नीसारखा. ८. दुःखहारक. ९. नवजाय, जात नाहीं. १०. तेजस्वी. ११. अनु (पाठीमागून) ज (जन्मलेले), कनिष्ठबंधु. १२. 'अहिल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा । पंचकं ना(=नरः) स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥' इत्यादि प्रसिद्ध आहे. तसेंच 'अहल्या द्रौपदी सीता तारा । पांचवी मंदोदरी चतुरा । त्यांचे महिमेचा डांगोरा । भुवनत्रयीं न समाये. ॥ [वनपर्व—अ० ६–१६.] ही मुक्तेश्वरोक्तीही लक्षांत ठेवण्यासारखी आहे. १३. झटकन, लौकर.

जो मुनिजनांचें ध्येय ध्यान । जो देवांचें[1] देवतार्चन । जो जगाचा जगज्जीवन । **राम** निधान[2] भेटवीं.' ॥ ४२ ॥ देखोनी **हनुमंताचा** प्रेमा । गहिंवर दाटला विहंगोत्तमा । '**अयोध्यावासी** परमात्मा । भेटीलागीं इच्छीत.' ॥ ४३ ॥ मग हस्तक धरूनि द्वय[3]मूर्ति । निघते झाले ऊर्ध्वपथीं[4] । त्याचा वेग देखोनि चित्तीं । लज्जाभूत पैं झाला. ॥ ४४ ॥ मार्ग क्रमितां नभपोकळीं । **गरुड** धाके[5] अंतराळीं । '**श्रीराम** न देखतां जवळीं । प्राणसंकट मांडेल. ॥ ४५ ॥ आधींच कोपिष्ठ वानर । दृष्टी न पडतां **रघुवीर** । मग मारील महामार[7] । प्रळय**रुद्रा**सारिखा.' ॥ ४६ ॥ येरीकडे **यादवेश्वरें** । **द्वारका** पालटोनियां त्वरें[8] । **अयोध्या** रचियली एकसरें । **शरयूतीररमणीया.** ॥ ४७ ॥ ऐसी[9] जंव **गरुड** चिंता करी । तंव बोलिला **विश्वसूत्रधारी** । '**द्वारके** केली **अयोध्यापुरी** । क्षण एक न लागतां.' ॥ ४८ ॥ जो अनंत ब्रह्मांडाचा कर्ता । त्यासी काय **अयोध्येची** अशक्यता? । अर्ध क्षणही न लगतां । **कृष्ण** जाहला **श्रीराम** ॥४९॥ **सौमित्र** शोभे सव्य[10]भागीं । पाठी शोभती उभयवर्गीं[11] । मेघश्याम[12] प्रभा[13] आंगीं । कोटी सूर्यांची प्रकाशे. ॥ ५० ॥ **सत्यभामेसी** सांगे **मुरारी,** । '**सीता** होई झडकरी' । नाना वेश घेतां अळंकारीं । पैं रूप न पालटे. ॥ ५१ ॥ येरें **रुक्मिणीकडे** अवलोकिलें । तंव तें तात्काळ **जानकीरूप** जालें । वामांकावरी[14] बैसलें । तेज मिरवलें अर्धांगीं. ॥ ५२ ॥ **गरुडें अयोध्या** अवलोकिली । म्हणे, '**कृष्ण**महिमा नें वचे वर्णिली.[15]' । समीप आले तंव देखिलीं । पांचही दिव्य रूपडीं[16]. ॥ ५३ ॥ **हनुमंत** वंदी **श्रीरामचरणा** । म्हणे, 'आजि सुफळ झाली मनकामना । आवडी[17] देतां आलिंगना । दोघांही एकचि पैं झालीं. ॥ ५४ ॥ ऐसी

१. महादेवप्रभृति देवांचें. २. भांडार, ठेवा. ३. दोघे जण. ४. आकाशमार्गानें. ५. ह्याचा कर्ता 'गरुड'. ६. मनांत. ७. मोठा मार, खरपूस मार. 'महामार मारील' हें Cognate object (क्रियासदृश कर्म) चें उदाहरण होय. [मागें पृ० ७ टी० ४ पहा]. ८. एकदम, ताबडतोब. ९. ओंवी ४७ व ४८ यांचा क्रम उलट पाहिजे असें अर्थाच्या धोरणावरून वाटतें. १०. उजवीकडे. ११. दोघे बंधु (भरत व शत्रुघ्न). वर्ग=सजातीयांचा समुदाय. १२. घननीळ. १३. कांति, तेज. १४. डाव्या मांडीवर. १५. वर्णिली जात नाहीं, अवर्णनीय आहे, वर्णणें शक्य नाहीं. १६. 'रूपडें' ह्या शब्दाचा उपयोग प्रेम व वात्सल्य किंवा भक्ति यांचें आधिक्य दर्शवितो. १७. आवडीनें. मराठी कवितेंत शब्दांचें सामान्य रूप किंवा मूळरूप कधींकधीं अर्थाच्या धोरणानें विभक्तींचें दर्शक होतें. येथें तृतीयेचा प्रत्यय न लावतां 'आवडी' या सामान्यरूपाचा किंवा मूळरूपाचा तसा उपयोग केला आहे. या प्रकारचीं पुष्कळ उदाहरणें आढळतातः=(१) दाटूनि बोलवी **आग्रहता** (आग्रहतेनें, आग्रहपूर्वक) । प्रभूतें पुसे राजवार्ता ॥ [मूर्खांची लक्षणें·

अनेक प्रवृत्ती । आत्मरूपें का स्मरती । तैसा दाशरथी आणि मारुती । स्पर्शले निजस्वरूपीं. ॥ ५५ ॥ ऐसी श्रीरामहनुमंतभेटी । तेणें हर्ष झाला सृष्टी । आनंद वर्तलासे पोटीं । काय बोलों कौतुक? ॥ ५६ ॥ येथींचें सुख जाणत । जे का रामभजनीं निरत । अखंड रामनाम स्मरत । काळ क्रमीत निरंतर. ॥ ५७ ॥

---

**उपसंहार.**

हें ऐकतां **हनुमंताख्यान** । पापें कोटी नाशती जाण । आणि प्राप्त वैकुंठभुवन । हें वाल्मीकाचें पैं वाक्य. ॥ ५८ ॥ वाल्मीकिकाव्य शतकोटी । रामायण असे सृष्टी । जैयास. प्रेम असे पोटीं । सदा सन्मुख, सांगतां.॥५९॥ शंकर जपे हृदयकमळीं । श्रीरामनामावळी । उमेलागीं उपदेशिलीं । दोन्ही चांग अक्षरें. ॥ ६० ॥ सर्वांसी असे तुळणा । परी उपमा नाहीं रामायणा । हें मानलें कवीच्या मना । निश्चयेंसी सर्वदा. ॥ ६१ ॥ मुक्तेश्वराचा श्रीगुरू । दत्तात्रय परब्रह्मअवतारू । स्मरतां. झाला भवसागरू । गोष्पदप्राय सद्भक्ता. ॥ ६२ ॥

---

ओंवी ७२]. (२) उद्धवें विनविल्यावरी । **कृपा** (कृपेनें) कळवळला हरी. ॥ (३) **आवडी** (आवडीनें, आवडीमुळें) कळवळलें चित्त । घाली साष्टांग दंडवत ॥ (४) पत्र लिहिलें **रुक्मिणी** (रुक्मिणीनें) । जेव्हां तुज चक्रपाणी. ॥ (५) स्वकरें चंदन घांशी गंगेचें पाणि **कावडी** (कावडीनें) भरितो. ॥ इत्यादि. १८. राम, लक्ष्मण, सीता, भरत, शत्रुघ्न व मारुति—हीं सहाजणें.

१. आसक्त. २. 'वरदानस्य उक्तिर्या सा काव्य उपसंहृतिः' ज्या पद्यांत वरदानाचा उल्लेख असतो त्यास 'उपसंहार' असें म्हणतात. ५८ व्या ओंवींत वरदानाचा उल्लेख आहे. ३. ज्या रामायणास. ४. 'रा' व 'म' हीं दोन अक्षरें. ५. चांगलीं. ६. मुक्तेश्वर हा श्रीदत्ताचा उपासक होता. ७. गाईच्या पावलाएवढ्या आकाराच्या डबक्यासारखा, फार लहान. ८. सद्भक्त जो मुक्तेश्वर त्यास. ह्या प्रकरणाची हस्तलिखित प्रत कै० वामनराव ओक यांनीं मिळवून ठेवलेल्या हस्तलिखित पोथ्यांत आम्हांस मिळाली. 'मूर्खांच्या लक्षणां'चीही एक प्रत कै० ओक ह्यांच्याच संग्रहांतून आम्हांस मिळाली होती.

# ३. भविष्योत्तरपुराणांतील प्रकरणें.

## ७. विश्वामित्रभोजन.

(ओंव्या.)

हस्तिनावतीस[1] दुर्योधन । राज्य करी सुसंपन्न । तंव अद्वैतवनींहूनि आले ब्राह्मण । करिती स्तुती पांडवांची. ॥ १ ॥ म्हणती[2] 'सदाशिवाचे अवतार । दूरी करावया भूमिभार । प्रत्यक्ष ते हरिहर[3] । जन्मले सोमवंशीं.' ॥ २ ॥ ऐकतां द्विजांचें वचन । सभेचा[4] उठिला दुर्योधन । एकांतीं शकुनीकर्णा । विचार पुसता जाहला. ॥ ३ ॥ म्हणे[5] 'पांडवांचें अयुक्षण[6] क्षीण । हें होईल कैसेन ? । ऐसा दृढविचार[7] करून । मज सांगा; स्वामिया!' ॥ ४ ॥ म्हणे, 'दुर्वासऋषी[8] पाठविला । तोही वृथा जाऊनि आला । ऐसा ऋषी नाहीं जन्मला । शापोनि त्यां[9] भस्म करी.' ॥ ५ ॥ मग शकुनी म्हणे रायासी । 'उपाय आठवला मानसीं । येथें आणावें गांधिसुतासी[10] । तो प्रत्यक्ष अग्नी.' ॥ ६ ॥ ऐकतां शकुनीचें वचन । तत्काळ उठिला दुर्योधन । तंव गंगासागरीं संध्यास्नान । करीत बैसला विश्वामित्र. ॥ ७ ॥ मग घातलें लोटांगण । उभा राहिला करें[11] जोडून । म्हणे, 'अनन्य भावें शरण । कृपा करावी; स्वामिया'! ॥ ८ ॥ मग ऋषी म्हणे, 'माग प्रश्न[12] । तूं भूपतींमध्यें मान्य । तुज जाहलों जी! प्रसन्न । जें मानसीं ये समयीं[13].' ॥ ९ ॥ मग अच्युतवृक्षबीज[14] आणिलें । तें अग्नीं संस्कारिलें[15] । मुनींचे करीं दिधलें । 'हें द्यावें धर्माकरीं ॥ १० ॥ याचा वृक्ष करीं लावून । त्याचिया फळाचें शीघ्र भोजन । जेणें संतोषे माझें मन । संध्या[16] दिधलें

---

१. हस्तिनापुरास. २. ह्याचा कर्ता 'ब्राह्मण'. ३. हा हरिहरांचा दृष्टांत मुक्तेश्वराच्या कवितेंत ठिकठिकाणीं आढळतो:—'जितेंद्रिय सदाचारी । जननीसमान ज्या परनारी । तोही हरिहरांचे सरी । मान्य होय सुरवरां. ॥' (आदिपर्व अध्याय २७।१४१.) ४. सभेंत बसलेला. ५. ह्याचा कर्त्ता 'दुर्योधन'. ६. अयुक्षण=आयुष्य (?).७. पक्का (पोक्त) विचार. ८. ही दुर्वासभोजनकथा मुक्तेश्वरानें आपल्या वनपर्वांत (अ० १२) सविस्तर वर्णिली आहे, ती वाचकांनीं अवश्य पहावी. ९. त्यां (पांडवांस) शापोनि भस्म करी ऐसा ऋषी जन्मला नाहीं—असा अन्वय. १०. विश्वामित्रास. ११. हात. १२. इच्छित वस्तू. १३. ह्या वेळेस जें तुझ्या मनास येईल तें माग—हा इत्यर्थ. १४. येथें 'अमृतवृक्षबीज' असा पाठ असावा. (पुढें ओ० १५ व २९ पहा). १५. भाजलें. [ओंव्याची कोय रुजूं नये म्हणून भाजली.] १६. आतांच्या आतां, तावडतोब.

पाहिजे.' ॥ ११ ॥ 'अवश्य' म्हणोनी तपस्विराज । म्हणे, 'माझें हें सर्वदा काज.' । धर्म छळावयाची पैज । स्विकारिली कोपिष्ठें. ॥ १२ ॥ मनोवेगें त्वरेंकरून । पावला अद्वैतवन । तों धर्मराज टाकीत बळिहरण[1] । तंव पुढें उभा तत्काळ. ॥ १३ ॥ प्रेमें धावोनि लागला पायां । म्हणे, 'जयजयाजी! ऋषिराया! । उत्तम आलेती या समया । स्नान करावें; स्वामिया!' ॥ १४ ॥ ऐसें धर्माचें वचन ऐकोन । ऋषी म्हणे, "अजी! आम्हां कैचें अन्न? । मज द्यावें इच्छिलें भोजन । अमृतफळाचें ये काळीं.' ॥ १५ ॥ बीज[2] दाखविलें धर्माला । 'याचा वृक्ष करतळीं[3] पाहिजे लाविला । त्याच्या फळाचें रसभोजन मजला । अजी! द्यावें, आवड माजी. ॥ १६ ॥ देसी, तरी करितों स्नान । 'नाहीं' म्हणतां जातों परतोन." । ऐसें ऐकतां युधिष्ठिराकारण[4] । आली मूर्च्छना तये वेळीं. ॥ १७ ॥ तंव आली द्रौपदी धांवोन । नमस्कारी ऋषीचे चरण । म्हणे, 'स्वामी! करावें स्नान । त्वरेंकरोनी मुनींद्रा[5]!' ॥ १८ ॥ ऋषी म्हणे द्रौपदीला । 'धर्माकरीं वृक्ष पाहिजे लाविला । त्याच्या फळाचें मजला । अजी! पाहिजे भोजन.' ॥ १९ ॥ ऐसें ऐकतां ऋषिवचनासी । द्रौपदी भयाभीत मानसीं । म्हणे, 'देवा! हृषीकेशी! । हें अघटित कैसें होईल?' ॥ २० ॥ तंव द्रौपदीचें म्लानवदन । बरवें पाहिलें ऋषीनें । म्हणे 'हें नव्हे तुमचेने[6] । तरी मातें आज्ञा द्यावी[7]' ॥ २१ ॥ हें ऐकोन जगत्रयजननी । म्हणे, 'स्नाना जावें महामुनी! । तुमच्या कृपेंकरोनी । सर्वही पदार्थ परिपूर्ण.' ॥ २२ ॥ ऋषी म्हणे द्रौपदीसी । 'त्वरेनें जातों स्नानासी । जरी अंतर पडलें तुम्हांपाशीं[8] । तरी शब्द[9] न ठेवावा मातें.' ॥ २३ ॥ मग तो गेला स्नानासी । द्रौपदी उभी धर्मापासीं । नेत्र लाऊनि हृषीकेशी । आठविला हृत्कमळीं[10]. ॥ २४ ॥ 'ये रे! माधवा! मुकुंदा! । त्वरें यावें आनंदकंदा! । श्रीवरा! स्वामी गोविंदा! । करुणासागरा! पावावें. ॥ २५ ॥ अच्युता! अनंता! नारायणा! । लक्ष्मीकांता! मनमोहना! । धाव, पाव, नारायणा! । जगज्जीवना! कृपाळुवा!'

---

१. वैश्वदेव केल्यानंतर जो बळि टाकितात तो. २. आंब्याची कोय. ३. तळहातावर. ४. धर्मराजास. येथें यमकपोषणार्थ 'स' ह्या विभक्तिप्रत्ययाच्या बद्दल 'कारण' ह्या अव्ययाची योजना कवीस करावी लागली! ५. ऋषिश्रेष्ठा! ६. तुमच्यानें, तुमच्या हातून. ७. आज्ञा द्यावी=निरोप द्यावा, जाण्यास परवानगी द्यावी. ८. जर तुमच्या हातून कांहीं चुकी झाली व मीं तुम्हांस शाप दिला, तर तुम्हीं मला दोष देऊं नये हा भावार्थ. ९. दोष. १०. हृदयरूपी कमळांत.

॥ २६ ॥ ऐसें करितां स्तवन । कंठीं दाटला प्राण । नेत्रासी आलें जीवन[1] । प्राण व्याकुळ जाहला. ॥ २७ ॥ या ऐकोनी स्तवनासी । उभा द्रौपदीचे पाठीसी । 'कोणतें संकट तुम्हांसी? । मजप्रती सांगावें.' ॥ २८ ॥ मग द्रौपदी म्हणे, 'हृषीकेशी! । विश्वामित्र गेला स्नानासी । तो मागे अमृतरस-भोजनासी । वृक्ष धर्माकरीं लावणें.' ॥ २९ ॥ मग बीज घेवोनि नारायण । धर्मे पुढें कर पसरोन । म्हणे, 'तुम्ही नेत्र झांका साहीजण[2] । उपाय करितों, भाग्य तुमचें. ॥ ३० ॥ माझें दहा अवतारींचें पुण्य । तें समर्पिलें धर्माकारण। वृक्ष व्हावा उत्पन्न' । अणीक काय बोलता जाहला. ॥ ३१ ॥ 'मी ब्रह्मचारी सत्यभावें । वृक्ष येथें वाढावें[3]' । संकल्प सोडितां देवाधिदेवें । तरू जाहला द्रुपानी[4]. ॥ ३२ ॥ न लागतां एक क्षणांत । वृक्ष जाला गगनचुंबित । शाखा, पत्रें, फळें, समवेत । पांडवासि म्हणे 'अवलोकीं.' ॥ ३३ ॥ भार होईल धर्माला । म्हणोनि पाणितळीं[5] टाकिलें सुदर्शनाला. । मग म्हणे, 'पाचारा ऋषीला' । आज्ञा केली सहदेवातें ॥ ३४ ॥ तों त्वरें सहदेव धांवोन । ऋषीस घातलें लोटांगण । मग याचें होतां अघमर्षण[6] । वृक्ष देखिला गाधिसुतें. ॥ ३५ ॥ मनीं जाला विकस्मीत[7] । वारंवार अवलोकन करीत । तंव वृक्ष करीं दिसत । राया धर्माचिये. ॥ ३६ ॥ मग बैसविलें ऋषीकारण । षोडशोपचार[8] केलें पूजन । कनकपात्रीं पक्वान्न । दिव्य षड्रसें[9] वाढिलीं. ॥ ३७ ॥ अमृतरसाचें भोजन । तृप्त जाहले सकळ ऋषिगण । मग उठिले हस्तपाद प्रक्षाळून । दिधले तांबूल सर्वांसी. ॥ ३८ ॥ वेदोच्चार करून । सकळ देती आशीर्वचन । विश्वामित्र करीं अक्षता घेऊन । काय वदता जाहला? ॥ ३९ ॥

श्लोकार्ध—'रिक्तपाणिर्न पश्येत राजानं देवतां गुरुम्[10] ॥

'बाहात्तर कोटी वरुषें अनुष्ठान । तें पुण्य अर्पिलें तुजकारण ।' ऐसें देवूनि आशीर्वचन । गेला मुनी हस्तिनापुरा. ॥ ४० ॥ सभे बैसला दुर्योधन ।

---

१. पाणी, अश्रु. २. पांच पांडव आणि द्रौपदी. ३. वाढ पावेल, वाढेल. ४. ज्याच्या कोंभांतून नुकतींच दोन पानें फुटलीं आहेत असा. ५. हाताखालीं. ६. संध्येतील एक प्रयोग. ७. विस्मित, चकित. ८. सोळा उपचारांचीं नांवें:—'आवाहनासने पाद्यमर्घ्यमाचमनीयकम् । स्नानं वस्त्रोपवीते च गंधमाल्यादिभिः क्रमात् ॥ धूपं दीपं च नैवेद्यं नमस्कारं प्रदक्षिणाम् । उद्यापनं षोडशकमेवं देवार्चने विधिः ॥' इति नागदेवः. ९. षड्रसांनीं युक्त. सहा रसांचीं नांवें:—'मधुर, तिक्त, कषाय जाण । कटु, अम्ल, आणि लवण । षड्रस बोलती विचक्षण । सूपशास्त्रीं जाणते. ॥' [मुक्तेश्वर—आदिपर्व अ० २९ ओ० ५९]. १०. राजा, देवता व गुरू यांची भेट रिकाम्या हातीं घेऊं नये (यांच्या भेटीस जातानां त्यांस देण्याकरितां कांहीं नजराणा न्यावा).

म्हणे, 'काय पांडवांचें वर्तमान?' ऋषी म्हणे. 'त्यांचें कल्याण। तुझा वंशक्षय व्हावा. ॥ ४१ ॥ मज कृपणाचें वेचलें धन। बाहात्तर कोटि वरुषांचें पुण्य,। तें सकळही देऊन। अपुला प्राण संरक्षिला.' ॥ ४२ ॥ ऐसें बोलोनि निघाला। बद्रिकाश्रमा तपासी गेला। कृष्ण आज्ञा मागोनि पांडवांला। जाता जाला द्वारके. ॥ ४३ ॥ अदृश्य केलें वृक्षासी। आपण गेला स्वस्थानासी। पुढिले प्रसंगीं श्रोत्यांसी। तें सावधान परिसावें. ॥ ४४ ॥ हे कथा भविष्योत्तरपुराणीं। महर्षि व्यासमुनींची वाणी। मुक्तेश्वराचें चित्त सुमनी। संतचरणीं सर्वदा. ॥ ४५ ॥

---

## ८. दुर्योधनशल्यपरिस्फोट.

(ओंव्या.)

सोमवंशाचीं रत्नें। कौरव, पांडव, नामाभिधानें। व्यासवाक्यांचीं सुमनें[2]। प्रगटलीं वैसुंधरे[3]. ॥ १ ॥ धृतराष्ट्राचे कुमर। एकोत्तरशत सहोदर। प्रतापें झुंजती थोर। मेरु तोही ठेंगणा. ॥ २ ॥ सभे बैसला गांधार। घेवूनि आले सहोदर। भीष्म, द्रोण, कर्ण, वीर। कृपाचार्य, अश्वत्थामा, ॥ ३ ॥ सुशर्मा, जयद्रथ, विदुर,। सोमसप्तक महावीर,। भूरिश्रवा, विकर्ण, सोमदत्त, शूर। सभास्थानीं बैसले. ॥ ४ ॥ सभा झाली सैनातन। तों आला पांडुनंदन। ज्यासी म्हणती श्वेतवाहन। दाहा नांवें शोभती. ॥ ५ ॥ अर्जुन सभेसी आला। सकल अभ्युत्थान देती तयाला। तो सभेमध्यें शोभला। जैसा तारांमाजी मैयंकु. ॥ ६ ॥ सकळ विद्येनें कुशळ। आचरे महाशीळ। सभा

---

१. तपोधन खर्च करण्यासंबंधीं कृपण. २. सुमना (पुष्पा) सारखें. ३. पुष्पें. ४. पृथ्वीवर. ५. धृतराष्ट्राच्या एकोत्तरशत पुत्रांची नामावळी मुक्तेश्वरानें आपल्या आदिपर्वांत दिली आहे. [अध्याय २७ ओ० १०३–११५ पहा.] ६. अशा प्रकारचे प्रयोग मुक्तेश्वरानें आपल्या काव्यांत अन्यत्रही योजिले आहेत:—(१) पुरल्या मनोरथाच्या कोडी। सर्व सौख्या झाली जोडी। आनंद तुळितां पडीपाडीं। स्वर्गही दिसे ठेंगणा. ॥ ६२ ॥ (आदिपर्व-अध्याय १६)—(२) दिव्य तारुण्य, दिव्य संपदा। दैवें लाधली दिव्य प्रमदा। ते वेळीं त्याचिया आनंदा। ब्रह्मांड वाटे ठेंगणें. ॥ ९३ ॥ (आदिपर्व–अध्याय २२). ७. स्थिर, अढळ. ८. अर्जुन. ९. अर्जुनास दहा नांवें होतीं:–अर्जुन, फाल्गुन आणि जिष्णु। किरीटी, पांचवें श्वेतवाहानु। बीभत्सु, विजयी, आठवा कृष्णु। सव्यसाची, धनंजय ॥७५॥' [मुक्तेश्वर–विराटपर्व–अध्याय ६ पहा.] १०. सन्मानार्थ उठून उभें राहाणें. ११. चंद्र.

तल्लीन सकळ । अवलोकिती पांडुसुता. ॥ ७ ॥ सकळ रत्नें कोंदणीं । मध्यें जडिला महामणी । समस्त देखती नयनीं । तैसा धनंजय शोभतसे. ॥ ८ ॥ नानायाती तरुवर । अगरचंदन, देवद्वार[1] । त्यांमध्यें मलयागर । ऐसा पाहातां शोभला. ॥ ९ ॥ पुष्पें पाहतां संपूर्ण । चंपकआदीकरून । मध्यें मालतीसुमन । तैसा पार्थ शोभला. ॥ १० ॥ सकळांसी त्या स्वरूपाचें ध्यान । भीष्मद्रोणआदीकरोन । चित्तीं जालें समाधान । आशीर्वचन पैं देती. ॥११॥ हें पाहातां रायानें[2] । परम लज्जित अंतःकरण । घृतें शिंपिला हुताशन[3] । मान्यता पाहोनी अर्जुनाची. ॥ १२ ॥ पैशुन्य[4] बोले दुर्योधन । पार्थ विंधिला शब्दबाणेंकरून । सभेमध्यें गर्जोन । म्हणे 'आज पाळी कोणाची?' ॥ १३ ॥ ऐकतां हें उत्तर । करावया नसे निरुत्तर । अंतःकरणीं लागला शीर । दुर्योधनाचा. ॥ १४ ॥ पार्थ आला धर्मापासीं । म्हणे, "गांधारें विंधिलें शब्दबाणासीं । समस्तां देखतां सभेसी । म्हणे, 'आज पाळी कोणाची?'" ॥ १५ ॥ हें ऐकतां धर्मानें । केलें कृष्णाचें स्मरण । कृष्ण आला द्वारकेहून । पांडवीं केला प्रणिपात. ॥ १६ ॥ कौरवसभेचें वर्तमान । निवेदन केलें अर्जुनानें । सतेज मारिला बाण[6] । म्हणे, 'आज पाळी कोणाची?' ॥ १७ ॥ हांसोनि बोले नारायण । "त्याचें वर्म तुज करितों श्रवण । तेणें अपराधावीण । केला त्याग भानुमतीचा. ॥ १८ ॥ ऐसा एक संवत्सर । रायें टाकिला सुंदर । तों आश्रमा ऋषीश्वर । येता जाला व्यासमुनी. ॥ १९ ॥ षोडशोपचारीं पुजून । उभी राहिली कर जोडून । म्हणे, 'अन्हेर[7] केला रायानें । उपाय केला पाहिजे.' ॥ २० ॥ जाणोनि तिचा भावार्थ । व्यासें दिधलें चरणतीर्थ । 'जेथें बैसेल कौरवनाथ । त्या आसनीं प्रोक्षावें. ॥ २१ ॥ तेथें बैसतां दुर्योधन । होईल तुझें स्मरण । तात्काळ येईल त्वरेनें । न विसंबे तूज.' ॥ २२ ॥ आणिक उपाय करून । स्नेह[9] दिधलें अभिमंत्रून । 'तें मस्तकीं मर्दून । वश्य होईल तूज.' ॥२३ ॥ ऐसें सांगोनि व्यास ऋषी । गेला बद्रिकाश्रमासी । तीर्थ प्रोक्षितां सिंहासनासीं । बैसतांची आला दुर्योधन. ॥ २४ ॥ सख्य जालें उभयतांसी । केलें [10]मंर्दन मस्तकासी । लावितां पात्र पडलें क्षितीसीं । स्नेह गेलें पा-

१. देवदार तरू. २. दुर्योधनानें. ३. अग्नि. ४. निंदा, चाहाडी. ५. द्रौपदी पांच पांडवांची पत्नी असल्यामुळें प्रत्येकाजवळ वर्षांतून दोन महिने, बारा दिवस याप्रमाणें पाळीनें राहात असे; त्या गोष्टीस उद्देशून दुर्योधनानें हा कुत्सित प्रश्न विचारिला. (मुक्तेश्वर–आदिपर्व–अ० ४६ पहा.) ६. बाण. ७. प्रखर. ८. भानुमती ही दुर्योधनाची स्त्री. ९. तैल. १०. अभिमंत्रित तैलाचें मर्दन.

ताळा. ॥ २५ ॥ पडलें शेषाच्या मस्तकावर । तो प्रतापी दुर्धर । मंदिरीं निद्रा करितां गांधार । आला पाताळींहून. ॥ २६ ॥ तों निद्रा करितां दोघें-जण । शेषें वोढिला दुर्योधन । मंचकचरणीं बांधोन । आपण विषय भोगी. ॥ २७ ॥ ऐसा उषःकाळपर्यंत । मंचकचरणीं गांधारीसुत । सोडोनि त्याच्या बंधनातें । आपण गेला स्वस्थळा. ॥ २८ ॥ परमलज्जित दुर्योधन । म्हणे 'देह कैर्यंते, सोडीन प्राण' । दुःखें नेत्रासी आलें जीवन । प्राणांतक समय आला. ॥ २९ ॥ 'माझा सखा रविनंदन । त्यासि करावें निवेदन' । मग पावला त्याचें भैवन । निशीचें वर्तमान सर्व सांगे. ॥ ३० ॥ मग धरिला हृदयीं । 'राया! भय नसे तुज कांहीं । आपण येतों त्या समयीं । हें कार्य क्षुल्लक.' ॥ ३१ ॥ भाष्य दिधलें रायाला । आपण समागमें येता जाहाला । देखतां हर्ष भानुमतीला । म्हणे, 'निशी उगवला मार्तंड. ॥३२॥ अतुर्बळी हा कर्ण । अजी सौख्या पावेल दुर्योधन । करोनी चित्तसमाधान.' । तों शेष पाताळींहुनी आला. ॥ ३३ ॥ आधीं बांधिला रविनंदन । मग बांधिला दुर्योधन । मंचक-चरणीं दोघेजण । आपण निद्रा करी संतोषें. ॥ ३४ ॥ तंव प्रातःकाळ जाला । बंधमोचन उभयांला । शेष स्वस्थळासी गेला । संकटीं पडिला भानु-सुत. ॥ ३५ ॥ चिंता करिती दोघेजण । म्हणती 'आम्हांत बलाढ्य दुःशा-सन । हें त्यासी करावें श्रवण । तो हें विघ्न निवारी.' ॥ ३६ ॥ मग पाचारिला दुःशासन । एकांतीं बैसती तिघेजण । म्हणती, 'आलें असे मरण । शेषाकरीं बंधनाचें.' ॥ ३७ ॥ सविस्तारू दुर्योधन सांगता झाला । दुःशासन क्रोधें दाटला । म्हणे, 'संकट काय तुम्हांला? । निमिषांत खंड करीन.' ॥ ३८ ॥ सर्वें घेवोन दुःशासन । येते जाले तिघेजण । भानुमतीनें देखोन । थोर आदर करिती जाली. ॥ ३९ ॥ निशी जाली एक प्रहर । त्रिवर्ग करिती विचार । शेष महादुर्धर । क्रोधाग्निजैसा प्रगटला. ॥ ४० ॥ येतांचि बांधिला दुःशासन । दुसरे चरणीं रविनंदन । तिसरे चरणीं दुर्योधन । मंचकाच्या शोभतसे. ॥ ४१ ॥ मंचकीं आपण करी शयन । अरुणोदयप्रमाण । [12]जातां त्यांचें बंधमोचन । करोनि जाय स्वगृहा. ॥ ४२ ॥ कर्ण, दुर्योधन, दुः-

---

१. चिरत आहे, दुभंग होत आहे. २. सूर्यपुत्र (कर्ण). ३. गृह. ४. शेषाच्या येण्याच्या वेळीं. ५. भाक, वचन. ६. रात्रीं. ७. सूर्य. ८. अत्यंत बलवान्. ९. हा व अशाच घटनेंचे दुसरे शब्द जुन्या पोथ्यांतून 'दोघेजन' 'तिघेजन' 'माहीजन' असे लिहिलेले आढळतात. अशा रीतीनें 'न'चा 'ण' झाल्याचीं बरींच उदाहरणें आहेत:—लशुन—लसूण, स्मशान—मसण, पालन—पाळण, लेखनी—लेखणी, पानीय—पाणी इ०. १०. विस्तारासह, सविस्तरपणें. ११. अरुणोदय होईपर्यंत. प्रमाण= सीमा, मर्यादा. १२. जातांना.

शासन । विचारा करिती तिघेजण । म्हणती, 'वृथा आलें मरण । यत्न कांहीं विचारा. ॥ ४३ ॥ युद्ध करिता समरंगणीं । तरी दाखवितों प्रतापकरणी । मौन्यरूपें येवोनी । बंधन करी त्रिवर्गा.' ॥ ४४ ॥ ऐसे एकांतीं तिघेजण । बैसले, करिती अधोवदन । राजदर्शनाकारण । येता जाहला शकुनी. ॥ ४५ ॥ मग तया अभ्युत्थान दिधलें । वर्तमान श्रवण केलें । 'आज तुम्हीं पाहिजे आलें । कृपा करणें; स्वामिया!' ॥ ४६ ॥ मग ते आले चौघेजण । संतोष भानुमतीकारण । बैसावया कनकासन । मुखें तांबूल घेताती. ॥ ४७ ॥ शेष आला पाताळींहून । आधीं बांधिला प्रधान[1] । मग बांधिला दुःशासन । तिसरिया चरणीं कर्णातें. ॥ ४८ ॥ मंचकाचा चौथा चरण । तेथें शोभा पावे दुर्योधन. । शकुनी म्हणे, 'हा वीर कोण? । वृद्धपणीं मृत्यु आला.' ॥ ४९ ॥ ऐसे निशी चारी प्रहर । श्रम पावले महावीर । तंव पूर्वे उगवला दिवाकर । तेव्हां सुटका चौघांतें. ॥ ५० ॥ शेष गेला आपुले भुवना । शकुनी म्हणे, 'दुर्योधना! । अपकीर्ति जाली त्रिभुवना । आम्हांकारण पैर्वतपात[2]. ॥ ५१ ॥ ऐसा विचार करून । अरण्यांत गेले चौघेजण । पर्वत देखिला उच्च एक योजन । त्यावरी उभे राहिले. ॥ ५२ ॥ केलें दिशा अवलोकन । मुखें करिती हरिस्मरण । 'तुझें नांव पतितपावन । ब्रीद[3] आपुलें सांभाळीं. ॥ ५३ ॥ महापातकी वाल्मीक । तो त्वां केला पुण्यश्लोक[4] । त्याहूनीही आम्ही रंक । कृपाघना! पावावें.' ॥ ५४ ॥ ऐसें म्हणोनी सद्गदित । करूं पाहती पर्वतपात । तों आला अकस्मात । विहंगमासारिखा[5]. ॥ ५५ ॥ येवोनी दिधलें दर्शन । चौघे घालिती लोटांगण । मग स्वगृहींचें वर्तमान । निवेदन करिती लज्जित. ॥ ५६ ॥ मग म्हणे चक्रपाणी । 'भय धरूं नका मनीं । तुमच्या समागमें सदनीं । आपण येतों हा भरंसा.' ॥ ५७ ॥ मग ते चौघेजण.। पांचवा श्रीकृष्ण । भानुमती घाली लोटांगण । पूजन केलें षोडशोपचारीं. ॥ ५८ ॥ ऐसी एकी प्रहर निशी । शेष आला त्या भुवनासी । सन्मुख देखिला हृषीकेशी । सप्रेम श्रीनिवासचरणीं[6]. ॥ ५९ ॥ करुनी अधोवदन । लज्जित संकोचें मन । त्यातें पुसे श्रीकृष्ण । 'कोण कार्य ये स्थळीं?' ॥ ६० ॥ शेष म्हणे, 'वासुदेवा! । हा प्रारब्धाचा ठेवा । तुज देखिलें माधवा । सोडवीं वशीकरणापासुनी. ॥ ६१ ॥ ऐसें असतें माझें[7] मन । तरी कैसें साहतों

---

१. शकुनी. २. आतां आम्हांला कडेलोट करून जीव दिला पाहिजे—असा स्पष्टार्थ. ३. लौकिक. ४. ज्याची कीर्ति (श्लोक) पुण्यकारक आहे असा. ५. पक्ष्याप्रमाणें. अर्थात् अत्यंत त्वरेनें. ६. श्रीनिवास (कृष्ण) चरणीं. 'लागला' हें क्रियापद येथें अध्याहृत आहे. ७. विषयोपभोगासक्त.

पृथ्वीकारण[१] । यासी साक्ष तूं नारायण । माझें कर्म हें दूर करीं.' ॥ ६२ ॥ मग तो पसरला । पुच्छीं अंगुष्ठ दिधला । हात घालूनि फडेला । वशीकरणा काढिलें. ॥ ६३ ॥ कांती टाकिली तैंपासून । मुक्त केले पांचही जण । ऐसें अर्जुनासि सांगोन । वर्म दुर्योधनाचें. ॥ ६४ ॥ "तरी त्वां जावें सभेला । दुर्योधन पुसेल तुजला । त्वां म्हणावें तयाला । 'पुसावें शेषातें'." ॥ ६५ ॥ ऐसें शिकवी अर्जुनासी । मग पाठविला कौरवसभेसी । तेथें बैसतांचि पार्थासी । अधीरपणें[२] दुर्योधन पुसे. ॥ ६६ ॥ 'पाळी सांग कोणाची? मजला।' अर्जुन म्हणे 'पुसावें शेषाला'. । खालुतें करुनी वदनाला । म्हणे, 'वर्म कोणाचें काढूं नये.' ॥ ६७ ॥ 'काय पुसा शेषाला?' । 'मंचकचरणीं बांधिलें चौघांला' । 'पार्था! तुज ज्ञानसागराला । हें पैशुन्य कां आठवलें? ॥ ६८ ॥ आजपासोनी पैशुन्य । न बोलावें कोण्हाचें नैन्य[३] । त्यासी होय अधःपतन । आणि रवैरव[४] इहलोकीं.' ॥ ६९ ॥ मग तो छंद टाकिला । मौन्य सभेमध्यें बैसला । सहसा न बोले अर्जुनाला । हें करणें श्रीकृष्णाचें. ॥ ७० ॥ हें भविष्योत्तरपुराणींचें निरूपण । अपूर्व कथा पुण्यपावन । मुक्तेश्वराचें चित्तसुमन । संतचरणीं सर्वदा. ॥ ७१ ॥

---

## ९. अर्जुनकामपूर्ति.

(ओंव्या).

श्रीभागवतनिरूपण । ऐका भक्तीचें महिमान[५] । नवविधा भक्ति संपूर्ण । नसे घडली एकासी. ॥ १ ॥ एकें केलें श्रवण । एकें केलें स्मरण । सख्य केलें अर्जुनानें । म्हणोनि, 'मम प्राणा! ये पांडवा!' ॥ २ ॥ कृष्ण अर्जुन दोघेजण । प्रत्यक्ष नरनारायण[६] । हरिहररूपें[७] धरून । भार दुरी करिती पृथ्वीचा. ॥ ३ ॥ कोण्ही एके दिवशीं । अर्जुन आला द्वारकेसी । तों स्नान केलें हृषीकेशीं[८] । देवतार्चनीं[९] बैसले. ॥ ४ ॥ सकळ भक्तांचें करी पूजन । सनकसनंदनआदीकरून । त्यांमध्यें पांडुनंदन । अतिप्रिय कृष्णातें. ॥ ५ ॥ तें

---

१. सर्प कांत (आपल्या शरीराची जुनी त्वचा) टाकितो--हें प्रसिद्धच आहे. २. उत्कंठायुक्त होत्साता, उतावळेपणानें. ३. न्यून, उणें. ४. नरकवास. ५. माहात्म्य. ६. स्वायंभुव मन्वंतरांत धर्मनामक ऋषीस मूर्तिनामक स्त्रीपासून नर व नारायण असे दोन पुत्र झाले होते. तेच पुढल्या जन्मीं अर्जुन आणि कृष्ण या नांवानें प्रसिद्धीस आले. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वर—वनपर्व—पृ. ९७ टी. १२ व पृ. ९८ टी० ४ पहा.] ७. मागें विश्वामित्रभोजन—ओंवी २ वरील टीप पहा. ८. कृष्णानें. हृषीक (इंद्रियें)+ईश (स्वामी)=जितेंद्रिय. ९. देवपूजेस.

देखिलें पार्थानें । आश्चर्य केलें अंतःकरणें । कृष्णासी म्हणे, 'तुझें देवतार्चन । हें अभिनव[1] मजला वाटतसे.' ॥ ६ ॥ मग म्हणे नारायण । 'जो करितो माझें स्मरण । त्याचें अखंड ध्यान । हृत्कमळीं माझिया. ॥ ७ ॥ किरीट, कुंडलें, कौस्तुभ केर्णी[2] । अतिप्रीति अंतःकरणीं । त्यांतें दूर करोनी । एक अंतरीं जपमाळा.' ॥ ८ ॥ ऐसें म्हणतां हृषीकेशी । पार्थ लागला चरणासी । सप्रेमता दोघांसी । सौख्यचरित्रें कुंजवनींचीं. ॥ ९ ॥ 'अनुपम्य रम्य तें वन । निबिड छाया मैलागिरीचंदन । मालतीआदीकरून सुमन । पंकज भ्रमर शोभती. ॥ १० ॥ तेथें मंचक दैदिप्यमान । त्यावरी सेजेसुमन[3] । तेथें माझें शयन । सखया! विश्रांत[4] ते ठायीं.' ॥ ११ ॥ ऐसें श्रीकृष्णाचें वचन । ऐकोनि संतोषला अर्जुन । मग आज्ञा मागोन । जाता जाहला स्वनगरा. ॥ १२ ॥ मार्गीं आठविलें कुंजवन । म्हणे 'पाहावें तें स्थान.' । आला त्वरेंकरून । सकळ सौख्य देखिलें. ॥ १३ ॥ मग पाहिलें मंचकाला । म्हणे येथें करावें शयनाला । अंग टाकिता जाहला । तों व्यापिला विषयबाणें. ॥ १४ ॥ विसरला हस्तिनापुर । बाणें भेदिलें जिव्हार[5] । विषय महादुर्धर । छळन केलें ब्रह्मादिकां. ॥ १५ ॥ पराशरऋषी । देखोनि भुलला दुर्गंधेसी[6] । उर्वशीमागें[7] ऋषी । विश्वामित्र लागला. ॥ १६ ॥ सोडोनियां कैलासाला । शिव भिल्लिणीमागें लागला । इंद्र भगांकित जाला । विषयसंगें.[8] ॥ १७ ॥ हरी वृंदेचें[9] स्मशान; । देखोनि कन्यारत्न । न विचारितां ज्ञान । भुलला विधी.[10] ॥ १८ ॥ बंधु सुंदोपसुंद दोघेजण । तिलोत्तमा ते देखून । एकमेकां करिती हनन । हें चरित्र विषयाचें.[11] ॥ १९ ॥ साठी संवत्सर । प्रसवला ब्रह्मकुमर[12] । ऐसा विषय दुर्धर । प्राप्त जाला धनंजया. ॥ २० ॥

---

१. अद्भुत, आश्चर्यकारक. २. येथें 'कौस्तुभमणी' असा पाठ असावा. ३. पुष्पशय्या. ४. विश्रांति. ५. मर्मस्थान, अंतःकरण. ६. सत्यवतीस. हिच्या आंगास माशाची घाण येत असल्यामुळें हीस 'मत्स्यगंधा' 'दुर्गंधा' अशीं नांवें होतीं. [मुक्तेश्वर—आदिपर्व अध्याय १३ ओंव्या ८८–११६ पहा.] ७. येथें 'मेनकेमागें' असें पाहिजे. हीच नजरचूक मुक्तेश्वराच्या हातून मागें 'शुकरंभासंवाद' ओंवी १४ हींत झाली आहे. (पृष्ठ १३० टीप १६ पहा.) [मुक्तेश्वर—आदिपर्व—अध्याय १५ ओंव्या ११२–१५५ पहा.] ८. अहिल्येचें धर्षण केल्यामुळें. ९. वृंदा ही जालंदर नामक राक्षसाची पतिव्रता स्त्री होती. हिचें पातिव्रत्य विष्णूनें जालंदराचें रूप घेऊन हरण केलें. हिच्या ह्या पापामुळें जालंदर मेला व ही सती गेली. तेव्हां विष्णूस तिचा विरह सहन होईना व तो तिच्या स्मशानांत जाऊन बसला. अशी कथा आहे. १०. सरस्वती. ११. मुक्तेश्वर—आदिपर्व—अ०४६ ओं.५१–९०पहा. १२. नारद. नारदास संसार करण्याची इच्छा झाली, तेव्हां त्यानें रूप पालटून तो नारदी झाला, व तिचे पोटीं साठ संवत्सर जन्मास आले—अशी कथा आहे.

धन्य तो **पांडुकुमर** । परनारी सहोदर । चित्तीं आणिक विचार । नसे **सुभ**-**द्रे**वांचोनी. ॥ २१ ॥ **सुभद्रे**पासीं गुंतलें मन । विकार करिती विषयबाण । हें संकष्ट देखोन । **कृष्ण** जाहला **सुभद्रा**. ॥ २२ ॥ षोडशशृंगार करून । प्रवेशली कुंजवन । करीं आरती घेवून । प्राणनाथा वोंवाळिलें. ॥ २३ ॥ उभी राहिली तिष्ठत । **पार्थ** स्वरूप अवलोकीत । म्हणे, 'तुज कोणें केलें श्रुत ? । हें मज आश्चर्य जाहलें.' ॥ २४ ॥ येरी म्हणे, 'पतिव्रतेचें लक्षण । भ्रतारें करितां संकेतीं स्मरण । तत्काळ यावें त्वरेनें । तयेसी म्हणती पति-व्रता.' ॥ २५ ॥ हें ऐकतां **श्वेतवाहन** । परम लज्जित अंतःकरण । म्हणे, 'हें **कृष्णा**चें शयनस्थान । येथें रमतां अधःपात.' ॥ २६ ॥ मग म्हणे **सुभ**-**द्रे**सी । नुलंघीं माझ्या वचनासी । तुवां जावें स्वगृहासी । हें न कळतांची **कृष्णा**तें.' ॥ २७ ॥ मग **सुभद्रा** बोले वचन । 'मज द्यावी मुद्रिका खूण.' । तंव बोले **अर्जुन** । 'हे मुद्रिका **कृष्णा**ची. ॥ २८ ॥ दहा अवतारांचीं चिन्हें । क्षण एक दिधली **नारायणें** । ते कैसी देऊं तुजकारण ? । पुसेल तरी काय सांगूं तया ?' ॥ २९ ॥ येरी धरी दृढ चरण । 'निशीसी देईन स्वामीकारण । मज श्री**कृष्णा**ची आण । सहसा अभिलाष न करीं.' ॥ ३० ॥ मग विचारी **अर्जुन** । 'एका क्षणाचें कारण;' । मग करींची काढून । देता जाहला **सुभद्रे**. ॥ ३१ ॥ ऐसी घेवूनि खूण । पावली आपुलें भवन । चिंता करी **अर्जुन** । केव्हां निशी प्राप्त होय. ॥ ३२ ॥ 'जरि कां पुसेल **हृषीकेशी** । काय म्हणावें तयासी । केव्हां प्रवर्तेल निशी । मागणें मुद्रिका **सुभद्रे**.' ॥ ३३ ॥ तों रवि जाला अस्तमान । निशीसि एकांतीं दोघेजण । **पार्थ** कर पसरोन । म्हणे, 'मुद्रिका मज द्यावी. ॥ ३४ ॥ कुंजवनींची खूण । मज द्यावी त्वरेनें.' । **सुभद्रा** बोले वचन । सहसा, 'नसे म्यां देखिली. ॥ ३५ ॥ मज श्री**कृष्णा**ची आण । आणि साक्ष तुमचे चरण' । ऐसें ऐकतां **अर्जुन** । क्रोधें भरला. ॥ ३६ ॥ म्हणे, 'स्त्रिया असती । सत्याचें असत्य करिती । आणि पतिव्रता म्हणविती । अभिलाष मांडिला मुद्रेचा. ॥ ३७ ॥ स्त्री असत्याची राशी । विश्वासों नये स्त्रियेसी ।

१. सख्या बहिणीप्रमाणें. २. सोळा शृंगार:—तैलाभ्यंगस्नान, वस्त्र, कंचुकी, कुंकुम, कज्जल, कुंडलें, हार, मौक्तिकालंकार, केश (कबरीबंधन), नूपुरें, चंदन, कंबरपट्टा, तोडे, तांबूल, बांगड्या आणि चतुरता (कामशास्त्रांत प्रावीण्य). ३. (सुभद्रावेशधारी कृष्णाचें) सौंदर्य. ४. शपथ. ५. आपल्या घरीं गेली. ६. एकदम, तात्काळ. ७. कुलटा, साध्वी नव्हेन त्या.

अभाग्य घालोनि विरोचनासी[1] । वध (?) केला तात्काळ. ॥३८॥ ऐसी यांची करणी । यांसी ठाय वेदे धरणी । मिथ्या न वदें वाणी । याचा साक्ष श्रीकृष्ण.' ॥ ३९ ॥ मग पद्मासन घालून । पण केला अर्जुनानें । 'मुद्रिकेचें न होतां दर्[2]-रुपण । आलें मरण उभयवर्गा.' ॥ ४० ॥ सुभद्रा म्हणे, 'नारायणा! । कृपेनें रक्षणें आमुचिया प्राणां । विलंब होतां जगज्जीवना! । प्राण देहीं न राहे.' ॥४१॥ ऐसें ऐकतां स्मरण । तों मंदिरीं होता श्रीकृष्ण । म्हणे, 'हें आश्चर्य कोण?' । हास्य करिता जाहला. ॥ ४२ ॥ मग म्हणे रुक्मीण । 'कां केलें हास्यवदन?' । सांगतां लज्जित मन । तैं रुक्मीण लागे चरणीं. ॥४३॥ मग म्हणे नारायण । 'कुंजवन पाहतां अर्जुनानें । तों विषयें व्यापिलें मन । त्यासि सुभद्रा आठवली. ॥ ४४ ॥ आपण जालों सुंदरी । खूण मुद्रिका घेतली करीं । तो भरला क्रोधें भारी । मुद्रिका मागे सुभद्रेसी.' ॥४५॥ ऐसें ऐकतां रुक्मीण । सौहस्त्र[3] करिती हास्यवदन । मग उठिला नारायण । आला गृहा धर्माचिये. ॥ ४६ ॥ पार्थ-सुभद्रा लागलीं चरणीं । सविस्तर सांगती चक्रपाणी । 'खूण मुद्रिका न दे मजलागुनी । अभिलाष मांडिला.' ॥ ४७ ॥ कृष्ण म्हणे सुभद्रेसीं । 'लांच्छन[4] लावूं नका कुळासी । वंचनार्थ[5] स्वामीसीं । करितां अधःपात.' ॥ ४८ ॥ सुभद्रा म्हणे, 'जगज्जीवना! । जरी असेल देखिली या नयना । तर्‍ही माझिया पंच प्राणां । भस्म व्हावें ये क्षणीं.' ॥४९ ॥ 'सत्य' म्हणे श्रीकृष्ण । 'अन्यथा नव्हे तुझें वचन.' । मग म्हणे अर्जुनाकारण । 'सुभद्रा आहे निष्कलंकी. ॥ ५० ॥ माजी मुद्रिका द्यावी मजला । पसरोनि मागें पीतांबराला । दाहा अवतारींचीं चिन्हें तियेला । माजी वस्तू मज द्यावी.' ॥ ५१ ॥ ऐकतां श्री-हरीचें वचन । कज्जळपूर्ण पार्थाचे नयन । 'आतां अग्निकाष्ठ घेईन । काय

---

१. विरोचन=सूर्य. संज्ञा हो सूर्याची पत्नी होय व छाया हो संज्ञेची निःसत्त्व प्रतिमा होय. ए-कदा छायेला आपल्याबद्दल ठेवून, व अशी नवऱ्याची फटवणूक करून, संज्ञा ही नवऱ्याच्या नकळत बापाच्या घरीं निघून गेली. पुढें सूर्याला छायेच्या पोटीं तीन मुलें झालीं; सावर्णी व शनि हे दोन मुलगे व तपनी ही मुलगी. हें स्त्रीकृत सूर्यवंचन येथें अनुसंधेय आहेसें भासतें. २. येथें 'न दे' असा पाठ असावा. ३. पुढें हरिश्चंद्राख्यान ओं० ४६ वरील टीप पहा. ४. दर्शन. ५. 'आलें' ह्या रूपावरून भूतकाळाचा बोध होतो तथापि येथें अर्थानुरोधानें भविष्यकाळ समजला पाहिजे. अशा प्रकारचे प्रयोग आपल्या नेहमींच्या भाषणांतही आढळतात; जसें:—'तूं पुढें जा, पाठी-मागून मी आलोंच (येतोंच).' ६. येथें कांहीं अपपाठ असावा. ७. दोष, कलंक. ८. कपट, फसवणूक. ९. कज्+जल=अश्रु.

वदन दाखवूं तुज?' ॥ ५२ ॥ ऐसें देखतां निर्वाणें । मुद्रिका काढिली करींचें भूषण । 'सत्य दोघांचें वचन । मी जालों सुभद्रा.' ॥ ५३ ॥ हें ऐकतां अर्जुन । करिता जाला अधोवदन । मग म्हणे नारायण । 'नसे द्वैतें उभयतां. ॥ ५४ ॥ तूं नर, मी नारायण । हरिहर दोघेजण । वेदव्यासाचें वचन । हें प्रसिद्ध त्रिलोकीं. ॥ ५५ ॥ हे भविष्योत्तरपुराणींची कथा । श्रोते व्हावें सा[वचिता] । मुक्तेश्वरकवि वदता । महाभारती. ॥ ५६ ॥

# ४. इतर पुराणांतील आख्यानें.

## १०. हरिश्चंद्राख्यान.

(ओंव्या.)

### अध्याय पहिला.

ॐनमो जी! गजवदना! । नागानना! पन्नगभूषणा! । एकदंता! त्रिनयना! । मूषकवाहना! तुज नमो. ॥ १ ॥ नमूं शारदा ब्रह्मकुमारी । शुक्लां-

१. आणीबाणीची वेळ, निकराचा प्रसंग. २. भेदभाव, द्वैतबुद्धि. ३. सुविद्य, किंवा उत्तम वक्ता. ज्या पोथींतून आम्हांस हें व ह्याच्या पूर्वींचीं दोन प्रकरणें मिळालीं, ती पोथी रा. रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, बी. ए. ह्यांनीं बीड येथील पाटांगणांतून आणिली होती. ही पोथी फारच जीर्ण झालेली असून हिचीं पहिलीं व अखेरचीं बरींच पृष्ठें नाहींशीं झालीं आहेत. ह्या पोथींत एके ठिकाणीं 'हो वही त्रिविक्रम शकुने याची' असा उल्लेख आहे. पोथींत वरील प्रकरणांस नांवें दिलेलीं नव्हतीं म्हणून आम्हींच त्यांतील कथानकानुरूप त्या त्या प्रकरणास नामाभिधान दिलें आहे. ४. हें आख्यान मार्कंडेयपुराण, अध्याय ७।८ यांत आहे. मुक्तेश्वरकृत हरिश्चंद्राख्यान व मार्कंडेयपुराणांतर्गत हरिश्चंद्राख्यान यांत बरीच तफावत दृष्टीस पडते. मोरोपंतकृत हरिश्चंद्राख्यानांतील कथा मात्र अगदीं मूळास धरून आहे. श्रीधरकृत 'पांडवप्रताप' अध्याय ३० यांत 'हरिश्चंद्राख्यान' आहे, परंतु त्यांत व मूळांतील कथानकांत बराच फेरफार आढळतो. देवीभागवत स्कंध ७ अध्याय १७–२७ ह्यांतही 'हरिश्चंद्राख्यान' वर्णिलेलें आहे. ५. 'ॐ नमो' ह्या शब्दांनीं ग्रंथारंभ करण्याची चाल आहे, कारण 'ॐ' हें शुभाक्षर असून ह्याच्या योगानें ब्रह्मा, विष्णु, महेश, ह्या देवत्रयाचा बोध होतो:—'अकारो विष्णुरुद्दिष्ट उकारस्तु महेश्वरः । मकारस्तु स्मृतो ब्रह्मा प्रणवस्तु त्रयात्मकः ॥' [विशेष माहितीकरितां मुक्तेश्वर—वनपर्व—काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ. १ टीप २ पहा]. ६. गणपति हा बुद्धिदाता व निर्विघ्नकर्ता देव होय म्हणून त्याचें चिंतन ग्रंथारंभीं केलें आहे. 'स जयति सिंदुरवदनो देवो यत्पादपंकजस्मरणं । वासरमणिरिव तमसां राशीन् नाशयति विघ्नानाम् ॥' इत्यादि गणपतिवर्णन प्रसिद्धच आहे. ७. गजानना. (नाग=गज, हत्ती.) ८. शं-

बरा शुक्लभूपर्णी । अर्चुनी नमिली सुरमुनीं । हंसवाहिनी ते नमो. ॥ २ ॥ नमो संसारमोहतमांतका । मुमुक्षुसाधकां स्वपददायका । दुर्घट भवार्णवतारक नौका । देहधारी द्विभुजा. ॥३॥ आतां नमो श्रोतेजन । ज्ञानवैराग्यभक्तिसाधन । मज देऊनि वरदान । कथानुसंधान परिसावें. ॥४॥ मोक्षसिंहासनाची पायरी । प्रथम, नाम अयोध्यापुरी । धर्मस्वरूप जीमाझारी । राज्य करी हरिश्चंद्र ॥५॥

कर व गणपती यांस समान अशीं जीं अनेक विशेषणें किंवा नांवें आहेत, त्यांपैकींच हीं दोन आहेत. पहा:—सरळशुंड, वक्रतुंड, **त्रिनयना.** । (आरती); वरेण्यसूनो, विकट, **त्रिनेत्र.** । (अष्टोत्तरशत नामस्तोत्र); **त्रिनेत्रयुक्तं,** त्वभयंकरं तं, महोदरं, चैकरदं, गजास्यम्. । **सर्पोपवीतं,** गजकर्णधारं ······॥(मानसपूजा); चतुर्बाहुं, **त्रिनेत्रं** च गजास्यं, रक्तवर्णकम्. । (बाह्यपूजा). ९. शारदा=शारं (ज्ञानं) ददाति इति शारदा (सरस्वती). सरस्वती ही केवळ वागधिष्ठात्री देवता आहे म्हणून तिचें चिंतन पाठीमागून केलें आहे. १०. शुक्ल (शुभ्र) अंबर (वस्त्रानें) युक्त अशी. 'या कुंदेंदुतुषारहारधवला' इत्यादि श्वेतवर्णसरस्वतीचें वर्णन सुप्रसिद्धच आहे.

१. शुभ्रालंकारमंडित. 'शुकवंदिनी' असाही पाठ आढळतो. २. सुर (देव)+मुनी (ऋषि) यांनीं. 'सुरगणीं' असाही पाठ आहे. ३. हंस हें सरस्वतीचें वाहन. ४. संसाराचा मोह (मायापाश) हाच तम (अंधकार किंवा अज्ञान) त्याचा नाश करणारा (गुरु). ५. मोक्षप्राप्तीची इच्छा करणाऱ्या साधकांस. ६. भव (संसार)रूपी अर्णवांत (समुद्रांत) तारक (तारणारा). ७. एका पोथींत ह्या ओंवीनंतर पुढील ओंव्या आढळतात:—'अद्वैतवनीं विशाळ कीर्ति । हरिस्मरणीं काळ क्रमिती । तंव तेथें सर्वेशमूर्ति । बृहदश्वा पातला. ॥ १ ॥ नमस्कारोनि ऋषितापसां । धर्म म्हणे 'पवित्र पुरुषा । मागांपुढां माझिया क्लेशा । समान कोणही असेना.' ॥ २ ॥ हांसोनि वदे ऋषिश्रेष्ठ । 'पाहतां मागिलांचे कष्ट । मेरूपुढें मशक कीट । तेवीं तुमचे भासती.॥ ३ ॥ ऐकें हरिश्चंद्राचे क्लेश, परिसतां होय हृदयत्रास । तितुकेही भोगुनी नरेश । चळला नाहीं स्वधर्मा. ॥ ४ ॥ तें सविस्तर कथनरस । सेवीं रसनेनें सावकाश । चित्त ठेवूनियां परीस । कुरुकुलनृपवर्या !' ॥ ५ ॥ हरिश्चंद्राख्यान हें वनपर्वांतर्गत आहे असें मानल्यास ह्या ओंव्या या ठिकाणीं असणें साहजिकच आहे. परंतु हें आख्यान व्यासकृत महाभारताच्या वनपर्वांत नसल्यामुळें, तें आम्ही मुक्तेश्वराच्या वनपर्वांत सामील करूं इच्छित नाहीं [ मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला ) पृ० १२५ टीप ५ पहा] आणि ह्याकरितां वरील पांच ओंव्यांची योजना टीपांत केली आहे. ८. मोक्षरूपी सिंहासना (भद्रासना)ची. पाठभेद:—मोक्षश्रियेची. ९. अयोध्या, मथुरा, माया, काशी, कांची, अवंतिका (उज्जयिनी) आणि द्वारका—ह्या मोक्षदायक सात नगरी आहेत. त्या मोक्षसिंहासनाच्या पायऱ्याच होत. अशी येथें कल्पना केली आहे. **रूपका**लंकार. १०. मूर्तिमंत धर्मच. ११. ज्या पुरीमध्यें. १२. हरिश्चंद्र हा सूर्यकुलोत्पन्न त्रिशंकु राजाचा पुत्र. ह्या राजाविषयीं श्रीमद्भागवतांत पुढील उल्लेख आढळतो:—'त्रैशंकवो हरिश्चंद्रो विश्वामित्रवसिष्ठयोः । यन्निमित्तमभूद्युद्धं पक्षिणोर्बहुवार्षिकम् ॥ ७ ॥ ...... सत्यसारां धृतिं दृष्ट्वा सभार्यस्य च भूपतेः ॥ २४ ॥ विश्वामित्रो भृशं प्रीतो ददावविहतां गतिम् ॥ २५ ॥ [ स्कंध ९ अध्याय ७ पहा].

सूर्यवंशक्षीराब्धिसोम[1] । कीर्तिप्रकाशें[2] उजळीत[3] व्योम[4] । प्रजावल्लीतें[5] सुख परम । यालागीं नाम हरिश्चंद्र[6]. ॥ ६ ॥ शत्रुकरिणांलागीं[7] हरी[8] । साधुसज्जना सुधाकारी[9] । बळी त्रासी[10] यालागीं हरि-।-श्चंद्र[11] नाम तयाचें. ॥ ७ ॥ तो सत्य-[12]सत्वाचा शिरोमणी । परोपकारी परमज्ञानी । दुःखदरिद्रवार्ता[13] कर्णी । ऐकों नेदी जगाच्या[14]. ॥ ८ ॥ धीरसत्वाचा महामेरू[15] । दानीं मेघजैसा उदारू । प्रजापालनीं[16] कमलावरू[17] । शक्रातुल्य प्रतापी. ॥ ९ ॥ आपुली आज्ञा सिंधुव-सनी[18] । परिधान करुनी, धराकामिनी । प्रतापवीर्यें भोगुनी जनीं । वरा-सनीं[19] विराजे. ॥ १० ॥ ऐसा राजा चक्रवर्ती[20] । सिंहासनीं विराजमूर्ती[21] । जैसा इंद्र अमरावतीं[22] । शोभे, तैसा शोभला. ॥ ११ ॥ सभे साधु ऋषीश्वरू । कथा[23], कीर्तन, रागोद्गारू[24], । तेणें श्रवणें राजेश्वरू । सुखनिर्भर[25] मानसें. ॥१२॥

---

१. सूर्यवंशरूपी क्षीरसागरांतील सोम (चंद्र). २. 'कीर्तिप्रतापें' असाही पाठ आहे. ३. उज-ळणें=प्रकाशित करणें. ४. आकाश. ५. प्रजारूपी लतांस. चंद्राच्या किरणांत अमृत असतें व त्या अमृताच्या योगानें तो सर्व ओषधींचें पोषण करितो. या समजुतीस अनुलक्षून हें वर्णन आहे. 'पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः' इत्यादि **गी**तावचन प्रसिद्ध आहे. [अ-ध्याय १५, श्लोक १३ पहा.] ६. ह्या ओंवींत सूर्यवंश आणि क्षीरसागर, हरिश्चंद्र आणि चंद्र, कीर्ति आणि प्रकाश, भूमंडळ आणि आकाश, प्रजा आणि वल्ली–ह्यांचा अभेद वर्णिला आहे म्हणून हा **रूपका**लंकार होय. जेथें उपमान आणि उपमेय यांचा वास्तविक भेद असून हीं प्रत्यक्ष एकच आहेत, यांत भेद नाहीं, असें वर्णन असतें तेथें **रूपका**लंकार होतो. ७. शत्रुरूपी हत्तींस. ८. सिंह. ९. अमृत स्रवणारा, चंद्र. १०. त्रासणें=भयाभीत करणें. 'क्षिती पाळी' असाही पाठ आहे. ११. शत्रूला सिंहाप्रमाणें, बलवानांस भीति उत्पन्न करणारा व साधुसज्जनांना चंद्राप्रमाणें (सुखदायक) असल्यामुळें 'हरिश्चंद्र' असें नांव पडलें–हा इत्यर्थ. या व वरील ओंवींत हरिश्चंद्र हें नांव सहेतुक व अन्वर्थक होतें असें वर्णिल्यामुळें **'निरुक्ति'** नांवाचा अलंकार झाला आहे. १२. 'धैर्यसत्वाचा' व 'शुद्धसत्वाचा' असे अन्यपाठ आहेत. १३. 'इच्छा' असा पाठभेद आढळतो. १४. आमच्या जवळील दोन पोथ्यांत ही ओंवी चोविसाव्या ओंवीपुढें आढळते. १५. 'कनकमेरू' असा अन्यपाठ. १६. प्रजेचें पालन करण्याविषयीं. १७. लक्ष्मीपति (विष्णु). १८. ओंवीचा अन्वयार्थः–आपुली सिंधुवसनी (=समुद्र आहे वस्त्र जिचें अशी, समुद्रान्तापर्यंत गेलेली) आज्ञा (=सत्ता) परिधान करूनी [=समुद्रवलयांकित राजसत्तेनें भूषित होऊन] [व] प्रतापवीर्यें धराकामिनी भोगुनी [तो हरिश्चंद्र] जनीं वरासनीं विराजे. १९. श्रेष्ठासनीं किंवा वराच्या (नवरदेवाच्या, नवऱ्याच्या) आसनावर. 'राज्यासनीं' 'नरासनीं' असे अन्य पाठ आहेत. २०. सार्वभौम राजा. [मुक्तेश्वरकृत सभापर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला पृ. ८ टीप २ पहा.] २१. विराजमान, शोभित. 'सभामंडळीं विशाळकीर्ति' असा अन्यपाठ. २२. 'सिंहासनीं निर्जरपती' 'वरासनीं निर्जरपंक्ति' अशीं पाठांतरें आढळतात. २३. 'कथाश्रवणीं' 'कथाचर्चा' 'कथाचरित्र' अशीं पाठांतरें. २४. गायन. २५. सुखानें परिपूर्ण, सुखयुक्त.

बसला वेष्टित वीरप्रधानीं । उभय भागीं वेत्रपाणी । मंगल वाद्यांचिया ध्वनीं । नाद गगनीं न समाय. ॥ १३ ॥ तों अकस्मात् गगनपंथें । नारदमुनी पातला तेथें । वीणा वाजवी मधुर हस्तें । वदनीं गात हरिकथा. ॥ १४ ॥ जो ज्ञानारविंदमकरंदू । वैराग्यवल्लीचा मूळकंदू । विवेकसागरींचा पूर्णेंदू । तो नारदू पातला. ॥ १५ ॥ रायें देखतांचि नयनीं । धांवोनि मस्तक ठेविला चरणीं ॥ जयजयकारें महामुनी । सिंहासनीं बैसविला. ॥ १६ ॥ कनकपात्रीं शुद्धजळें । रायें चरण प्रक्षाळिले । कस्तुरी चंदन चर्चिलें । भाळीं रेखिलें केशर. ॥ १७ ॥ नानापुष्पजातिमाळा । गणित नाहीं सुगंधपरिमळा । नैवेद्यतांबूलादि सोहळा । करूनी पूजिला नारदू. ॥ १८ ॥ देखोनि रायाची विनयभक्ती । नारद सुखावला चित्तीं । आज्ञा मागुनी, गगनपंथीं । गमन केलें मुनींद्रें. ॥ १९ ॥ आला शक्राचिया भुवना । संवेग पातला मंडपस्थाना । इंद्रें नमूनियां चरणा । केलें पूजन विधियुक्त. ॥ २० ॥ सभा मिनली घनदाट । बैसले विश्वामित्र, वशिष्ठ,। आणीकही श्रेष्ठश्रेष्ठ । तपोनिष्ठ पैं आले. ॥ २१ ॥ लोहूनि शक्राचा बहुमान । नारदें आरंभिलें कीर्तन । पढता झाला महिमान । तया अयोध्यापुरीचें. ॥ २२ ॥ 'भूमंडळीं शरयूतटीं । अयोध्यापुरी अतिगोमटी । मज पाहतां सकळ सृष्टी । न दिसे दृष्टीं आणिक.

१. वीर आणि प्रधान (मंत्री) यांना, 'राजधानी' असा अन्यपाठ. २. छडीदार, भालदार. ३. 'तुरांचिया' असें पाठांतर. ४. न राहे, न सांठे. ५. ज्ञानरूपी कमलाचा मकरंद (परमज्ञानी). पाठभेदः–ज्ञानरवीचा मकरंदू. ६. उत्पत्तिस्थान, आदिकारण. ७. पूर्ण चंद्र. ८. 'मस्तक' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे, व मुक्तेश्वराच्या कवितेंत 'मस्तक' शब्दाचा पुल्लिंगी प्रयोग ठिकठिकाणीं आढळतोः–(१) तो मुनिवर्य देखुनी नयनीं, धर्मै मस्तक ठेविला चरणीं ॥ [वनपर्व अ० ९।७३.] (२). उभय कुळदैवतीं माझा । मस्तक पायीं स्पर्शिला ॥ [आदिपर्व–उपसंहार, ओंवी ८ वी] इत्यादि. ९. मुनिश्रेष्ठ (नारद). १०. सुवर्णपात्रांत, सोन्याच्या भांड्यांत. ११. शुद्धोदकानें. १२. धुतले. 'चरणप्रक्षालन केलें' असा अन्यपाठ. १३. अनेक प्रकारच्या फुलांच्या माळा. १४. आकाशमार्गानें. १५. 'नारदें' असा अन्यपाठ. १६. इंद्रलोकास. १७. वेगानें, जलदीनें. १८. सभा भरण्याचे ठिकाणीं. १९. भरली, जमली. 'सभा दाटली' 'सभा घनवटली' असे पाठभेद आहेत. २०. 'बैसले' असें पाठांतर. २१. स्वीकारून, पावून. २२. माहात्म्य, थोरवी. २३. 'अयोध्यापुरपतीचें' असाही पाठ आहे. ही ओंवी आमच्याजवळील एका पोथींत आढळत नाहीं. २४. अयोध्यापुरीविषयीं विशेष माहिती पाहिजे असल्यास मुक्तेश्वरकृत वनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ. १७० टीप १ पहावी. २५. फार सुरेख, अत्यंत प्रेक्षणीय. २६. सकळ सृष्टी पाहतां मज आणिक (अयोध्येखेरीज दुसरी) दृष्टी न दिसे–असा अन्वय.

|| २३ || एक आज्ञा, एक छत्री । नव[1]खंड सर्व धरित्री[2]- । वरी विराजे वीर क्षत्री[3] । हरिश्चंद्र नृपनाथ.' || २४ || परिसोनी नारदाच्या गोष्टी । वशिष्ठ सुखावला पोटीं । सभे गर्जोनी म्हणे, 'सृष्टीं । उपमा त्यासी तो एकें[4].' || २५|| नारदवचनाचिया वातें[5] । गाधिजकुंडीं[6] क्रोधाग्नि चेतें[7] । वरी वशिष्ठवाक्याचिया[8] घृतें । शिखा[9] गगनातें कवळिती[10]. || २६ || खदिरांगारींतुल्य[11] नयन । करुनी, वदनचापींहून[12] । सोडिता झाला अतितीक्ष्ण । वाग्बाण[13] सुतेज[14]. || २७ || वशिष्ठपादपा[15]आडून । वेधूं[16] इच्छी भूपहरिण[17] । परी त्यासीं मारील[18] कवण । कृपा पूर्ण सद्गुरूची[19]. || २८ || तयावरि सत्वाची[20] पाखर[21] । जडोनि ठेली सबाह्य[22] अभ्यंतर । तेथें ऋषीचे[23] वाग्शर । केवीं शरीरीं स्पर्शती? ||२९ || असो; विश्वामित्राचीं वचनें । बोलिला तीं ऐका श्रवणें[24] । कठोर परि मवाळ[25] सुमनें[26] । पुण्यपरागें[27] घमघमीत[28]. || ३० || 'निर्जरसभेसी[29] भूपाळकीर्ती[30] । वर्णितां शंका नाहीं चित्तीं; । हें अयोग्य वाटे मजप्रती । सत्य जाण; नारदा[31] ! ||३१||

---

१. पुढें अध्याय दुसरा, ओंवी ५१ वरील टीप पहा. दहावें खंड काशी. हें पृथ्वीच्या बाहेरचें समजलें जात असे. २. पृथ्वीवर. ३. क्षत्रिय. ४. येथें **अनन्वया**लंकार आहे. एकच पदार्थ उपमान आणि उपमेय झालेला असला म्हणजे **अनन्वया**लंकार होतो. विशेष माहितीसाठीं मुक्तेश्वरकृत सभापर्व काव्यसंग्रहग्रंथमाला पृ. ५० टीप २ पहावी. ५. 'नारदाचिया वचनवातें' असा अन्यपाठ. ६. विश्वामित्र हेंच अग्निकुंड त्यांत. ७. प्रदीप्त होई. ८. ह्या ओंवींत उत्तम **रूपका**लंकार आहे. ९. ज्वाळा. १०. आलिंगन देती, जाऊन पोंचती. ११. खैराच्या निखाऱ्यासारखे, अत्यंत आरक्त. 'खदिराग्निकुंडातुल्य' असा अन्यपाठ. १२. मुखरूपी धनुष्यापासून. १३. शब्दरूपी शर. 'शब्दबाण' असा पाठभेद. १४. अत्यंत तेजस्वी, देदीप्यमान. ह्या ओंवीचा अन्यपाठ असा आहे:—'असो. विश्वामित्र वचनें । बोलिला तीं परिसा श्रवणें । खदिरांगारतुल्य नयन । करूनि तीक्ष्ण शब्द बोले.' ॥ १५. वशिष्ठ हाच वृक्ष, त्याच्या आडून. १६. 'विंधूं पाहे' असा पाठभेद. १७. राजा (हरिश्चंद्र) हाच हरिण. **रूपका**लंकार. १८. 'मारिता' असें पाठांतर. १९. वशिष्ठाची. 'गुरूची' 'श्रीगुरूची' असे अन्यपाठ. २०. सत्व=सद्वर्तन करण्याचा निश्चय व तसें आचरण, ईश्वरभक्ति. [मुक्तेश्वर—वनपर्व—काव्यसंग्रहग्रंथमाला. पृ. १२६ टीप ४ पहा.] २१. आश्रय, रक्षण. २२. 'सबाह्यांतर' असा अन्यपाठ. २३. विश्वामित्राचे. २४. कानानें. 'तुम्हीं परिसावीं श्रवणें' असा अन्यपाठ. २५. मृदु, कोमल. २६. फुलें. 'वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि' ह्या भवभूतीच्या उक्तीप्रमाणें. २७. पुण्यरूपी परागानें. पराग=पुष्पांतील रज. 'पुष्पपरागें' असा अन्यपाठ. २८. घमघमीत, सुगंधित. २९. देवांच्या सभेंत. ३०. पृथ्वीपाळाची कीर्ति. येथें 'निर्जर' आणि 'भूपाळ' ह्या शब्दांनीं देव आणि मानव यांमधील महदंतर दर्शविलें आहे. ३१. ह्या ओंवीचा अन्यपाठ दोन पोथ्यांत असा आढळतो:—'निर्जरसभेसी नृपाळकीर्ति । वानितां चित्तें न लाजती । सूर्यापुढें दीपज्योति । तेज कैसें मिरवेल? ॥'.

समर्थापुढें रंक[1]महिमा । मेरूसि[2] योजिली वल्मिक[3]उपमा । कण्हेर आणि कल्पद्रुमा । संमान[5] कैसें म्हणावें?'[4] ॥ ३२ ॥ वशिष्ठ म्हणे, 'जी ऋषिराया! । वृथा कोप कासया[6]? । धैर्य[7], सत्त्व, शांति, दया, । असे जया, तो श्रेष्ठ.[8] ॥३३॥ तो धीरसत्त्वाचा[9] महामेरु । अढळपदीं जैसा धुरू[10] । सूर्यवंशींचा शृंगारू[11] । हरिश्चंद्र नृपनाथ[12]'. ॥ ३४ ॥ परिसोनि वशिष्ठाचिया गोष्टी । विश्वामित्र सक्रोधदृष्टी । म्हणे 'मी या छळितां, सृष्टीं । रक्षिता[13] पाठी कोण असे? ॥ ३५ ॥ मज विश्वामित्रऋषीपुढें । भूपाळसत्व कायसें बापुडें[14] । क्षणामाजी करीन वेडें' । वचन धेंडपुडें[15] बोलिला. ॥ ३६ ॥ येरु[16] म्हणे, 'हें तैंच घडे । जैं यवनमुखीं वेद पडे; । माझे पूर्वज रौरवकुंडें[17] । भोगिजेति सर्वही[18]. ॥ ३७ ॥ ना तरी मी या शिखासूत्रा[19]-। वेगळें होणें, कुरुक्षेत्रा[20]-। माजी दान[21] करपात्रां । स्पर्श करीन अधमाचें. ॥ ३८ ॥ आणिक ऐक[22] प्रतिज्ञावचन । नरक[23]करोटीं सुरापान । आणि गोत्रजाचें हनन । हे दोष गर्हन[24] मज घडोत. ॥ ३९ ॥ ऐसिया दोषांचे पर्वत । सत्त्व टाकितां नृपनाथ । मस्तकीं घेऊनि नरकांत । पूर्वजांसहित बुडेन.' ॥ ४० ॥ परिसोनि वशिष्ठाचिया वचना । विश्वामित्रही करी प्रतिज्ञा, । 'नृपसत्व टाळीन[25] नाना- । यत्नेंकरूनी सर्वथा. ॥ ४१ ॥ जरी उतरेल माझ्या कसीं[26] । तरी देईन जोडल्या सुकृतासी[27]' । 'तथास्तु.'शब्दें

---

१. रंक=भिकारी, दरिद्री. २. पर्वतविशेष. [ मुक्तेश्वरवनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ. ३७ टीप ३ पहा.] ३. मुंग्यांच्या वारुळाची उपमा. ४. 'कण्हेर अर्कीं कल्पद्रुमा । समानता केविं होय? ॥' असा अन्यपाठ. अर्की=रुईचें झाड. ५. मारखें, भेदरहित. ६. 'कासया वायां' असें पाठांतर. ७. 'धर्म' असाही पाठ आहे. ८. ह्या ओंवीचे ३।४ चरण सुभाषितरूप आहेत. ९. 'धैर्यशिखेचा' असा अन्यपाठ. शिखा=पर्वताचें शिखर. १०. ध्रुव (उत्तानपाद राजाचा पुत्र). 'जेविं का धुरू' असा अन्यपाठ. ११. भूषण, सौंदर्य. १२. 'नृपवरू' असें पाठांतर. १३. रक्षिता पाठी= पाठी रक्षिता=पाठिराखा, संरक्षण करणारा. १४. क्षुद्र, क्षुल्लक. १५. कठोर, मर्मभेदक. १६. वशिष्ठ. १७. नरककुंड. १८. सप्त नरक:—क्षारकर्दम, रक्षोगणभोजन, शूलप्रोक्त, दंदशूक, अवटनिरोध, पर्यावर्तन आणि सूचिमुख. 'भोगितील सर्वही' असा अन्यपाठ आहे. १९. शिखा (शेंडी) व सूत्र (यज्ञोपवीत, जानवें). २०. हस्तिनापुराच्या सभोंवतालचा प्रदेश [ मुक्तेश्वर—वनपर्व—काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० १२ टीप ६ पहा ]. २१. उत्तरार्धाचा अन्वयार्थ:—कुरुक्षेत्रामाजी करपात्रां (हातांतील भांड्यांत किंवा हस्तरूप भांड्यांत) अधमाचें (=चांडाळाचें, अंत्यजानें दिलेलें) दान स्पर्श करीन. २२. 'ऐकें' असें पाठांतर. २३.'नरकपाळीं' असा अन्यपाठ. २४. भयंकर, अत्यंत गर्हणीय. २५. चुकवीन, ढळवीन. २६. कसोटीस उतरेल. २७. पुण्यास.

पल्लवाशीं[1] । येरें[2] ग्रंथी[3] दीधली. ॥ ४२ ॥ ‘[4]माझिया तपाच्या असंख्य कोटी । न [5]समाती ब्रह्मांड[6]घटीं, । कोणतीं म्हणाल, तरि कर्णपुटीं । [7]श्रवण केलें पाहिजे. ॥ ४३ ॥ जेणें तपें म्यां [8]अपरसृष्टी । निर्मिली आणि [9]चर्मदृष्टी । [10]रविबिंब अवलोकितां [11]दृष्टी । गळोनी पडलीं बुबुळें. ॥ ४४ ॥ [12]माजी निघाले [13]ज्ञाननयन । घेतलें सूर्याचें दर्शन । आणि [14]वातांबुपर्णाशन । केलें [18]वर्षे कोटी दहा. ॥ ४५ ॥ लोहचूर्ण सेवूनि वनीं । तपलों [15]पंचाग्नि साधुनी । [16]रेतकुंडीं [17]पद्मासनीं । जपलों [18]अब्दें कोटी दाहा. ॥ ४६ ॥ ऐसिया तपाचेनी बळें । मृत्यु जिंकिला तये [19]वेळे । नृपातें [20]वोपीन तात्काळें । जरी माझिये तुळे उतरेल.’ ॥ ४७ ॥ ऐसा दोघांचा संवाद । होतां, उठिला मुनि **नारद.** । **इंद्र** म्हणे, ‘कायसा वाद ? । शब्दें शब्द [21]वाढेल’. ॥ ४८ ॥ हटीं पेटूनियां दोघे । प्रतिज्ञा [22]करूनियां निघाले वेगें । **विश्वामित्र** परमरागें । **सि**[23]द्धाश्रमा तो गेला. ॥ ४९ ॥ **सूर्यवंशींचा** अभिमानी । अयोध्ये गेला **वशिष्ठमुनी** । **विश्वामित्रें** शिष्य दोन्ही ।

---

१. पदराला. २. वशिष्ठानें. ‘येर’ शब्दाची तृतीया. ३. वशिष्ठानें ‘तसें असो’ [=ठीक आहे, कांहीं चिंता नाहीं] असें म्हणून पदरास गांठ दिली म्हणजे तुझी प्रतिज्ञा शेवटास कशी जाते ती पाहूं; मी ती शेवटास निश्चयानें जाऊं देणार नाहीं; हा [वशिष्ठाचा] भाव (नवनीत). ४. हें विश्वामित्राचें भाषण आहे. ५. न मावती, न राहती. ६. ब्रह्मांडरूपी घटांत. ७. ‘श्रवण करा सज्जन हो’ असा अन्यपाठ. ८. प्रतिसृष्टी, ब्रह्मदेवाच्या सृष्टीहून निराळी सृष्टी. ‘त्रिशंकुराजानें सशरीर स्वर्गास जाण्याच्या हेतूनें यज्ञ करविण्यास वशिष्ठास विनंति केली, ती त्यानें नाकारली. तेव्हां विश्वामित्रानें त्याचें म्हणणें कबूल करून यज्ञास आरंभ केला. पण शेवटीं इंद्र त्या राजास स्वर्गांत घेईना म्हणून विश्वामित्रानें आपल्या तपोबलानें नवीं नक्षत्रें वगैरे उत्पन्न केलीं अशी कथा आहे.’ (नवनीत.) ९. चर्मचक्षूंनीं, नुसत्या डोळ्यांनीं. १०. सूर्यमंडल. ‘**बिम्बं** तु प्रतिबिम्बेऽपि मंडलं पुंनपुंसकम्’ इति मेदिनी. ११. ‘सृष्टी’ असा पाठभेद आहे. १२. त्यामध्यें, ज्या ठिकाणाहून बुबुळें गळून पडलीं त्या ठिकाणीं, डोळ्यांच्या खांचींत. १३. ‘दिव्यनयन’ असें पाठांतर. १४. वात+अंबु+पर्ण+अशन=वायु, उदक व झाडाचीं पानें हीं खाणें. १५. चार दिशांस चार आगट्या व डोक्यावर सूर्य मिळून पांच अग्नि. [मुक्तेश्वर–आदिपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला. पृ. ४१३ टीप ११ पहा.] ‘पंचाग्निसाधनीं’ असा अन्यपाठ. १६. ‘रिक्त कुंड’ ‘प्रेतकुंड’ अशीं पाठांतरें. १७. पद्मासन=योगसाधनांतील एक बैठक. हिचें लक्षणः–‘ऊरुमूले वामपादं पुनस्तु दक्षिणं पदं । वामोरौ स्थापयित्वा तु **पद्मासन**मिति स्मृतम् ॥’ १८. वर्षें. आमच्या जवळील दोन पोथ्यांत ही ओंवी आढळत नाहीं. १९. त्या वेळेस, तप करितांना. २०. देईन, अर्पण करीन. २१. ‘वाढवा’ असा अन्यपाठ. २२. ‘प्रतिज्ञा करूं’ असा पाठभेद. २३. ऋषीच्या आश्रमाला, पर्णकुटीला. थोड्या वर्षांपूर्वीं एका बंगाली गृहस्थानें हिमालयावर ‘सिद्धाश्रम’ नांवाचें ऋषींचें स्थान पाहून आल्याचें वर्तमान वृत्तपत्रांतून प्रसिद्ध केलें होतें.

गुप्त पाठीं[1] पाठविले. ॥ ५० ॥ '[2]इंद्रसभेमाजी वाद । दोघां झाला प्रतिज्ञा[3]-शब्द । योंलागीं[4] राजा सावध । करावया बोध तो गेला. ॥ ५१ ॥ तुम्हीं जाउनियां गुप्त । पाहोनि यावें सकळ वृत्तांत.' । येरीं जाउनी पहातां तेथ । मुनी नेमस्त[5] न सांगे ॥ ५२ ॥ वशिष्ठ आला ऐसी वाणी[6] । ऐकतां, राजा धांवला, चरणीं । नमस्कारुनी, शिबिकायानीं[7] । बैसवूनी चालिला[8]. ॥ ५३ ॥ गुढ्या उभविल्या नगरीं । मखरें, तोरणें, घरोघरीं । जय-जयकारें मंगळ तुरीं[9] । वशिष्ठ नगरीं प्रवेशे. ॥ ५४ ॥ रायें आणुनी महीं-द्रालया[10] । कनकपीठीं[11] बैसवी तया । सहकुमार[12] नरेंद्रजाया[13] । येती जाली द-र्शना.॥ ५५ ॥ ऋषिचरणीं ठेवुनी माथे[14]; । येरें स्पर्शिलें अमृतहस्तें । हृदयीं आलिंगुनी तयांतें । मंगल शब्दें गौरवी. ॥ ५६ ॥ षोडशोपचारीं[15] पूजापात्रें । कनककुंभीं जळें पवित्रें । पूजा करुनी सांग मंत्रें । [16]धरी छत्रें आवडी. ॥५७॥ अर्घ्य, पाद्य, दिव्य सुमनें[17]. । सुगंध[18] माला, [19]हरिचंदनें, । नैवेद्य, तांबूल, निरांजनें, । कनकतबकीं वोपिलीं[20].॥५८॥ ऐसिया उपचारें पूजोनी मुनी । राजा उभा जोडोनि पाणी[21] । विश्वामित्रवचन मनीं स्मरोनी । बोलता जाला वशिष्ठ. ॥ ५९ ॥ 'सवितोचळापासून[22] निर्मळ । ईहपर्यंत[23] कीर्तिजल । भरुनी वाहे पूर तुंबळ । अरिअचळ[24] [25]भंगोनी. ॥ ६० ॥ ऐसी वंशगंगा[26] पवित्र । तियेसी

१. (वशिष्ठाच्या) पाठोपाठ, मागून. २. हें विश्वामित्राचें आपल्या शिष्यांस सांगणें आहे. ३. 'प्रतिशब्द' असें पाठांतर. ४. यालागीं राजा (राजाला) सावध करावया, [व राजास] बोध [करावया] तो (वशिष्ठ) गेला–असा अन्वय. ५. नेमकें (इंद्रसभेंतील वर्तमान). ६.'वशिष्ठ आला ऐसें कर्णीं । शब्द ऐकतां' असा अन्यपाठ. ७.पालखींत. 'शिबिकासनीं' असाही पाठ आहे.८.'आणिला' असा पाठभेद. ९. मंगलवाद्यें वाजत असतांना. तुरें=वाद्यें. १०. मही+इंद्र (=राजा)+आलया= राजवाड्यांत. ११.सुवर्णासनावर.१२.पुत्रासह.१३.राजपत्नी (तारामती).१४. मस्तकें. १५. षोडश उपचारांनीं युक्त. (मागें विश्वामित्रभोजन–ओंवी ३७वरील टीप पहा.) १६.'धराछत्रें' असा पाठभेद आढळतो. धराछत्र=राजा (?). १७. 'वसनें' असें पाठांतर. १८. 'सुगंध सुवास सुमनें' असा पाठभेद. १९. एक प्रकारचा मलयदेशांत होणारा चंदन. [मुक्तेश्वर-सभापर्व-काव्यसंग्रहग्रंथमाला पृ. १५, टीप ४ पहा.] २०. 'ठेविलीं' असाही पाठ आहे. २१. हस्त. 'कर जोडोनी' असें पाठांतर. २२. सूर्यरूपी पर्वतापासून. हरिश्चंद्र हा सूर्यकुलोत्पन्न राजा होय. २३. येथपर्यंत (हरिश्चंद्रापर्यंत). **'इह परत्र' 'इह पवित्र'** असे अन्यपाठ. २४. शत्रुरूपी पर्वत. ओंव्या ६०।६१ ह्यांत सुरेख **रूपक** आहे.२५. 'भंगावयास' असा पाठभेद.२६.वंशरूपी गंगा. 'वसे गंगा' 'शिवगंगा' अशीं पाठांतरें.

जन्हु[1] विश्वामित्र । शोषावया पवित्र वेक्त्र[2] । पसरुनी बैसे यज्ञासी. ॥ ६१ ॥ मूळींच पवित्र स्वर्गभुवनीं । वरी विराजे ऋषिवदनीं । पुढें मिरवे अभिधानीं[3] । जान्हवी ऐसी प्रसिद्ध[4]. ॥ ६२ ॥ नृपसत्वशुद्धहाटक[6] । वरी ऋषिकोपाग्निसंगें चोखं[7] । मोला चढे अधिकाधिक । हें जाणिजे सुजाणीं[8]. ॥ ६३ ॥ असो;[9] ऋषि म्हणे, 'गा! राया! । सांगितलें धरीं हृदया । भलें सत्व, शांति, दया । असे जयातें तो श्रेष्ठ. ॥ ६४ ॥ शिबिराजा[10] चक्रवर्ती । सूर्यवंशीं[11] प्रख्यात कीर्ति । सत्वरक्षणीं मांस[12]तुकिती । देह कापुनी ताजवां[13]. ॥ ६५ ॥ सूर्य-वंशींचिया[14] राया! । आणिक परिसें गुणालया[15]! । वना नवजावें, ऋषिचिया[16] । सदना गमन न करावें.' ॥ ६६ ॥ संकेत[17] दाउनी रायासी । वशिष्ट गेला तपासी । राजा सावध अहर्निशीं । अयोध्येसीं[18]वर्तत. ॥६७॥ येरीकडे सिद्धा-श्रमीं । विश्वामित्र अभिचारकर्मी[19] । मांतगयाग[20] सकामी[21] । करिता झाला साक्षेपें.

१.सोमवंशांतील एक राजा.२.मुख, तोंड.'भगीरथानें स्वर्गाहून गंगा आणिली,ती हिमालयावरून खालीं येत असतां मध्यें जन्हूचा आश्रम लागला,तेथें जन्हु यज्ञ करीत होता.त्याची यज्ञसामग्री वाहूं लागली, तेव्हां त्याला राग येऊन त्यानें ती पिऊन टाकिली. तेव्हां भगीरथानें त्याची प्रार्थना केल्यावर तिला त्यानें कानावाटे सोडून दिलें. तेव्हांपासून तिला जान्हवी हें नांव मिळालें. (नवनीत.) ३. नांवानें. ४. जन्हुकन्या ह्या नांवानें. ५. 'विख्यात' असा अन्यपाठ. ६. राजानें सत्व हेंच शुद्ध सुवर्ण. हा अग्निसुवर्णाचा दाखला अन्यत्रही आढळतो. (रघुवंश, सर्ग १ श्लोक१० पहा.) ७. आंच देऊन आणलेली स्वच्छता, झिलई, उजळा. ८. 'सुजाणा' असें पाठांतर. ९. ह्या ओंवीचा अन्यपाठ दोन पोथ्यांत असा आहे:-'असो ऋषि म्हणे गा राया । भल्यानें सत्व रक्षणें, सांडणें काया । करूनि सांडिती ते स्वर्गालया । अक्षयीं भोग भोगिती. ॥ ६४ ॥.' १०. हा उशीनर राजाचा ज्येष्ठ पुत्र. ह्याची परीक्षा पाहण्याकरितां इंद्र व अग्नि हे अनुक्रमें श्येनाचें व कपोताचें रूप घेऊन आले होते. [मुक्तेश्वर-सभापर्व काव्यसंग्रहग्रंथमाला पृ. १६५ टीप १ पहा.] ११. शिबिराजा सूर्यवंशीय नसून सोमवंशोत्पन्न होता. मुक्तेश्वराच्या हातून अशा प्रकारच्या नजरचुका झालेल्या कोठें कोठें आढळतात. (मागें पृष्ठ १३० टीप १६ पहा.) १२. देह कापुनी ताजवां (ताजव्यांत, तराजूंत) मांस तुकिती (तोलिती)-असा अन्वय. १३. ताजवा+आं (सप्तमीचा प्रत्यय)=ताजव्यांत. 'आं' हा प्रत्यय सप्तमीचा असून 'अ'कारान्त किंवा 'आ' कारान्त नामांस लागतो. याचीं उदाहरणें:-(१) जोड दिली दुखवुं नको, **पायां** पडतों बृहन्नडे सोड । (मोरोपंत). (२) रत्नांचे बहु हार शोभति **गळां** कौस्तुभ मुक्ताफळें. । (पांडुरंग.) इत्यादि. १४. 'ऐशिया वंशींचिया' असा अन्यपाठ १५. गुणांचें आलय (घरच) अशा राया, सद्गुणयुक्त राया. १६. वना नव जावें ( वनांत जाऊं नको ) [ इतक्या उपर वनांत गेलासच तर ] ऋषिचिया सदना गमन न करावें ( मुनीच्या आश्रमांत तरी जाऊं नको )-हा इत्यर्थ. येथें 'ऋषि' म्हणजे 'विश्वामित्र' हा वशिष्ठाचा सांकेतिक अर्थ आहे. 'मुनीच्या' असा पाठभेद आहे.१७.मोघम सूचना. १८.'सर्वदा' असा अन्यपाठ.१९.जारणमारणादि घातक कर्म करणारा.२०.देवी प्रसन्न व्हावी म्हणून केलेला तंत्रोक्त यज्ञ. २१. फलेच्छा मनांत धरणारा.

॥ ६८ ॥ शुद्ध पाहुनी भूमिका । आमंत्रुनी[1] याज्ञिकां[2] । अकरा कुंडें षट्[3]कोणिकां । निर्मिलीं, मृत्तिका शोधुनी[4]. ॥ ६९ ॥ अथर्वणवेदींचे पाठक । अभिचारकर्मी शाक्तिक[5] । नानाहोमद्रव्यें, अनेक । पुष्पमाला[6] आरक्त[7]. ॥ ७० ॥ सिंदूर, कुंकुम, रक्तचंदन, । अर्ककण्हेरजास्वंदसुमन । रक्तकुंभ, प्रेतासन, । मांसपात्रें चरूचीं[8]. ॥ ७१ ॥ तीथें पूर्ण भरिले घट । अशुद्धकवळें[9] भरिलें ताट । स्थापुनी शक्तीचें[10] पीठ । होम आरंभिला ऋषीनें. ॥ ७२ ॥ मंत्रयंत्र तंत्रोपकरणें । पूजुनी जुंव्हती[11] पात्र वचनें । शक्ति शेष करिती पानें । पंचमुद्रा[12] संयुक्ता[13]. ॥ ७३ ॥ स्नान करुनी शोणितीं[14] । नग्नासनीं[15] बैसोनी, होतीं[16] । अभिचारकंकण[17] बांधोनि, सोडिती । पिंगट जटा मोकळ्या. ॥ ७४ ॥ मध्यें बैसोनी आपण । कुंडीं प्रतिष्ठिला[18] हुताशन[19] । 'स्वाहा' म्हणोनी[20] अवदान[21] । मंत्रोच्चारें[22] टाकिती. ॥ ७५ ॥ आहुति टाकितां मेदमांसीं[23] । धूम्र दाटला आकाशीं । कर्पट घाणी बैसली शीर्षीं । वदन, घ्राण[24], दाटोनी[25]. ॥७६॥ सप्तरंगी[26] ज्वाळा उमटती[27]। अकरा कुंडीं सासष्ट आहुति । हविता[28], देवी पावली तृप्ती । मातंगशक्ति[29] भवानी. ॥ ७७॥ सहस्र अवदानें पूर्णाहुती। होतां, प्रगटली आदिशक्ति; । 'कोण कामना तुझ्या चित्तीं? । सांग निगुती[30], मुनिवर्या!' ॥७८॥ ऋषि म्हणे, 'हेंचि मागणें । क्रूर श्वापदीं[31] भरीं काननें' । 'निकें[32]' म्हणोनी उदार[33] वचनें । देती झाली जगदंबा.

१. बोलावून. २. याजकांस, ऋत्विजांस. ३. षट्कोणाकृति, ज्यांस सहा कोण आहेत अशीं. ४. शुद्ध करून. ५. शक्तिदेवीचे उपासक. 'शांतिक' असा पाठभेद. ६. 'पुष्पयाती आरक्ता' असें पाठांतर. ७. तांबड्या रंगाच्या, लाल. ८. चरू=अग्नीस आहुति देण्याकरितां शिजविलेला भात वगैरे. ९. रुधिरग्रास. [अशुद्ध=रक्त, रुधिर; कवळ=घांस, ग्रास.] १०. शक्तिदेवी, शाक्तांची देवी. ११. जुंव्हती=जुहोति. ज्यांत 'जुहोति' असें म्हणतात असा याज्ञिक प्रयोग. १२. खेचरी, भूचरी, अगोचरी, चाचरी आणि अलक्ष ह्या पंचमुद्रा ज्यांत. १३. ही ओंवी आमच्या जवळील पोथ्यांत आढळत नाहीं. १४. रक्तांत, रुधिरानें. १५. 'यज्ञासनीं' असाही पाठ आहे. १६. 'पाहती' असा अन्यपाठ. १७. जारणमारणोच्चाटनयज्ञाचें कंकण. कंकण=लग्नांत किंवा यज्ञांत मनगटास सूत्रवेष्टन बांधतात तें. १८. स्थापिला, स्थापना केली. १९. अग्नि. २०. 'श्रुवा पात्रीं' असें पाठांतर. श्रुवा=स्रुवा; पळीसारखें पात्र, हें बहुतकरून लांकडाचें केलेलें असतें. २१. आहुति. २२. 'मंत्रोपचारें' असा पाठभेद. २३. 'मद्यमांसीं' असा अन्यपाठ. २४. नाक. २५. दाटणें=भरणें. २६. सात रंगांनीं युक्त. सात रंगांचीं नांवें:-निळवट, गुळीचा, अस्मानी, हिरवा, पिंवळा, नारिंगी व लाल. २७ 'उठती' असा अन्यपाठ. २८. हवन करितां. २९. 'माताशक्ती' असा पाठभेद. ३०. निश्चयपूर्वक, खात्रीनें. 'निरुती' असाही पाठ आहे. निरुती=स्पष्ट. ३१. श्वापदांनीं. 'श्वापदें' असा अन्यपाठ. ३२. बरें आहे, ठीक आहे. ३३. 'उत्तर वचन' असा पाठभेद.

॥ ७९ ॥ विश्वामित्र तये वेळे । देवीवरदानाचेनि बळें । निर्मिता[1] जाला श्वापदकुळें । भयानक[2] काननीं. ॥ ८० ॥ पक्ष[3], मासें, अयनें, अब्दें, । प्रसवलीं अनेक श्वापदें । विस्तारें वदिजेल, तरी शब्दें । ग्रंथ जाईल पाल्हाळी[4]. ॥८१॥ दंती, शृंगी, नखी, क्रूर । निर्मिले श्वापदगणांचे भार[5] । पादहीन, पक्षधर, । खेचर[6], भूचर, झोटिंग. ॥ ८२ ॥ कानन[7] व्यापिलें, श्वापदें । मातलीं[8] भक्षुनी मांस, मदें[9] । गर्जती भयानक शब्दें; । त्रास देती जगातें. ॥ ८३ ॥ कृषिक[10] नव[11]-जाती कृषिके[12] । तीर्थयात्रेसीं पांथिकें[13] । व्यवहार सांडिला व्यवसायिकें[14] । धेनु वना नेव्रजाती. ॥ ८४ ॥ भयें वनीं न रिघे[15] कोणी । कल्पांत भाविती[16] सकल प्राणी । म्हणती, 'घालूं राजकर्णी[17] । जाऊनी सदनीं रायाचे.' ॥ ८५ ॥ प्रजा येऊनी[18] राजसभे । जोहार[19] करुनी राहिले उभे; । 'तुझीये शौर्यसूर्यप्रभे-। माजी पशुतम[20] दाटलें. ॥ ८६ ॥ सांगावया योग्य नव्हे मात[21] । न सांगतां आमचा प्राणांत[22] । श्वापदें मातलीं वनांत । करिती घात जगाचा.' ॥ ८७ ॥ ऐकोनी पौरें[23] यांची वाणी । राजा विचारी अंतःकर्णी । गुरुवचन[24] तें मानुनी मनीं । राहतां[25], जनीं अपकीर्ति[26]. ॥ ८८ ॥ वनीं निवटूनी[27] श्वापदगणां । सुखी करावें सकल जनां । वशिष्ठ कोपेल, तरी चरणां । नमन करीन साष्टांगीं. ॥ ८९ ॥ ऐसें विचारुनी चित्तीं । पाचारिला वाहिनीपति[28] । म्हणे[29], 'जाणें[30] वनाप्रति ।

---

१. 'करिता' असा अन्यपाठ. २. भयंकर. हें 'श्वापदकुळा'चें विशेषण. 'जगहिंसक' 'जीवहिंसक' असे पाठभेद. ३. पक्ष=पंधरवडा; मास=महिना; अयन=सहा महिने; अब्द=वर्ष. ४. पाल्हाळ=विस्तार. ह्या ओंवीचा अन्यपाठः—'पक्षमास आयोनि आळें (?) । प्रसवलीं अनेक श्वापदकुळें । विस्तारें वदिजे तरी सकळें । ग्रंथ जाईल पाल्हाळी. ॥' ५. समूह. ६. आकाशांत संचार करणारे. ७. अरण्य. ८. माजलीं, उन्मत्त झालीं. ९. 'मांसमेदें' असा अन्यपाठ आहे. १०. शेतकरी. ११. नवजाती=न जाती. १२. कृपिका=शेतकी. १३. पांथस्थ, प्रवासी. १४. व्यापाऱ्यांनीं. १५. रिघणें=शिरणें, जाणें. 'निघे' असाही पाठ आहे. १६. समजती, मानिती. १७. राजाच्या कानावर. कानावर घालणें=कळविणें, सांगणें. १८. 'जाऊनि' असाही पाठ आहे. १९. मुजरा. 'जोहारूनि' असा अन्यपाठ. २०. पशुरूपी तम (अंधकार). हें **रूपक** आहे. २१. वर्तमान, वार्ता. २२. 'घात' असें पाठांतर. २३. पुरवासी लोक, नागरिक. 'पौरजांची' असें पाठांतर. २४. मागें ओंवी ६६ वी पहा. २५. घरीं स्वस्थ राहतां, कांहीं बंदोबस्त न करितां राहिल्यास. २६. प्रजेचें पालन करणें, हें राजाचें कर्तव्यकर्म आहे; तें न केल्यामुळें अपकीर्ति होईल—हा भावार्थ. २७. नाश करून, मारून. २८. सेनाधिपति. २९. ह्याचा कर्ता 'राजा' (अध्याहृत). ३०. जाणें=जाणें आहे, जावयाचें आहे, जावें लागतें.

सेना सिद्ध करावी.' ॥९०॥ तेणें [1]आहाटिल्या [2]भेरी । वाजती [3]रणतुरें [4]मोहरीं । वीर[5]श्रीवसनें महावीरीं । परिधान केलीं तात्काळ. ॥ ९१ ॥ अश्वगजरथादि वहनीं । [6]वळवल्या वीरांच्या [7]श्रेणी । त्यांमाजी राजा प्रतापगुणी । वीर[8]श्रिया शोभला. ॥ ९२ ॥ [10]सजिले असंख्य [11]रहंवर । पाठी चालती अश्वभार । मत्त कुंजरांचे भार । [12]ऊर्ध्वशुंडें धांवती. ॥ ९३ ॥ [13]तयांपृष्ठीं दिव्य पताका । भासती सेनासागरीं नौ[14]का । उभय कर्णामाजी म[15]स्तका- । वरी अंकु[16]श शोभले. ॥ ९४ ॥ नानावाद्यांचिया ध्वनी । राजा आरूढला वहनीं । तारामती शिबि[17]कासनीं । सेनें[18]गर्भी चालत. ॥ ९५ ॥ [19]छत्रच्छायेतळीं नृपवर । वीरश्रियेंसी वि[20]राजे वीर । नगरीं ठेवुनी [21]राजकुमर । पुरीबाहेर निघाला. ॥ ९६ ॥ राजा प्रवेशला महावनीं । श्वापदकळप देखिले नयनीं । शस्त्रीं, शरीं, [22]पाशबंधनीं, । वधुनी [23]धरणी पाडीत. ॥ ९७ ॥ ऐसे रायें मारिले कळप । एका अंगीं भरला कंप । उरलीं श्वापदें [24]लंघिती [25]नृप । [26]प्राणधाकें पळताती. ॥ ९८ ॥ येरीकडे गाधिजमुनी । परम संतोष [27]मानुनी मनीं । पुरी त्यागूनियां [28]महावनीं । राजा आला म्हणोनी. ॥ ९९ ॥ आश्रमा आणावया राव । ऋषीनें केलें [29]लाघव । [30]कुरंग निर्मिला अपूर्व । कनककांति [31]साजिरा. ॥ १०० ॥ 'तुझ्या [32]स्वरूपरज्जूनें गळां । बांधुनी

---

१. वाजविल्या, ठोकिल्या. २. प्रस्थानभेरी, नौबती. ३. रणवाद्यें. ४. अघाडीस, पुढच्या बाजूस. 'अघारीं' असा अन्यपाठ. ५. वीरश्री हींच वस्त्रें. ६. चढल्या, स्वार झाल्या. ७. रांगा, समूह. ८. वीरश्रीनें. 'श्रिया' हें 'श्री' शब्दाचें संस्कृत भाषेच्या नियमानुसार तृतीयेचें एकवचनी रूप आहे. ९. 'अयोध्यानगरीची मुखांतुनी । बाहेर सर्वही निघाले. ॥' 'अयोध्यानगरीच्या वदनींहुनी । बाहेर सर्वही निघाल्या. ॥ असे पाठभेद आहेत. १०. सज्ज केले, तयार केले. ११. रथश्रेष्ठ. 'आणिक असंख्यात स्वार । कव्हेरी अश्वरहंवर ॥' 'पुढें पायांचे मोगर । पाठीं अश्वरहंवर' असे पाठभेद आढळतात. १२. सोंडा वर करून. १३. त्यांच्या पाठीवर. १४. नावा. येथें सेना आणि सागर; पताका आणि नौका–यांमध्यें अभेद मानिला आहे म्हणून हें **रूपक** होय. १५. 'देखा' असा अन्यपाठ. १६. 'ऊर्ध्व तुंडें' असें पाठांतर. १७. पालखींत. १८. सैन्याच्या मध्यभागीं. १९. छत्र=उन्हाचा ताप निवारण करण्याचें साधन, आतपत्र. २०. 'राजेश्वर' असा पाठभेद. २१. राजपुत्र, युवराज (रोहिदास). २२. जाळ्यांत. २३. जमिनीवर. 'विंधुनी रणीं पाडिती' असा पाठभेद. २४. चुकवून जातात. २५. 'द्वीप' असा अन्यपाठ. २६. 'मृत्युधाकें' असाही पाठ आहे. २७. 'संतोषें तोषला मनीं' असा अन्यपाठ. २८. मागें ओंवी ६६ पहा. २९. युक्ति, चातुर्य. ३०. हरिण. रामास पर्णकुटींतून बाहेर काढण्यास रावणानें हीच युक्ति योजिली होती. ३१. सुंदर, गोजिरवाणा. विश्वामित्रानें अरण्यांत एक मायिक वराह (डुकर) उत्पन्न केला व तो वराह वनांतील प्राण्यांस फार पीडा देऊं लागला असें वर्णन देवीभागवतांत आहे (स्कंध ७ अध्याय १७). ३२. सौंदर्यरूपी रज्जूनें (दोरीनें).

आणावें नृपाळा.[1] । 'निकें' म्हणोनी चरणकमळां । वंदुनी[2] गेला वनासी. ॥ १०१ ॥ मृगराज आला समीपू । राजा पाहे तंव कनकवपू[3] । नरनाथहृदयीं कामनासर्पू[4] । फुंफाट करीत ऊठिला. ॥ १०२ ॥ गुणीं[5] लावुनियां बाण । घेवूं पाहे कुरंगप्राण । येरें फेडिलें कीं रान[6] । भूमी चरण न थारे. ॥ १०३ ॥ राजा लागला तया पाठी । धांवतां जाला परम कष्टी । पळत पैंतला[7] आश्रमानिकटीं । विश्वामित्रऋषीच्या. ॥ १०४ ॥ अंतरें[8] राहुनियां उभा । पहात ठेला वनश्रीशोभा । वनसरोजीं[9] नेत्ररोलंबां[10] । स्वादामोदा लोभले.[11] ॥ १०५ ॥ वनश्री[12] वर्णावी कवणें? । उपमे नंदनवन[13] उणें । नानावृक्षीं फळें सुमनें । रससुवासें दाटलीं. ॥ १०६ ॥ एकें[14] सरळ शाखाविहीन । एक ते शाखामंडित पूर्ण । तया ग्रीवां[15] लतिका वेष्टन[16] । करुनी जाती सुरवाडें.[17] ॥ १०७ ॥ कर्पूरकर्दळी, नारीकेळी,[18] । चूतवृक्ष[19] लेवले[20] फळीं । कंटकी[21] फळांची नव्हाळी[22] । लागलीं मुळीं[23] असंख्य. ॥ १०८ ॥ द्राक्षीमंडपातळीं दाट । वोहती[24] अमृत रसाचे पाट[25] । फणसफळें त्यागुनी देंट[26] । धांविती[27] वाट सिंधूंची. ॥१०९॥ जाई, जुई, चंपक, मालती, । बकुळ, मोगरे, कांचन[28], शेवती, । केतकीवनें मघमघिती । पराग क्षिती सुगंध.[29] ॥११०॥ अगरचंदन, देवदारू, । हरिचंदन, मैलागरू, । वृक्ष वेष्टितें[30] विषधरू[31] । भूतें जैशीं निधांना.[32]

---

१. राजाला. 'भूपाळा' असाही पाठ आहे. २. 'नमुनी गेला' असें पाठांतर. ३. कनकमय शरीर. ४. कामना (इच्छा)रूपी सर्प. ५. गुण=धनुष्याची दोरी.. ६. रान फेडिलें=तो मृग रानभर फिरला. 'फोडिलें किराण' असा अन्यपाठ. किराण=उडी. ७. 'आला' असें पाठांतर. ८. अंतरावर, दूर. ९. अरण्यरूपी सरोजा (कमळा)चे ठायीं. १०. नेत्र हेच रोलंब (भ्रमर) त्यांस. 'नेत्रारंभा' असा अन्यपाठ. ११. 'सुख आमोद लाधला' असा अन्यपाठ. १२. वनाची शोभा. 'वनश्री वर्णवे कवणा' असें पाठांतर. १३. इंद्राचें उद्यान. १४. कित्येक. १५. तया (झाडाच्या) ग्रीवा (मानेला). 'तयाग्रीं' असें पाठांतर. १६. 'तया आंगीं मालती वेष्टन' असा अन्यपाठ. १७. सुखानें, सुखयुक्त होत्सात्या. १८. नारळाचें झाड, माड. १९. आम्रवृक्ष. २०. फळीं लवले=फळांच्या भारानें वांकले. 'लवियले' असें पाठांतर. २१. फणसांची. 'फळांचा' असा अन्यपाठ आहे. २२. कौतुक, गोडी. २३. मुळीं लागलीं=(फळें) मूळापासून लागलीं–हा इत्यर्थ. २४. 'धांवती' असें पाठांतर. २५. 'लोट' असा अन्यपाठ. २६. 'वेष्ट' असा पाठभेद. २७. रसानें थबथबलीं होतीं व रस वाहून जात होता–असा भावार्थ. २८. धत्तूर, धोतरा. २९. 'सुवर्णकमळें साजिरें' असा पाठभेद. ३०. वेटिती, वेढती. ३१. सर्प, साप. सर्पास सुगंध फार आवडतो, व ते चंदनाच्या आणि केतकीच्या झाडांस वेढून बसतात, अशी प्रसिद्धी आहे. ३२. ठेवा, द्रव्यनिधि. भूतें द्रव्याचें संरक्षण करितात व तीं त्याच्याजवळ कोणास जाऊं देत नाहींत–अशी समजूत आहे.

॥ १११ ॥ न्यग्रोध[1], पालाश[2], पिप्पलतरू[3] । जे देवत्रयाचे[4] अवतारू । बिल्व, तुळसी, हरि, हरू । ज्यांचे पत्रें तोषती[5]. ॥ ११२ ॥ अनेक वृक्षांचिया जाती-। माजी पशुपक्षी क्रीडती । कनककल्हारीं[6] शोभती । पूर्ण[7] जीवनीं तडाग. ॥ ११३ ॥ ऐसी सिद्धाश्रमाची वाटिका[8] । देखोनी रायें वारिलें कटका[9] । आ-पण, प्रधान[10], पट्टनायिका- । वांचुनी[11] आणिका येऊं नेदी. ॥ ११४ ॥ प्रवेश करितां तये वनीं । राजा आश्चर्य देखे नयनीं । धेनु व्याघ्र[12] एके स्थानीं । एक-मेकां चाटिती. ॥ ११५ ॥ नकुळ[13] सर्प क्रीडती सुखें । मार्जारीस्तना लागती[14] मूषकें । सिंह करिण[15] करीत कौतुकें[16] । वनामाजी विचरती. ॥११६॥ उलूका[17] निरवूनी पिलीयांसीं । वायस[18] जाती चारियासी[19] । विश्वामित्रमाया ऐसी । सहसा न कळे मानवा. ॥ ११७ ॥ निर्वैरें[20] श्वापदांचे गण । देखोनी विस्मित रायाचें मन । पुढें जातां सुगंध जीवन । तडागीं पूर्ण देखिलें. ॥ ११८ ॥ तया कासारजीवनें[21] स्नान । करोनि[22] विश्रांति लाहिजे[23] मनें । परिधान करुनी दिव्य वसनें । देवालया निघाला. ॥ ११९ ॥ कर्दळीद्रोणीं[24] हेमकमळें । नाना पुष्पें सुपरिमळें[25] । कनकपात्रीं भरुनी जळें । शिवागारीं[26] प्रवेशे. ॥ १२० ॥ सोमकांत[27]-श्वेत शिखर । माजीं[28] विराजे[29] कर्पूरगौर । द्वारीं धवळा[30] नंदिकेश्वर[31] । मनोहर

१. वड. २. पळस. ३. पिंपळ. ४. ब्रह्मा, विष्णु व शिव यांचे. ५. शंकरास बेलाचें व विष्णूस तुळसीचें पत्र (पान) फार आवडतें–असें वर्णन ग्रंथांतरीं आढळतें. ६. सुवर्णकमळांचे योगानें. 'कनक कण्हेर' असा अन्यपाठ. ७. पाण्यानें पूर्ण (सांडोसांड) भरलेले तडाग (सरोवरें). ८. उद्यान, बाग. ९. सैन्य. १०. मंत्री, दिवाण. ११. खेरीज, शिवाय. 'वांचून' ह्या शब्दाशीं इंग्रजींतील 'Save' हा शब्द कसा अगदीं समानार्थक आहे ! १२. धेनु आणि व्याघ्र, नकुळ (मुंगूस) आणि सर्प, मांजर आणि उंदिर, सिंह आणि हत्ती, घुबड आणि कावळे–यांचें हाडवैर असतें, परंतु सिद्धाश्रमांत ते आपला वैरभाव सोडून देऊन मित्रभावानें राहात होते म्हणून हरिश्चंद्रास आश्चर्य वाटलें. १३. मुंगूस. १४. उंदीर मांजरीचें दूध पीत होते–असा भावार्थ. 'स्तनालागीं' 'स्तना लागलीं' असे अन्यपाठ. १५. हत्ती. १६. क्रीडा, आनंद. '**कौतुकं** मंगले हर्षे हस्तसूत्रे कुतूहले' इति शाश्वतः. १७. घुबडाच्या स्वाधीन करून. १८. कावळे. १९. चारा शोधून आणावयास. 'चरावयासी' असा अन्यपाठ. २०. द्वेषभावरहित, वैरभाव सोडून. २१. सरोवरांतील पाण्यानें. २२. 'करितां' 'करी' अशीं पाठांतरें आढळतात. २३. मिळविली. २४. कर्दळीच्या पानाच्या द्रोणांत. २५. अत्यंत सुगंधित. २६. शिवालयांत. 'भवनागारमंदिरम्' इत्यमरः; 'अगार' शब्दाचें 'आगार' असेंही रूप आहे. अगार=अगान् स्तम्भादिभूतान् आराति गृह्णाति इति. २७. चंद्रकांताप्रमाणें शुभ्रवर्ण. २८. (देवालया)मध्यें. २९. 'शोभला' असा अन्यपाठ. ३०. ढवळा=धवल, शुभ्र. ३१. हा महादेवाचें वाहन. हा शिलीमुनीचा पुत्र असून शिवगणांपैकीं एक आहे. [विशेष माहितीकरितां अनेककविकृत लघुकाव्यमाला (काव्यसंग्रह) भाग ४ यांतील 'नंदिकेश्वरजननाख्यान' पहावें].

शोभेत.[1] ॥ १२१ ॥ भावें[2] पूजुनी **गि**रिजावर । नमन केलें जोडोनी कर । भार्येसहित राजेश्वर । स्वेच्छासनीं[3] बैसला.[4] ॥ १२२ ॥ **वि**श्वामित्रें मातंगकामिनी[5] । गुणी, सुरूप,[6] नाचणी,[7] । रायासमीप दोघी जणी । देउळांगणीं प्रेरिल्या.[8] ॥ १२३ ॥ **ऋ**षिआज्ञेनें कामसरिता[9] । लावण्यलतिका,[10] गुणैकें[11]भरिता, । सालंकार,[12] शोभिता । नृपनाथासन्मुखें.[13] ॥ १२४ ॥ येऊनी नृत्यगायन[14] करिती । आविर्भावें[15] ताळ[16] तोडिती । नयनबाणें विंधिती । चित्तें[17]कुरंग रायाचा. ॥ १२५ ॥ त्यांचिया गायनाची विचित्र कळा । निर्झरें[18] पाझरती शिळा । पवन [19]पांगुळे, गंगे[20]कूळा । पूर तुंबोनी दाटती.[21] ॥ १२६ ॥ सभे श्रवणा[22] बैसले सादरें । नानाश्वापदजाती अपारें । वैर त्यागुनी परस्परें । मधुरस्वरें मोहिलीं.[23] ॥ १२७ ॥

---

१. 'शोभला' 'विराजे' असे पाठभेद. २. भक्तीनें. ३. स्वच्छ (पवित्र) आसनावर. 'स्वस्थानीं' 'स्वस्थासनीं' असे अन्यपाठ. ४. ह्या १२० ओंव्यांपैकीं बहुतेक सर्व **मु**क्तेश्वराच्या स्वप्रतिभानिर्मित आहेत. **मु**क्तेश्वरास वर्णनविस्तार आवडत असे ह्याचें हें स्थल उत्कृष्ट उदाहरण होय. ह्यापैकीं **सि**द्धाश्रमवाटिकेचें वर्णन वाचून आपण त्या वाटिकेंतच आहों किंवा ती वाटिका आपल्या दृष्टीसमोरच आहे, असा भास होतो. वनश्री, शृंगारवनें, स्वर्गशोभा, मनुष्याच्या मनोवृत्ति इत्यादिकांचें शब्दचित्र रेखाटण्याचें कौशल **मु**क्तेश्वराचे अंगीं उत्तम प्रकारें वसत होतें, असें वाटतें. अशीं शब्दचित्रें **मु**क्तेश्वराच्या कवितारूपी चित्रशाळेंत ठिकठिकाणीं दृष्टीस पडतात. ५. मांगिणी, मांगांच्या बायका (?). एक सुंदर स्त्री, जिच्या प्राप्त्यर्थ विश्वामित्र घोर तप करीत होता ती, वनामध्यें हरिश्चंद्राचे दृष्टीस पडली—असें देवीभागवतांत आहे. (स्कंध ७, अध्याय १८ श्लोक १—१०.) ६. 'रूपसा' असा अन्यपाठ. रूपसा=रूपासह, सुंदर. ७. नाचणाऱ्या. मागें, शुकरंभासंवाद—ओंवी १२३ पहा. ८. 'प्रवेशल्या' असा पाठभेद. ९. सरिता=नदी. १०. सौंदर्यवल्ली. ११. गुणान्विता, सद्गुणमंडिता. १२. 'अलंकारेंसीं' असें पाठांतर. १३. 'जवळिकें' असा पाठभेद. १४. 'गीतनृत्य' असाही पाठ आहे. १५. 'हावभावें' असा अन्यपाठ. १६. ताळ तोडणें=थाक तोडणें, ठेका साधणें. पहा:—नृत्यांत अप्सरांचे तोडिति हस्तहचि सर्व थाक थवे. मोरोपंत; अनुशासनपर्व ५।४४. १७. चित्तरूपी हरिण. १८. शिळांतून झऱ्यांचे पाझर फुटूं लागले. १९. पांगुळा झाला, गतिविहीन झाला. २०. कूळ=कांठ, तट, थडी. २१. त्यांचें गायन इतकें उत्तम होतें कीं, तें ऐकून दगडास पाझर फुटला, वारा बंद झाला, गंगेचें पाणी वाहीनासें झालें म्हणून तिला पूर आला. ही **'अतिशयोक्ति'** आहे. अतिशयोक्तीचे **रू**पकातिशयोक्ति, **सं**बंधातिशयोक्ति व **च**पलातिशयोक्ति असे प्रकार आहेत. येथें दगडाशीं, वाऱ्याशीं व पाण्याशीं गाण्याचा कांहीं संबंध नसतांही संबंध वर्णिलेला आहे म्हणून ही **'संबंधातिशयोक्ति'** होय. [मुक्तेश्वर-वनपर्व-काव्यसंग्रह पृ. १८४ टीप ९ पहा.] २२. ऐकण्याकरितां. 'बैसले' ह्या क्रियापदाचा कर्ता हरिश्चंद्र, प्रधान वगैरे. 'बैसलीं' असें पाठांतर. २३. 'मांडिलीं' 'दोहिलीं' असे अन्यपाठ.

ऐसें देखोनि[1] धरारमण[2] । म्हणे, 'धन्य धन्य चतुरानन[3] । जेणें संगीतनिकेतन[4] । कामिनीरूपें निर्मिलें.' ॥ १२८ ॥ त्रिशंकुरायाचा[5] नंदन । संगीतशास्त्रीं[6] अति- प्रवीण । श्रवणें झाला सुप्रसन्न । करींचें कंकण[7] काढिलें. ॥ १२९ ॥ अनेक रत्नें धरामौळीं[8] । हाटककंकणा[9] जडियेलीं । नांचणी[10] पाचारुनी जवळी । देता झाला तियेतें. ॥ १३० ॥ येरी न घेवोनी[11] बोले वचन । 'आह्मां ऋषिधर्मे काय उणें[12]? । तव भोगीलागीं[13] मनें । येथें आणिलें; नरेंद्रा! ॥ १३१ ॥ तुझ्या- ऐसा सुरूप[14] गुणी । दुजा न देखों त्रिभुवनीं । आह्मां ऐशा कुरंगनयनी[15] । अपर[16] कामिनी असती[17] ना.' ॥ १३२ ॥ ऐसें बोलतां मुनिवर्यदासी[18] । राजा कोपला मानसीं[19] । आज्ञा करी[20] प्रधानासी । 'मारून बाहेर घालाव्या[21].' ॥ १३३ ॥ येरें[22] आज्ञा वंदुनी शीसीं[23] । बाहेर घातल्या तापसदासी[24] । रुदितवदनें[25] आश्र-

---

१. 'एकोनियां' असा अन्यपाठ. २. पृथ्वीपति. पृथ्वी ही राजाची स्त्री होय—अशी समजूत आहे. ३. ब्रह्मदेव [मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ० ९ टीप १ पहा]. ४. संगीताचें वासस्थान. ५. त्रिशंकु=ज्याला त्रि (तीन) शंकु (शल्यें, दुःखें) आहेत तो. 'त्रयः शंकव इव दुःख- हेतवो दोषा यस्यासौ त्रिशंकुः. । तदुक्तं हरिवंशेः—'पितुश्चापरितोषेण गुरोर्दोग्ध्रीवधेन च । अप्रो- क्षितोपयोगाच्च त्रिविधस्ते व्यतिक्रमः ॥ इति.' ह्याच्या हातून तीन दोष घडले होते तेः—पित्याचा असंतोष, गुरूच्या गाईचा वध आणि प्रोक्षण केल्यावांचून अन्न भक्षण करणें. ह्या तीन गोष्टी त्याच्या मनाला शल्यासारख्या खुपत असत. ह्यानें एका ब्राह्मणकन्येचें हरण केलें म्हणून वसि- ष्ठानें यास 'चांडाल हो' असा शाप दिला व त्यामुळें यास चांडालत्व प्राप्त झालें. [भागवत—स्कंध ९ पहा.] ६. गायनकलेंत. ७. कडें. ८. पृथ्वीवर. ९. सुवर्णवलयाला, सोन्याच्या कड्याला. १०. ना- चणारी (कलावंतीण). ११. 'नेघोनी' असें पाठांतर. १२. 'न्यून' असा अन्यपाठ. १३. 'तुझिया स्वरूपा वेधलें मन । इच्छा संग कामाचा' असा पाठभेद. १४. 'रूपस गुणी' असें पाठांतर. १५. हरिणाक्षी, मृगनयना. 'कुरंगिणी' असा 'काव्येतिहाससंग्रहकारांचा पाठ आहे, पण तो गौण दिसतो. १६. अन्य, दुसऱ्या. 'अपार' असें पाठांतर. १७. 'असेना' असा आदर्श- पुस्तकांत पाठ आहे पण चुकीचा आहे, हें स्पष्टच आहे. १८. 'मुनिवर्यदासी' हा शब्द अर्थगर्भ आहे. जरी त्या दासी होत्या, तरी त्या विश्वामित्रासारख्या जाज्वल्य ऋषिश्रेष्ठा- कडून आलेल्या असल्यामुळें त्यांनीं असें अनीतीचें वर्तन करावयाचें नव्हतें. १९. 'निजमानसीं' असा अन्यपाठ. २०. 'करोनि' असें पाठांतर. २१. 'घातल्या' 'घालित' असे पाठभेद. २२. प्रधानानें. 'आज्ञा करितां' 'आज्ञा होतां प्रधानासी' असे अन्यपाठ. २३. मस्तकीं. आज्ञा शिरसा मान्य करून—हा स्पष्टार्थ. २४. दोन मातंगकामिनी (तापसदासी) हरिश्चंद्राकडे विश्वामित्रानें पाठविल्या—असें मूळांत नाहीं. ज्या विद्यांचें साधन विश्वामित्र करीत होता त्या सर्व विद्या भयाभीत होऊन स्वसंरक्षणार्थ हरिश्चंद्राकडे आल्या—असें वर्णन मूळांत आहे. [मार्कंडेयपुराण— अध्याय ७ पहा]. २५. 'रुदनवदनें 'अधोवदनें' असे पाठभेद.

मासी । ऋषिरायाच्या पातल्या. ॥ १३४ ॥ आपल्या करें फाडोनि वसनें । कबरीं[1] आच्छादिलीं वदनें । आंगीं धुळी चर्चुनी, नयनें । उष्ण[2] जीवनें ढाळिती. ॥ १३५ ॥ शरीर थरथरां कांपत । 'हा! हा!'[3] शब्दें हृदय पीटित । आक्रोशें रडत, पैंडत[4] । बीभेत्सरूपें[5] कुपात्रा.[6] ॥ १३६ ॥ ऋषिआंगणीं उभय कामिनी । आंग टाकूनि[7] लोळति धरणी[8] । हें देखोनी गाधिजमुनी । शांतवुनी पूसत. ॥ १३७ ॥ 'तुम्हां कवणें दिधला त्रास? । त्याचा समूळ करीन प्रास[9] । खेद सांडून सांवकाश[10] । श्रुत केलें पाहिजे.' ॥ १३८ ॥ येरी म्हणती, 'जी स्वामियां! । तुमच्या वचनें देवालया । जाउनी, गीतनृत्यें[11] राया । तोषविलें; समर्था[12]! ॥ १३९ ॥ उचित[13] देतां नरभूषणें[14] । आम्ही नेघोनि[15] बोलिलों वचनें । 'तव भोगालागीं[16] मनें । आणिलें तेथें नरेंद्रा![17]' ॥ १४० ॥ ऐसें आम्ही बोलतां वचन । राजा कोपला दारुण । प्रधानहस्तें मारून[18] । बाहेर घातलें आमुतें. ॥ १४१ ॥ वसनें[19] कंचुकी[20] फाडुनी । मुष्टिप्रहारें पृष्ठीं मर्दुनी । प्रेतदशा[21] पावोनी । भूमीवरी पडलों जी[22]! ॥ १४२ ॥ दैवें स्मृति पावोनि[23] उठतां । बाहेर घातलें वोपोनि[24] लाथा । ऐसें वर्तलें; कृपावंता!' । बोलोनि गहिवरें दाटल्या.[25] ॥ १४३ ॥ त्यांची परिसोनी दीन वाणी । ऋषि धांवे, वमीत[26] क्रोधाग्नी । भासे जैसीं[27]

---

१. केशकलापानें. २. उष्ण जीवनें=दुःखाचे अश्रु. अश्रुपात करिती, रडती–हा इत्यर्थ. ३. हाय हाय. ४. 'स्फुंदत' असा अन्यपाठ. ५. भयानक रूपानें, भयंकर रूप धारण करून. ६. कु (पृथ्वीरूपी) पात्रा (पात्रावर) पडत (पडती)–असा अन्वय. ७. 'आंग टाकिती लोटोनि' असा अन्यपाठ. ८. जमिनीवर. ९. 'नाश' असा अन्यपाठ. १०. 'मानस' असा पाठभेद. मानस=मनांतील गुप्त गोष्ट, हेतू. ११. 'नृत्यगीतें' असा अन्यपाठ. १२. 'समर्थ' हें विशेषण साभिप्राय आहे. 'समर्थ' ह्या शब्दानें विश्वामित्र हरिश्चंद्रास शिक्षा करण्यास समर्थ आहे, असें दर्शविलें आहे; म्हणून हा '**परिकरा**'लंकार होय. जेथें सहेतुक व खुबी ठेवून विशेषणांची योजना झालेली असते तेथें '**परिकर**'नामक अलंकार होतो. ह्या अलंकाराचें लक्षण:–'अलंकार: **परिकरः** साभिप्राये विशेषणे.' १३. उपायन, नजराणा, इनाम. १४. नरश्रेष्ठानें, राजानें. १५. 'नेघों' असा अन्यपाठ. १६. 'तवांगभोगालागीं मन' असा पाठभेद. १७. 'अंगसंगालागीं मन । असे तुमच्या नरेंद्रा!' असा अन्यपाठ. १८. मारून=मारवून (प्रयोजक). १९. वस्त्रें. २०. चोळी. २१. प्रेतावस्था, मूर्च्छा. ह्या ओंवीचा अन्यपाठ:—'वसन कंचुकी फाडुनी नेमी । मुष्टीप्रहारें मर्दुनी, भूमी- । वरी पडिलों जी! आम्ही । प्रेतदशा पावोनी. ॥' २२. 'पडिलों जंव आम्ही' असें पाठांतर. २३. शुद्धीवर आल्यावर, देहमान प्राप्त झाल्यावर. २४. मारून (वोपणें=अर्पणें, देणें). २५. 'बोलतां गहिंवर दाटला' असा अन्यपाठ. २६. ओकीत, वमन करीत. २७. 'जणों' 'जेविं' अशीं पाठांतरें.

समुद्रमथनीं । व्याळ गरळा सांडीत. ॥ १४४ ॥ कीं मदनदहनालागीं शंकर। तृतीय नेत्रींचा वैश्वानर । पसरी, तैसा ऋषीश्वर । रायासमीप पातला. ॥१४५॥ म्हणे 'रायांमाजी अधमा! । नेणसी माझा प्रतापमहिमा । आतांचि बोळवीन धामा । वैवस्वतांच्या अविलंबें. ॥ १४६ ॥ वसिष्ठ गुरूच्या पडिभरें । मातलासि राज्याधिकारें । यालागीं मदाचें कांविरें । नयनीं आलें तूझिया. ॥ १४७ ॥ अरे! तुझिया गुरूसी । प्रचीत असेल निज मानसीं । म्यां एकशत पुत्रांसीं । यमलोकासी पाठविले.' ॥ १४८ ॥ ऐसे ऋषीचे वाक्शर । वर्षती जैसे सौदामिनीवर; । नृपाअंगीं क्षमापंजर । शांतिभूषणें मिरवला. ॥ १४९ ॥ राजा म्हणे, 'प्रतिसृष्टिजनका! । विनापराधें कोप कां । करितां तुह्मी? ऋषिनायका! । हें मज कळलें पाहिजे.' ॥ १५० ॥ ऋषि म्हणे, 'राया! कृतघ्ना! । माझिया बाळकां श्वापदगणा । वधुनी कां येणें सदना । तापसाच्या? निर्लज्जा! ॥ १५१ ॥ निर्वैर श्वापदांच्या कोटी । वनीं विचरती, पाहें दृष्टी । ऐशियांतें वधूनि, शेवटीं । वांयां दासी मारिल्या?' ॥ १५२ ॥ रायें मस्तक ठेविला चरणीं । बोलता जाला मधुर वचनीं । 'मम अपराध न धरुनी मनीं । क्षमा केली पाहिजे. ॥ १५३ ॥ येका देहाचीं करणें । तेथें रसना खंडिली दशनें । तर्जनीनखें फुटतां नयनें । द्वेष न धरिजे मां-

---

१. मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय ४ पहा. २. सर्प (वासुकी). ३. विष. ४. शंकरानें आपल्या तृतीयनेत्रांतील अग्नीनें मदनास जाळून भस्म केलें–अशी कथा आहे. ५. अग्नि. ६. पसरी=प्रसृत करी, उघडी. ७. हरिश्चंद्र राजाजवळ. 'रायापाशीं' असें पाठांतर. ८. विश्वामित्र म्हणे. ९. धाम=गृह, सदन. १०. सूर्यपुत्राच्या, यमाच्या. येथें 'मारीन' असें एकदम न म्हणतां 'यमाच्या घरीं पाठवीन' असें वळसा घेऊन म्हटलें आहे, म्हणून हा **'पर्यायोक्त'**लंकार होय. 'उजू व सरळ वर्णन न करितां पर्यायानें वर्णन करणें' हें **पर्यायोक्ता**चें लक्षण. [अलंकारमीमांसा पृ० १३.] ११. विलंब (उशीर) न लावतां, सत्वर. १२. पाठबळानें, बळावर. १३. उन्मत्त झालास. १४. राज्य व अधिकार (सत्ता) प्राप्त झाल्यामुळें. 'राज्यांधकारें' असा '**का**व्येतिहाससंग्रह'कारांचा पाठ होता, पण तो गौण दिसतो. १५. पटल, धुंदी. १६. वशिष्ठास. १७. अनुभव, प्रतीति. १८. विश्वामित्रानें वशिष्ठाचे शंभर पुत्र मारिले–अशी कथा आहे. १९. 'वाक्यशर' असा अन्यपाठ. २०. विद्युल्लतेचे वर, विजेचे पती, मेघ. २१. 'शोभलीं' असा अन्यपाठ. २२. हे प्रतिसृष्टिनिर्माणकर्त्या (विश्वामित्रा). २३. 'कां आलासी' असा पाठभेद. २४. जाती, प्रकार. २५. 'कां रे' असा अन्यपाठ. २६. 'मानूनि' असा पाठभेद. २७. इंद्रियें. 'कारणें' असा अन्यपाठ. २८. जीभ. २९. चाविली. ३०. दांतांनीं. ३१. आंगठ्याजवळील बोटाच्या नखानें. ३२. अर्थसादृश्यः–आपला दांत आपली जिव्हा रगडी। दुःख वाटे, तरी काय दंत पाडी? । ज्यास सर्वांभूतीं आत्मत्वाची आवडी । क्रोध कोणारी करील तो? ॥ यथार्थदीपिका, १२।१४८६.

नसीं. ॥१५४॥ म्हणतां,'श्वापदें आपुलीं बाळें'। सांगा, आम्ही कवणाचीं सकळें !। क्रोध सांडोनी स्नेहाळें । क्षमा केली पाहिजे'. ॥ १५५ ॥ तापसकोपाग्नीच्या शिखा । नृपें केल्या मृगांकमरीचिका; । ऋषिआश्रमा त्यागुनी, पादुका । वंदूनि, आला स्वस्थाना. ॥ १५६ ॥ श्रमें श्रांतला कुंभिनीवर । सुषुप्तीनें व्यापिलें अंतर । तारामतीअंक सुकुमार । उशी करूनि पहूडला. ॥ १५७ ॥ आतां पुढें रसाळ कथा । निद्रा लागतां नृपनाथा । स्वप्नामाजी तत्वतां । दान मागेल 'कौशिक. ॥ १५८ ॥ इति श्रीभारतवनपर्वणि । नवरसरंगें वरदायिनी । मुक्तेश्वराची वाग्भवानी । भंवली स्वानंदगोंधळीं. ॥ १५९ ॥

---

## अध्याय दुसरा.

अंगनाअंकीं वाम कर्ण । ठेवुनी पहुडला नरभूषण । देउळाद्वारीं प्रधान । सावधान बैसला. ॥ १ ॥ अपर देहींची सृष्टिजननी । मानसविलाससरोज-धानी । नसोनी सोचोकार जैनीं । दावी जैसें मृगांबु; ॥ २ ॥ कीं श्रमसागरीं

---

१. 'म्हणा' असा अन्यपाठ. २. कृपाळु जे आपण त्यांनीं. ३. 'कोपशिखिशिखा' असें पाठांतर. शिखि=अग्नि, शिखा=ज्वाळा. ४. चंद्राचे किरण. पाठभेदः–'मृगांबुका.' पाठभेदार्थः– मृगजळासारिख्या केल्या म्हणजे ऋषीला कोप आला तरी राजानें आपल्या मनाची शांति ढळूं दिली नाहीं. (नवनीत.) ५. विश्वामित्राच्या सिद्धाश्रमाला. ६. 'घालुनी' असा अन्यपाठ. ७. ऋषीच्या पादुकांना वंदन करून. पादत्राण=पायांचें संरक्षण करण्याचें साधन. 'पादुका' शब्दानें प्रत्येक प्रकारच्या पादरक्षणसाधनांचा बोध होऊं शकतो, परंतु लांकडाच्या पादत्राणांनाच 'पादुका' म्हणण्याचा प्रघात आहे. ८. 'शांतला' असा अन्यपाठ. ९. पृथ्वीपति, राजा. १०. झोंपेनें, निद्रेनें. ११. अंक=मांडी. १२. हा स्वप्नादि प्रकार मूळांत नसून मुक्तेश्वरानें स्वकल्पनेनेंच योजिलेला आहे. १३. विश्वामित्र. १४. 'शांतिपर्वणि' असा अन्यपाठ आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं हरिश्चंद्राख्यान वनपर्व व शांतिपर्व यांपैकीं कोणत्याही पर्वांत नाहीं ! १५. शृंगारादि नवरसांत रंगून. १६. वाणी हीच भवानी (तुळजापुरची देवी). 'वाग्वाणी' असा अन्यपाठ. १७. 'भरी' 'भरली' असे पाठभेद. १८. स्त्रियेच्या मांडीवर. अंगना=जिचें अंग सुंदर आहे ती स्त्री. १९. 'पहुडे नृपनंदन' असा पाठभेद आहे. २०. स्वप्नसृष्टीची माता अशी निद्रा. 'अपार देहाची सृष्टिजननी । मानसविलासें राजधानी' असा अन्यपाठ. २१. निरंकुश अशा मनोव्यापारांचें आदिपीठ अशी निद्रा. 'राजध्यानीं' असा पाठभेद. २२. खरोखर. २३. 'नयनीं' असें पाठांतर. २४. मृगजळ. २५. श्रमरूपी समुद्रांत.

वडवानळी[1] । मानसवृक्षीं कामनावल्ली[2] । सुरवाडोनी[3] स्वप्नफळीं[4] । सुखदु:ख-रसेसीं; ॥ ३ ॥ ऐसी निद्रा लागतां राया । विश्वामित्राची[5] विचित्र माया । आपण स्वप्नीं प्रकटोनियां । रायापासीं द्विजरूपें[6]. ॥ ४ ॥ स्वप्नीं देखोनी द्विजातें । रायें नमिलें जोडोनि हस्तें । येरू गौरवी तयातें । 'मनोरथावाप्तिरस्तु[7].' ॥ ५ ॥ राजा बोले उदार वचनीं[8] । 'कोण कामना इच्छूनि[9] मनीं । येथें आलेति ? तें श्रवणीं । श्रुत केलें पाहिजे.' ॥ ६ ॥ ब्राह्मण म्हणे, 'राया! समर्था! । संसा[10]-रविपिनामाजी वसतां । दारिद्र्यव्याघ्र उठी अवचिता । आतुर[11] कंठीं झोंबला[12]. ॥ ७ ॥ तूं दयाशीळ धर्ममूर्ति । बहु[13] वक्रीं[13] ऐकिली कीर्ति । यालागीं शरण नृपति! । तुज आलों, गृहस्था! ॥ ८ ॥ ऐश्वर्यधनुष्य[14]शरीरीं । सेनापंजर[15] घालुनी वरी । राजवहनीं वळघुनी[16], करीं । कोश[17]शस्त्र सुतेज. ॥ ९ ॥ ऐशियापरी दारिद्र्यव्याघ्रा । वधावया हेतु नृपवरा[18]! । धरूनी आलों मी पवित्रा! । तुजपासीं याचक.' ॥ १० ॥ राजा म्हणे, 'याहून परता । लाभ तो कोण

---

१. हें 'वडवानळ' याचें स्त्रीलिंगी रूप. हें २ व ३ या ओंव्यांतील निद्रेचें वर्णन फार सुरेख आहे. वडवानळ=शिवाच्या तृतीय नेत्रांतून निघालेला अग्नि. [कालिकापुराण, अ. ४१ पहा.] हा समुद्रांत राहून त्याचें जल शोषून घेतो–अशी समजूत आहे. हें तेज लाटांच्या संघर्षणानें उत्पन्न होतें, असें म्हणतात. उदाहरणार्थ:—

> " On whose dull same-ness, his full tide of youth
> Broke with a phosphorescence.—*Tennyson.*"

तसेंच 'कल्पापायमरुत्प्रकीर्णपयस: सिंधोरिवौर्वानल:' हें परशुरामवचनही विचारणीय आहे. [विशेष माहितीकरितां मुक्तेश्वर–वनपर्व (काव्यसंग्रह–ग्रंथमाला) पृ० १३, टीप १० व पृ० २९, टी० १३ पहा.] २. येथील **रूपक** सुरेख आहे. मानस=वृक्ष, कामना=वल्ली, स्वप्न=फळ, सुखदु:ख=रस–अशी **रूपका**ची रचना आहे. ३. प्रफुल्लित होऊन. ४. 'स्वप्नकाळीं' असा अन्यपाठ. ५. 'ऋषीची जे अलोट माया' असा अन्यपाठ. ६. ब्राह्मणाच्या रूपानें. 'विश्वामित्र निजरूपें' असा पाठभेद. ७. मनोरथ+अवाप्ति:+अस्तु=मनोरथाची प्राप्ति होवो. ८. ह्या ओंवीचा अन्यपाठ:–'राजा बोले मधुरवचनें । कोण कामना इच्छूनि मनें । येथें आलेति तें मजलागुन । कथन केलें पाहिजे. ॥' ९. 'इच्छा' असा अन्यपाठ आहे, पण तो द्विरुक्तिमूल असल्यामुळें ग्राह्य नाहीं. १०. संसाररूपी अरण्यांत. येथें **रूपक** आहे. ११. (भक्ष्य मिळविण्याविषयीं) उत्सुक. 'अतुर' 'अतुट' असे पाठभेद. १२. 'शिरकला' असा अन्यपाठ. १३. पुष्कळ लोकांच्या तोंडून. (वक्र=तोंड). १४. 'शौर्य धरूनि शरीरीं' असा अन्यपाठ. १५. पंजर=पिंजरा; येथें चिलखत, कवच असा अर्थ. १६. चढून. १७. कोश=द्रव्यभांडार, खजीना. ह्या ओंवींतील **रूपक** ह्रदयंगम आहे. दारिद्र्यव्याघ्राचा नाश करावयास कोशरूपी शस्त्रच पाहिजे! 'कोशशस्त्रें सुतेजें' असा पाठभेद. १८. 'वधावें हातें नृपवरा' असा पाठभेद.

असे आतां?' । रायें संकल्प घालितां । झाला बोलता द्विजवर. ॥ ११ ॥ 'अंकुश, कडपाळें, लेखणी, । इतुकें वोपीं माझ्या पाणीं'. । येरें 'दिधलें' म्हणोनी । उदक हातीं सूदलें. ॥ १२ ॥ सवेंचि आणिक देखे दृष्टी । काळपुरुष उभा निकटी । लोहार्गळा धरूनी हातीं । हाणी मस्तकीं निघातें. ॥ १३ ॥ तेणें घायें भयाभीत । राजा स्वप्नामाजी बरळत । तारामतीनें त्वरित । जागृत केला स्वहस्तें. ॥ १४ ॥ निजरूप[13] विसरुनी प्राणी । अज्ञानभ्रमें भ्रमतां योनी[14] । सुखदुःखाची ओटणी[15] । भोगिजेती सर्वदा. ॥ १५ ॥ हें जाणिजे भूत स्वप्न । 'मी,' 'माझें,' हें बरळणें[16] । अज्ञाननिद्रेचें लक्षण । जीवदशा[17] बोलिजे. ॥ १६ ॥ तया संसारविपिनामाजी । अज्ञाननिद्रेचिया सेजीं[19] । वाहे जन्ममृत्यूचीं वोझीं । रंकरूपें समर्थ. ॥ १७ ॥ ऐसिया अज्ञानतमाचा हंता । श्रीगुरु चिदात्मपददाता । क्लेशातीत करी, तेवीं कांता । सावध करी तयातें. ॥ १८ ॥ उठोनि बैसला सावधान । करिता जाला हरिस्मरण । तारामती म्हणे, 'कोण । अवस्था जाली मानसीं?' ॥ १९ ॥ राजा म्हणे 'सुकृतकोटी । राज्यदानें जोडिल्या शेवटीं[26] । एक काळपुरुष[27] निकटीं । लोहो-

१. संकल्पोदक सोडितांच. २. अंकुश शब्दानें हत्ती, कडपाळें (लगाम) शब्दानें घोडे, व लेखणी शब्दानें दप्तर असें समजावें, व तिहींचा एकंदर अर्थ राज्य असा असावा. (नवनीत.) 'कडाळें' 'कडियाळें' अशीं पाठांतरें. ३. हातीं. ४. दान दिलेल्या पदार्थावरील स्वत्वनिवृत्ति व्हावी एतदर्थ उदक सोडण्याची चाल आहे. ५. घातलें, सोडलें. [मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ० १५६, टीप ३ पहा.] ६. तात्काळ, त्याच वेळीं. ७. 'पाठी' असा अन्यपाठ. ८. लोखंडाची कांब, दांडा. ९. 'कवळोनि मुष्टी' असा अन्यपाठ. १०. जोरानें. ११. 'प्रहारें' असें पाठांतर. १२. 'जागृत । राजा केला हस्तकें' असा अन्यपाठ आहे. १३. आत्मस्वरूप, आपण कोण ही गोष्ट. १४. जन्म. 'व्योमीं' असें पाठांतर. १५. आंच, जाचणी, त्रास, क्लेश. 'आटणी' याचा मूळ अर्थ आटविण्याची क्रिया किंवा साधन असा आहे. 'सुखदुःखाचा आरणी' असा अन्यपाठ आहे. आरणी= भोंवरा. 'अरणी' असा पाठ असल्यास, अरणी=होमाग्नि उत्पन्न करण्याचें काष्ठ. १६. बडबडणें. १७. जन्ममरणाच्या फेऱ्यांत असण्याची अवस्था. 'जीव ऐसें' असें पाठांतर. १८. संसाररूपी अरण्यांत. १९. बिछान्यावर. २०. भिकाऱ्याच्या रूपानें. समर्थ रंकरूपें जन्ममृत्यूचीं ओझीं वाहे—असा अन्वय. या ओवींत **रूपक** व **विरोधाभास** आहेत. २१. अज्ञानरूपी अंधकाराचा नाशकर्ता. गुरूचें माहात्म्य असें आहे:—'विदलयति कुबोधं बोधयत्यागमार्थं सुगतिकुगतिमार्गौ पुण्यपापे व्यनक्ति । अवगमयति कृत्याकृत्यभेदं गुरुर्यो भवजलनिधिपोतस्तं विना नास्ति कश्चित्.' ॥ 'सूक्तिमुक्तावली—गुरुप्रक्रम—श्लोक १४.' २२. 'निजात्मपददाता' असा अन्यपाठ आहे. २३. दुःखपार. २४. 'करूनि' असा अन्यपाठ. २५. 'सावधान करी रायासी' असा अन्यपाठ. २६. 'हातीं,' 'मुष्टीं' असे अन्यपाठ. २७. काळा (यमा) सारखा (भयंकर) पुरुष. 'शेवटीं एक काळपुरुष दृष्टीं' असा पाठभेद.

दंडेसीं देखिला. ॥ २० ॥ तेणें दंड हाणितां शिरीं । भयें बरळलों स्वप्नांतरीं । तुवां[1] उठवितां सुंदरी । क्लेशातीत मी झालों.' ॥ २१ ॥ येरी म्हणे, 'जी ! प्राणजीवना ! । यया तीर्थी करावें स्नाना; । घालुनी अग्निमुखीं अवदाना[2] । स्वप्नदोष नाशेल[3].' ॥ २२ ॥ प्रधान म्हणे, 'जी! महाराजा ! । कांहीं दान वोपिजे[4] द्विजां.' । तंव अकस्मात[5] तपोतेजा[6] । विश्वामित्रा देखिलें. ॥ २३ ॥ राजा नमूनी बोले वचन । "स्वामी[7]! आजी शयनीं[8] स्वप्न । देखिलें त्याचें ज्ञान[9] । प्रकट केलें पाहिजे. ॥ २४ ॥ तुमच्या[10] प्रतिमेचें रूपडें । ऐसा ब्राह्मण देखिला पुढें । आशीर्वाद करूनी[11] तोंडें । इच्छा करी दानाची. ॥ २५ ॥ 'सिंहासनासह[12] मेदिनी[13] । राया! दे गा! मजलागुनी' । ऐसें बोलतां ते क्षणीं । उदक[14] हातीं सूदलें[15]. ॥ २६ ॥ सिंधुवासा[16] धेनुधरणी[17] । नवखंडरत्नभूषणी[18] । सुदोहा[19] राज्यभाजनीं[20] । आज्ञायुक्ता[21] सवत्सा[22]. ॥ २७ ॥ ऐसियां दानें[23] सुकृतराशी[24] । लाहतां[25], उदेली[26] माजी[27] विवेशी[28], । काळ[29]-पुरुष लोहोदंडेसीं । देखें, हाणी मस्तकीं." ॥ २८ ॥ ऋषि म्हणे, 'राया! समर्था! । असो स्वप्नींची मायिक[30] वार्ता; । दर्पणींचें[31] प्रतिबिंब जेवीं हाता ।

१. 'तंव' असें पाठांतर. २. आहुती. ३. 'वारणें' असा अन्यपाठ. ४. अर्पिजे, देइजे. ५. 'अकल्पित' असा अन्य पाठभेद. ६. तपाच्या तेजानें (प्रभावानें) युक्त असा जो (विश्वामित्र) त्याला. ७. 'म्हणे' असा अन्यपाठ. ८. झोपेंत. ९. गूढार्थ, स्वप्नाचा अर्थ. १०. तुमच्या स्वरूपासारखें ज्याचें रूप आहे असा. ११. 'आशीर्वचनें बोलोनि तोंडें' असा अन्यपाठ. १२. सर्व राज्य–हा इत्यर्थ. १३. पृथ्वी. १४. दानोदक. १५. सोडिलें, घातलें. 'दान वोपीं द्विजातें' असा अन्यपाठ आहे. १६. समुद्रवसना. पृथ्वी समुद्ररूप वस्त्र परिधान करिते, असें वर्णन संस्कृत ग्रंथांतूनही आढळतें. 'कालिदास–शाकुंतल–अंक ३।१७ पहा.' १७. पृथ्वीरूपी गाय. पृथ्वीला गाईची उपमा देण्याचा संस्कृत ग्रंथकारांचाही प्रघात आहे. [रघुवंश–सर्ग १ श्लोक २६; नीतिशतक–श्लोक ४६ पहा.] १८. नवखंडें हींच नऊ रत्नें त्यांनीं युक्त. 'भुवनीं' असा अन्यपाठ. १९. चांगलें (पुष्कळ) दूध देणारी. २०. राज्यरूपी पात्रांत. 'राजभाजनीं' असा अन्यपाठ. २१. ह्या ओंवींत **रूपक** आहे. धरणी=धेनु; राज्य=भाजन; आज्ञा=वत्स; ह्या उपमान उपमेयांच्या जोड्या. २२. पाठभेदः–सावधा. २३. वरील ओंवींत वर्णिलेल्या पृथ्वीच्या दानानें. २४. पुण्यराशी. २५. प्राप्त होतां. २६. उद्भवली, उत्पन्न झाली. 'ठेला' प्रमाणें 'उदेला' ह्याही क्रियापदाचें वर्तमानकाळाचें रूप प्रचारांत नाहीं. [मराठी व्याकरणावरील निबंध–पृ० १४०.] २७. मध्येंच (इतक्यांत). २८. जखीण. 'इतक्यांत आकाबाईचा फेरा आला' (नवनीत). २९. 'काळरूपें' असा अन्यपाठ. ३०. मायामय, मिथ्या. ३१. आरशांतील.

नये सर्वथा, तेवीं स्वप्न. ॥ २९ ॥ प्रस्तुत मागावया तूतें । इच्छा धरूनी आलों येथें । औट[1] तुक कनकातें । मज दिधलें पाहिजे. ॥ ३० ॥ उदार-पणें देसी जरी । उदक घालीं माझे[2] करीं.' । राजा म्हणे, 'आपुले[3] नगरीं । आलें पाहिजे, स्वामिया[4] !' ॥ ३१ ॥ ऋषि म्हणे, 'संकल्पाविणें[5] । किंनिमित्त नगरा येणें?' । रायें घेऊनियां जीवन । तया हातीं सूदलें[6]. ॥ ३२ ॥ रायें[7] स्नान कासारजीवनीं । सारूनी, गिरिजावर[8] पूजोनि[9] सुमनीं[10]; । विश्वामित्र शिबिकायानीं[11] । बैसवूनी चालविला[12]. ॥ ३३ ॥ प्रधान, आपण[13], तारामती, । सरिसीं[14] चरणचाली[15] चालती, । सिद्धाश्रम सांडुनी पुढती । आत्मनगरा[16] पातलीं. ॥ ३४ ॥ वाहिनीवेष्टित[17] रावो । चालतां, वाद्यां लागला[18] घावो, । वीरश्रियेसीं धरानाहो[19] । अयोध्येसी पातला. ॥ ३५ ॥ राजा आला म्हणोनी नगरी । शृंगारिली नानापरी । अनेक वहनीं वळंघोनी[20], पुरी-। बाहेर थवे[21] दाटले. ॥ ३६ ॥ वाद्यगजरीं[22], मंगळ तुरीं[23] । राजा प्रवेशला नगरी[24] । कामिनीवृंदें[25] माडियागोपुरीं[26] । भूपचंद्रा लक्षिती. ॥ ३७ ॥ कनकताटीं[27] हेमसुमनें[28], । राजमुकुट लक्षूनि नयनें, । अंजळी भरूनि वोपितां[29] रत्नें; । सुमनघनें[30]

---

१. औट तुक=साडे तीन भार म्हणजे २८ हजार तोळे. २. 'माझिये' असें पाठांतर. ३. आपुले=हरिश्चंद्राच्या. ४. 'दयाळा' असा अन्यपाठ. ५. दान करण्याविषयीं संकल्प केल्याशिवाय. ६. 'ऋषीहस्तीं सूदलें' असा अन्यपाठ. ७. 'राजा स्नान करोनी' व 'राजकांता स्नान कासारजीवनीं' असे पाठभेद. ८. पार्वतिपति (महादेव). ९. येथें 'पूजनीं' असा पाठ 'काव्य०संग्रहां'त आहे. १०. पुष्पांनीं (पक्षीं) उत्तम मनानें, भक्तिपूर्वक. ११. पालखींत. 'शिबिकासनीं' असा अन्यपाठ. १२. 'चालिला' असा पाठभेद. १३. 'आणि' असें पाठांतर. १४. बरोबर, एकदम. १५. चरणचाली=पायांच्या चालीनें, पायांनीं. १६. आपल्या नगरास (अयोध्येस). 'जातां सेना टाकिली' असा अन्यपाठ. १७. सैन्यानें वेष्टित. 'वहनीं' असा अन्य-पाठ. १८. वाद्यें वाजूं लागलीं—हा स्पष्टार्थ. १९. पृथ्वीपति, राजा. (नाहो=नाथ.) २०. चढून, स्वार होऊन. २१. 'थोवे' असें पाठांतर. २२. वाद्यांचा गजर होत असतां. २३. तुरें=वाद्यें. २४. 'प्रवेशे अयोध्यापुरी' असा अन्यपाठ. २५. स्त्रीसमूह. 'ऐकोनि जनवृंद' असा पाठभेद. २६. गोपुर=शहराच्या, देवालयाच्या, किंवा राजवाड्याच्या दरवाजावर बांधलेली उंच इमारत. २७. सोन्याच्या ताटांत. 'कनकताट' हा संस्कृतमराठी शब्दांचा समास होय. २८. सुवर्णपुष्पें. २९. 'वोपितां तेणें' असा अन्यपाठ. ३०. पुष्पमेघानें. जणुं काय आकाशांतून पुष्पांचा पर्जन्यच पडला—असा भावार्थ. हा **उत्प्रेक्षा**लंकार. येथें 'जणों' 'जणुं काय' 'वाटे' इत्यादि उत्प्रेक्षाबोधक शब्द गुप्त असल्यामुळें ही **'प्रतीयमानोत्प्रेक्षा'** जाणावी. [मुक्तेश्वरवनपर्व–(काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ० १४१ टी० १ पहा.] तसेंच येथें सुवर्णपुष्पांची पूर्ण समृद्धि वर्णिल्यामुळें **उदात्ता**लंकार.

वर्णिजे. ॥ ३८ ॥ राजा प्रवेशला[1] मंदिरीं । तों **विश्वामित्र** बैसला द्वारीं[2] । दंड पडताळुनी[3] करीं । **तारामती** लक्षिली. ॥ ३९ ॥ दंडें[4] हाणोनी मोडिली शिबिका । वेणिये[5] कवळोनी[6] नृपनायिका । 'देई' म्हणे 'माझिया कनका' । म्हणोनि तीतें मारीत. ॥ ४० ॥ येरी थरथरां कांपत । 'हा ! हा !' शब्दें रुदन[7] करीत । राया जाणविली मात । आला धांवत ऋषीपासीं. ॥ ४१ ॥ राजा म्हणे 'दयासागरा[8]! । कोण्या[9] अपराधें स्त्रिये मारा । तो दोष ठेवूनि[10] माझे शरीरा । खंडण किजे तिळतुल्य[11].' ॥ ४२ ॥ 'संकल्प[12] करूनी आणिलें येथें । शेखीं[13] द्वारीं टाकूनी मातें । दान नेदितां, सदनातें । प्रवेश केला, हा दोष.' ॥ ४३ ॥ रायें पाचारुनी भांडारी[14] । म्हणे, 'कनक आणा झडकरी.' । धनाधीशें कोटीवरी[15] । हेममांदुसा[16] आणविल्या. ॥ ४४ ॥ तुळे[17] उभवुनी[18] धडा[19] । कनक भरितां पारडां[20]; । **ऋषि** म्हणे 'राया! मूढा! । सुवर्ण[21] देशी कवणाचें ? ॥ ४५ ॥ माझेंची मज देशी धन; । या धर्माचें कोण लक्षण ? । मज दिधलें राज्यदान; । तें काय हिरोन घेतलें ? ॥ ४६ ॥ वोपिलें दान हिरोनी घेती । ते पूर्वजांसहित[22] नरकीं पचती[23]; । सवितासुताचिया[24] दूतीं । त्रासिजेती सर्वदा[25].' ॥ ४७ ॥ राजा म्हणे, 'जी दयार्णवा[26]! । बरवें सुचलें[27] देवाधिदेवा । राज्यदानें भवार्णवा- । माजी बुडतां तारिलें. ॥ ४८ ॥ **संत** भवार्णवीं[28] तारक । मोहतमाचे[29] चिदर्क[30] ।

---

१. 'प्रवेशतां' असा अन्यपाठ. २. द्वारीं बैसला=दारांत धरणें घेऊन बसला, तगादा करूं लागला. 'दुरी' असें पाठांतर. ३. उगारून, परजून. ४. 'दंड' असा अन्यपाठ. ५. वेणीनें. ६. राणीला ओढून, राणीला पकडून. ७. 'अट्टहास्यें रुदना करीत' असा अन्यपाठ. ८. 'करुणाकरा' असाही पाठ आहे. ९. 'कोणा' 'कवणा' अशीं पाठांतरें. १०. 'स्थापूनि' असा पाठभेद. ११. तिळाएवढें. जो अपराध माझ्या स्त्रीनें केला असेल, तो मींच केला असें समजून, माझ्या शरीराचे तिळाएवढाले तुकडे करा (भयंकर शिक्षा करा)—हा मथितार्थ. १२. दान देण्याचा निश्चय. १३. शेवटीं. १४. भांडारी=धनाधीश, खजिनदार. १५. कोट्यवधि. 'सत्वरी' असा पाठभेद. १६. मांदुसा=पेट्या. १७. तुळा=तागडी. १८. 'तुळा ऊभवी धडाधडा' असा अन्यपाठ. १९. वजन. २० (तागडीच्या) पारड्यांत. २१. 'कनक' असा अन्यपाठ. २२. 'पितरांसहित' असा अन्यपाठ. २३. शिजतात, उबतात. २४. सूर्यपुत्राच्या (यमाच्या). २५. 'सर्वथा', 'अपार' असे अन्यपाठ. २६. कृपासागरा. २७. 'बरवें सूचिलें, देवाधिदेवा !' असा अन्यपाठ. सूचिलें=सुचविलें. २८. संसारसागरांतून तारणारे. २९. मोह (माया)रूपी अंधकाराचे (म्हणजे त्याचा नाश करणारे). ३०. चित्+अर्क=ज्ञानाचे सूर्य. 'विदारक' असा अन्यपाठ.

सारूनि जीवित्व[1]कळंक । शिवरूपीं मिळविती.' ॥ ४९ ॥ मग[2] म्हणे अमात्य प्रधाना । 'छत्रमुद्रा[3]सिंहासना । ऋषिकरीं वोपोनी, नमना । करूनी, बोले सेवकां; ॥ ५० ॥ नवखंड[4] धरेची आज्ञा[5]-। सुमनें पूजिलें प्राज्ञा[6] । तुम्हीं न करूनी अवज्ञा । ऋषिमतें[7] वर्तावें.' ॥ ५१ ॥ अंकुश, कडपाळें[8], लेखणी, । नृपें वोपिलीं ऋषिचरणीं । 'हें पावलें.' म्हणे मुनी । 'दान देईं कनकाचें[9].' ॥५२॥ स्तंभीं[10] बांधोनी राया । कठोर दंडें मारी तया । दुःखें समस्त नागरिक-जाया[11] । शोक करिती आक्रोशें. ॥ ५३ ॥ तंव पातला रोहिदास[12] । ऋषि-चरणीं मस्तकास । ठेवूनि म्हणे, 'स्वामी ! दोष । कवण घडला रायातें?' ॥ ५४ ॥ येरू पावका[13]तुल्य नयन । करूनी म्हणे, 'हा कवण[14]?' । राजा म्हणे, 'कुलभूषण । होय नंदन[15] पैं माझा.' ॥५५॥ तया, देखतां पितो[16] जननी, । अधिक मारी गाधिज[17]मुनी । हें देखोनी नगरजनीं । हाहाकारें वर्तिजे. ॥ ५६ ॥ धनाढ्य[18] पुरींचे सौदागर[19] । करुणा भाकिती[20] ऋषीसमोर । 'आम्ही धन देऊं, नृपवर[21] । सोडिला पाहिजे; स्वामिया[22]!' ॥ ५७ ॥ विश्वामित्र म्हणे तयांप्रति । 'मातें वोपिली सर्व जगती । राज्य आणि[23] संपत्ति । यावेगळी दक्षणा. ॥ ५८ ॥ पृथ्वी[24]वरील जितुकें धन । तितुकेंही माझेंची प्रमाण[25] । यावेगळें कोठील[26] कोण । देईल धन मजलागीं?' ॥ ५९ ॥ रोहिदास म्हणे, 'जी ऋषि ! । मी गहाण

---

१. मी जीव (देहधारी) अशी बुद्धि, हाच दोष. ही ओंवी **सुभाषित**रूप आहे. २. 'म्हणोनि आत्मप्रधानें । छत्र मुद्रा सिंहासनें । ऋषीकरीं वोपुनी मनें । आज्ञा बोले सेवकां. ॥' असा अन्यपाठ. ३. मुद्रा=राजमुद्रा, शिक्का. Seal. ४. नऊ खंडांचीं नांवें:—ऐंद्र, कसेरु, ताम्रपर्ण, गभस्तिमत, कुमारिका, नाग, सौम्य, वारुण, गांधर्व (भास्कराचार्य व तत्कृतज्योतिष–पृष्ठ २५). ५. आज्ञारूपी पुष्पानें. आज्ञा=राजसत्ता, अधिकार. ६. 'म्यां राज्ञा' असें पाठांतर. ७. 'ऋषी-आज्ञा' असा अन्यपाठ. ८. मागें ओंवी १२ वरील टीप पहा. ९. साडेतीन भार सोन्याचें. (मागें ओंवी ३० पहा.) १०. खांबाशीं. ११. 'नगरजाया' 'जनजाया' असे पाठभेद. स्त्रियांना दुःख होणें साहजिकच आहे, कारण त्यांचें मन फार कोमल असतें. 'पुरंध्रीणां चित्तं कुसुमसुकुमारं हि भवति' ही भवभूत्युक्ति प्रसिद्धच आहे. १२. ह्याचें नांव 'रोहिताश्व' असें अन्यत्र आढळतें. [भागवत. स्कंध ९ अध्याय ७.] १३. अग्निसदृश, अत्यंत आरक्त. १४. 'म्हणे तूं कवणाचा कवण' असा अन्यपाठ. १५. पुत्र. १६. पिताजननी देखतां (हरिश्चंद्र व तारामती यांचे समक्ष) तया (रोहिदासास) गाधिजमुनी अधिक मारी–असा अन्वय. १७. विश्वामित्र. १८. श्रीमान्. १९. व्यापारी. २०. 'करिती' असा अन्यपाठ. २१. 'राजेश्वर' असा पाठभेद. २२. 'दयाळा' असें पाठांतर. २३. 'राज्य आदिकरोनी संपत्ति' असा अन्यपाठ. २४. 'क्षितीवरील' असें पाठांतर. २५. 'जाण' असें पाठांतर. २६. 'कोठोनि' असा पाठभेद.

राहीन तुम्हांपाशीं । पितृवचनऋणासी । उत्तीर्ण[1] होईन सर्वथा[2]. ॥ ६० ॥ ऋण, हत्या आणि वैर । मेलिया न चुके हा निर्धारें[3] । यालागीं धरूनी शरीर । जन्मोजन्मीं फेडिजे[4].' ॥ ६१ ॥ परिसोनी बाळकाचीं वचनें । ऋषि चमत्कारूनी म्हणे[5] । 'एकचित्तें[6] हीं तिघेंजणें । जालिया, न चले स्रष्टयाचें[7]. ॥६२॥ सूर्यरश्मि[8] आणि प्रभा । मिळोनी नाशिती तमशोभा[9] । शमदमविरक्ति[10] वल्लभा । स्पर्शों नेदी रतीच्या[11]; ॥६३॥ कीं ज्ञान वैराग्य एकमेळें[12] । असतां, भवाचें[13] भय पळे । तेंवी भार्या-सुतभूपाळें । एकचित्त जालिया, ॥६४॥ आमुच्या[14] तपाचिया राशी । वेंचल्या;' ऐसें निज मानसीं । भावूनि[15], म्हणे नृपासी[16] । 'आमुच्या देशीं न राहें.' ॥६५॥ राजा म्हणे 'करुणामूर्ती[17]! । काशी नवखंडांपरती । तेथें जाऊनि, भलत्या रीती[18] । ऋण तुमचें[19] फेडीन. ॥ ६६ ॥ एक मासाची अवधी[20] । दिधली पाहिजे; कृपानिधी[21]!' । ऋषि म्हणे, 'नेमसंधी[22] । टळतां शापूनि जाळीन.' ॥ ६७ ॥ 'निकें[23]' म्हणोनि नमूनि चरणां । सव्य घालोनि प्रदक्षिणा । सहकुमरस्त्रियेशीं[24] विपिना । निघतां, जाला आकान्त. ॥ ६८ ॥ लोटला[25] पौरजांचा[26] पोळा[27] । नेत्रीं उदकें वाहती ढळढळां । एक करें पिटोनी कपाळा । सद्गदित बोलती. ॥ ६९ ॥ म्हणती 'कैसा ब्राह्मणग्रहो[28] । नृपचंद्रा लागला राहो[29] । राजा दवडुनी[30], पुरीनाहो[31] । होऊं पाहे दुरात्मा.' ॥ ७० ॥ वनिता[32] सद्गदिता कंठीं । ऋ-

१. मुक्त, ऋणमुक्त. २. 'स्वामिया' असें पाठांतर. ३. निश्चय. ४. 'फेडिती' असें पाठांतर. ५. 'मनें' असा अन्यपाठ. ६. एका मतानें वागणारीं. 'एकचित्त हीं' 'एकचि हीं' असे पाठभेद आढळतात. ७. ब्रह्मदेवाचें. 'श्रेष्ठाचें' असा पाठभेद. ८. सूर्यकिरणें. ९. अंधकाराची शोभा. १०. शम=मनःशांति; दम=इंद्रियांचें दमन करणें, इंद्रियजय; विरक्ति=आसक्तिरहितता. ११. रतीच्या वल्लभा=मदनाला. रति=मदनस्त्री. १२. एकजुटीनें. १३. संसाराचें. १४. स्वतःच्या (विश्वामित्राच्या). १५. समजून, कल्पना करून. १६. 'नृपवरासी' असा अन्यपाठ. १७. 'क्षमामूर्ति' असा अन्यपाठ. १८. कोणत्याही रीतीनें, कांहींतरी करून. १९. 'स्वामीचें' असें पाठांतर. २०. मुदत. २१. 'दयानिधी' असें पाठांतर. २२. नेमलेली मुदत. २३. बरें, ठीक. २४. 'सुकुमारस्त्रियेसीं' असा अन्यपाठ. २५. 'दाटला' असें पाठांतर. २६. नागरिकांचा. २७. समूह, जमाव. २८. नृपचंद्रा (राजा हाच चंद्र त्याला) ब्राह्मण हाच राहुग्रह लागला (पाठीस लागला, पीडा देऊं लागला.)–असा भावार्थ. येथें **'रूपक'** आहे. २९. मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय ४ पहा. ३०. 'होऊनि' असा अन्यपाठ. ३१. नगरनाथ. ३२. स्त्रिया.

षिवदन पाहोनी दृष्टी । व्यंकटा[1] करूनि भृकुटी[2] । रोषें मोडिती अंगोठिया[3]. ॥ ७१ ॥ राय अवलोकुनी जनां । म्हणे, 'स्नेहें[4] असों द्या, आम्ही वना । जातों, तुम्ही[5] तपोधना-। मतें वर्तलें पाहिजे.' ॥ ७२ ॥ राजा अवलोकी सदनाकडे । पशु पक्षी तितुका[6] रडे । आहार[7] विसरोनी, तोंडें । शब्द करूं लागले. ॥ ७३ ॥ वाजी[8], वारण[9], उष्टरें[10], । पयोधरपशूंचीं[11] खिल्लारें[12] । शिकारी श्वापदें महाक्रूरें[13] । तींही गहिंवरें दाटलीं. ॥ ७४ ॥ कनकपंजरीं[14] सारिका[15], रावे[16] । हंस, तित्तिर, मयूर, लावे, । त्यांतें सोडोनि म्हणे 'जावें[17] । निजस्थाना[19] आपुलिया.' ॥ ७५ ॥ तयां सोडितां गगनोदरीं[18] । पक्षी बोलती मंजुळ स्वरीं, । 'आम्हां निरवुनी कवणा करीं । केउंता जासी स्नेहाळा?' ॥ ७६ ॥ चित्रशाळेचीं निर्जीव लेपें[21] । गहिंवरें बोलती विलापें । 'आम्हां सांडोनि[22], कवणापें[23] । स्वीकारीसी प्रवासा?' ॥ ७७ ॥ नरनाथ सांडोनि[24] ममता । तयां संबोखोनि[25] म्हणे, 'आतां । तुम्हांसी रक्षो अपरधाता । प्रतिसृष्टीचा कौशिक.' ॥ ७८ ॥ ऐसें बोलोनियां, वेगें[27] । बाहेर निघालीं त्रिवगें; । सालंकार देखोनि, रंगें[28] ।

---

१. वांकड्या. 'विकटा' असा अन्यपाठ. विकटा=भयंकर. २. भिंवया, भोंवया. भिंवया चढविणें किंवा वांकड्या करणें–हें तिरस्काराचें व रागाचें द्योतक चिन्ह आहे. ३. बोटें. बोटें मोडणें–हें क्रोधाचें दर्शकचिन्ह आहे. ४. लोभ, कृपा. ५. 'परंतु' असा अन्यपाठ. ६. सर्व, प्रत्येक. ७. खाणें. आमच्याजवळील एका पोथींत ही ओंवी नाहीं. ८. घोडे. ९. हत्ती. १०. उंट. 'खेचर उष्टरें' असा अन्यपाठ. ११. ज्यांना स्तन आहेत असे पशु, दूध देणारे पशु. १२. कळप. 'खिल्लार' हा शब्द बहुतकरून गाई व म्हैसी यांच्या कळपालाच लावण्याचा प्रघात आहे. १३. महाक्रूर शिकारी श्वापदांना सुद्धां दुःख झालें! 'अपारें' असाही पाठ आहे. या आणि वरील ओंवीत **'संबंधातिशयोक्ति'** नामक अलंकार आहे. [मागें अध्याय १ ला, ओंवी १२५ वरील टीप पहा.] यासंबंधानें कै० **बा० म० हंस** म्हणतात:–'अतिशयोक्तीनें वर्णन करणारा **मु**क्तेश्वरासारखा महाराष्ट्रकवींत कोणी झाला नाहीं असें आम्हांस वाटतें. **अ**मृतराय, **रा**मजोशी, **वा**मनपंडित ह्यांची स्वभावोक्ति जरी हृदयंगम असते; तसीच **मु**क्तेश्वराची अतिशयोक्तिही फार गोड असते.' [मोरोपंतावरील निबंध. पृ० १३४–१३५.] १४. सोन्याच्या पिंजऱ्यांत. 'कनकपिंजरा' 'कनकपांजिरा' असे अन्यपाठ. १५. साळुंक्या, मैना. १६. पोपट, राघु. १७. वनांत जावें–हा भावार्थ. १८. आकाशांत. १९. स्वाधीन करून. २०. 'कोठें' असा अन्यपाठ. २१. चित्रें. २२. 'निरवूनि' असा अन्यपाठ. २३. कोणापाशीं. 'पें' हा प्रत्यय हिंदीभाषेंतील आहे. २४. 'सोडोनि' असें पाठांतर. २५. उद्देशून. 'तयांसि बोलोनि' असा पाठभेद. २६. तुम्हां प्रतिसृष्टीचा अपरधाता (प्रतिब्रह्मदेव) [जो] कौशिक (विश्वामित्र) [तो] रक्षो–असा अन्वय. २७. जलदीनें, त्वरेनें. २८. 'सांगें' असें पाठांतर; सांगें=संगें=बरोबर.

**वि**श्वामित्र धाविन्नला. ॥ ७९ ॥ **ता**रामती धरूनि हातीं । म्हणे, 'माझिया राज्यांतील संपत्ति, । [१]भूषणें काढोनि, मजप्रति । देउनी जावें वन-वासा'. ॥ ८० ॥ **रा**जा, **रो**हिदास, **ता**रामती, । नगर सांडूनि वनाप्रति । [२]गेलिया पुढें कसी गती । वर्तली? ते [३]परियेसा. ॥ ८१ ॥ [४]संसारसागरींचें जहाजें । [५]धैर्यध्वजेशीं विराजे । [६]सत्वकेणें भरिलें वोझें । सत्कीर्ति वसे मस्तकीं. ॥ ८२ ॥ **गा**धिजबंदरीं शुद्ध [७]केणें । भरिलें, देउनी [८]राज्यनाणें । [९]गुरुकृपेच्या प्रभंजनें । [१०]कैवल्यपेठे [११]जातसे. ॥ ८३ ॥ येरीकडे [१२]नगरवासी । दुःखशोकें अधोवदनेंसी । [१३]वियोगदुःखें [१४]कासाविसी । [१५]निजसदनासी पातले. ॥ ८४ ॥ घोर वनांतरीं नृपति । [१६]सकुमार राणी **ता**रामती । **रो**हिदास धरूनि हातीं । जातां कैसें [१७]वर्तलें? ॥ ८५ ॥ **वि**श्वामित्रें तये [१८]वेळे । **कृ**तांत[१९]जनका आज्ञापिलें. । म्हणे 'आजी [२०]द्वादशकळे । तपलें पाहिजे [२१]ममाज्ञा.' ॥ ८६ ॥ **कौ**शिक[२२]दर्पें [२३]सहस्र-रश्मी । तपों लागला [२४]तीव्रें [२५]व्योमीं । तेणें तेजें पर्वत भूमी । तापोनी उलों पाहे ते [२६]काळीं. ॥ ८७॥ [२७]सवेंची [२८]वरुणालागीं कोपें । म्हणे, 'येणें पंथें चालतां

---

१. (आंगावरील) दागिने. २. 'गेलीं' असा अन्यपाठ. ३. 'अवधारा' असा पाठभेद. ४. 'संसारसमुद्रींचीं जाहजें' असा अन्यपाठ. ५. धैर्य हीच पताका (शीड, अवजार) तिच्या योगानें. ६. सत्वरूपी केणें (व्यापाराचा माल, जिन्नस). ७. राज्यनाणें (राज्य हाच पैसा, किंमत) देउनी गाधिजबंदरीं (विश्वामित्ररूपी बंदरांत) शुद्ध केणें (चोख माल) भरिलें—असा अन्वय. येथें रूपकगर्भित **'परिवृत्ति'** अलंकार आहे. 'जेथें दोन पदार्थांची अदलाबदल झाली, असें कवीनें दर्शविलेलें असतें तेथें हा अलंकार होतो.' 'आंवळा देऊन कोहळा काढणें' ही म्हण **'परिवृत्ति'** अलंकाराचें एक उत्कृष्ट उदाहरण आहे. ८. 'देऊनि भरिलें राज्यदानें' असा पाठभेद. ९. गुरुकृपा हाच प्रभंजन (वायु, वारा) त्याचे साहाय्यानें. १०. मोक्षरूपी पेठेस (बाजारांत). ११. ह्या व वरील ओंवींत फार रमणीय **रूपक** आहे. १२. 'पौरजवासी' असें पाठांतर. १३. 'वियोगतापें' असा अन्यपाठ. १४. कासावीस, विकळ होत्सातें. १५. 'निजधामासी' असें पाठांतर. १६. कोमल. 'कुमर आणि' असा अन्यपाठ. १७. 'राजकुमर' असा अन्यपाठ. १८ 'काय केलें' असा अन्यपाठ. १९. यमाच्या बापाला (सूर्याला). 'कृतांतजनक' हा शब्द येथें योजण्यांत **मु**क्तेश्वरानें फारच चातुर्य दाखविलें आहे. यम फार दुष्ट, क्रूर आणि निर्दय आहेच, पण त्याचा बाप त्याहूनही जास्त क्रूर असेल व त्यामुळें हरिश्चंद्रास फारच क्लेश भोगावे लागतील, असें ध्वनित केलें आहे. २०. सूर्याच्या बारा कळा असतात, अशी समजूत आहे. २१. माझ्या आज्ञेनें. २२. विश्वामित्राच्या प्रभावामुळें. २३. सूर्य. २४. तीव्र=कडक, प्रखर. 'क्रूर' असा अन्यपाठ. २५. आकाशांत. २६. 'तात्काळ' असा अन्यपाठ. २७. तसाच, लागलाच. २८. वरुण हा जलपति होय. [ मुक्तेश्वर—वनपर्व. (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ. १०२ टीप ६ पहा. ]

नृपें । सरितासरोवराचीं आपें । नेऊनी, शुष्क करावीं.' ॥ ८८ ॥ केवढें ऋषीचें सामर्थ्य! । वरुणें केला निर्वारि पंथ । कूप, सरिता, तडाग, समस्त । आर्द्रता लोपेली. ॥ ८९ ॥ कांता, कुमर, चालतां पंथीं । उष्णें करपली सुकुमारकांती । कडिये कुमर तारामती । घेऊनि चाले नृपसंगें. ॥ ९० ॥ अंतर शोषलें तृषेनें । तेनु करपली उष्ण किरणें । तेणें कोमेजलीं वदनें । देह घामें थबथबीत. ॥ ९१ ॥ रोहिदास म्हणे, 'जी! ताता! । तृषेनें प्राण जाईल आतां.' । म्हणोनी कडेहूनी खालता । पडोनी, लोळे गडबडां. ॥ ९२ ॥ माता म्हणे, 'रे! तान्हया! । पैलें वृक्षातळीं दिसे छाया । तेथें बैसोनियां, तोया । आणूनी पाजूं तुजलागीं.' ॥ ९३ ॥ म्हणोनि गेली तरुतळीं । तंव सूर्यबिंब आलें मध्यमंडळीं । स्वल्प छाया दिसे मूळीं । जाऊनि तेथें बैसली. ॥ ९४ ॥ राजा पाहे वनांतरीं । कूपसरितासरोवरीं । बिंदुमात्र न दिसे वारी । हृदय जैसें अधमाचें. ॥ ९५ ॥ रायें शोधिलें सकळही वन । कोठें न मिळे जीवन । परतोनि आला, नंदन । होता जेथें मातेशीं. ॥ ९६ ॥ भार्या पाहे राजाकडे । मुखसरोज दिसे कोरडें । उदक न देखोनि धेडें । पृथ्वीवरी टाकिलीं. ॥ ९७ ॥ राजा अवलोकी तयांतें । तंव धुळीमाजी जैसीं प्रेतें; । पल्लवें वारा घालुनी, हातें । स्पर्शोनि केलीं सावध. ॥ ९८ ॥ कुमर म्हणे, 'द्यावें जीवन.' । ऐकोनि, रायें उभय नयन । भरूनि, म्हणे सखेद वचन ।

---

१. नद्या व तलाव यांचीं. २. पाणी, जलें. ३. निर्जल (वारि=पाणी, जल). ४. 'आरद्र तेही लोपिले' असा अन्यपाठ. ५. 'सहकांतापुत्र' असा पाठभेद. ६. कडेवर. ७. 'हळूहळू' असा अन्यपाठ. ८. 'तापलें' 'कोरडें' अशीं पाठांतरें. ९. शरीर. १० 'तापली' असा अन्यपाठ. ११. 'कोमायलीं' असा अन्यपाठ. १२. 'देह सर्व लवथवित' असा अन्यपाठ. १३. कडेवरून. १४. पलीकडील वृक्षाखालीं. 'पडे छाया' असें पाठांतर. १५. मध्यावर, आकाशाच्या मध्यभागीं. १६. (झाडाच्या) मूळाशीं, तळाशीं. १७. पाणी. १८. अधमाच्या हृदयांत दयेचा लेशही नसतो, त्याप्रमाणें जलाशयांतून पाण्याचा थेंबही नव्हता; असा स्पष्टार्थ. ही सुरेख **उपमा** आहे. 'जेथें दोन वस्तूंचें चमत्कारिक सादृश्य वर्णिलें असतें तेथें हा अलंकार होतो.' [अलंकारदर्पण.] १९. जल, पाणी. २०. 'टाकोनि' असा अन्यपाठ. २१. मुककमल. 'मुखसरोवर' असा अन्यपाठ 'नवनीतां'त आहे; परंतु आमच्याजवळील कोणत्याही पोथींत सदरहू पाठ आढळत नाहीं. २२. शरीरें. २३. 'जैसीं धुळीमाजी पडिलीं प्रेतें' असा अन्यपाठ. २४. पदरानें. 'पालवें' 'वल्लभें' अशीं पाठांतरें. पालव=पल्लव, पदर; वल्लभ=पति (हरिश्चंद्र). २५. 'उठवोनि' असा अन्यपाठ. २६. जीवन=(१) पाणी. (२) जीवित, प्राणरक्षण करणें. मला पाणी द्या किंवा मला जीवदान द्या—असे दोन्ही अर्थ संभवनीय असल्यामुळें येथें **श्लेष** आहे.

'पुढें येई डोळसा!' ॥ ९९ ॥ ऐसें बोलोनि, उभय करीं । कवळोनि, चालतां पुढारीं; । विश्वामित्र[2] वनांतरीं । प्रकट जाला द्विजरूपें[3]. ॥ १०० ॥ जरेकरूनि[4] व्यापिली वपू[5] । तेणें कंधरा[6] प्राप्तकंपू । संहनन[7] लवोनी जाला चापू[8] । आला खोकत टेंकीत. ॥ १०१ ॥ रायें देखोनि केलें नमन, । येरें[9] दिधलें आशीर्वचन. । म्हणे, 'तुझी कीर्ति परिसोन । आलों येथें संकाम[10].' ॥ १०२ ॥ राजा म्हणे, 'बोलिजे स्वामी!' । येरु म्हणे, 'तीर्थासी[11] आम्ही । भार्या, सुत[12], समागमीं । जौतां[13] चरण पोळती. ॥ १०३ ॥ जो देईल पादत्राणें[14] । त्यासी कल्याण नारायणें । किजे' म्हणतां नरभूषणें । वसनें[15] वोपिलीं चरणींचीं. ॥ १०४ ॥ तिघें चालती नग्नचरणीं[16] । तळीं तापली[17] धरणी । माथे[18] पोळती उष्ण किरणीं । अंतरें[19] तृषेनें करपलें[20]. ॥ १०५ ॥ ऐशिया दुःखें चालतां पंथीं । सुकुमार पाउलें पोळती । फोड उठोनि निघे कांती[21] । नखें उलती[22] बोटींचीं[23]. ॥ १०६ ॥ यापरी तिघें चालतां कष्टें । तापसें[24] घातलीं अव्हाटे[25] । पायीं रिघती[26] पूर्ण कांटे । आणि सरांटे लागती[27]. ॥ १०७ ॥ सुकुमार बाळ म्हणे, 'जी! ताता! । आकांत प्रळय मांडिला आतां । ऋषिऋण न फेडितां[28] मरतां । सर्व जाऊं नरकासी.' ॥ १०८ ॥ ऐसीं लंघितां[29] वनोपवनें । पुढें विश्वामित्रें वांटिका[30]

---

१. हे सुरूपा. डोळस=ज्याचे डोळे सुरेख आहेत असा. 'पुढें ये गा पाडसा!' असा अन्यपाठ. २. 'तंव विश्वामित्र' असा अन्यपाठ. ३. ब्राह्मणाच्या रूपानें. 'अवचिता' असा अन्यपाठ. ४. वार्धक्यामुळें, म्हातारपणामुळें. ५. शरीर. ६. मान. 'शरीरा' असा अन्यपाठ. ७. शरीर. 'सिंही' 'सीत' अशीं पाठांतरें. ८. धनुष्य; धनुष्यासारखें वांकलेलें. ह्या ओंवींत **'स्वभावोक्ति'** अलंकार आहे. ९. ब्राह्मणरूपधारी विश्वामित्रानें. १०. मनांत इच्छा धरून. ११. 'तीर्थवासी' असा अन्यपाठ. १२. 'कुमर' असें पाठांतर. १३. 'चालतां' असें पाठांतर. १४. पायांचें रक्षण करणारे (जोडे). 'आम्हांसि देतां पादत्राणें' असा अन्यपाठ. १५. चरणींचीं वसनें=जोडे. वसनें=वस्त्रें, पोशाख. १६. अनवाणी, पादत्राणरहित पायांनीं. 'तिघें जणें चालतां' असा अन्यपाठ. १७. 'पोळत पैं धरणी' असा अन्यपाठ. १८. मस्तकें, डोकीं. 'माथां' असें पाठांतर. १९. अंतःकरण. २०. 'पीडिलें' असें पाठांतर. २१. कांती=कांत (त्वचा, कातडें). 'उले कांती' असा अन्यपाठ. २२. 'निघती' असें पाठांतर. २३. बोटींचीं=बोट+ई (सप्तमीचा प्रत्यय)+चीं (षष्ठीचा प्रत्यय). अशीं प्रत्ययद्वयघटितरूपें मुक्तेश्वराच्या कवितेंत (ओंवी १०४ यांतील 'चरणींचीं' हा शब्द पहा) व जुन्या भाषेंत पुष्कळ आढळतात; जसें:—'घरींच्यांस खावयास मिळत नाहीं व दारींचे मौजा मारितात' इत्यादि. २४. विश्वामित्रानें. 'तापस घाली' असा अन्यपाठ. २५. आडवाटेस. २६. 'निघती' असें पाठांतर. २७. 'रूतती' असा अन्यपाठ. २८. 'ऋण न फिटतां मरतां' असा अन्यपाठ. २९. 'लंघोनि वनें उपवनें' असा पाठभेद. ३०. बाग.

जीवनें[1] । अति[2]रमणीय [3]प्रपास्थानें । मायामय निर्मिलीं. ॥ १०९ ॥ **विश्वा**-मित्रें [4]रमणीय [5]धाम । पुढें निर्मिलें मनोरम । जें देखतां [6]जाय श्रम । दोष जैसे हरिनामें. ॥ ११० ॥ तेथें [7]सुरतरूंची छाया । सदनीं [8]रंभेऐसिया जाया । [9]कनकरांजणीं भरूनि तोया । [10]वाळावेळा[11]सुगंधें. ॥ १११ ॥ सुवर्णपात्रीं भरूनि चंदन । [12]सुवास वाळ्याचें जीवन । पाकशाळेमाजी अन्न । नानाविध [13]षड्रस. ॥ ११२ ॥ ऐसिया स्थानीं हेम[14]मंचकीं । मालतीमोगरे-चंपकी । [15]ओरळ घातले [16]हस्तकीं । [17]पंथिकांतें पहुडावया. ॥ ११३ ॥ पुराण, गीत[18], धर्मचर्चा, । महिमा वर्णिती ईश्वराचा । [19]वारा नलगे श्रमाचा । जया [20]श्रवणीं पांथिका. ॥ ११४ ॥ ऐसी [21]ऋषि निर्मी पोहे[22] । नृपवर दुरोनि पाहे । जीवनालागीं [23]लवलाहें । जाता झाला पुढारां. ॥ ११५ ॥ [24]सुत, कांता, सांडुनी मागें । [25]मायावनीं पातला वेगें । पोहे जाणुनियां, नेघे[26] । राजा फिरे [27]माघारा. ॥ ११६ ॥ आतां येथुनी [28]कायावाहिनी । भरुनी चाले [29]सत्वजीवनीं । नाना-विघ्नगिरी भंगुनी । कैवल्यसागरीं मिळेल. ॥ ११७ ॥ मूळीं **विश्वंभरगुरुकृ**-पेची [30]वांकडी । लागली, तेणें उभय थडी । भरून वाहे, ब्रह्मांडीं । सत्कीर्ति-घोषें गर्जत. ॥ ११८ ॥ इति **श्री**भारते [31]वनपर्वणि । कथा[32]नर्मदा रसवाहिनी । वदे **मुक्ते**श्वराची वाणी । **लीलाविश्वं**भरप्रसादें. ॥ ११९ ॥

---

१. पाणी. 'नयनें' असें पाठांतर. २. 'रायें देखिलीं जें मनें' असा अन्यपाठ. ३. पाणपोया. ४. सुंदर. 'रमणीक' असा पाठभेद. ५. गृह, घर. ६. 'विश्रमे श्रम' असा अन्यपाठ. ७. कल्पतरूंची. ८. 'रंभेसारिख्या दाया' असा अन्यपाठ. ९. रांजण=पात्रविशेष. १०. वेळा=वेलदोडा. ११. 'शीतळ' असा अन्यपाठ. १२. सुवासयुक्त, सुगंधित. १३. आंबट, गोड, कडू, खारट, तिखट व तुरट—हे षड्रस. १४. सोन्याच्या पलंगावर. १५. मऊ बिच्छाने. १६. हस्तक=मदतगार. 'सेज करूनियां सेवकीं' असा अन्यपाठ. १७. प्रवासी लोकांसाठीं. 'पांथिकांसी' असा अन्यपाठ. १८. गायन. १९. लेशमात्र देखील श्रम होत नसत—हा इत्यर्थ. २०. ऐकिल्यानें. 'श्रवणें करूनि' असा अन्यपाठ. २१. 'कौशिकें निर्मिली' असा अन्यपाठ. २२. पाणपोई. २३. सत्वर, घाईनें. २४. 'पुत्र' असें पाठांतर. २५. कपटवनांत, इंद्रजालानें (गारुडी विद्येनें) निर्मिलेल्या अरण्यांत. २६. 'निघे' असें पाठांतर. २७. 'तेथूनि सरे माघारीं' असा अन्यपाठ. २८. काया (हरिश्चंद्राचें शरीर) रूपी वाहिनी (नदी). २९. ह्या ओंवींत **मुक्तेश्वरानें 'रूपका'**लंकार मोठ्या बहादुरीचा साधला आहे. शरीर=नदी; सत्व=पाणी; विघ्नें=पर्वत; मोक्ष=समुद्र—ह्या उपमानउपमेयांच्या जोड्या. ३०. पावसाची झड, मोठ्या जोराचा पाऊस. ३१. 'शांतिपर्वणि' असाही पाठ आढळतो!!! ३२. कथारूपी नर्मदा नदी. नर्मदा='नर्म ददाति द्यति वा' [व्याख्यासुधा अमरकोश]. नर्म=लीला, क्रीडा, थट्टा.

## अध्याय तिसरा.

विरक्तें[1] देखोनि लावण्यप्रमदा[2] । नैराश्यें[3] अवलोकुनी संपदा । वैराग्यबोधें प्रपंचधंदा । देखोनि विटिजे[4] ज्यापरी; ॥ १ ॥ कीं चंपकपुष्पाचा आमोद[5] । सांडूनियां जाय जेवीं षट्पद[6] । लिंगनिर्माल्यप्रसाद[7] । नातळती[8] धार्मिक; ॥ २ ॥ ऐशिया परी प्रपामंदिर[9] । सांडोनि जातां राजेश्वर । तोयपात्र[10] ऋषीश्वर । घेऊनि धांवे[11] पाठीशीं[12]. ॥ ३ ॥ म्हणे[13] 'उभा राहें पांथिका! । श्रमें श्रांतलासी[14], घे उदका.' । राजा म्हणे 'हें[15] धार्मिकां । सेव्य नव्हे[16] सर्वथा. ॥ ४ ॥ अन्नसत्रींचें भोजन । धर्मपोईचें उदक जाण[17] । सेविल्याचें सुकृतधन । जाऊनि, होय महादोषी[18].' ॥ ५ ॥ ऋषी म्हणे, 'तनुभांडवल[19] । रक्षितां, सुकृतधन जोडेल; । यालागीं बोलती वडील । शरीर[20] रक्षी तो धर्म.' ॥ ६ ॥ ऐसें बोलोनि धरिला करीं । म्हणे, 'चाल[21] मम मंदिरीं । स्नान सारूनि भोजन करीं । नाविक[22] शयनीं पहुडावें. ॥ ७ ॥ देवांगनातुल्य[23] दासी । सादर[24] तिष्ठती सेवेशीं । ज्यांचिया

१. निरिच्छ पुरुषानें. [मुक्तेश्वर–वनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ० ४० टीप १ पहा.] २. लावण्ययुक्त (सुंदर) स्त्री. येथें 'लावण्य' ह्या नामाचा उपयोग विशेषणासारखा केलेला आहे. ३. नैराश्य=वासनारहितता. 'नैश्वर' असा अन्यपाठ. ४. विटणें=कंटाळा करणें, त्रासणें, रागावणें. ५. सुवास. भुंग्यांना चांफ्याच्या फुलांचा वास आवडत नाहीं–असा उल्लेख मुक्तेश्वराच्या कवितेंत अन्यत्रही आढळतो. (शुकरंभासंवाद–ओंवी ९५; मागें पृ. १३८ पहा.) ६. भ्रमर, भुंगे. 'द्विरद' असा अन्यपाठ आहे, परंतु हत्तीस 'चंपकपुष्पांचा आमोद' आवडत नाहीं अशी प्रसिद्धी नसल्यामुळें सदरहू पाठ अप्रशस्त होय. ७. निर्माल्य= महादेवास वाहिलेलीं फुलें, कोमेजलेलीं फुलें. 'शिवनिर्माल्यप्रसाद' असें पाठांतर. ८. स्पर्श करीत नाहींत. ९. पाणपोईचें स्थान. 'पोहेमंदिर' असें पाठांतर. १०. पाण्याचें भांडें. ११. 'धांवत जात' असा अन्यपाठ. १२. पाठीमागून. १३. विश्वामित्र म्हणे. १४. भागलास, थकलास. १५. पाणपोईंतील पाणी. 'हे धार्मिका!' असाही पाठ आहे. १६. 'न घडे' असें पाठांतर. १७. 'पान' असा अन्यपाठ. १८. 'महापापी' असाही अन्यपाठ आहे. १९. आपत्काळीं हरप्रयत्नानें प्राणांचें रक्षण करावें व नंतर पापक्षालनार्थ प्रायश्चित्त करावें–असें देवीभागवतांत सांगितलेलें आहे. 'तथाऽप्यापदि धर्मस्य सूक्ष्ममार्गं ब्रवीम्यहम् । देहस्य रक्षणं कार्यं सर्वथा यदि मानद॥२२॥पापस्यान्ते पुनः कार्यं प्रायश्चित्तं विशुद्धये । दुर्गतिस्तु भवेत्पापादनापदि न चापदि ॥ २३ ॥ (स्कंध ७, अध्याय १२). रूपकालंकार. २०. जेणेंकरून आपल्या शरीराचें रक्षण होईल तो धर्म–असा भावार्थ. शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् । (कुमारसंभव), 'आत्मानं सततं रक्षेत्' इत्यादि सुभाषित प्रसिद्धच आहे. २१. 'चला जी!' असें पाठांतर. २२. क्षणभर. २३. अप्सरांसारख्या, २४. सन्मानपूर्वक, आदरानें.

दर्शनें श्रमासी । बोळवण तत्काळ. ॥ ८ ॥ शीतळ चंदनी घेइजे उटी । सुमनमाळा घालिजे कंठीं । परिमळद्रव्यें तुम्हांसाठीं । ठेविलीं, तीं सेविजे. ॥ ९ ॥ विश्रांति पावल्या चित्तीं । सुखें जाइजे आपुल्या पंथीं.' । हें परिसोनियां नृपति । बोले उदार मानसें. ॥ १० ॥ 'विश्रांति पावलों समस्त । तुमच्या दर्शनें कृतकृत्य.' । ऐसें बोलोनि नृपनाथ । शीघ्र चांमके पुढारां. ॥ ११ ॥ तारामती तया पाठीं । चालतां, झाली परम कष्टी । पोई जाणोनियां, दृष्टी । मुरडोनियां चालिली. ॥ १२ ॥ पोहे सोडूनियां सुंदरी । जातां देखिली ऋषीश्वरीं । तोयपात्र धरूनि करीं । पुढा येउनी ठाकला. ॥ १३ ॥ म्हणे, 'माये! श्रमलीस पंथीं । उष्णें करपली सुकुमार कांती । चरणकमळीं फोड दिसती । अधर तृषेनें शोषला.' ॥ १४ ॥ ऐसें बोलोनियां तोंडें । उदकपात्र वोडवी पुढें । येरी नेघोनियां मुरडे । आपुल्या पंथें जावया. ॥ १५ ॥ येरीकडे आश्रमांत । ऋषीनें केलें अत्यद्भुत । मायामय नृपनाथ । करूनि बैसवी मंचकीं. ॥ १६ ॥ ऋषी म्हणे 'वो! पतिव्रते! । तुझा पती पाचारी तुतें । पैल पालवीतसे हातें । मंचकीं बैसूनी मंदिरीं.' ॥ १७ ॥ येरी अवलोकी भीतरी । रायासि देखे मंचकावरी । चरणसेवा सुंदरी । सुकुमार करीं करिताती. ॥ १८ ॥ एक लाविती चंदनउटी । एक माळा घालिती कंठीं । एकी उभिया निकटी । मलयानिल ढाळिती. ॥ १९ ॥ ऐसें अवलोकितां

---

१. (१) पाठवणी, रवानगी; (२) नाश, शेवट. २. चंदनाची. ३. पुष्पमाला. 'घालूनि' असा अन्यपाठ. ४. 'विश्राम' असा पाठभेद. ५. 'उदास मनेंसीं' असा अन्यपाठ. ६. कृतार्थ, धन्य. ७. जाई, गमन करी. हा शब्द **मुक्तेश्वराच्या** कवितेंत ठिकठिकाणीं आढळतो. [मुक्तेश्वर—वनपर्व—अध्याय २।९०;अध्याय ७।१२३ व १४३; सौप्तिकपर्व—अध्याय २।१३७ इत्यादि पहा.] ८. 'पोटीं' असा अन्यपाठ. ९. मुरडणें=परतवणें, मागें फिरविणें. 'मुरडोनियां दृष्टी' असा पाठभेद. १०. 'पोहे सांडूनियां जातां दुरी । तोयपात्र घेऊनि करीं । विश्वामित्र ते अवसरीं । पुढें येऊनि ठाकला' असा अन्यपाठ. ११. 'चरणसरोजीं' असें पाठांतर. १२. ओंठ. 'अधर शोषले बहुत' असा अन्यपाठ. १३. देण्यासाठीं पुढें करी. १४. फिरे, परते. १५. 'चालावया' असा अन्यपाठ. १६.मायेनें उत्पन्न केलेला. १७.पति हेंच जिचें व्रत ती पतिव्रता. 'आर्तार्ते मुदिते हृष्टा प्रोषिते मलिना कृषा । मृते म्रियेत या पत्यौ सा स्त्री ज्ञेया **पतिव्रता.** ॥' इति स्मृतिः. याचा भावार्थः—जी पतीला दुःख झालें असतां दुःखित होते, तो आनंदित असला तर जी आनंदित होते; तो परदेशीं गेला असल्यास अलंकारादिकांचा त्याग करून (मिताहारादि नियम पाळल्यामुळें) कृश होते व पति मृत झाला असतां स्वतः प्राणत्याग करिते, तिला पतिव्रता म्हणतात. १८. बोलावी. १९ हाताच्या (किंवा पदराच्या) खुणेनें बोलावीत आहे. २०. नाजूक (कोमल) हातांनीं. २१. उभिया=उभ्या. 'झाल्या, केल्या, त्याच्या, माझ्या, तुझ्या इत्यादि शब्दांचें संयोगकृत कठोरत्व कमी करण्याकरितां किंवा

सती । म्हणे, 'हें काय घडलें ! श्रीपति ! । अंधकारामाजी गभस्ती[1] । अडखळोनी कूपीं पडियेला. ॥ २० ॥ दशद्वयेशताक्षें[2] शिरीं । वसुधा वाहिली सुमनापरी[3] । तो भार मानुनी सांडी जरी । तरी हें ऐसें घडों ये[4]. ॥ २१ ॥[5] दुष्टदंडना[6] कमळापती[7] । अवतार धरितां भागे चित्तीं । अस्तमान[8] होतां फिरे गभस्ती । तरी हें ऐसें घडों ये. ॥ २२ ॥ कीं पर्वतमस्तकींचें[9] जळ । अधोपंथें धांवे तुंबळें[10] । तें परतोनि पावे मूळ[11] । तरी हें ऐसें घडों ये. ॥ २३ ॥ कीं वेदमर्यादा[12] ब्राह्मण । लंघुनी करी अनाचरण[13] । कीं पतिव्रता पतिवचन । न मनी, तरी हें घडों ये. ॥ २४ ॥ कीं परम श्रोत्रियें[14] संकटीं । क्षुधेकरुनी[15] होतां कष्टी[16] । अवर्णगेहीं[17] दाटोदाटी[18] । भोजन करी, तरी हें घडों[19] ये. ॥ २५ ॥

---

छंदाच्या अनुरोधानें या शब्दांचीं कवितेंत झालिया, केलिया, त्याचिया, माझिया, तुझिया, अशीं रूपें करितात.' [पद्यरत्नावली. मराठी कवितेंतील व्याकरणाचे विशेष.] 'येक उभी ठाकोनि निकटीं' असा अन्यपाठ. २२. मलयपर्वतावरील वायूसारखा सुखकारक व सुगंधित वारा घालिती—हा इत्यर्थ.

१. सूर्य. येथें 'सूर्य अंधकारामुळें अडखळून कूपांत पडला' असें वर्णन आहे म्हणून हा **'विरोधा-'** लंकार होय. जेथें एका पदार्थावर परस्परविरुद्ध अशा एक किंवा अनेक धर्मांचा आरोप केलेला असतो तेथें **'विरोध'** नामक अलंकार होतो. सूर्य हाच सर्व जगास प्रकाश देणारा असून अंधारामुळें पडला म्हणून **विरोध.** याशीं समानार्थक अन्य उदाहरण:—'विपरीतचि हें कुरुकुलदीपांनीं स्वप्रकाश हारविला. ।' [मोरोपंत—सभापर्व—अ० ७।४२.] २. ज्यास दोन हजार डोळे आहेत अशा शेषानें. (१०×२×१००=२०००+अक्षि=डोळे.) 'दशकद्वयशताक्षशिरीं' असा पाठभेद. ३. फुलाप्रमाणें (हलकी). ४. ओझें. ५. 'तरी ऐसें घडेल' असा अन्यपाठ. ६. दुष्टांस शासन करण्याकरितां. [भगवद्गीता—अध्याय ४ श्लोक ८ पहा.] ७. लक्ष्मीपति (विष्णु). ८. सूर्यास्त होण्याची वेळ असून, सूर्य अस्त न होतां परत मागें फिरला तर—असा भावार्थ. 'अस्त न होतां' असा अन्यपाठ. ९. 'शिखरींचें' असा अन्यपाठ. १०. अतिशय, जोरानें. ११. उगम, उत्पत्तिस्थान. १२. वेदाची आज्ञा. १३. धर्मबाह्य आचरण. १४. वेदशास्त्रज्ञ ब्राह्मण. 'जन्मना ब्राह्मणो ज्ञेयः संस्काराद्द्विज उच्यते । विद्यया याति विप्रत्वं त्रिभिः **श्रोत्रिय** उच्यते. ॥' सारांश ज्याचा जन्म ब्राह्मणकुळांत झाला आहे, ज्याचे मौंजीबंधनादि संस्कार झाले आहेत व ज्यास विद्या प्राप्त झाल्या आहेत, त्यास श्रोत्रिय म्हणावें. श्रोत्रियाची व्याख्या अन्यत्र अशी आढळते:—'एकां शाखां सकल्पां वा षड्भिरङ्गैरधीत्य च । षट्कर्मनिरतो विप्रः **श्रोत्रियो** नाम धर्मवित् ॥' येथें 'श्रोत्रिय' हा शब्द मोठ्या खुबीनें योजिलेले आहे. १५. भुकेनें, भूक लागल्यामुळें. १६. 'पीडितां पोटीं' असा अन्यपाठ. १७. नीच जातीच्या मनुष्याच्या घरीं. 'अवर्णघरीं' असा अन्यपाठ आहे. १८. लगट करून, मुद्दाम, दाटून, जाणूनबुजून. 'अन्नताटीं' असें पाठांतर. १९. ओंव्या २१–२५ ह्या पांच ओंव्यांत **'मिथ्याध्यवसिति'** अलंकार आहे. एखादी मिथ्याभूत किंवा दुर्घट गोष्ट सिद्ध करण्यासाठीं दुसऱ्या मिथ्या किंवा दुर्घट अर्थाची कल्पना करणें, त्यास **मिथ्याध्यवसिति** म्हणतात.

तैसा राजा सूर्यवंशी । धर्मशील सत्वराशी । क्लेश पावतां, पोईशीं । विश्रामेल, हें घडेना. ॥ २६ ॥ असो; मी तंव न घें जीवन'. । म्हणोनि केलें पुढारां गमन. । विश्वामित्र म्हणे 'कोण । सत्व इये सतीचें?' ॥ २७ ॥ मागें पाहे जंव कौशिक । तंव येतां देखिलें बालक । श्रमें शोषलें वेदनांबुजक[1] । अंतर तृषेनें करपलें. ॥ २८ ॥ धांवोनि कडिये घेतलें । करतळें मुख कुरवाळिलें । सुंदर सुकुमार पाउलें । पाहतां, फोड दिसती[2]. ॥ २९ ॥ म्हणे, 'श्रमलासी चालतां पंथीं । या पोहेसीं करीं[3] विश्रांती । उदक प्राशूनियां पुढती । गमन करीं, बाळका!' ॥ ३० ॥ रोहिदास म्हणे, 'स्वामिया! । आम्ही न शिवों[4] ऐशिया तोया । कलंक लागेल आमुचिया । सूर्यवंशालागुनी.'[5] ॥ ३१ ॥ म्हणोनि घातलें दंडवता[6] । 'दुरी अंतरलीं मातापिता । तरी कृपा करूनि आतां[7] । आज्ञा दिधली[8] पाहिजे.' ॥ ३२ ॥ ऋषिप्रती बोलोनि ऐसें । गमन केलें रोहिदासें । विश्वामित्र निजमानसें[9] । वोवाळीत[10] बाळका[11]. ॥ ३३ ॥ 'ऐशिया सत्वसवित्यांपुढें[12] । आमुचें तप खद्योत[13] बापुडें । वृथा सुकृत हारविलें, तोंडें[14] । प्रतिज्ञा करूनि सर्वथा.' ॥ ३४ ॥ असाध्य[15] जाणूनि भूपाळसत्व । कौशिकें[16] कोपला अत्यद्भुत । भूतळीं[17] सृष्टी करावया[18] हुत । जेणों[19] शंकर अंवतरला[20]. ॥ ३५ ॥ येरीकडे वसुधापती[21] । पोहे लंघुनी[22] जातां पंथीं । तयामागें[23] तारामती । कवळोनि चाले पुत्रातें[24]. ॥ ३६ ॥ महाघोर वनांतरीं । चालतां[25] जाली कैशी परी? । चित्त देऊनियां चतुरीं । श्रवण केलें पाहिजे. ॥ ३७ ॥ विश्वामित्रें जाऊनि पुढें । वणवा लाविला चहूंकडे । जळों लागलीं

---

१. वदन+अंबुज+क (प्रत्यय)=नाजुक मुखकमल. '-ह्रस्वार्थे कन् प्रत्ययः'. २. 'देखतसे' असा अन्यपाठ. ३. 'कीजे' असा अन्यपाठ. ४. 'नेघों' असें पाठांतर. ५. 'सूर्यवंशकुळासी' 'सूर्यवंशा समस्ता' असे अन्यपाठ. ६. नमस्काराला. ७. 'दया करोनि कृपावंता' असा अन्यपाठ. ८. दिधली=दिली. 'दिधला' 'दिधली' हीं मराठी आर्षरूपें होत, असें म्हटलें तरी चालेल. अशा रूपांस Archaism असें इंग्रजींत म्हणतात. ९. अगदीं आपल्या अंतःकरणापासून. 'जीवें मानसें' असा अन्यपाठ. १०. वोवाळणें=ओंवाळणें, आरती करणें. ११. 'तयासी' 'सर्वस्वें' अशीं पाठांतरें. १२. मूर्तिमंत सत्वरूपी सूर्यापुढें. १३. काजवा. १४. 'गाढें' 'मूढें' अशीं पाठांतरें. १५. साध्य न होणारें, हरण करण्यास कठिण. १६. विश्वामित्र. १७. पृथ्वीवर. 'भूतसृष्टी' असें पाठांतर. १८. भस्म करण्याला, जाळण्याला. १९. ही उत्प्रेक्षा आहे. २०. 'क्षोभला' 'कोपला' असे अन्यपाठ. २१. पृथ्वीपति, राजा (हरिश्चंद्र). २२. ओलांडून, वलांडून. २३. 'पाठी' असें पाठांतर. २४. 'कुमरातें' असें पाठांतर. २५. 'महाघोर अरण्यांतरीं । चालतां तयां नवलपरी । प्राप्त जाली ते चतुरीं । श्रवण केली पाहिजे. ॥' असा पाठभेद आहे.

उभीं झाडें । श्वापदपक्ष्यां आकांत. ॥ ३८ ॥ धूम्रें दाटलें अंबरें[1] । भडके उठती भयंकर । तयामाजी राजेश्वर । सहपरिवारें सांपडला. ॥ ३९ ॥ ज्वाळा लागती शरीरा । तेणें पोळती चरचरा । नेत्र आणि घ्राणद्वारां[2] । धूम्रें[3] लागे तीक्ष्ण. ॥ ४० ॥ विश्वामित्रें काय केलें? । राया, रोहिदासा, चुकविलें[4] । तारामतीतें सांवाइलें[5] । तया वणवियामाझारी[6]. ॥ ४१ ॥ मागें पाहे तारामती । पुत्र न देखोनी पडली क्षिती[7] । पुढें पाहे तंव नृपती । तोही तीतें दिसेना[8]. ॥ ४२ ॥ म्हणोनि लोळे भूतळवटीं । आक्रंदोनी कपाळ[9] पिटी । म्हणे, 'कटकटा[10]! ललाटीं[11] । काय लिहिलें? कळेना.' ॥ ४३ ॥ वणवियामाजी जळोनि मेले । ऐसें हृदयामाजी भाविलें[12] । लल्लाट पिटोनि करतळें । शंखस्फुरणें[13] करितसे. ॥ ४४ ॥ म्हणे 'बाळा! रोहिदासा! । भेटी देईं बा! पोंडसा[14]! । तुजवेगळ्या दाही दिशा । वोस वांटती[15] मजलागीं. ॥ ४५ ॥ अहा सूर्यवंशचूडारत्ना[16]! । माझिया प्राणपतिनिधाना[17]! । मजवेगळे[18] सायुज्यसदना[19] । भोगावया गेलेती! ॥ ४६ ॥ मज सांडूनि भवपुरीं[20] । पेणें[21] केलें दुरिच्या दुरी । कवण अपराध माझिये शिरीं? । भेटी देउनी सांगिजे. ॥ ४७ ॥ नों तरी[22] वैधव्यदोषाचा मळ । स्पर्शों नेदीं मी अळुमाळ[23].' । युगासमान वाटे पळ । म्हणोनी अनळ[24] प्रार्थिला. ॥ ४८ ॥ 'जया अनळें दाहिला पती । तया वोपीन वपु[25] आहुती ।' मनेंची सौभाग्यद्रव्यसंपत्ती[26] । वर्षती झाली पावकीं[27]. ॥ ४९ ॥ ब्रह्मरूप भाविला वन्ही । धर्मशिळे[28] उभी राहुनी । उडी टोंकावी[29] तंव ते क्षणीं । प्रकट झाला कौशिक. ॥ ५० ॥ वणवा विझवुनी अंगें[30] । सतीसमीप[31] पावला वेगें. । म्हणे, 'तूं कवण? कवणाची? सांगें । किमर्थ आलीस काननीं[32]?' ॥ ५१ ॥

---

१. आकाश. २. घ्राण=नाक, वास घेण्याचें इंद्रिय. ३. 'भेदी तयाचें' असा अन्यपाठ. ४. रोहिदास हरिश्चंद्र यांची चुकामूक पाडली, हा इत्यर्थ. ५. साध्य केलें. 'ठेविलें' असा अन्यपाठ आहे. ६. वणव्यामध्यें, दवानलांत. ७. जमिनीवर. ८. 'तोही दृष्टी न दिसे' असा अन्यपाठ. ९. 'हृदय' असा अन्यपाठ. १०. हायहाय, अरेरे! ११. कपाळीं, दैवांत. 'अदृष्टीं' असा अन्यपाठ. १२. मानिलें, कल्पना केली. १३. शंखध्वनी. १४. बालका. १५. 'पडल्या' असें पाठांतर. १६. सूर्यवंशशिरोमणि, सूर्यवंशांतील श्रेष्ठा. १७. भ्रताररूपी द्रव्यभांडार. १८. मला सोडून, मला टाकून. १९. मुक्तीच्या घरीं (मोक्षास). 'सायुज्यभुवना' असा अन्यपाठ. २०. संसारांत. २१. मजल, गमन. २२. 'आतां वैधव्यदशेचा मळ' असा अन्यपाठ. २३. किंचित्, लेशमात्र. २४. अग्नि. २५. शरीर, देह. २६. 'सौभाग्यद्रव्य सती' असा पाठभेद. २७. अग्नींत. 'हुताशा' अन्यपाठ. २८. धर्मरूपी शिळेवर. २९. 'टाकितां ततक्षणीं' असा अन्यपाठ. ३०. स्वतः, जातीनें. ३१. 'सतीपुढें पातला' असा पाठभेद. ३२. अरण्यांत. 'कामिनी' असें पाठांतर.

येरी म्हणे, 'आम्ही पथिक[1] । माझा पति आणि बाळक । या वणवियामाजी देख । जळोनि मेले केळेना[2]. ॥ ५२ ॥ तुम्हीं देखिले असती जरी । कृपेनें सांगिजे उत्तरीं.' । ऋषी म्हणे, 'वो ! वनांतरीं[3] । जळोनि पडलीं दोन शवें. ॥ ५३ ॥ एक पुरुष, एक[4] कुमर । जळोनि पडिले लोथें[5] शरीर.' । ऐसें परिसतां अंतर । कर्पोनि गेलें तियेचें. ॥ ५४ ॥ ऋषि म्हणे, 'माझियासवें । येशील तरी दावीन शवें[6].' । ऐसें बोलोनि लघु लाघवें[7] । प्रेतें[8] निर्मिलीं वनांतरीं. ॥ ५५ ॥ तारामतीस नेऊन तेथें । दाविता झाला उभय प्रेतें । त्वचा जळोनि पडलीं व्यस्तें[9] । हस्तपाद पसरूनी. ॥ ५६ ॥ ओळखोनि पतिपुत्रांचीं मेंडीं[10] । उभय हस्तें हृदय ताडी । शंखस्फुरण[11] करी तोंडीं । लोळे क्षिती गडबडा. ॥ ५७ ॥ अवलोकुनी पतीचें[12] मेंडें । म्हणे, 'वल्लभा[13] ! पाहें मजकडे । रुसणें[14] सांडोनि, बोलिजे तोंडें । गुजगोष्टी मजसवें. ॥ ५८ ॥ मजवेगळें[15] उदकपान । तुम्हांसी लागे विषासमान । जीवींचें गुह्यवचन[16] । अखंड सांगा[17] मजलागीं. ॥ ५९ ॥ ते तुम्हीं आजी कवणा गुणें । क्रोध धरिला अंतःकरणें ? । मौन धरूनियां वचनें । कां न बोला मजसवें ?' ॥ ६० ॥ रोहिदासतनु कवळोनी पोटीं[18] । लल्लाट मेळवी लल्लाटीं । शोक करितां, श्वापदें[19] दृष्टी । देखोनि गहिंवरें दाटलीं[20]. ॥ ६१ ॥ 'कवणा घालूं[21] मी भोजन ? । कवणा वोपूं स्तनपान ? । कडिये घेउनी वचन । बोलों आतां कवणाशीं ?' ॥ ६२ ॥ ऐसा विलाप करितां सती । अस्तमाना गेला गभस्ती । ऋषि म्हणे, 'आतां किती । शोक करिशी शवांचा ? ॥ ६३ ॥ प्रेतें कवळुनी काय फळ ? । निघोनि गेला हंसें[22] नीळ. । वृथा पिटिशी कपाळ । शीण वाटे पाहतां[23]. ॥ ६४ ॥ आम्हीं परिशिली एक मात[24] । तुम्हांस

---

१. वाटसरू, प्रवासी. २. 'न कळेची' 'नकळे कीं' अशीं पाठांतरें. ३. वनांत, अरण्यांत. ४. 'दुजा' असा अन्यपाठ. ५. 'होवोनि पडिले लोथ शरीर' असा अन्यपाठ. ६. प्रेत. ७. मोठ्या कुशलतेनें. लघु=चपल, सुंदर, थोडक्यांत. ८. 'दग्ध प्रेतें' असा अन्यपाठ. ९. वांकडीं तिकडीं, अस्ताव्यस्त. १०. प्रेतें. ११. शंखध्वनी. १२. 'नृपाचें' असें पाठांतर. १३. प्राणप्रिया ! १४. येथें 'रुसणें' हें क्रियावाचक नाम आहे. १५. मजशिवाय. १६. 'जीविंचें गुजगुह्य ज्ञानवचन । आतें सांगा मजपाशीं' असा अन्यपाठ. १७. सांगत असां. हा रीतिभूतकाळ आहे. १८. आलिंगून, पोटाशीं धरून. १९. 'श्वापदसृष्टी' असा अन्यपाठ. २०. येथें **'संबंधातिशयोक्त्य'**लंकार आहे. [मागें अध्याय १, ओं० १२५ वरील टीप पहा.] २१. देऊं, अर्पूं. २२. आत्मारूपी हंसपक्षी शरीर हें घरटें सोडून गेला—असा स्पष्टार्थ. नीळ=नीड=घरटें. 'हंस अनिळ' असा अन्यपाठ आहे तो ग्रहण केल्यास 'आत्मारूपी वायु' असा अर्थ करावा. २३. 'ऐकतां' असें पाठांतर. २४. वर्तमान, बातमी.

ऋण असे किंचित.' । येरू म्हणे, 'जी ! सत्य, सत्य, । देणें असें ऋषीचें.'[1] ॥ ६५ ॥ येरू म्हणे, 'पतीचें ऋण । फेडी ते पतिव्रता जाण । तेणें अक्षय स्वर्गभुवन । भोगावया जोडेलें.[2] ॥ ६६ ॥ आतां प्राप्त जाली निशी[3] । श्वापदें भक्षिती तुंजसी[4] । शेखीं[5] भोगणें[6] नरकाशीं । घडे दोषें ऋणाच्या. ॥ ६७ ॥ आमच्या गृहीं क्रमुनी निशी[3] । प्रभातीं अग्नि देणें शवांसी । भलतिया[7] परी पतिऋणाशी । हरुनी, स्वर्गा धाडिजे.' ॥ ६८ ॥ तारामती म्हणे, 'दयाळा ! । केवीं सांडूं मी पति आणि बाळा ? । धणीवरी[8] पाहेन डोळां । मुखकमळें दोघांचीं ?' ॥ ६९ ॥ ऐसें ऐकूनियां वचन । अदृश्य झाला तपोधन[9] । कौशिक ऋषीनें विंदाण[10] । काय केलें वनांत ? ॥ ७० ॥ घोर दाटली इंदुवल्लभा[11] । माजी उडुगणें[12] दाविती शोभा । पिशाचश्वापदांची सभा[13] । प्रेतें देखोनी पातली. ॥ ७१ ॥ तयांमाजी[14] विश्वामित्र । व्याघ्ररूप धरुनी क्रूर । महाभयानक पसरोनि वक्त्र[15] । झेंप घाली अवचितीं. ॥ ७२ ॥ सतीपुढोनि उभय प्रेतें । वोढूनि नेली परौतें[16] । उदर फाडोनि आंतें[17] । काढुनी टाकी बीभत्स.[18] ॥ ७३ ॥ दृष्टी लावुनी सतीकडे । मांस भक्षीतसे तोंडें । रागें गुर्गुरत पुढें[19] । भय दावी क्षणक्षणा. ॥ ७४ ॥ तारामती म्हणे, 'गा ! श्रीपती ! । धांव, पावं[20], या आकांतीं[21] । कैशी प्राप्त झाली गती ! । ऐशी वैरिया होऊं नये[22]. ॥ ७५ ॥ अनळें दाहिलें उभय रत्नां । सेखीं[23] प्राप्त व्याघ्रवदना । आतां माझिया-

---

१. 'धन्य' असें पाठांतर. २. प्राप्त होईल. 'जोडिजे' असें पाठांतर. ३. रात्र. ४. 'तिघांसी' असा पाठभेद. ५. शेवटीं. ६. 'भोगाल' असें पाठांतर. ७. येनकेन प्रकारानें, हरतऱ्हा करून. या ओंवीचा अन्यपाठः—'आमुचे गृहीं क्रमोनि रजनी । प्रभातें शवां देइजे अग्नी । भलतिये परी पति अऋणी । करोनि धाडीं स्वर्गासी. ॥' ८. पोटभर, तृप्ति होईपर्यंत. ९. तप हेंच आहे धन ज्याचें तो (विश्वामित्र). १०. कपट, कौटिल्य, चातुर्य. ११. चंद्रप्रिया (रात्र). १२. तारागण, तारे. १३. पिशाच (वेताळझोटिंगादि) व श्वापदें (वाघ, सिंह वगैरे) यांची सभा (जमात, मंडळी). १४. या ओंवीचा अन्यपाठ असा आहे:—'तयामाजी विश्वामित्रें । काय केलें परिसा श्रोत्रें । महा भयानक पंचवक्त्रें । झेंप घाली अवचिती. ॥' या ओंवीचा दुसरा पाठ असा आहे:—'ते समयीं विश्वामित्रें । काय केलें परिसा श्रोत्रें । महाव्याघ्र वक्त्रें । झेंपा घालीत पातला. ॥' १५. तोंड, मुख. वक्त्र=वक्त्यनेन इति=ज्याच्या योगानें आपण बोलतों तें वक्त्र. १६. पलीकडे, दूर. 'परती तेथें' असा पाठभेद. १७. आंतडीं. 'अंत्रें' असें पाठांतर. १८. चिळस येईल अशा रीतीनें. १९. 'मुरडे' असा पाठभेद. २०. 'धांव धांव' असा अन्यपाठ. २१. संकटीं. २२. 'वैरिया न घडावी' असा अन्यपाठ. २३. शेवटीं. 'शवें' असें पाठांतर.

ही प्राणा । न सोडी हा सर्वथा. ॥ ७६ ॥ 'जन्मल्या देहासी मरण । कदा न चुके' ब्रह्मवचन । परी त्या ब्राह्मणाचें ऋण । फिटलें नाहीं आमुतें. ॥७७॥ असो; पुढें जन्म घेतां । ऋषिऋण फेडूं सर्वथा । मी पतिसवें पतिव्रता । गमन करीन अविलंबें.' ॥ ७८ ॥ म्हणवुनी नैयन झांकिले । पंच प्राणांतें आकर्षिलें । प्राण द्यावा, तंव सूचलें । ज्ञानदृष्टी कौशिका. ॥ ७९ ॥ 'तारामती सांडीतां प्राण । आमुचें जाईल प्रतिज्ञावचन.' । म्हणोनि आणी दोघेजण । पतिपुत्र तीपुढें. ॥ ८० ॥ कैंचा व्याघ्र? कैंचा वणवा? । जैसा मृगाब्धीचा हेलावा । कीं दुष्ट स्वप्न भोगितां जीवा । वोडंबरीसारिखें. ॥ ८१ ॥ राजा म्हणे, 'हो! अंगने! । तुंजलागीं हिंडलों वनें । बहुत श्रमलीस तृषेनें । म्हणोनी एथें बैसलीस?' ॥ ८२ ॥ तारामतीनें लोचनें । उघडितां देखिले दोघेजण । धाउनी दिधलें आलिंगन । शोक करी आक्रोशें. ॥ ८३ ॥ राजा म्हणे, 'सौभाग्यसरिते! । किमर्थ शोक? सांग मातें.' । येरी म्हणे, 'तुम्हांतें । पुनर्जन्म देखिले. ॥ ८४ ॥ तुम्ही जळोनी मेलेति वणवां । कवळोनी बैसल्यें उभय शवां । परम दुःख वाटलें जीवा । शंका वाटे सांगतां. ॥ ८५ ॥ अकस्मात् व्याघ्रें झेंपू । घालोनी नेल्या दोन्ही वपू । भयें मातें भरला कंपू । मृत्यु-

---

१. 'न सोडीच हा व्याघ्र' असा अन्यपाठ. २. ब्रह्मदेवाचें वचन. 'आहे' हें क्रियापद येथें अध्याहृत घेतलें पाहिजे. ३. 'न फिटेची आह्मांसी' असा अन्यपाठ. ४. 'पुढें तरी जन्म होतां' असा पाठभेद. ५. 'तत्वता' असें पाठांतर. ६. लवकर, उशीर न लावतां. ७. नेत्र, डोळे. 'दोन्ही नेत्र' असा अन्यपाठ. ८. पंचप्राणांचीं नांवें:—प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान. ह्या प्राणांचीं स्थानें:—'हृदि प्राणो गुदेऽपानः समानो नाभिमंडले । उदानः कंठदेशे स्यात् व्यानः सर्वशरीरगः ॥'. [विशेष माहितीकरितां जिज्ञासूंनीं डा० गर्देकृत वाग्भट—अष्टांगहृदय, सूत्रस्थान, अध्याय १२ श्लोक ४–९; पृ० १४८–१४९ पहावीं.] ९. कळलें, समजलें. १०. ज्ञानदृष्टीनें, अंतःसाक्षित्वानें. ११. 'सांडील' असें पाठांतर. १२. 'आणिले' असें पाठांतर. १३. तारामतीपुढें. १४. मृगजलाच्या समुद्राचा. 'मृगार्णवीचा' असा अन्यपाठ. १५. (पाण्याची) लाट. १६. गारुडी विद्येप्रमाणें, मिथ्या. वोडंबरी=राक्षसी माया, गारुडी विद्या. (सं० वोड्=सर्प.) १७. हे स्त्रिये! १८. 'तुम्हांलागीं' असा पाठ आहे. १९. 'काय श्रम आले कीं तृषेनें' असा अन्यपाठ. २०. 'पीडितां' असें पाठांतर. २१. डोळे, नेत्र. २२. 'सौभाग्यसरिता' ह्या विशेषणाचे योगानें तारामतीस वैधव्य येण्याची भीती नाहीं—असें ध्वनित होतें, म्हणून येथें 'परिकरा'लंकार आहे. 'सत्वसरिते' असा पाठभेद. २३. पुन्हा जन्मास आल्यासारखे. २४. वणव्यांत. २५. आलिंगून. (कवळणें=कवेंत आंवळणें, कवटाळणें. कवा=मिठी.) २६. शंका=भय. 'सांगतां वाटे अशंका' असा अन्यपाठ. २७. 'असंख्यात' असें पाठांतर. २८. शरीरें.

समयो वीटला.[1] ॥ ८६ ॥ यालागीं झांकले नयन[2] । हृदयीं स्मरला नारायण[3] । परिसोनी तुमचें वचन । नेत्र उघडोनी पाहिलें.'[4] ॥ ८७ ॥ राजा म्हणे, 'वैकुंठपाळ[5] । ऐशींच विघ्नें भंगुनी[6] सकळ । मोक्षपदीं स्थापिल अढळ[7] । सत्व देखोनी आमुचें.' ॥ ८८ ॥ असो; तिघें मिळोनी पंथीं । चालतां कष्ट पावलीं रातीं[8] । भयानक वनें लंघिती । नदनदिया भयासुर[9]. ॥ ८९ ॥ यापरी चालतां मध्यरात्रीं । पुढें देखिली वोस[10] नगरी । जे कां पिशाचादि खेचरीं[11] । आणि श्वापदीं वसेविली[12]. ॥ ९० ॥ वेताळझोटिंगमेळावा[13] । मेसको[14], मायराणी[15], प्रेतीर्णवा[16] । धुमस[17] घालिती मानवा । अशौच्यातें[18] छळणार्थ[19]. ॥ ९१ ॥ सिंह, शार्दूळ[20], महिष[21], सूकर[22], । व्याघ्र, कुंजर[23], तरस, तेंगर[24], । उलूक[25], भालुका[26] भयंकर । शब्द करिती टिटवियीं[27]. ॥९२॥ ऐसे परी वोस नगरी । लंघूनि जातां, पृथ्वीवरी[28] । मुख दावितां दिनकरकरीं[29] । पैठत[30] गेली तमशोभा. ॥९३॥ यापरी लोटला एक मास । राजा न लभे[31] सुखाचा लेश । दुःखावेगळें निमिषें[32] । जाऊं नेदी कौशिक. ॥९४॥ भूपाळसत्व शुद्धरत्न[33] । कौशिककोप न[34] गणी घनें[35] । मशकनाशिकींच्या[36] प्रभं-[37]

---

१. 'पातला' असा पाठभेद. २. 'झांकोनि नयन' असा अन्यपाठ. ३. भगवान् (विष्णु). ४. 'नेत्र उघडिले लगबगां' असा अन्यपाठ. ५. स्वर्गाधिपति (विष्णु). या ओंवीचा अन्यपाठ:—'राजा म्हणे वैकुंठपाळें । ऐशींच विघ्नें टाळिलीं सकळें । मोक्षपदीं स्थापिलें अढळें । सत्व देखोनि आमुचें. ।।' ६. नाहींशीं करून. ७. ध्रुव, अक्षय, चिरकालपर्यंत. ८. रात्रीं. ९. भ्यासुर, भयंकर. १०. ओसाड, निर्जन. 'लागली वोस पुरी' असा अन्यपाठ. ११. आकाशांत फिरणाऱ्यांनीं. १२. 'वसिन्नली' असा अन्यपाठ. १३. मेळावा=समुदाय, जमाव. 'डाकिनी लांवा' असा पाठभेद. १४. जलदेवताविशेष. १५. देवताविशेष, पिशाची. १६. पिशाचविशेष. १७. धुडगुस, धांगडधिंगा, धुमाकूळ. १८. मानवा अशौच्यातें (अपवित्र मनुष्यास) छळणार्थ (छळावयाकरितां) धुमस घालिती—असा अन्वय. १९. 'छळिताती' असें पाठांतर. २०. वाघ. २१. रेडे, हले. २२. डुकर. 'क्रूर' असा पाठभेद. २३. हत्ती. 'जंबुक' असें पाठांतर. २४. मेंढा. २५. घुबड. २६. म्हाताऱ्या कोल्ह्यास किंवा कोल्हीस 'भाल्लू' असें म्हणतात. २७. 'टिवटिव्या' असें पाठांतर. २८. 'पद्मिनीवर' असा अन्यपाठ. पद्मिनीवर=चंद्र. २९. सूर्यकिरणांनीं. कर=(१) हस्त (२) किरण. ३०. 'पळोन गेली' असें पाठांतर. ३१. लाभे, पाही, भोगी. 'नलगे' असें पाठांतर. ३२. निमिष=अत्यंत अल्पकाल, पळ. ३३. हरिश्चंद्राचें सत्व हेंच शुद्ध रत्न. 'भूपाळ शुद्धसत्वलक्षणा' 'भूपाळशुद्धसत्व लेश ना' असे अन्यपाठ. ३४. पर्वा न करी. या क्रियापदाचा 'रत्न' हा कर्ता व 'घन' हें कर्म. 'न मनी' असें पाठांतर. ३५. कौशिककोप (विश्वामित्राचा क्रोध) हाच घन (घण; लोखंड, तांबें इत्यादिकांवर उचलून मारावयाचें एक लोखंडी औत). येथें रूपकालंकार आहे. 'घणघणा' असें पाठांतर. ३६.'मशकनाशकाच्या प्रभंजना' असा अन्यपाठ. ३७. मशकाच्या नाकांतील वाऱ्यानें. मशक=चिलटें, घुंगुरडें, प्रभंजन=वायु,वारा.

जनें । मेरु[1] जैसा न हाले; ॥ ९५ ॥ कीं लावण्यरूपवयसुगुणी[2] । नम्र होवोनी[3] प्रार्थी कामिनी । शुकहृदयींचा[4] कामफणी[5] । सहसा नुचली मस्तक; ॥ ९६ ॥ कीं आस्तिकमंत्रें[6] फणी[7] तक्षक । स्थापितां न घडे[8] याज्ञिक । तेंवी त्या[9] तपें नृपनायक । अचळ केला वसिष्ठें. ॥ ९७ ॥ असो; सह[10] कुंमरकांता नृपती । परमकष्टें चालतां पंथीं । मोक्षदायक पुरी अवचिती । वाराणशी[11] देखिली.[12] ॥ ९८ ॥ अपर[13] नीलकंठाचें पीठ[14] । माजी घेरटीकार[15] सुभट[16] । काळभैरव वाजवी सांट[17] । महादोषाच्या मस्तकीं. ॥ ९९ ॥ जिये नगरीं अमरगण[18] । जन्म[19] इच्छिती पावोनी मरण । मग इतरांचा पाड[20] कोण? । निधनें लाहिजे

---

१. पर्वतविशेष. हा सुवर्णाचा असल्यामुळें फार जड आहे म्हणून त्याची उपमा विशेष योग्य आहे. [मेरूपर्वताविषयीं सविस्तर माहिती मुक्तेश्वर–वनपर्व (काव्यसंग्रहग्रंथमाला) पृ.३७,टी.२ यांत दिली आहे, ती पहावी.] २. लावण्यरूप+वय+सुगुणी=सौंदर्य, तारुण्य व सद्गुण यांनीं युक्त अशी (रंभा). 'वयसा गुणीं' असें पाठांतर. ३. 'दावोनि' असें पाठांतर. ४. येथें शुकरंभासंवादकथा अनुसंधेय आहे. [मागें पृष्ठें १२९–१७१ पहा.] ५. कामरूपी सर्प. ६. कीं (ज्याप्रमाणें) आस्तिकमंत्रें (आस्तिकाच्या मंत्राच्या योगानें) फणी तक्षक (तक्षकसर्पास) स्थापितां (अंतराळीं थांबवितां) याज्ञिक (यज्ञकर्म) न घडे तेवी इ०—असा अन्वय. आस्तिक—हा वासुकीची बहिण जरत्कारी हीस जरत्कारुमुनीपासून झालेला पुत्र. ह्यानें जनमेजयाच्या सर्पसत्रांतून वासुकी (तक्षका) स वांचविलें—अशी कथा आहे. [मुक्तेश्वर—आदिपर्व—अध्याय ११ पहा.] ७. 'कीं आस्तिकमंत्रें फणी तक्षका । स्थापिला न संपडे जेवी याज्ञिका' असा अन्यपाठ. ८. 'न पडे याज्ञिकां' असा पाठभेद. ९. हरिश्चंद्राचें सत्वहरण होऊं नये म्हणून वशिष्ठ जें तप करावयास गेला होता, त्या तपाच्या योगानें. (मागें अध्याय १, ओंवी ६७ पहा.) १०. पुत्र (रोहिदास) व पत्नी (तारामती) यांसह. ११. काशी. 'वाराणशी' शब्दापासूनच बनारस (Benares) हें अपभ्रष्टरूप प्रचारांत आलें. १२. हरिश्चंद्रादि मंडळी वाराणशी नगरीस जात असतां त्यांस मार्गात विश्वामित्रानें छळिलें असें वर्णन मूळांत नाहीं. अध्याय २, ओंवी ८५ पासून येथपर्यंतच्या सुमारें १३० ओंव्या मुक्तेश्वराच्या पदरच्याच आहेत. कदाचित् हरिश्चंद्राविषयीं पूज्यबुद्धि व सहानुभूति वाचकांच्या आणि श्रोत्यांच्या मनांत उत्पन्न व्हावी, ह्या उद्देशानें मुक्तेश्वरानें असें वर्णन केलें असावें. श्रीधरस्वामी यांच्या 'पांडवप्रतापां'तर्गत 'हरिश्चंद्राख्यानां'त व विष्णुदास नामा यांच्या 'हरिश्चंद्राख्यानां'त मुक्तेश्वरासारखेंच वर्णन आहे. पंतांनीं मात्र हरिश्चंद्रास प्रवासांतील संकटें भोगावयास न लावितां एकदम काशीस नेऊन पोंचविलें आहे. १३. अपर पीठ=अन्य पीठ (स्थान). कैलास हें महादेवाचें मुख्य स्थान व काशी हें दुय्यम प्रतीचें स्थान. १४. पीठ=आसन, राहण्याचें स्थान. १५. हेर, गस्तकारी. १६. चांगला, मोठा. १७. वेत किंवा बांबूच्या काठ्या यांचा जुडगा. १८. देवसमुदाय. १९. 'मोक्ष' असा अन्यपाठ. २०. थोरवी. अमर (ज्यांना मरण नाहीं ते, देव) मरण इच्छितात; मग इतरांची कथा काय? येथें 'अर्थापत्ति' नामक अलंकार आहे. जेथें कैमुतिकन्यायानें अर्थसिद्धि होते, तेथें हा अलंकार होतो. ह्या अलंकारास 'काव्यार्थापत्ति'

मोक्षातें. ॥ १०० ॥ जे का [1]नवखंडावेगळी । [2]पंचक्रोशी [3]वसुधातळीं । जेथें वसे [4]चंद्रमौळी । द्यावया मोक्ष [5]जगातें. ॥ १०१ ॥ [6]लक्ष चौऱ्यासी [7]जन्मभ्रमणा । चक्रीं घातले जीव नाना । जन्म न चुके [8]चतुरानना, । [9]पंचवदनावांचूनी. ॥ १०२ ॥ ते [10]पुरी देखोनी भूपाळें । साष्टांग लोटांगण[11] घातलें । पुढें चालतां देखिलें । तीरें[12] [13]भागीरथीचें. ॥ १०३ ॥ श्रीधरनखेंदुसुधाधारा[15] । बो-

---

असेंही नांव आहे. या अलंकाराचीं उदाहरणें:–(१) तो बापास बाप म्हणत नाहीं, मग चुलत्यास काका म्हणेल काय? (२) हे सुंदरि! तुझ्या मुखानें चंद्र जिंकिला, मग कमळाची कथा काय? २१. 'लाहिजे सुकृतधनातें' 'सुकृतें लाहिजे निधनातें' असे पाठभेद. निधन=मरण, मृत्यु.

१. मागें अध्याय २, ओंवी ५१ वरील टीप पहा. २. पांच कोशांचें क्षेत्र आहे ती नगरी. ३. पृथ्वीवर. ४. शंकर. 'विराजे चंद्र मौळीं' असा पाठभेद. ५. 'भक्तांसी' असा अन्यपाठ. ६. एकंदर योनी चौऱ्यायशीं लक्ष आहेत. या चौऱ्याशीं लक्ष योनींची संख्या अशी:–२१ लक्ष अंडज खाणींत [९ लक्ष योनि सर्प मुंगी इत्यादि, ४ लक्ष योनि जळचरांत, ८ लक्ष योनि पक्षिकुळांत,–मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष जारज खाणींत [९ लक्ष द्विपद योनि, ४ लक्ष चतुष्पद योनि, ८ लक्ष श्वापद योनि,–मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष उद्भिज्ज खाणींत [९ लक्ष अन्नधान्यादिक, ४ लक्ष सुगंधादिक पदार्थ, ८ लक्ष वृक्ष तृण इत्यादि,–मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष स्वेदज खाणींत [९ लक्ष तारागणादिक, ४ लक्ष मेघमाला, ८ लक्ष हिरे रत्नमाणिकादिक, मिळून २१ लक्ष]; याप्रमाणें प्रत्येक खाणींत २१, मिळोन चार खाणींत ८४ योनि होतात. दुसऱ्या मताप्रमाणें २० लक्ष वृक्षयोनि, ११ लक्ष कीटकयोनि, ३० लक्ष पशुयोनि, ९ लक्ष जलचरयोनि, १० लक्ष पक्षियोनि, आणि ४ लक्ष मनुष्ययोनि, मिळून ८४ लक्ष योनि होतात. ७. जन्ममरणाच्या फेऱ्यांत. ८. महादेवास. [मुक्तेश्वर–सभापर्व (काव्यसंग्रह) पृ. १४२ टीप १७ पहा.] ९. शंकरास 'पंचवदन' असें नांव पडण्याचें कारण त्यास पांच मुखें आहेत. त्या मुखांचीं नांवें:–सद्योजात, तत्पुरुष, अघोर, वामदेव आणि ईशान. [स्तुतिकुसुमांजलिस्तोत्र ११ श्लोक ११६ टीका पहा.] १०. ह्या पुरीचें वर्णन विष्णुदास नामा यांनीं आपल्या 'हरिश्चंद्राख्याना'त असें केलें आहे:–'तेथें प्राणी जो गेला । तेणें स्वर्ग हातीं चिनविला । तेथें व्यवहारिक शब्द बोलिला । तेंचि जाहलें अनुष्ठान. ॥ २६ ॥ समुद्रवलयांकित तीर्थी । जन्म कोटीवरी वास करिती । तेथें दोन प्रहर केलिया वस्ती । काशीविश्वेश्वरा पाविजे. ॥ २७ ॥ 'शिव शिव' ऐसें उच्चारी । विश्वेशप्रासादाभीतरी । प्रसन्न होऊनि त्रिपुरारी । कैलासपदीं बैसविला. ॥ २८ ॥ [अध्याय चौथा.] ११. 'दंडवत' असें पाठांतर. १२. 'नीर' असें पाठांतर. १३. गंगेचें. भगीरथानें गंगेस स्वर्गांतून खालीं आणिली म्हणून तीस भागीरथी (भगीरथकन्या) असें म्हणतात. १४. 'वैकुंठपाळाचिये नखीं । तेचि दुर्गापतीचे मस्तकीं । प्रगटोनी प्रवाहे त्रिलोकीं । कुसुमन्याय मिरवली. ॥' अशी एक ओंवी, मूळांतील ओंव्या १०३–१०४ यांच्या मध्यें फक्त एका पोथीत आढळते. १५. श्रीधर+नख+इंदु+सुधा+धारा=विष्णूच्या नखरूपी चंद्राची अमृतधारा (गंगा). गंगा विष्णूच्या पायांतून निघाली अशी कथा आहे.

पिल्या भक्त [1]भगीरथच[2]कोरा । त्यांचेनि[3]योगें चराचरा । प्राप्त झाली [4]सुदैवें. ॥ १०४ ॥ तया [5]सुरसेव्य गंगाजळीं । स्नान करूनी, चंद्रमौळी । पूजा बांधूनी शुद्ध कमळीं । [6]बद्धांजली स्तवितसे. ॥ १०५ ॥ 'जय जय कैलास-गिरिनायका ! । कर्पूरगौरा ! [7]कामांतका ! । त्रि[8]गुणत्रिपुरभेदका ! । वृषभध्वजा ! महेशा ! ॥ १०६ ॥ जय जय [9]भक्तकामकल्पद्रुमा ! । [10]रमारमणविश्रामधामा ! । [11]वैराग्यमुकुटींच्या ललामा ! । नीलग्रीवा ! [12]जटाधरा !' ॥ १०७ ॥ [13]स्तवूनि, पूजूनि विश्वनाथा । [14]विनयें चरणीं ठेविला माथा । देउळाबाहेरी नृपनाथा । निघतां, कैसें वर्तलें ? ॥ १०८ ॥ कौशिकें प्रकटोनी देउळीं । नृप वोढिला धरूनी [15]अंचळीं । 'तूतें शोधितां [16]महीतळीं । आजी एथें देखिलें. ॥ १०९ ॥ जरी द्यावया नव्हतें धन । तरी कां केलें [17]वाग्बंधन ? । याचक [18]शिणवूनि दान । केलियाचें फळ काय ? ॥ ११० ॥ मी तों न सोडीं एक कवडी । तूतें घालीन [19]बांदवडी । काय नेणशी माझी [20]प्रौढी ? । करीन वेडीं [21]सुरासुरें.' ॥ १११ ॥ राजा म्हणे, 'दयासागरा ! । आंवरा [22]क्रोधहयवाग्दोरा । आजी अस्त [23]नें

१. भक्त भगीरथ हाच चकोर (पक्षिविशेष). भगीरथानें अत्यंत कठिण तपश्चर्या करून गंगेस प्रसन्न करून पृथ्वीवर आणिलें–अशी कथा आहे. (मुक्तेश्वरसभापर्व–(काव्यसंग्रह)–पृ. ५६ टीप ५ पहा.) २. चकोरपक्षी चंद्रकिरणपान करून उपजीविका करितो असा समज आहे. चकोर शब्दाचा विग्रह असा आहे:—'चकति चंद्रामृतपायित्वाद्विषं प्रतिहंति, चक् तृप्तौ प्रतिघाते च चकोरः । चकति तृप्यते ज्योत्स्नया इति **चकोरः** ॥' इति स्वामी. [स्तुतिकुसुमांजलिस्तोत्र ९ वें, श्लोक ४९. टीका.] ३. 'प्रसादें' असा अन्यपाठ. ४. 'सदैव' 'सदेवा' अशीं पाठांतरें. ५. देवांनींही सेवन करण्यास योग्य. ६. हात जोडून. ७. मदननाशका ! ८. सत्व, रज आणि तम हे त्रिगुण. हींच तीन पुरें यांचा नाश करणाऱ्या ! येथें त्रिपुरासुरसंहारकथा अनुसंधेय आहे. [मुक्तेश्वरवनपर्व–(काव्यसंग्रह)–पृ. ५१ टीप १० पहा.] ९. भक्तांचे मनोरथ पूर्ण करणाऱ्या. १०. रमारमण (विष्णु, राम) आहे विश्रांतिस्थान ज्याचें अशा ! महादेव नेहमीं रामनामाचा जप करीत असतो; असें वर्णन आहे. ११. वैराग्यरूपी मुकुटांतील भूषणा ! अत्यंत वैराग्यशीला. १२. 'महेशा' असें पाठांतर. १३. 'स्तवनीं' असें पाठांतर. १४. विनयपूर्वक, नम्रपणानें. १५. पदर धरून. अंचळ=वस्त्रादिकांचा पदर. 'अंजली' असा पाठभेद. १६. 'महीमंडळीं' असा अन्यपाठ. १७. वचन देऊन बांधून घेणें. १८. 'श्रमवोनियां' असा अन्यपाठ. १९. बंदींत, पराधीनतेंत. २०. थोरवी, प्रताप. २१. देव आणि राक्षस. येथें 'सुरासुरें' असें नपुंसकलिंगी रूप क्षुद्रत्व दर्शविण्याकरितां मुक्तेश्वरानें मुद्दाम योजिलें असावें. विश्वामित्राचें भाषण मूळांत फारच संक्षिप्त आहे. मुक्तेश्वरानें एका श्लोकाचे ठिकाणीं तीन ओंव्या रचिल्या आहेत. मुक्तेश्वराची वर्णनशैली मूळावर ताण करणारी आहे. २२. क्रोधरूपी घोड्याचा वाग्रूपी दोरा (घोड्याला बांधावयाची दोरी). रूपकालंकार. २३. सूर्यास्त होण्यापूर्वी.

होतां भास्करा । देईनें[1] शरीरा विकूनी. ॥ ११२ ॥ अस्ताचळा[2] वासरमणी[3] । न जातां फेडीन ऋण । जरी नव्हे सत्य वचन । तरी शापूनी[4] भस्म करीं.' ॥ ११३ ॥ ऐशिया परी तपोतेजा । शांतवूनि बैसवी राजा[5] । करींची मुद्रिका काढिली[6] बोजा[7] । जे त्रिशंकु[8]रायबोटींची. ॥ ११४ ॥ ते देऊनी घेतलें तृण । आपणासहित जायानंदन-। माथां स्वहस्तें बांधूनीयां; वदन । खालावूनी[10] चालिला. ॥ ११५ ॥ पुढील कथेची सूचना[11] । 'पहिले[12] विकील निजांगना । तयापाठी निजनंदना[13] । मग[14] आपणा विकील. ॥ ११६ ॥ पुढें वर्तली कैशी कथा ? । ते आणावी श्रवणपथा[15] । तयासारिखी क्लेशावस्था । कोणें भोगिली असेल[16] ? ॥ ११७ ॥ इति श्रीकथा[17]रससागर । श्रवणें नाशी भव दुस्तर[18] । नाना आघात[19]गिरिवर । भस्म[20] होती निर्धारें. ॥ ११८ ॥ इति भारत[21]वनपर्व । पवित्र कथा अतिअपूर्व । श्रवणें नाशती दोष सर्व । मुक्तेश्वर कवि वंदे[22]. ॥११९॥

१. 'देईन' ह्या क्रियापदाचें कर्म 'दक्षिणा' (अध्याहृत). २. ह्या ओंवीचा अन्यपाठ:– 'अस्ताचळा वासरमणें । ऋण फेडीन नव्हतां येणें । न फेडितां स्वामीचें ऋणें । शापूनि भस्म करावें.' ३. सूर्य. ४. 'क्षोभूनि भस्म करावें' असा अन्यपाठ. ५. 'वोजा' असें पाठांतर. ६. 'काढोनि राजा' असा अन्यपाठ. ७. बोजा=ओजा, ओजेनें, वजेनें, काळजीनें. तसेंच ओज=धातूची चकाकी, तेज. पहिला अर्थ घेतल्यास 'काळजीपूर्वक जपून ठेवलेली आंगठी' असा होईल. दुसरा अर्थ घेतल्यास 'तेजस्वी, चकाकणारी आंगठी' असा होईल. ८. त्रिशंकु= हरिश्चंद्राचा बाप. ह्याचें खरें नांव सत्यव्रत. [मागें पृष्ठ २०६, टीप ५ पहा.] ९. हरिश्चंद्रानें आंगठी देऊन तृण घेतलें व तें आपल्या मस्तकावर बांधलें असें वर्णन मूळांत नाहीं. १०. खालीं घालून, अधोमुख करून. मुक्तेश्वरानें मूळांतील बऱ्याच भागास येथें फांटा दिला आहे. मूळांतील हरिश्चंद्र व तारामती यांचें भाषण, तारामतीनें केलेली सत्यप्रशंसा व सत्यरक्षणाविषयीं राजास केलेला बोध, तिच्या मनाची त्या वेळची स्थिति इत्यादि प्रसंग मोठे चटकदार आहेत. [मार्कंडेयपुराण–अध्याय ८.] ह्या प्रसंगांचा थोडासा मासला पंतांच्या 'हरिश्चंद्राख्यानां'त पाहावयास सांपडेल. [अध्याय २ पहा.] ११. 'रचना' असें पाठांतर. १२. 'प्रथम' असा पाठभेद. १३. 'नृपनंदना' असें पाठांतर. १४. 'शेखीं' असा अन्यपाठ. १५. 'तूं ऐक धरित्रीनाथा' असें पाठांतर. १६. 'सांग पां' असा अन्यपाठ. १७. कथेच्या रसाचा सागर. १८. दुस्तर (तरून) जाण्यास कठीण; भव=संसार. १९. आघातरूपी पर्वतश्रेष्ठ. आघात= संकट, दुर्दैव, तडाका, जखम. 'आंधारगिरिवर' असें पाठांतर. २०. 'भग्न' असा पाठभेद. २१. 'शांतिपर्व' असाही पाठभेद आढळतो ! २२. 'इति श्रीमन्महाभारते महापुराणे शतसहस्रसंहितायां शांतिपर्वणि हरिश्चंद्राख्यानो नाम काशीप्रवेशो नाम तृतीयप्रसंगः ।' असा सगामिलेख एका पोथींत आहे.

## अध्याय चौथा.

छायापतिवंशमंडण[1] । चाले माथां बांधोनी तृण । सरिसीं[2] पवित्र जाया नंदन । फिरे पैटणीं[3] ग्राहकार्थ[4]. ॥ १ ॥ पुरी फिरवूनी[5] शेवटीं । कौशिकें आणिलीं हाटवटीं[6] । राजलक्षणें देखोनि दृष्टी । विस्मय पोटीं जगाच्या. ॥ २ ॥ म्हणती[7], 'हा हरिश्चंद्र नृपती । दुजी सुकुमार तारामती । पुत्र तिचा पवित्रकीर्ती[8] । रोहिदासासारिखा.' ॥ ३ ॥ एक म्हणती, 'यथार्थ[9] वचन । रायें वोपिलें राज्यदान । दक्षिणेलागीं हा ब्राह्मण । चौथा दिसे कौशिक.' ॥ ४ ॥ ऐशी परस्परें मांत[10] । प्रकट झाली[11] नगरांत । ऐकोनि धाविन्नले समस्त[12] । धनवंत धनेंशीं[13]. ॥५॥ तारामती म्हणे, 'प्राणेश्वरा ! । प्रथम विकूनि मम शरीरा,। उरलिया[14] धनालागीं कुमरा । वोपोनी[15] शांतवीं ऋषीतें.' ॥ ६ ॥ तंव रोहिदास पितृचरणीं[16] । मस्तक ठेवूनि, उभय पाणी[17] । जोडोनी बोले विनयवाणी[18] । ते तूं ऐकें कुरुवर्या[19] ! ॥ ७ ॥ 'प्रथम[20] माझिया धनारविंदें[21] । कौशिकमौळीं पूजा बांधें। जेणें पुत्रपणाचीं[22] बिरुदें । वदनीं विबुधें[23] वानिजे.' ॥ ८ ॥ ऐकोनी दोघांचीं विनयोत्तरें । आश्चर्य मानिलें ऋषीश्वरें । मग म्हणे, 'तुझ्या[24] शरीरें । ऋण[25] कैसें फिटेल? ॥ ९ ॥ नृपांगीं दोन तुकें । एक तुक नृपनायिके[26] । अर्ध[27] उरलिया बाळकें । विकूनि द्यावें देहासी[28].' ॥ १० ॥ कर्मरेखा[29] करुनी मान्य ।

---

१. छाया (सूर्यपत्नी), तिचा पति (सूर्य) त्याच्या वंशाचें मंडण (भूषण), हरिश्चंद्रराजा. येथें सुरेख **'पर्यायोक्ता'**लंकार आहे. २. समागमें, बरोबर. ३. शहरांत, नगरांत. 'फिरे पाटणग्राहिकां' असा अन्यपाठ. ४. विकत घेणारे लोकांचा शोध करण्याकरितां. ग्राहक= स्वीकार करणारा. 'ग्राहक' शब्दापासूनच सध्या प्रचारांत चालू असलेला 'गि-हाइक' शब्द उत्पन्न झाला. ५. 'फिरोनि,' 'फिरतां' अशीं पाठांतरें. ६. बाजारांत. ७. लोक म्हणती. ८. 'पैल तिजा उत्तमकांता,' 'पुत्र तिचा उत्तमकीर्ति' असे पाठभेद. ९. खरी गोष्ट. वरील ओंवींत सांगितलेले तर्क खरे आहेत, असें कांहीं लोक म्हणाले—हा इत्यर्थ. १०. वार्ता, बातमी. ११. 'प्रगटली नगराआंत' असा अन्यपाठ. १२. 'बहुत' असें पाठांतर. १३. द्रव्य बरोबर घेऊन, द्रव्यासह. १४. आणखी देणें बाकी राहिल्यास. १५. 'विकूनि' असा पाठभेद. १६. 'मातृचरणीं' 'मातृवचनीं' असे अन्यपाठ. १७. हात, हस्त. १८. नम्र वचन. १९. 'म्हणे परिसें नृपवर्या !' असा अन्यपाठ. २०. ह्या ओंवीचा अन्यपाठ:—'प्रथम माझिया धनारविंदें । पूजावीं ऋषीचीं पदारविंदें । सत्वरक्षा स्वानंदें । वदनीं विबुधें वानिजे. ॥'. २१. द्रव्यरूप कमळानें. २२. पुत्रानें आपलें कर्तव्यकर्म केलें अशा प्रकारचा लौकिक. २३. देवांनीं. २४. 'तुमच्या' असें पाठांतर. २५. भार, वजन. २६. राजस्त्री (तारामती) तिला. २७. 'उरलें अर्ध त्यासी' असा पाठभेद. २८. 'धनासी' असें पाठांतर. २९. दैवरेषा, प्राक्तन.

अंगनामस्तकीं[1] बांधी तृण । रूपयौवनलावण्य[2] । देखोनि, आलीं ग्राहकें. ॥११॥ ऐश्वर्यसंपन्न कुंट्टिणी[3] । शिबिके बैसोनी ते क्षणीं । लावण्यवनिता[4] देखोनी । येती[5] जाली जवळिके. ॥ १२ ॥ तये वेश्येचिया धना । करूं शके कोण गणना ? । सुंदर[6] देखोनी अंगना । आणवी द्रव्य[7] तात्काळ. ॥१३॥ तुळे उभवुनी धडधडां[8] । कनककोटी[9] भरी पारडां[10] । तारामतीच्या तनूचा धडा[11] । करूनि, वोपी[12] तापसा. ॥ १४ ॥ ऋषिकरीं वोपूनि धन । हातीं धरिली[13] गुणनिधान[14] । जेंवी का श्रुति अवर्णवदन[15] । स्पर्श करी कल्पांतीं[16]; ॥ १५ ॥ कीं ते पवित्र शिळा गंडकी[17] । पशुघ्नें[18] नेली मांसतुकीं[19] । ना तरी जान्हवीजळ मद्यकीं[20] । मद्यालागीं घेतलें[21]; ॥ १६ ॥ तैशी पवित्र राजबाळा । शिबिके वाहूनि गुणवेल्हाळा[22] । भोंवतीं वेष्टिती कामिनीपाळा[23] । उदक[24] डोळां ढाळिती. ॥ १७ ॥ कुमरकांतावियोगानळें[25] । भडका उठतां हृदय पोळे । म्हणे, 'काय[26] जाश्वनीळें[27] । तिघां केल्या तीन वाटा.' ॥ १८ ॥ कुंटिणी म्हणे, 'वो! सुंदरी! । तुझा भाग्यलक्षणतमारी[28] । उदयो झाला[29] म्हणोनी घरीं[30] । दैवें आलीस आमुच्या. ॥ १९ ॥ आम्हांऐशिया तुझिया दासी । सकळ वैभवा स्वामिणी होशी ।

---

१. स्त्रियेच्या मस्तकावर. २. सुस्वरूप+तारुण्य+सौंदर्य. ३. कुंटीण. तारामतीला विकत घेण्याकरितां कुंटीण आली असें वर्णन मूळांत नाहीं. ओंव्या १२–२४ ह्या मुक्तेश्वराच्या पदरच्याच आहेत. ह्यावरून मूळपोथी जवळ ठेऊन मुक्तेश्वर ग्रंथरचना करीत नसे, असें अनुमान होतें. ४. सुस्वरूप स्त्री. ५. 'मोल पुसे तियेचें' असा अन्यपाठ. ६. 'सौंदर्यें' असें पाठांतर. ७. 'मागवी धना' असा पाठभेद. ८. 'धडा' असें पाठांतर. धडा=दहा शेर वजन. ९. सोन्याच्या लगडी. 'कनककोटी भरी' 'कनक भरिलें' असे पाठभेद. १०. (तराजूच्या) पारड्यांत. ११. तारामतीच्या शरीराचें वजन. (धडा=भारंभार वजन.) १२. (तारामतीच्या भारंभार द्रव्य) तापसा (विश्वामित्रास) वोपी (अर्पी, देई). १३. 'धरूनि' असें पाठांतर. १४. सद्गुणांचें भांडारच अशी (तारामती). १५. म्लेच्छाचें तोंड. १६. प्रळयकाळीं. १७. गंडकी नदींतील शिळा (दगड). गंडकीनदींत शालिग्रामशिला सांपडतात–अशी प्रसिद्धि आहे. १८. खाटकानें. १९. मांस तोलण्याकरितां. २०. मद्य तयार करणाऱ्यानें, कलालानें. २१. 'वोतिलें' असा अन्यपाठ. २२. आपल्या गुणांनीं दुसऱ्यांच्या मनास चटका लावणारी. २३. स्त्रीसमुदाय. 'कुंभिनीपाळा' असें पाठांतर.कुंभिनीपाळ=पृथ्वीपाळ (राजा). २४. अश्रुपात करिती–हा इत्यर्थ. २५. पुत्र (रोहिदास), कांता (तारामती) यांच्या वियोगरूपी अग्नीच्या योगानें. २६. 'हा! कर्मा!' असा पाठभेद. २७. शिवानें. २८. तुझें सुदैव हाच तमारी (अंधकारनाशक सूर्य). 'तुझ्या भाग्यें पद्मिणीवरीं' व 'तुझिया भाग्यपद्मावरी' असे अन्यपाठ. पद्मिणीवर=कमलिनीपति(चंद्र). २९. 'केला' असें पाठांतर. ३०. पाठभेद:–दारीं.

तूंचीं पढियंती[1] रायाशीं,[2] । होशील पात्र[3] प्रीतीचें.' ॥ २० ॥ ऐशिया परी ते कुंटिणी । बुझावीत[4] मवाळ[5] वचनीं । तारामतीचा शोकवन्ही । विषादवातें[6] पेटला.[7] ॥ २१ ॥ शिबिकेआंतुनी तारामती । उडी टाकुनी खालती । धांवोनी म्हणे, 'प्राणपती! । इच्या हातीं न द्यावें'. ॥ २२ ॥ राजा म्हणे, 'तूं तपोधना । प्रार्थूनि सोडवीं आपणा.' । येरी लागोनी ऋषिचरणा । 'मज सोडवीं यांपासोनी.[8] ॥ २३ ॥ इचें आचरण दिसे दुष्ट[9] । माझा स्वधर्म[10] पावेल भ्रष्ट । शेखीं[11] माझ्या जिवा वाट । होईल प्राप्त नरकाची.'[12] ॥ २४ ॥ कांहीं कोप, कांहीं करुणा । करूनि, वोपिलें तिचिया धना । तंव काळकौशिक तथा[13] क्षणा । ग्राहक आला सुंदरी.[14] ॥ २५ ॥ तो परम पवित्र श्रोत्री[15] । सदाचारी अग्निहोत्री[16] । धर्मशाळे अन्नसत्रीं । पाकालागीं[17] घेतसे.[18] ॥ २६ ॥ पवित्र तारामतीचें तुक[19] । तुकोनि दिधलें शुद्ध कनक[20] । राजांगनेसी[21] काळकौशिक । घेऊनी जातां आश्रमा;[22] ॥ २७ ॥ रोहिदास म्हणे, 'जी! ताता! । मातृस्नेहें[23] कळवळ[24] चित्ता । भेटोनि येईन मागुता । वेळ न लागतां क्षणमात्रें.'[25] ॥ २८ ॥ राजा

१. आवडती. [पढियंती—हा शब्द ज्ञानेश्वरींत आढळतो.] २. पाठभेदः—नृपासीं. ३. 'ज्ञालीसी पात्र प्रीतिलें' असा पाठभेद. ४. समजावी, समजूत करी. (बुझावणें=कोणतीही गोष्ट मनांत भरवून देणें). ५. मृदु, कोमळ. ६. विषादरूपी वायूनें. विषाद=उत्साहभंग, दुःख. ७. 'विशेष पेटे वचनानलें' असा अन्यपाठ. ८. कुंटिणीच्या घरीं जावें लागणार ह्या संकटांतून. 'म्हणे माझिया प्राणां सोडवीं' असा अन्यपाठ. ९. 'नष्ट' असें पाठांतर. १०. 'माझा स्वधर्म' ह्या शब्दांवरून तारामतीला आपल्या पातिव्रत्याविषयीं केवढा अभिमान वाटत असे, हें कळतें. 'माझें पातिव्रत्य पावेल नष्ट' 'माझें पतिव्रत पावेल भ्रष्ट' असे अन्यपाठ. ११. शेवटीं. १२. शेखीं माझ्या जीवा नरकाची वाट प्राप्त होईल—असा अन्वय. १३. 'तपोधना' असा पाठभेद. १४. सुंदरीला, सुंदर स्त्री विकत घेण्याकरितां. १५. वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण. [ मागें अध्याय ३, ओं० २५ वरील टीप पहा.] १६. ब्राह्मणांनीं अग्नि बाळगून सांजसकाळ होम करावा, असें जें कर्म तें करणारा. १७. स्वयंपाक करण्याकरितां. १८. 'घेतलीं' असें पाठांतर. १९. तुक=भारंभार सोनें. (तुक म्हणजे मनुष्यादिकांचें अंगचें महत्व, वजन—असा मूळ अर्थ.) २०. सुवर्ण, सोनें. २१. राजभार्येस. 'तारामतीसि' असें पाठांतर. २२. ओंव्या २७–२८ ह्या दोन ओंव्या मिळून अन्वय होत असल्यामुळें येथें **'युग्मक'** आहे. तीन पद्यें मिळून अन्वय होत असल्यास **'विशेषक;'** चार पद्यें मिळून अन्वय होत असेल तर **'कलापक;'** व पांच पासून पंधरा पद्यें मिळून अन्वय होत असल्यास **'कुलक'** असें म्हणतात. २३. मातृप्रेमामुळें. २४. कळवळा, दुःखामुळें किंवा प्रेमामुळें अंतःकरणास द्रव येतो तो. 'कवळी' असें पाठांतर. २५. 'क्षणार्धें' असा अन्यपाठ.

म्हणे [1]सगद्गद वचनें, । 'भेटोनि मागुती शीघ्र [2]येणें.' । मातृ [3]पाठीं धांवतां तेणें । आलें [4]देखे बाळक. ॥ २९ ॥ उभी राहुनी वेल्हाळा । पोटेशीं [5]कवळूनी बाळा । स्तन घालूनि मुखकमळा । कुरवाळुनी बुझावी. ॥ ३० ॥ [6]म्हणे, 'बाळका! कुळभूषणा! । रोहिदासा! आनंदघना! । [7]तुझ्या न देखतां वदना । मी दुःखी तुजविणें.' ॥ ३१ ॥ आंसवें भरुनी उभय नयन । 'हाहा!' शब्दें करी रुदन । [9]परतापक्लेशें सज्जन । [10]नवनीत तैसे वितुळती. ॥ ३२ ॥ काळकौशिक म्हणे, 'माते! । स्नेह सांडूनि चालिजे [11]चित्तें । कृपा केलिया [12]कमळाकांतें । योग[13] होईल दोघांचा.' ॥ ३३ ॥ येरी ऋषीचे पादें-[14]पद्मीं । नमूनि म्हणे, '[15]तात! स्वामी! । माझें बाळक घ्यावें तुम्हीं । सेवा करील [16]चरणाची.' ॥ ३४ ॥ करुणा येतां ब्राह्मणोत्तमा । अर्ध तुक वोपिलें [17]हेमा; । कुमारासहित [18]राजभामा । स्वकीय [19]धामा आणिली. ॥ ३५ ॥ तुकें दोन उरलें

१. 'सद्गदित' असें पाठांतर. २. ये, आलें पाहिजे. क्रियावाचक नामें क्रियापदाबद्दल उपयोगांत आणण्याचा प्रघात आहे; मागें, पृ० ६७, टी० १ पहा. ३. तणें (हरिश्चंद्रानें जावयास सांगितल्यामुळें) मातृ (माता, तारामती) बाळक (रोहिदास) पाठीं धांवतां (पाठीमागून धांवणारें) आलें [असें] देखे—असा अन्वय. ४. 'जननी देखे' 'जाणोनी (पा० भे० जन) देखे बाळका' असे पाठभेद. ५. 'पोटिसीं कवळिलें सकुमार बाळा' असा अन्यपाठ. ६. तारामती म्हणे. ७. 'तुझा वियोग झाला प्राणा' व 'तुझा वियोग न साहवे प्राणा' असे पाठभेद. ८. पाठभेदः— परी तापसदक्षिणेचिया ऋणा । नेदूं (पा० भे० नेऊं) कैशी तुजवीणें? ९. 'परतापें क्लेश सज्जना' असें पाठांतर. १०. लोण्याप्रमाणें. लोण्याला उष्णता लागतांच तें वितुळतें त्याप्रमाणेंच सज्जनांच्या हृदयास परदुःखरूपी ताप (उष्णता) लागतांच तें वितुळतें (दयार्द्र) होतें—असा भावार्थ. 'परदुःखेनापि दुःखिता विरलाः' अशी कव्युक्ति आहे परंतु ती सज्जनांस लागू नाहीं, हें स्पष्टच आहे. ११. 'पंथें' असें पाठांतर. १२. लक्ष्मीपतीनें. १३. भेट. १४. चरणकमळास. १५. तात=पूज्य पुरुष. 'तातः पितरि पूज्ये च' इति कोषः. १६. मूळांतील तारामतीचें भाषण चटकदार आहे. त्याचा थोडक्यांत मासलाः—'बा! घेतली जशी हे मी दासी, हाहि बाळ घे दास । तव कार्यसाधिका कसि, जरि या होईन पात्र खेदास? ॥ १ ॥ गाईशीं वत्स जसा, मजशीं हा शिशु तसा करीं युक्त । बापा! प्रसन्न हो, या दासीचें हेंचि चालवीं उक्त. ॥' [मोरोपंत—हरिश्चंद्राख्यान—अध्याय. २ गीति ५५–५६.] १७. सुवर्ण. काळकौशिकानें राजाच्या उत्तरीयवस्त्रांत सुवर्ण बांधिलें व तो रोहिदास व तारामती यांस घेऊन गेला—असें वर्णन मूळांत आहे. १८. राजस्त्री. १९. गृहा. मुक्तेश्वरानें मूळांतील बराच भाग येथें गाळिला आहे. स्त्री व पुत्र यांस काळकौशिक घेऊन गेल्यावर राजानें केलेला विलाप व त्याचें आत्मनिंदापर आत्मगत भाषण वाचण्यासारखें आहे. [मोरोपंत हरिश्चंद्राख्यान—अध्याय २ गीति ६०–६५ पहा.]

ऋण । यालागीं रायें घेतलें तृण । माथां बांधोनी आपण । उभा ठेला हाटवटीं[1]. ॥ ३६ ॥ नगरवासी नारी नर । देखतां नयनीं ढाळिती नीर. । म्हणती, 'चंडाळ ऋषीश्वर । विकाया[2] नृप घातला.' ॥ ३७ ॥ मात फांकली[3] नगरीं । वीरबाहो[4] दुराचारी । श्वपच[5] यातीचा प्रेतपुरी-[6]। नाथ जाणा प्रत्यक्ष[7]. ॥ ३८ ॥ तामस[8] तनूची दुर्गंधी । विशाळरूपी[9] तालस्कंधी[10] । तया देखोनि सज्जनमांदी[11] । दुरी ठेली पहात[12]. ॥ ३९ ॥ होमशाळेमाजी[13] श्वान । कीं ग्रहणीं सिंहिकानंदन[14] । धनकुंभीं[15] पिशाचगण । प्रकटे तैसा पातला. ॥ ४० ॥ तया डोंबाचिये[16] गृहीं । धनालागीं मर्यादा[17] नाहीं । गंगातटीं प्रेतदाहीं[18] । द्रव्य वोपिती तयातें. ॥ ४१ ॥ डोंब म्हणे, 'गा ! साचें[19] । काय मोल सांग याचें[20]?' । ऋषि म्हणे, 'दे ह्याचें । दोन तुकें सुवर्ण'. ॥४२॥ ऐसें बोलतांची[21] कौशिकें[22], । डोंबें तुकोनी दिधलें कनक. । नृपा नेतां सकळ लोक । शोक करिती आक्रोशें.

---

१. बाजारांत. २. 'विक्रया' 'विकरा' अशीं पाठांतरें. ३. 'प्रगटतांचि' असा पाठभेद. ४. मूळांत याचें नांव 'प्रवीर' असें सांगितलें आहे. ५. चांडाळ. (श्वपच=कुत्रीं शिजवून खाणारा.) ६. यम. ७. मूर्तिमंत, साक्षात्. ८. तमोगुणयुक्त. ९. भव्यरूपी. १०. ताल (ताड) वृक्षाइतके ज्याचे स्कंध (खांदे) उंच आहेत असा, फार उंच. 'अर्गळास्कंधी' असें पाठांतर. ११. सज्जनांचा समुदाय. १२. 'दुरी जाहली पाहतां' असा अन्यपाठ. १३. होमशाळा आणि श्वान यांचा दाखला मुक्तेश्वराच्या कवितेंत ठिकठिकाणीं आढळतो. [सभापर्व—अध्याय १५।२४ आदिपर्व—अध्याय १८।८८, अध्याय २०।८० आणि वनपर्व—अध्याय १३।१५ पहा.] १४. राहू. [मुक्तेश्वर—आदिपर्व—अध्याय ४ पहा.] १५. द्रव्य पुरून ठेविलेल्या मडक्यावर. 'निधानकुंभीं' असा पाठभेद. हा दाखला मुक्तेश्वराच्या कवितेंत ठिकठिकाणीं आढळतो. १६. एक अतिशूद्रांची जात, महार. १७. सीमा, गणती. १८. प्रेत दहन करण्याबद्दल. 'प्रेतदाही' (=प्रेत दहन करणारे) 'प्रेतवाही' असे पाठभेद आहेत. १९. खरोखर. 'तंव डोंब बोले रायाप्रती । तुझें द्रव्य देणें किती । तें सांग पां निगुती । एकाची बोलें निर्धारें. ॥' [विष्णुदासनामा—हरिश्चंद्राख्यान—अ० ५।९६.] २०. हरिश्चंद्रराजाचें. 'येरू म्हणे देहाचें' असा अन्यपाठ आहे, तो घेतला तरी पुढच्याच ओवींत 'ऐसें कौशिक बोलतांची' इत्यादि वाक्य आहे, त्यावरून हें भाषण विश्वामित्राचें आहे यांत कांहीं शंका नाहीं. 'गा ! तयाचें' असा पाठभेद. २१. बोले तों—असा अन्यपाठ. २२. हरिश्चंद्रानें आपण होऊन आपल्यास डोंबास विकलें, असें मूळांत नाहीं. स्त्रीपुत्रांस विकून जें द्रव्य प्राप्त झालें तें त्यानें विश्वामित्रास दिलें, परंतु तें थोडें असल्यामुळें राजावर विश्वामित्र फार रागावला. तेव्हां राजा आपल्या मस्तकास तृण बांधून 'मला कोणी विकत घ्या,' असें नागरिकांस विनवूं लागला. त्याचे ते शब्द ऐकून प्रवीरनामक डोंब त्यास विकत घेण्यास सिद्ध झाला. परंतु तो हीनयाति असल्यामुळें, हरिश्चंद्र त्याचें दास्य पतकरण्यास कबूल होईना.

॥ ४३ ॥ हरिश्चंद्र पवित्र परम । त्यासही प्राप्त दुष्ट कर्म । [1]भोगणें घडे धाम । अंत्यजाचें अपवित्र. ॥ ४४ ॥ [2]श्वपचगृहा पवित्र नृपति । चालतां, मार्गीं पसरल्या अस्थी । [3]गैलद्रक्त चर्मे वाळती । दुर्गंधी घ्राणीं बैसली. ॥४५॥ अस्थी चुकवुनी ठेवी पाय । तंव देखिलें डोंबालय । रत्नखचित [4]हाटकमय । अतिरमणीय [5]साजिरें. ॥ ४६ ॥ [6]पण्यांगनेचें शृंगारयौवन । रसें परिपक्व [7]वृंदावन । कुटिल नराचें [8]बाह्याचरण । पतिव्रतापण [9]जारिणीचें. ॥ ४७ ॥ ऐशिया परी श्वपचधाम । [10]ऐश्वर्य मनोरम । जेवी का [11]पैशुन्याचें नाम । '[12]दयाळ' ऐसें बोलिजे. ॥ ४८ ॥ तया [13]धामशिखरावरी [14]पद्मिनी । रूपलावण्यचातुर्य-

---

तेव्हां विश्वामित्र अत्यंत क्रोधाविष्ट होत्साता राजास कठोर शब्दांनीं ताडण करूं लागला, यास्तव राजानें अत्यंत नम्रतापूर्वक आपलें मस्तक विश्वामित्राच्या चरणांवर ठेवून, प्रार्थना केली कीं 'हे भगवान्! मी सूर्यवंशांत जन्मलों आहे तेव्हां केवळ द्रव्यलोभानें चांडालाचें दास्य कसें पत्करावें? आपण शाप दिला तरी पत्करला. हे तपोनिधि! आपण प्रसन्न व्हावें. मी आपला दास आहें, मी आपला भक्त आहे. चांडालस्पर्शापेक्षां जास्त दुःखदायक दुसरी वस्तु नाहीं, यास्तव प्रसन्न व्हावें.' असें म्हणून विश्वामित्राचे दोन्ही पाय घट्ट धरून ठेविले. 'मी आपला दास आहें' असे राजाचे तोंडचे शब्द ऐकितांच ऋषीनें सांगितलें कीं 'जर तूं माझा दास आहेस, तर मी एक अर्बुद द्रव्य घेऊन, तुला चांडालास विकलें आहे.'–असें वर्णन मूळांत आहे [मार्कंडेयपुराण–अध्याय ८ पहा.] हा सर्व भाग श्रीधरस्वामी व विष्णुदासनामा यांनींही गाळला आहे. पंतांनीं मात्र वर्णिला आहे. [हरिश्चंद्राख्यान–अध्याय ३ गीति ६७–८८पहा.]

१ 'भोगणें घडे अपवित्र धाम । अंत्यजाचें कुश्चिळ. ॥' असा अन्यपाठ. २. चांडाळाच्या घरीं. 'श्वपचवाडां' (=महारवाड्यांत) असें पाठांतर. ३. ज्यांतून रक्त गळत होतें अशीं. ४. सुवर्णमय. ५. साजिरें=सुंदर. 'सज्ज' यावरून साज, साजणें आणि त्यावरून 'साजिरें' म्हणजे शोभणारें, सुंदर अशी 'साजिरें' शब्दाची व्युत्पत्ति दिसते. ६. वेश्येचें, वारांगनेचें. ७. कडू वृंदावन नामक फळ, कंवडळ. 'विलसे परिपक्व इंद्रावन' असा पाठभेद. ८. दिखाऊ वागणूक, ढोंग, दंभ. ९. व्यभिचारी स्त्रीचें. जी स्त्री दोन पुरुषांजवळ रत झाली ती जारिणी होय–असें महाभारतांत सांगितलें आहे. [सभापर्व–अध्याय ६८ श्लोक ३८.]—'एका स्पर्शतां पवित्र गृहिणी । दोघां स्पर्शतां जारिणी । तिघां गुह्य देखतां नयनीं । पण्यांगना बोलिजे. ॥ [मुक्तेश्वर–सभापर्व–अ० १५।१०३]. १०. 'अधाचरण' 'अद्याश्चर्य' अशीं पाठांतरें. ११. खाटिकाचें. १२. दयाळू. नांव 'दयाळू' पण करणी कसाबाची–हा इत्यर्थ. केव्हां केव्हां नांवें करणीशीं किंवा स्थितीशीं फारच विसंगत असतात:–(१) नांव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा. (२) भिकाऱ्याचें नांव धनपाळ. (३) मेलेल्या मनुष्याचें नांव अमरनाथ इत्यादि. या संबंधें दासबोध द० १४, स० १०, ओं० ६–१५ पहा. १३. घरच्या उंच भागावर (माडीवर किंवा गच्चीवर) 'धामासी खरी' असा अन्यपाठ आहे परंतु तो सरस नाहीं. १४. उत्तम लक्षणांनीं युक्त अशी स्त्री, मागें, पृ० १३१, टी० २ पहा.

[1]खाणी । उभी [2]वेल्लभा [3]लक्षीत नयनीं । वेष्टित [4]दासीदशकेशीं. ॥ ४९ ॥ वल्लभापाठीं [5]राजचिन्ही । पुरुष देखोनी [6]भाविलें मनीं; । प्रेतदहनालागीं कोणी । धन घेउनी पातला. ॥ ५० ॥ हर्षे [7]उतरोनी लवलाहें । बाहेर येउनी जंव पाहे । तंव राजा [8]कवळोनी बाहे । [9]वीरबाहू आणीत. ॥ ५१ ॥ आदरें बोलावूनि कांते । नृप वोपिला धरूनि हातें, । म्हणे, 'काज सांगिजे यातें । [10]बाह्यवर्तीचें सर्वदा.' ॥ ५२ ॥ ते म्हणे, 'हा [11]रोड [12]रोगी । याच्या कामा लागो [12]आगी । शक्ती कैंची याचे आंगीं ? । [13]संजीव प्रेता आणिलें.' ॥ ५३ ॥ [14]रांगें आणूनि घागरी । ठेविली नृपवराचे शिरीं । म्हणे, 'उदक आणीं झडकरी । भागीरथी गंगेचें.' ॥ ५४ ॥ कुंभ घेऊनि भूपाळ । भरी भागीरथीचें जळ । [16]कौशिकें येऊनि मांडिला छळ । तयावेळीं [15]रायाचा. ॥ ५५ ॥ कुंभ घेवोनि जातां पुढें । हाणोनि फोडियला दंडें । हातें लोटोनि देतां पडे । तोंडघशीं पालथा. ॥५६॥ शरीर [17]थरथरा गळत । [18]अंत्यजें देखिला [19]रितौ येत । कोपा चढला अत्यद्भुत । धांवोनि मारी [20]चंडकणा. ॥ ५७ ॥ 'वृथा पोशिला

१. 'रूपलावण्यगुणी विलासिनी' असा अन्यपाठ. २. पतीस, भ्रतारास. **'वल्लभो** दयितेऽध्यक्षे सलक्षणतुरंगमे' इति कोशः. ३. (वाट) पाहात. ४. दहा दासींनीं. जिच्या सेवेला दहा दासी होत्या अशी. ५. राजचिन्हांनीं युक्त. ६. मानिलें, कल्पना केली. ७. माडीवरून खालीं उतरून. ८. तंव राजा (राजास) बाहे (हातानें) कवळोनी (धरून)= राजाचा हात धरून—हा इत्यर्थ. हरिश्चंद्र पळून जाईल म्हणून त्यास बांधून, चांडालानें आपल्या घरीं नेलें. (देवीभागवत—स्कंध ७, अध्याय २४.) ९. 'वीरबाहूनें आणिला' असें पाठांतर. १०. घराबाहेरचें. 'बाह्यसेवेचें अखंड' 'ब्रह्मवृत्तीचें सर्वथा' असे पाठभेद. चांडालानें हरिश्चंद्रास आपले बायकोचे स्वाधीन केलें, असें वर्णन देवीभागवतांत नाहीं. राजास चार दिवस बंदींत ठेवून परस्पर स्मशानांतील कामगिरीवर पाठविलें—असें वर्णन आहे (स्कंध ७, अध्याय २४). ११. 'हा रोडांगी' असें पाठांतर. १२. 'याच्या कर्मा लागो आगी' असा अन्यपाठ. 'आग लागो' 'जळलें मेलें' हे शब्दप्रयोग बायकांच्या प्रचारांतीलच आहेत. १३. जीवंत असूनही प्रेतासमान (निर्बल) असा जो हरिश्चंद्र त्यास. १४. डोंबस्त्रीनें हरिश्चंद्रास पाणी आणावयास लावण्यापूर्वी दळावयास लाविलें—असें वर्णन **'पांडवप्रतापां'**त आहे:—'पांघरावया पटकुर । हरिश्चंद्रास देत महार । झाडी आंगण समग्र । केर बाहेर टाकीतसे ॥ १ ॥ रायाहातीं महारीण दळवीत । तरतरां फोड हातास येत । रक्त असे वाहात । परि न दावी तयांसी. ॥ २ ॥ ज्या हातें करोनि दान । केले सुखी पृथ्वीचे ब्राह्मण । त्याच हातेंकरून । करी दळण डोंबाघरीं. ॥ ३ ॥' [श्रीधर—पांडवप्रताप—अध्याय ३० ओंव्या २१४—१६.] १५. 'गुप्तवेशें पाठीसी' असा पाठभेद. १६. 'कौशिकें वाटेशी निवाडें । येउनी मांडिला दगड ।' असा अन्यपाठ. १७. 'शरीर थरथरां कांपत' असाही पाठ आहे. १८. डोंबानें. १९. रिकाम्या हातानें येत असलेला. २०. चपराक, चपाटी, थप्पड.

धष्टपुष्ट[1] । प्रथम मुहूर्तीं फोडिला घट । तुझेनी[2] न होती कष्ट । तरी कां आम्हां नागविलें?' ॥ ५८ ॥ राजा म्हणे, 'विशाळ घागरी । भरूनि[3], गेलों जी! चांचरी[4]; । कोप सांडुनी मजवरी । क्षमा केली पाहिजे.' ॥ ५९ ॥ मग[5] दुजी घागरी लहान । देऊनि म्हणे, 'भरीं रांजण । हे फोडिशी तरी प्राण । घेईन तुझा तात्काळीं[6].' ॥ ६० ॥ दुजा कुंभ घेउनी माथां । शीघ्र पाणी[7] भरुनी आणितां । रांजणीं जाउनी गुप्तता[8] । फोडी तत्वतां बुडुखीं[9]. ॥ ६१ ॥ उदयापासोनि[10] अस्तवरी । राजा कष्टें उदक भरी । बिंदुमात्र न थारे[11] वारी[12] । अभिषेकपात्रासारिखें. ॥ ६२ ॥ जैसों[13] भाग्यहीनाचा उदिम[14] । कीं वंध्यांगनेशीं रतिकाम । तेवीं अहोरात्र करितां श्रम । कष्ट त्याचे निष्फळ. ॥ ६३ ॥ ऐसे-परी तो नृपराज । क्लेश पावे करितां काज । अस्ताचळा मित्रराजें[15] । जातां विनवी[16] अंत्यजा. ॥ ६४ ॥ 'वर्णाश्रमाचा[17] सेतु[18] न ढळे । स्वामिसेवेचा पंथ चाले । ऐसें[19] पाहिजे केलें । अन्नदान, स्वामिया!' ॥ ६५ ॥ अंत्यजें जाउनी आपण । नृपा वोपिलें शुष्कान्न[20] । भार्गवशाळेचें[21] भांजन[22] । आणि इंधनआज्यादि[23]. ॥ ६६ ॥ नृपें[24] बांधोनी पदरीं । घेउनी गेला[25] गंगातीरीं । स्नान सारुनी, सामुग्री । घेउनी, पाक सारिला. ॥ ६७ ॥ हृदयस्थदेवार्चन[26] । करुनी, पात्रीं वोगरिलें[27] अन्न । गोग्रास[28] काढुनी, वदन । तृप्त केलें अग्नीचें[29]. ॥ ६८ ॥ एक

---

१. येथील वर्णनांत किंचित् विरोध आहेसा वाटतो. कारण डोंबस्त्रीला प्रथम हरिश्चंद्र राजबिंडा दिसला (ओं० ५०), पुढें ती त्याला रोगी व रोड म्हणून नांवें ठेवूं लागली (ओं० ५३) व आतां डोंब त्याला धष्टपुष्ट म्हणतो! २. तुझ्यानें, तुझ्या हातून. ३. 'भारें' असा पाठभेद. ४. चांचरी गेलों=पाय अडखळून पडलों. चांचरी=(१) अडखळणें. (२) खडकाळ जागा. ५. 'दुजी या घागर बहु लहान' असा पाठभेद. ६. 'अविलंबें' असें पाठांतर. ७. 'ऋषि छिद्र पाडी' असा अन्यपाठ. ८. गुप्तपणानें, गुप्तरूपानें. 'तत्वता' असा अन्यपाठ. ९. बुडाशीं, तळांत. (बुडुखा=बुडका, बुडखा=मूळाकडील विभाग, बूड.) १०. सकाळपासून संध्याकाळपर्यंत. ११. न थारे=न राही, स्थिर न होई. 'नसे' असें पाठांतर. १२. पाणी. १३. ही ओंवी आमच्याजवळील एका पोथींत आढळत नाहीं. १४. व्यापार, उद्योगधंदा. १५. सूर्य. 'मित्रपंकज' असा पाठभेद. १६. 'जाणवी' असा पाठभेद. १७. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र—हे चार वर्ण; आणि ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, व संन्यास—हे चार आश्रम. १८.मर्यादा, नियम, कायदा. १९.ऐसें (पहिल्या दोन चरणांत सांगितलेल्या प्रकारचें) अन्नदान केलें पाहिजे—असा अन्वय. २०. कोरडें अन्न, न शिजविलेलें अन्न. २१. कुंभाराच्या कारखान्यांतील. २२. पात्र (मडकें). २३. इंधन (सर्पण)+आज्य(तूप) वगैरे. २४. 'नृप सुस्नात' असें पाठांतर. २५. 'आला' असें पाठांतर. २६. त्याच्या हृदयांत वास करीत असलेल्या देवाची पूजा. (ओंवी ६ पहा.) २७. वाढिलें. २८. गाईकरितां निराळें ठेवलेलें अन्न. २९. अग्नीला आहुति दिली—हा इत्यर्थ.

विष्णु सर्वां घटीं । सर्व भूतें ज्याचे पोटीं । तरी संकल्पविकल्पाची गोष्टी । कल्पनेची कायशी? ॥६९॥ भोज्य[1], भोक्ता[2], भोजन, । त्रिरूपें एक नारायण । ब्रह्मीं ब्रह्म ब्रह्मार्पण[3] । करिता झाला या बोधें[4]. ॥ ७० ॥ ग्रास घालावा जंव वदनीं । तंव ब्राह्मणवेशें[5] कौशिक मुनी । तेथें पातला, भोजनीं । इच्छा धरुनी क्षुधार्थी[6]. ॥ ७१ ॥ उदरपृष्ठीची[7] घडी । करूनि चरणांची[8] वेंगेडी[9] । झोंक सांवरितां दंडीं[10] । शब्द तोंडीं न बोलवे[11]. ॥ ७२ ॥ करसंकेत[12] देउनी मुखा । देखोनि, दया आली नृपनायका । म्हणे, 'त्रैलोक्यजनका[13]! । स्नान कीजे सत्वर.' ॥ ७३ ॥ स्नान सारितांच ब्राह्मण । नृपें द्विभागिलें[15] अन्न । एक वोपी[16] मुनी- लागोन । एक ठेवी आपणा. ॥ ७४ ॥ ब्राह्मण देखोनी[17] क्षुधार्थी । राजा म्हणे, 'इतुकेन तृप्ती । कैशी पावेल हे मूर्ती!' । म्हणोनि मागें राहिला[18]. ॥ ७५ ॥ ब्राह्मण बैसवुनी पात्रीं । जेवितां मिटक्या मोरी वक्त्रीं[19]; । म्हणे, 'बहुतां दिवशीं नेत्रीं । आजी अन्न देखिलें.' ॥ ७६ ॥ स्वकीय भाग तो भक्षिला । दुजि- याशीं नेत्रें[20] लाविला; । नृपें जाणुनी, पात्र[21] गोळा[22] । करूनि, वोपिलें[23] स्वभाग. ॥ ७७ ॥ तृप्ति पावोनि ऋषीश्वर । उठिला देवोनि ढेंकर । उदक[24] मात्र नृप- वरें । चार अंजली सेविल्या. ॥ ७८ ॥ पोट कसोनी कंडासीं[25] । सदा सादर

---

१. जें भोजन करावयाचें तें. २. भोजन करणारा. ३. 'ब्रह्मभावें' असें पाठांतर. ४. सर्वभूतीं नारायण भरला आहे व सर्वरूपें (भोज्य, भोक्ता इत्यादि) तोच धारण करितो, असा बोध झाल्यामुळें. ५. 'ब्राह्मणरूपें' असें पाठांतर. ६. क्षुधित, भुकेलेला. ७. पोटाची व पाठीची. ८. 'चरणा व- ळिल्या' व 'चरणावली' असे अन्यपाठ. ९. वांकडेतिकडेपणाची स्थिति. १०. काठीवर. ११. या ओवींत वृद्ध व भुकेनें व्याकुळ झालेल्या ब्राह्मणाचें सुरेख शब्दचित्र मुक्तेश्वरानें चितारिलें आहे. येथें '**स्वभावोक्त्य**'लंकार आहे. १२. 'करें संकेत दाउनी मुखा' असा अन्यपाठ. १३. आमच्या जवळील एकाच पोथींत मात्र हा शब्द आढळतो. इतरांत तो गाळलेला आहे. १४. 'त्रैलोक्यनायका' असा पाठभेद. १५. अन्नाचे दोन भाग केले. १६. 'अर्पी' असें पाठांतर. १७. 'म्हणे बहु' असें पाठांतर. १८. ब्राह्मणाबरोबर जेवावयास बसला नाहीं—हा भावार्थ. १९. पाठभेदः—वाजती. २०. 'दुजिया भागा लाविला डोळा' असा अन्यपाठ. डोळा लावणें= आशाळभूतपणानें पाहणें, अतृप्त नजरेनें निरखिणें. २१. येथें 'पात्र' शब्दाचा लक्षणेनें 'पात्रां- तील अन्न' असा अर्थ घेणें इष्ट आहे. तेव्हां 'पात्रांतील अन्न' हा '**लक्ष्यार्थ**' होय. शास्त्रकारांनीं अर्थाचे तीन प्रकार सांगितले आहेतः—वाच्यार्थ, लक्ष्यार्थ आणि व्यंग्यार्थ. [मुक्तेश्वर—सभापर्व— (काव्यसंग्रह) पृ. १०१ टीप ४ पहा.] २२. पाठभेदः—गाला । करूनि वोपिलें स्वभावें ॥ २३. 'योजिला' असा पाठभेद. २४. 'उदकआहार' असा अन्यपाठ. २५. कडसून, घट्ट. पोट घट्ट बांधून—हा इत्यर्थ. 'कटासी कसोनी कासेसी' व 'पटका कसोनी कासेसी' असे अन्यपाठ.

सेवेसी. । भोजनकाळीं **कौ**शिकऋषी । येउनी अन्न भक्षीत. ॥ ७९ ॥ निराहार शक्तिहीन । दिसे जैसा रंक दीन । काज न होतां धांवोन । बळें दासी धुमसिती. ॥ ८० ॥ ऐशा परी **ता**रारंगक । सेवा करितां अब्द एक । भरी डोंबाघरीं **गं**गोदक । करी भोजन अर्कातीं. ॥ ८१ ॥ दासी पाहाती रांजणीं । बिंदुमात्र न दिसे पाणी । नृप ताडुनीयां, मूर्ध्नी । कुंभ देउनी धाडिला. ॥ ८२ ॥ निबिड तमाचिया पोटीं । चालतां पंथ न दिसे दृष्टी । कुंभ भरुनी परम कष्टीं । आणुनी पाजी स्वामिया. ॥ ८३ ॥ तंव **वीर**बाहूची अंगना । म्हणे, 'त्यासी ठेवावें स्मशाना । काज न करी हा, सदना । योग्य नव्हे आमुच्या.' ॥ ८४ ॥ **अ**योध्यापाळ पवित्र नृपती । डोंबें रक्षणा ठेविला प्रेतीं । '**मसणखांबा**' ऐसें म्हणती । नाम त्याचें प्रसिद्ध. ॥ ८५ ॥ 'माझिया आज्ञेविना सर्वथा । तुवां जाळूं न द्यावें प्रेता.' । ऐसें सांगोनि नृप-

१. दररोज भोजनाचे वेळीं. २. उपोषित, क्षुधित. ३. बडविती, ठोकिती. ४. तारारमण, तारामतीचा पति (हरिश्चंद्र). रंग=आनंद, विलास. ५. वर्ष. ६. 'ऐशा परी तारारंग । सामग्री घेऊन सांग । भरी डोंबाघरीं गांग । करी संध्यास्नान अर्कातीं ॥' 'ऐसिया परी तारारंग । सेवा करितां अब्दसीम । भरितां डोंब मागे गांग । करितां भोजन रात्रीसी. ॥' 'ऐसिया परी तारारंगें । सेवा करितां अब्दसंगें । कष्ट होती आन योगें । दुःख भोगी सकुमार. ॥ असे पाठभेद आहेत. ७. सूर्यास्तीं. अर्क=सूर्य. पाठभेदः—अर्कास्तीं. ८. 'दासी जंव पाहाती भाजनीं । तंव बिंदु इ०' असा अन्यपाठ. ९. डोकीवर. १०. गाढ अंधकारांतून. ११.'महाकष्टीं' असा पाठभेद. १२. 'श्रम करितां सदना' व 'काज करितां सदना' असे पाठभेद. काज करितां=काजाकरितां, काम करण्याकरितां (?). १३. 'आमुतें' असें पाठांतर. १४. वीरबाहूनें राजास थोडे दिवस आपल्या घरीं काम करण्याकरितां ठेविलें, असें वर्णन मूळांत नाहीं. चांडालानें राजास रात्रंदिवस स्मशानांत राहावयास आज्ञा केली व सांगितलें कीं प्रत्येक प्रेतावर जो कर वसूल करशील त्याचा सहावा भाग राजास द्यावा लागेल. बाकी राहील त्यापैकीं तीन भाग माझे व दोन भाग तुझ्या नोकरीबद्दल तुला मिळतील—असें मूळांत आहे. [मार्कंडेयपुराण—अध्याय ८.] १५. पाठभेद—मसणखांब. १६. पाठभेदः—नानायातींचें प्रसिद्ध. १७. स्मशानांत आल्यावर तरी राजाच्या पाठीमागचा छळवाद बंद व्हावयाचा होता पण नाहीं! माणसें मरणेंच बंद झालें व त्यामुळें डोंबास द्रव्य प्राप्त होईनासें झालें. **श्री**धरस्वामी वर्णन करितातः—'हरिश्चंद्र काशीस गेला । मृत्यु नगरींचा खुंटला । महारीण म्हणे आणिला । निदैव कैंचा घरासी ? ॥ १ ॥ यासि घरास आणिलें । दुखण्यास कोणी न पडे वहिलें । माणूस मरायाचें राहिलें । व्याधिदुःख गेलें गांवांतून. ॥ २ ॥ आमचे हातींचें द्रव्य गेलें । कारटे ब्राह्मण उपवासी मेले । याचें ऋण द्यावयाचें होतें भलें । दोन भार सुवर्ण. ॥ ३ ॥' [पांडवप्रताप—अ० ३०। २३९–४१.]

नाथा । नेउनी ठेविलें[1] स्मशानीं. ॥ ८६ ॥ गंगातीरीं[2] अटोळा[3] । घालुनी बैसविलें[4] नृपाळा[5] । पुढें वर्तलें तें भूपाळा! । श्रवण[6] करीं कुरुवर्या! ॥ ८७ ॥ इति भारतवनपर्वणी[7] । सकळ तीर्थांचिया श्रेणी[8] । जोडती इये ग्रंथश्रवणीं । मुक्तेश्वरकवि [9]वंदे. ॥ ८८ ॥

---

## अध्याय पांचवा.

प्रेतपाळें प्रेतरक्षणा । राजा ठेविलें[11] स्मशाना । तारामती नृपनंदना[12] । कोण कर्म वोढवलें? ॥ १ ॥ काळकौशिकगृहीं सती । पाकशाळे तारामती । रोहिदास शिष्यपंक्तीं । सेवी[13] करी सर्वदा. ॥ २ ॥ ऐसा क्रमिला किंचित काळ । कौशिकें येउनी मांडिला छळ । कुसुमवाटिकेमाजी[14] बाळ । बडव्यांसंगें[15] पातला. ॥ ३ ॥ तंव विश्वामित्र म्हणे, 'तक्षका! । दशनें[16] दंशीं नृपबाळका' ।

१. 'स्थापी' असा पाठभेद. २. 'गंगेचिया तीरीं' असा अन्यपाठ. ३. अटोळा=शेत राखण्याकरितां बसावयाचे उपयोगी पडावी म्हणून जी उंच जागा तयार करितात ती, माच, माळा. [मुक्तेश्वर–वनपर्व अ० ३ ओं. ५ हींत 'आटाळी' हा शब्द आहे, तें 'अटोळा' शब्दाचें स्त्रीलिंगीरूप असावें.] 'अट्ट' म्हणजे शिखर, घराच्या शिखरावरील जागा. 'अट्टाल' म्हणजे वरचा मजला. 'अट्टाल' शब्दापासून 'अटोळा' शब्दाची उत्पत्ति झाली असावी. ४. 'बैसविला' असें पाठांतर. ५. 'नृपाळा' असा पाठभेद. ६. 'श्रवणीं ऐके' असा अन्यपाठ. ७. 'शांतिपर्वणि' असाही पाठ आढळतो!!! ८. ओळी, समूह. ९. मुक्तेश्वरानें ह्या ठिकाणीं मूळांतील पुष्कळ भाग गाळिला आहे. स्मशानवर्णन, दहन करण्याकरितां आणिलेल्या प्रेताच्या आप्तेष्ट जनांचा विलाप, आपली पूर्वस्थिति आठवून राजानें केलेला विलाप, राजाची निद्रा, त्यास निद्रावस्थेंत दिसलेलें स्वप्न, जागृतावस्था प्राप्त झाल्यावर राजानें केलेली इंद्रादि देवगणांची प्रार्थना–इत्यादि प्रसंग मुक्तेश्वरानें वर्णिले नाहींत. पंतांनीं हे सर्व प्रसंग आपल्या 'हरिश्चंद्राख्यानां'त थोडक्यांत वर्णिले आहेत [अध्याय ३ गीति १–३५ पहा]. १०. 'इति……हरिश्चंद्राख्याने स्मशानभूमिरक्षणं नाम चतुर्थोऽध्यायः' असा समाप्तिलेख आहे. ११. 'राजया ठेवियलें' असा अन्यपाठ. १२. रोहिदास. १३. तारामती पाकशाळे सेवा करी [व] रोहिदास शिष्यपंक्तीं सेवा करी–असा अन्वय. १४. फुलझाडांच्या बागेंत. १५. पुजाऱ्यांबरोबर. 'बटुव्यांसंगें' असा पाठ एका पोथींत आढळतो. परंतु तींतच पुढें ओंवी आठ व बारा ह्यांत 'बडवियासंगीं' व 'बडवे' असे शब्द आहेत. तेव्हां येथें 'ड' च्या ऐवजीं 'टु' लेखकप्रमादानें पडला, असें मानणें भाग पडतें. परंतु देवीभागवतांत 'एकदा तु गतो रन्तुं बालकैः सहितो बहिः । वाराणस्या नातिदूरे रोहिताख्यः कुमारकः ॥' (स्कंध ७ अध्याय २५।१) असें या प्रसंगींचें वर्णन आढळतें. १६. दांतानें, दंश करण्याच्या साधनानें.

आज्ञा[1] वंदुनी बाटिका[2] । ठाकुनी आला गुप्तत्वें[3]. ॥ ४ ॥ सुमनगर्भीं[4] वसे[5] भोगी[6] । जेविं कां विजनीं[7] वसे योगी[8] । येथें नृपनंदन[9] अति वेगीं । आला समीप त्या ठायां. ॥५॥ परिमळकरंडा[10] वामहस्तीं[11] । सव्यें[12] सुमनें वेंचुनी भरिती[13] । जाळी[14] वृक्ष वल्ली किती । एक पहाती जळीं स्थळीं[15]. ॥ ६ ॥ मालती[16] मोगरे शेंवती । कमळ पारिजात केतकी । मंदार कांचन चंपक जाती । तुळशी दवणे बिल्वादि. ॥ ७ ॥ भूपाळबाळें बडवियांसंगीं । सुमनें वेंचितां लक्षीत[17] भोगी । दैवें प्रेरिलें[18] असतां वेगीं । त्याचि सुमना पातला. ॥ ८ ॥ तक्षक जयामाजी वसत । तया[19] पुष्पा घातला हात । दंशें[20] केला रोंवूनि दांत । उलथोनि पडे माघारा. ॥ ९ ॥ तक्षकविषाचा अनळ[21] । स्पर्शतां[22] अवरुधे[23] आयुष्यमूळ[24] । तनु[25]-यंत्रींचा प्राणगोळ । जातां पात्र[26] रितें पडे. ॥ १० ॥ ऐशियापरी मागिले[27] कडे । दशन[28] स्पर्शतां उलथोनि पडे । पंच प्राणांचें बिरडें । मोकळें जालें क्षणार्धें. ॥ ११ ॥ बडवे पाहाती जंव दृष्टी । तंव जाळीये व्याळ[29] धुंदाटी[30]; । देखतां भयाभीत पोटीं । पळोनि गेले आश्रमा. ॥ १२ ॥ मातेसी सांगावया

१. ‘ऋषिआज्ञेनें वाटिका’ असा पाठभेद. २. ‘बारीका’ असा पाठभेद. बारीका= बारी=डोंगर, झाडी यांच्या आश्रयामुळें जेथें चोर, व्याघ्र वगैरे असण्याचा संभव असतो ती जागा, भयंकर स्थळ. ३. पाठभेदः—जवळिके. ४. फुलांत. ५. ‘वास’ असें पाठांतर. ६. सर्प. ७. एकांतांत, अरण्यांत. ८. योगसाधन करणारा. ‘करिजे जनीं जेवीं योगी’ व ‘करिजे जेवीं विजनीं योगी’ असे अन्यपाठ. ९. ‘भोगें वोढिला असतां वेगीं । तया सुमना पातला ॥’ असा अन्यपाठ. १०. परिमळकरंडा=सुगंधयुक्त करंडा, फुलांची परडी. ११. डाव्या हातांत. १२. ‘सवेंग सुमनें वेंचिती’ असा पाठभेद. सव्यें= उजव्या हातानें. १३. पाठभेदः—धरिती. १४. जाळी=झाडांची गर्दी, वेलींची एकमेकांत गुंतागुंत. १५. ‘एक वेंचिती जळस्थें’ असा अन्यपाठ. १६. ह्या ओंवीचा अन्यपाठः—‘मालती मोगरे बकुळ केतकी । कमळें सेविती पारिजातकीं । कांचन मंदार चंपकीं । तुळसी दवणे बिल्वादि ॥’. १७. पाठभेदः—लक्षिला. १८. ‘भोगें वेढिला असतां वेगीं । तया सुमना रातला ॥’ ‘काळपाशें बोढिला म्हणोनि वेगीं । त्याचि सुमना रातला ॥’ व ‘कर्म तेचि संधी वेगीं । वोढोनि बळें आणिलें. ॥’ असे पाठभेद. १९. ‘रोहिदास तेथें ये त्वरित’ असा अन्यपाठ. २०. पाठभेदः—दंश करोनि रोबितां दांत. २१. अग्नि. ‘विषाचिया अनळा’ असें पाठांतर. २२. पाठभेदः—स्पर्शतां आयुष्यधना मुकला. २३. उपटे. २४. ‘आयुष्यमळा’ असा अन्यपाठ. २५. शरीररूप तोफेचा प्राणरूप गोळा. हें सुरेख **रूपक** आहे. २६. (शरीररूप) भांडें. ‘देतां पात्र माघारी’ ‘होतां पात्र माघारें’ अशीं पाठांतरें. २७. मागील बाजूस, उताणा. २८. (सर्पाच्या) दशनाचा (दांताचा) स्पर्श होतांच, सर्प चावतांच. ‘दशनस्पर्शें’ असें पाठांतर. २९. सर्प. ३०. झेंप घाली, झडपी. हा शब्द याच अर्थी गोपाळकवीनें योजिला आहेः—तीक्ष्ण बाणांचिया धुंदाटें । ग्रीवेपासाव शिर तुटे । कर्ण क्रोधार्णवाचे लोटें । पृथ्वी वाटे बुडाली. ॥ गोपाळकृत कर्णपर्व, १५।९०. पाठभेदः—धुंधुटी.

सेवडी[1] । न दिसे, गुंतली पात्रें वाढी । पाकशाळे जाउनी तांतडी । वृत्तांत कर्णी[2]
सुचविला[3]. ॥ १३ ॥ परिसोनि पुत्रनिधनवार्ता[4] । मातृहृदयीं शोकसरिता[5] । पूर
उचंबळोनि गर्ता[6] । पूर्ण होती नेत्रांच्या[7]. ॥ १४ ॥ गिळोनि पुत्रशोकार्णव[8] ।
धैर्य जाली कुंभोद्भव[9]; । म्हणे, 'कळतांचि[10] भूदेव[11] । अतृप्तीनें[12] उठतील.' ॥१५॥
अंचळें[13] पुसोनि नेत्रकमळें । करें कवळोनि पंचपाळें[14] । अन्नें करूनि ब्राह्मणकुळें[15] ।
तृप्त केलीं षड्रसें[16]. ॥१६॥ भोजनें होतां सर्वांचीं[17] । दीप्ति[18] लोपली दिनकराची[19] ।
पाउलें वंदुनी ऋषीचीं[20] । सद्गदित अनुवादे. ॥ १७ ॥ 'रोहिदास पूजेचीं
कमळें । आणूं गेला प्रारब्धकौळें[21] । तेथें अवचिता काळव्याळें[22] । दंशिला ऐसें
ऐकिलें[23]. ॥ १८ ॥ आतां जाईन कुसुमवना[24] । शोधूनि पाहेन निजनंदना.' ।
ऐसें बोलोनि सजलनयना[25] । वातवेगें[26] निघाली. ॥ १९ ॥ मोहतमाच्या[27] सागरीं ।
कवळीत शोकार्णवाच्या लहरी[28] । कुसुमवाटिके मातामगरी[29] । अंचळत्यागें[30] भ्रम-
तसे[31]. ॥ २० ॥ म्हणे, 'बाळा! कुलभूषणा! । हृदयस्थानीं[32] प्रेमपान्हा । भेटो-
नियां[33] करीं पाना । अगा! नंदना! वेगेंसीं.' ॥ २१ ॥ ऐशी विलापें भ्रमतां[34]
वनीं । तंव शवा उचलूनि कौशिकमुनी । पुढें ठेवितां, चरणीं । लागुनी पडे[35]

---

१. 'संवगडी' असें पाठांतर. २. पाठभेदः—श्रवणीं. ३. 'सूचिला.' 'सूदला' असे पाठभेद. ४. पुत्रमरणवार्ता. 'पुत्राची निधनता' असा अन्यपाठ. ५. शोकरूप नदी. ६. खांच (खळगा). पाठभेदः—पुढें उचंबळोनी गर्जतां. ७. डोळ्यांच्या. ८. पुत्रशोकरूप समुद्र. ९. अगस्तिऋषि. अगस्तिऋषीनें सर्व समुद्र पिऊन टाकला, अशी कथा आहे. हा रूपकालंकार. १०. [रोहिदास मरण पावला असें] कळतांच. ११. ब्राह्मण. १२. अर्धपोटीं. १३. पदरानें. १४. 'कनकपाळें' असें पाठांतर. १५. ब्राह्मणसमूह. 'कुलं जनपदे गोत्रे सजातीये गणेऽपि च' इति मेदिनी. १६. [मागें, पृ० २२१ टी० १३ पहा.] १७. 'सारितां सर्वेची' असें पाठांतर. १८. तेज, प्रकाश. १९. सूर्याची. सूर्यास्त झाला—हा इत्यर्थ. [दिवाकर= दिवा दिनं करोतीति दिवाकरः. पाणिनि ३।२।२१.] २०. काळकौशिकाचीं. २१. दैव योगानें. २२. काळसर्पानें. २३. 'सांगती' असें पाठांतर. २४. 'कमलबना' असें पाठांतर. २५. जिच्या डोळ्यांतून अश्रु उभे राहिले आहेत अशी. २६. वाऱ्यासारखी वेगानें, फार जलद. २७. मोहांधकाररूपी समुद्रांत. मोह=(१) ममता. (२) चित्तास भ्रम उत्पन्न होण्यासारखा जो धर्मविशेष तो. २८. लाटा. २९. माता (तारामती) हीच मगरी. रूपकालंकार. ३०. अंचळ (पदर) त्यागें (त्यागून)=पदर न सावरतां. पाठभेदः—'अचळ योगें' व 'अचळ अंगें.' ३१. 'जातसे' असा पाठभेद. ३२. 'हृदयस्तनीं' असें पाठांतर. ३३. 'मज भेटोनियां' 'देखोनियां' असे पाठभेद. ३४. पाठभेदः-श्रमतां. ३५. प्रेताला अडखळून पडली.

अवचित. ॥ २२ ॥ [1]अवचट लागतां हाता । वोळखिलें [2]निजतनयप्रेता । पोटीं कवळोनि, [3]माता । भूमी [4]माथा हाणीत. ॥ २३ ॥ [5]मुखें करितसे शोकें । हृदय पिटोनी, मारी हाक । दु:खें रडतां कौशिक । प्रकट जाला [6]काननीं. ॥ २४ ॥ म्हणे, 'तूं कवण? कवणाची? एथें । यक्षराक्षस [7]भक्षिती प्रेतें.' । येरी म्हणे, 'जी! बाळकातें । काळसर्पें [8]डंखिलें.' ॥ २५ ॥ ऋषि म्हणे, 'आहे कीं प्राण?' । माता म्हणे, '[9]निमाला नंदन.' । येरु बोले, 'किजे दहन । [10]मोक्षपंथा मेळवीं.' ॥ २६ ॥ उदयो [11]केलियां [12]पद्मिनीनाथें । धन वोपिल्यावीण [13]एथें । जाळूं नेदिती [14]शवातें । [15]दाहितां [16]दंडें पावशी. ॥२७॥ आतां [17]जाईं स्मशानभूमी । धर्मार्थ काष्टें वोपूं आम्ही । शोक करितां [18]निरयधामीं । पुत्र तुझा जाइल.' ॥ २८ ॥ येरी म्हणे, 'निशा दाट । चालतां मातें न दिसे वाट.' । ऋषि म्हणे, 'आम्ही [19]तटें । दाऊं तूतें गंगेचें.' ॥ २९॥ ऐशी बोधुनी तारामती । शवासहित धरूनी हातीं । नेली, जेथें [20]रक्षण पती । होता तिचा स्मशानीं. ॥ ३० ॥ [21]चिंताभिताचीं लांकडें । आणुनी, [22]सरणीं घातलें मडें । [23]मुनिहस्तें उभय [24]तोंडें । लागतां, [25]शिखा [26]दाटल्या. ॥ ३१ ॥ पुत्रशोकाचा [27]उमाळा । धडके, धडकतांचि [28]चितानळा; । ऋषि म्हणे, 'प्रेतपाळा । कळतां, [29]देहें दंडील.' ॥ ३२ ॥ ऐसें बोलोनी आपण । गुप्त झाला तपोधन । प्रदीप्त देखोनी [30]हुताशन । [31]मसणखांबा धाविन्नला. ॥ ३३ ॥ जळें विझवूनी सरण । शवा वोढिलें धरुनी चरण । मातेपुढें टाकून, ताडण । [32]करिता

१. अकस्मात्, अचानक. २. 'निजसुताचिया' असा पाठभेद. ३. 'भूमी माथां । हाणित पिटोनियां कपाळा' असा अन्यपाठ. ४. मस्तक, डोकें. ५. 'उभय करसरोजीं करी शंख' असा अन्यपाठ. ६. वनांत, कुसुमवनांत. ७. 'भूत प्रेतें' असें पाठांतर. ८. दंश केला. ९. मरण पावला. 'निमणें' ह्याचा मूळ अर्थ विश्रांत होणें, लीन होणें, रत असणें, तृप्ति होणें, एकत्व पावणें, असा आहे. जसें:–'सिद्धिबुद्धि धर्म हरिपाठ पावले । प्रपंचीं निमाले साधुसंगें. ॥' परंतु अलंकारिक भाषेंत मृत्यु पावणें–असा अर्थ होतो. १०. 'मोक्षमार्गा' असा अन्यपाठ. ११.'उदयो करितां पद्मनाथें' असा पाठभेद. १२. सूर्यानें. १३. येथें, वाराणशीपुरींत. 'तेथें' असें पाठांतर. तेथें=स्मशानांत. १४. प्रेतास. १५. (द्रव्य न देतां) दहन केल्यास. १६. शिक्षा. १७.'दाहों' असें पाठांतर. १८.नरकवासांत. १९. तीर. २०. रक्षक. २१.चितांच्या भोंवतालचीं [उरलींसुरलेलीं] लांकडें. 'चिताबिताचीं' असा पाठ 'नवनीतां'त आढळतो. एका पोथींत 'चिताभिताचळाकडे' असा पाठ आहे. २२. चितेवर. २३. 'मातृहस्तें' असा पाठभेद. २४. दोहों बाजूंनीं पेटतां. २५. ज्वाळा. २६. 'धडकती' असें पाठांतर. २७. लोट, हुंदका. 'उबाळा' असा अन्यपाठ. २८. चितेंतील अग्नि. 'चित्तानळा' असें पाठांतर. २९. 'दंडें' असा पाठभेद. ३०. अग्नि. ३१. पाठभेद:–मरणखांब. ३२. 'करी तियेसी' असा पाठभेद.

झाला दोर्दंडें. ॥३४॥ 'आतां कळतां प्रेतनाथा। मातें दंडील तो सर्वथा.'। ऐसें बोलोनियां लाथा। ताडोनि, गेला तियेसी. ॥ ३५ ॥ तंव अर्धदाहित प्रेत पोटीं। कवळोनि, माता हृदय पिटी.। म्हणे, 'कटाकटा! अदृष्टीं। काय लिहिलें, विधात्या! ॥ ३६ ॥ सूर्यवंशीं विजयकेतू। हरिश्चंद्रनृपाचा सुतू। त्याचा मरणकाळपंथू। केवढा घडला प्रारब्धें. ॥ ३७ ॥ व्याळदंशें मरण ज्यासी। मोक्ष म्हणती नाहीं त्यासी। तें आजी घडलें यासी। बाळकासी माझिया. ॥३८॥ सर्पें दंशिलें म्हणोनि वन्हीं। प्राप्त नव्हे तुजलागुनी। शेखीं अंत्यजाचा पाणि-। स्पर्श जाला तुजलागीं.' ॥ ३९ ॥ ऐशीं तियेचीं विलापवचनें। मसणखांबा, ऐकोनि श्रवणें,। येउनी म्हणे, 'तूं कवण?। शोक करीशी कवणाचा?' ॥ ४० ॥ येरी म्हणे, 'गा! प्रेतनाथा!। हरिश्चंद्रनृपाची मी

१. हातानें. २. डोंबास. ३. तियेसी लाथा ताडोनि गेला, असा अन्वय. 'मारूनि जाय स्वस्थाना' असा पाठभेद. ४. अर्धवट जळलेलें. पाठभेदः—अर्धदाही. ५. हाय हाय. ६. नशिबांत. ७. 'कवि' असें पाठांतर. ८. सर्प चावल्यामुळें. पाठभेदः—दशनें मृत्यु. ९. सर्प चावल्यामुळें मृत्यु आल्यास त्या मृत मनुष्यास स्वर्गप्राप्ति व्हावी, एतदर्थ कांहीं व्रतें करावीं लागतात, तीं न केल्यास त्या मनुष्यास अधोगति प्राप्त होते=असें शास्त्रांत सांगितलें आहे. सर्पदंशानें मरण आलें असतां, 'प्रत्येक मासामध्यें शुक्ल पंचमीचे दिवशीं उपोषण अथवा नक्त करून, पांच फणांचा पिठाचा नाग करून, अनंत, वासुकी, शंख, पद्म, कंबल, कर्कोटक, अश्वतर, धृतराष्ट्र, शंखपाल, कालिय, तक्षक, कपिल या नामांनीं बारा मासांमध्यें पूजा करून, पायसेंकरून ब्राह्मणास भोजन घालून वर्षांतीं सुवर्णाचा नाग व प्रत्यक्ष गाय यांचें दान करून, नारायणबलि करून, दहन, अशौच इत्यादि करावें. अथवा 'नमो अस्तु सर्पेभ्यो॰' या मंत्रेंकरून घृताच्या तीन आहुतींनीं होम करावा. पंचमीचे दिवशीं ८० गुंजा परिमित सुवर्णाचा नाग करून दुग्ध आणि घृत यांहीं युक्त पात्रांत तो नाग ठेवून पूजा करून ब्राह्मणास द्यावा. नागदंशानें जो मृत झाला त्यास हें व्रत शंभूनें सांगितलें आहे.' [धर्मसिंधु—तृतीय परिच्छेद, भाग २, पृ. ७०३.] १०. अग्नि. 'सर्पें डंखिलें म्हणोनी। अग्निमाजी घातलें आणोनी। शेखीं अंत्यजाचें पाणी। प्राप्त झालें तुजलागीं. ॥' असा अन्यपाठ. ११. अनामिकाचा, चांडाळाचा. १२. हस्तस्पर्श (विटाळ). १३. 'परतोनी आला' असा अन्यपाठ. १४. कानानें. १५. 'तूं कवण? कवणाची? म्हणे।' असा अन्यपाठ. १६. हरिश्चंद्रानें 'तूं कोण' असें विचारतांच तारामतीनें:—'तुम्हीं असावें आपुले लोकीं। गोष्टी न करावी परस्त्रियेसीं। तुम्हां इतकी पुसापुसी। काय निमित्य म्हणोनीयां ॥' असा खडखडीत जबाब दिला पण त्यानंतर हरिश्चंद्रानें तिला आपली कुळकथा सांगण्यास विनविलें तेव्हां तिनें आपली हकिकत सांगितली; असें विष्णुदासनामा यांनीं वर्णिलें आहे. [हरिश्चंद्राख्यान, अध्याय ७।१९३-१९५ पहा.] १७. डोंबा! 'प्राणनाथा' असा पाठभेद आहे, पण तो अप्रशस्त होय; कारण एकमेकांस उभयतांनीं अद्याप ओळखिलें नाहीं.

कांता । काळसर्पें डंखिलें सुता । रोहिदासा माझिया. ॥ ४१ ॥ धर्मार्थ ऐकें[1] दाविलें स्थळ । काष्ठें आणुनी वोपितां अनळ । तुवां धांवोनि उतावेळ[2] । सुकृतवांटा[3] साधिला!' ॥ ४२ ॥ ऐकुनी अंगनेच्या वचना । अश्रु आले[4] उभय नयना । म्हणे, 'कर्मा[5]! निजनंदना । कष्टविलें कृतघ्नें[6]. ॥ ४३ ॥ केवढें कर्माचें बळ । कर्में व्यापिला ब्रह्मगोळ[7] । भेदुनी मायेचें पडळ[8] । ऐसें दुर्घट[9] करविलें.' ॥ ४४ ॥ येरी म्हणे, 'स्मशानवासी[10] । मम दुःखें दुःखित होसी । तूं कोण? हें मज मानसीं[11] । कळलें पाहिजे; दयाळा!' ॥ ४५ ॥ येरू सांगतां पूर्व कथन । दोघां पडिलें आलिंगन[12] । शोकें[13] करितां अश्रुजीवनें[14] । स्नान शवा घातलें. ॥ ४६ ॥ राजा म्हणे, 'अवो कांते! । शोक करितां न पुरे येथें । मागूनि आज्ञा[15] अंत्यजातें । अग्नि देऊं बाळका. ॥ ४७ ॥ 'मी येई तंववरी स्मशाना । राहोनि, रक्षावें नंदना; । आतांचि पुसोनियां वंचना । येथें येईन अविलंबें[16].' ॥ ४८ ॥ ऐसें सांगुनी नरभूषण[17] । जातांची पातला तपोधन[18]; । म्हणे, 'माये! हें प्रेत जाण । धरूनी[19] राहाणें किमर्थ? ॥ ४९ ॥ निशीमाजी[20] तूं एकटी । शवासहित स्मशानपोटीं[21] । श्वापदपिशाचांची घेरटी[22] । मांस भक्षूं येईलें[23]. ॥ ५० ॥ शेखीं[24] तुझिया जिवा नाशू । राहतां घडेल निःशेषू । पैल देवालयीं

---

१. 'येथें' असें पाठांतर. २. 'तात्काळ' असा पाठभेद. ३. पुण्यांश. हें भाषण औपरोधिक आहे. येथें **'व्याजस्तुति'** नामक अलंकार आहे. जेथें निंदेनें स्तुति किंवा स्तुतीनें निंदा प्रदर्शित केली जाते, तेथें हा अलंकार होतो. येथें 'पुण्यांश जोडिला' असें वर्णन आहे तथापि त्याचा 'पाप केलें' असा अर्थ उद्दिष्ट आहे म्हणून ही **व्याजस्तुति** (Irony) होय. ४. 'लागलं' असें पाठांतर. ५. हा कपाळा! दुर्दैवा! ६. 'कष्टविलें सुकृतें' असा पाठभेद. ७. 'ब्रह्मांडगोळ' असा अन्यपाठ. कर्मबळासंबंधें भर्तृहरि–नीतिशतक–श्लोक ९४–१०२ पहा. ८. पडदा. (पडळ=पटल). ९. न घडणारें कर्म. १०. तूं स्मशानवासी असून–हा इत्यर्थ. ११. मनाला. 'तूं कवण, कवणाचा? मानसीं । कळलें पाहिजे माझिया ॥' असा अन्यपाठ. १२. ह्या प्रसंगाचें चित्र एखाद्या कुशल चित्रकारानें काढल्यास, तें फारच बहारीचें होईल. १३. 'शोकें रडतां' असा पाठभेद. १४. अश्रुजलानें. १५. आज्ञा. १६. सत्वर, विलंब (उशीर) न लावितां. १७. नरश्रेष्ठ (हरिश्चंद्र). १८. तप हेंच आहे धन ज्याचें तो (विश्वामित्र). 'ब्राह्मण' असें पाठांतर. १९. 'घेऊनि' असा अन्यपाठ. २०. रात्रीं. २१. स्मशानांत. 'स्मशानवाटीं' असा पाठभेद आहे. वाटीं=वाटेवर, रस्त्यांत. २२. घिरटी, फेरी. २३. 'श्वापदपिशाचांचीं घरटीं । मांस भक्षूं येतील ॥' असा पाठभेद. २४. राहतां (स्मशानांत राहलीस तर) शेखीं (शेवटीं) तुझिया जिवा निःशेष (पूर्णपणें) नाश घडेल, (याकरितां) चंडांशु (सूर्य) उदया ये तों (येईपर्यंत) पैल (पलीकडील) देवालयीं (देवळांत) बसावें–असा अन्वय.

चंडांशू । उदया ये, तों बैसावें.' ॥५१॥ केरें दाविलें देवालय । शवा घेउनी गेली माय. । विश्वामित्रें नवल काय । येउनी केलें तें ऐका. ॥५२॥ घोर निद्रा लाविली तीतें । प्रेत फाडुनी काढिलीं आंतें । रक्तें थबथबित हातें । मातृवदनीं घातलीं.॥५३॥ मांसरक्ताचा सडा । विखरोनि सांडिला चहुंकडां । चूर्णकज्जल तोंडा । चर्चुनी केली बीभत्सा॥५४॥आपण जाउनी नगरमुखा । शंख करुनी मारी हाका । 'कपाट उघडीं नरनायका ! । लांव पाठी लागली.' ॥ ५५ ॥ क्षुद्रकपाटें घेतला आंतू । वृत्तांत पुसती राजदूतू । येरू म्हणे, 'माझा मृत्यू । होत होता, वांचलों. ॥ ५६ ॥ या नगरांतूनि राक्षसी । भक्षीत आली बाळकासी । माझे लागतां पाठीशी । पळोन आलों लगबगां. ॥ ५७ ॥ बाळका भक्षीत देउळीं, । जातां प्रत्यक्ष देखाल डोळीं.' । तंव राजदूत दीपिकाजाळीं । पाहों आले सत्वर. ॥ ५८ ॥ नगरीं प्रगट जाली मात । जनलोक शस्त्रेंसीं धांवत । परी कोण्ही देउळाआंत । निर्भय चित्तें न रिघे. ॥ ५९ ॥ दुरूनि टाकिती पाषाणा । मुखें करिती गाढ गर्जना । शस्त्रें परंजुनी नाना । भाव दाविती शौर्याचे. ॥ ६० ॥ तेलदीपिका धरुनी हातीं । देउळीं रिघोनी धीर सुभटीं । वेणी धरुनी फरफराटीं । वोढूनि बाहेर आणिती. ॥ ६१ ॥ देउळाभीतरीं

१. चंड (प्रखर) अंशु (किरणें) आहेत ज्याचे असा (सूर्य). २. हातानें (खुणेनें). ३. माता (तारामती). ४. पाठभेद:-लागली नियेतें. ५. आंतडीं. ६. 'लबथबित' असा अन्यपाठ. ७. रक्तें थबथबित (रक्त ज्यांतून गळत आहे अशीं) [आंतें] हातें (आपल्या हातानें) मातृवदनीं घातलीं-असा अन्वय. ८. वर्षाव, शिपडणें, सिंचन करणें. ९. 'टाकिला' असें पाठांतर. १०. चुना+काजळ. ११. भयंकर, चिळस येण्यासारखी. १२. नगराच्या वेशीकडे. 'मुखं तु वदने मुख्यारंभे द्वाराभ्युपाययोः' इति यादवः. १३. शंख करणें=बोंबा मारणें. १४. दरवाजा. 'कपाट' असें पाठांतर. १५. जखीण, हडळ. १६. 'पाठीं पै लागे' असा अन्यपाठ. १७. दिंडींतून. क्षुद्रकपाट=लहान दरवाजा, दिंडी. १८. 'होतां होतां चूकला' असा पाठभेद. १९. पाठभेद:-आम्हांसी. २०. 'लागली' असें पाठांतर. २१. (देवळांत) जाल तर. २२. डोळ्यांनीं. २३. मशाली पाजळून, दिवट्या लावून. दीपिका=मशाली. पाठभेद:-राजदूतीं दीपिका उजळी. २४. 'पाहों गेले त्या स्थळा' असा अन्यपाठ. २५. वार्ता, बातमी. २६. पाठभेद:-'कोणातें (पा० भे० कोण्हा)········रिघवे' असा पाठभेद. २७. दगड. २८. मोठी. 'गड' असें पाठांतर. २९. फिरवून, तोलून. ३०. पाठभेद:-जाणा. ३१. हावभाव, ऐट. 'भाव दाविती' म्हणजे ते खरोखर शूर नसून, शौर्याचा पोकळ डौल मात्र दाखवीत-असा स्पष्टार्थ. 'भाव दाविती' हे अर्थगर्भ शब्द मुक्तेश्वरानें मोठ्या खुबीनें येथें योजिले आहेत. ३२. पाठभेद:-मुष्टी. ३३. मोठ्या पराक्रमी लोकांनीं. भट=योद्धा. 'भटः स्यात्पुंसि वीरे च विशेषे पामरस्य च' इति मेदिनी. 'धीट सुभटीं' 'धैर्यगती' असे पाठभेद. ३४. 'कुरळीं धरूनि तारामती' असें पाठांतर. ३५. 'आणिली बाहेरी' असा पाठभेद. ३६. 'देउळागर्भीं' असा पाठभेद.

मांसखंडें । पसरलीं दिसती चहुंकडे । गळतरक्त[1] आंतडें । मुखामाजी लां-
वेच्या. ॥ ६२ ॥ [2]उभय दंडें कर्षुनी [3]दूतीं । दंडें [4]दंडीत नगरपंथीं । आ-
णिली, तंव [5]मार्तंडदीप्ती । प्रकाशली [6]नभांत. ॥ ६३ ॥ मात [7]जाणविली
रायासी, । 'आम्हीं बळें धरिली राक्षसी । आतां [8]ईची आज्ञा कायशी ? । ते
आम्हांसी निवेदा.' ॥ ६४ ॥ राजा [9]अविचारी बुद्धिमंद । म्हणे, 'करूनि दृढ
बंध । नगरा [10]भोंवंडूनि, [11]शिरच्छेद । करा इचा अविलंबें.' ॥ ६५ ॥ दूतीं म-
स्तकीं शेंदूर । भरुनी, फिरविली नगर । [12]पाहों आले नारी नर । बाळतरुण-
वृद्धादि. ॥ ६६ ॥ एक म्हणती, 'हे [13]खेचरी । आम्हीं देखिली [14]कौशिकघरीं ।
अन्नमत्रीं पाक करी । ते हे होय [15]निर्धारें. ॥ ६७ ॥ इचे करींचें अन्न जेविलों ।
मरत मरत मी वांचलों.' । [16]दुजा म्हणे, 'मी पडिलों । [17]दुखणियां [18]षण्मास.'
॥ ६८ ॥ एक म्हणे, 'माझें बाळ । इणेंचि भक्षिलें [19]वेल्हाळ.' । [20]दुजा म्हणे, 'हे
[21]आळोआळ । भक्षीत फिरे बाळकां.' ॥ ६९ ॥ असो जनाची [22]चौंउटी । फि-
रवुनी आणिली **गं**गातटीं । **वी**रबाहू शस्त्र [23]मुष्टी । [24]देउनी धाडी सेवकां.
॥ ७० ॥ स्नान घालूनि **गं**गाजळें । उभी केली [25]अधोमौळें । [26]निजवल्लभें [27]शस्त्र
[28]तेजाळें । काढुनी [29]अंचळें पुशिलें. ॥ ७१ ॥ सत्व पहावया गगनीं । [30]गण
गंधर्व निर्जर[31] मुनी । [32]सतियांसहित विमानीं । कौतुक पाहों पातले. ॥ ७२ ॥

---

१. पाठभेदः—गळत रक्तेंशीं. २. उभय दंडें कर्पुनी=दोन्ही हात बांधून. ३. सेवकांनीं. 'हातीं' असें पाठांतर. ४. 'दंडोनी उगाप्रती' व 'दंडीत पुराप्रती' असे पाठभेद. ५. सूर्यप्रकाश. सूर्य मृत अंडांस सचेतन करितो म्हणून त्यास मार्तंड असें नांव पडलें. 'मृतेंऽडे जायते यस्मात् **मा**र्तंड इति चोच्यते.' [मत्स्यपुराण.] ६. आकाशांत. 'नभःपथीं' व 'नभातें' अशीं पाठांतरें. ७. कळविली, समजाविली. ८. हिच्याविषयीं. ९. 'अतिचारी' व 'अविचारबुद्धि मंद' असे पाठभेद. १०. फिरवून, धिंड काढून. ११. 'दुर्गा भवंडुनियां छेद' असा अन्यपाठ. १२. पाठभेदः—पहावया मिनले. १३. आकाशांत फिरणारी राक्षसी. १४. काळकौशिकाचे घरीं. १५. खरोखर, निःसंशय. १६. दुसरा. 'एक' असें पाठांतर. १७. दुखण्यानें, आजारानें. १८. 'एक मासवरी' असा अन्यपाठ. १९. प्रिय. २०. 'एक' असें पाठांतर. २१. प्रत्येक आळींत. आळी=पेंठ, मोहल्ला, नगराचा विभाग. २२. चावटपणा, वात्रटपणा, बडबड. पाठभेदः—वटवटी. २३. मुठींत (हातांत). २४. हरिश्चंद्रास. 'वीरबाहूनें खड्गमुष्टी । देऊनि धाडिलें सेवका' असा पाठभेद. २५. खालीं डोकें वांकवून. पाठभेदः—आणुनी मेळे. २६. आपल्या भ्रतारानें (हरिश्चंद्रानें). २७. पाठभेदः—शास्त्रजाळें । दाटुनी इ०. २८. चकचकित, पाणीदार. 'सतेजाळें' असा पाठभेद. २९. पदरानें. ३०. 'उभे' असें पाठांतर. ३१. देव. ज्यांना जरा (वार्धक्य) प्राप्त होत नाहीं ते निर्जर. ३२. 'सर्वांसहित विमानयानीं' व 'सर्वांसहित नारदमुनीं' असे पाठभेद.

सुवर्णेसी[1] सहस्रकिरण[2] । सहरोहिणी निशारमण[3] । स्वाहास्वधेशीं[4] उभयवदन[5] । समीरवरुणधनदादी[6]. ॥ ७३ ॥ शचीसहित[7] वज्रपाणी[8] । धर्मसंगीं[9] संयमिनी[10] । मुनिसंगें मुनिभामिनी[11] । विमानयानीं पाहती. ॥ ७४ ॥ सहतारा[12] बृहस्पती[13] । वसिष्ठऋषि अरुंधती । अत्रीसह[14] अनसुया सती । सत्व पाहों पातली. ॥ ७५ ॥ रमेसहित मदनारीमित्र[15] । सहसावित्री चतुर्वक्र[16] । उमेसहित विषमनेत्र[17] । पाहाती सत्व सतीचें. ॥ ७६ ॥ नृपसत्वद्रुमाच्या[18] मूळीं । वसिष्ठ वोपी सुकृतांजली[19], । तया तोयें शाखा पूर्ण बोंहाळी[20] । कवळूनि, जाती चिद्गगनीं[21] ॥७७॥ वैकुंठकैलासब्रह्मपदें । ऐशिया फळीं फळला[22] स्वादें[23] । स्वयें तृप्त स्वानंदबोधें[24] । चाड[25] न धरी तयांची[26]. ॥७८॥ तंव दूत म्हणती, 'खेचरी ! । आतां

१. वस्तुतः सूर्यपत्नीचें नांव 'सुवर्णा' नसून 'संज्ञा' आहे. 'सुवर्णा' हें अग्नीच्या सात जिव्हांपैकीं एकीचें नांव आहे. पाठभेदः–अरुणासहित. २. सूर्य. ३. निशापति (चंद्र). 'सरोहिणी शार्वरीरमण । स्वाहास्वधेसी उभयनयन ।' असा अन्यपाठ आहे. ४. स्वाहा व स्वधा हीं अग्नीच्या स्त्रियांचीं नांवें. ५. द्विमुख (अग्नि). 'चत्वारि शृंगा त्रयोऽस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्ता सोऽस्य' असें अग्निवर्णन वैश्वदेवांत आहे. ६. वायु+जलाधिपति+कुबेर+इत्यादि. ७. 'शचीरमण' असें पाठांतर. शची=इंद्राणी, इंद्रपत्नी. ८. इंद्र. वज्र आहे पाणीच्या (हाताच्या) ठायीं ज्याच्या तो. वज्र हें इंद्राचें मुख्य आयुध आहे, म्हणून त्यास 'वज्री' असेंही नांव आहे. ९. यमधर्माबरोबर. १०. वस्तुतः 'संयमिनी' हें यमपत्नीचें नांव नसून, यमनगरीचें आहे. 'जैमिनी' व 'सत्यमनी' अशीं पाठांतरें. ११. ऋषिस्त्रिया. १२. तारा ही बृहस्पतीची पत्नी. हिच्यामुळेंच 'तारकामय संग्राम' नामक तुमुल युद्ध झालें. [मुक्तेश्वर–आदिपर्व–(काव्यसंग्रह)–पृ० ३०८ टीप ८ पहा.] १३. बृहस्पति=सुरगुरु. [व्याकरणकारांनीं तस्कर आणि बृहस्पति या दोघांसही एकाच सूत्रानें निगडित केलें आहे!–'तद्बृहतोः करपत्योश्चोरदेवतयोः सुट् तलोपश्च.'] १४. पाठभेदः–अत्रिऋषिची. सबंध ओंवीचा अन्यपाठः–'सहतारेसीं वाचस्पति । वशिष्ठ आणि अरुंधती । अत्रीसहित अनुसुया सती । सत्व पाहों पातल्या.' १५. मदन+अरि=शिव; त्याचा मित्र=विष्णु. १६. ब्रह्मदेव. 'चत्वारिवक्र' असा अन्यपाठ. १७. त्रिनयन (शिव). शिवाला तीन नेत्र असून ते–श्वेतभानु (सोम) बृहद्भानु (अग्नि) व भानु (सूर्य) होत असें वर्णन आहे. [स्तुतिकुसुमांजलि–स्तोत्र २ श्लो० ६.] पाठभेदः–त्रिनयन. १८. हरिश्चंद्रराजाचें सत्व हाच वृक्ष त्याच्या मूळाशीं. हें **रूपक** आहे. १९. पुण्यरूपी जलाची अंजली. २०. बाहाळी=बहाळी, ताजेपणा, टवटवी. 'बाहाळीं' असा पाठभेद आहे. २१. चित् (ज्ञान) रूपी गगनीं (आकाशांत) जाती=फार उंच वाढतात–हा इत्यर्थ. 'चिद्गना' असा पाठभेद. २२. फळ देता झाला. ह्या क्रियापदाचा कर्ता 'नृपसत्वद्रुम' (ओंवी ७७ पहा) होय. २३. स्वादयुक्त. स्वाद=माधुर्य, गोडी. २४. आत्मबोध झाल्यामुळें. २५. इच्छा, आवड, गरज. २६. वैकुंठपद, कैलासपद व ब्रह्मपद हीं जीं फळें त्यांची. 'वैकुंठकैलासब्रह्मपदें । ऐशीं फळें आलीं स्वादें । परी स्वयंतृप्तीच्या स्वानंदबोधें । चाड न धरी त्या फळा. ॥' असा पाठभेद.

कुलदेवतास्मरण करीं । जयाची[1] इच्छा पूर्ण अंतरीं । चिंतन करीं तयाचें.' ॥ ७९ ॥ सुकुमार बैसुनी पद्मासनीं[2] । स्वरूपमुद्रा[3] लाविली ध्यानीं[4] । हृदयीं स्मरोनी चक्रपाणी । काय बोले कुरुवर्या ! ॥ ८० ॥ म्हणे, 'आतां जन्मची नसावा[5] । प्रारब्ध भोगवी जरी जीवा[6]; । तरी मागणें हेंचि देवा ! । जन्मोजन्मीं इच्छितें. ॥ ८१ ॥ हरिश्चंद्रासारिखा कांत[7] । रोहिदासासारिखा सुत । कुळगुरु अरुंधतीनाथ[8] । जन्मोजन्मीं असावा. ॥ ८२ ॥ प्रतिसृष्टीचा अपरधाता[9] । तपोतेजें तीव्र सविता[10] । तोचि जन्मोजन्मीं मागता । याचक असो कौशिकें.[11]' ॥ ८३ ॥ ऐसें बोलोनि नृपभामिनी[12] । हनना बोढवी[13] मूर्ध्नी[14] । शस्त्र पडावें तंव[15] ते[15] क्षणीं । विश्वामित्र धांविन्नला. ॥ ८४ ॥ वल्कलवसनें जटाधारी । विभूति[16] चर्चूनी शरीरीं । हुताशन नेत्रीं मिरवे, करीं । दंडकमंडलु सांजिरा[17]. ॥ ८५ ॥ शुद्धसत्वकळाषोडशीं[18] । पूर्ण देखोनी नृपशशी[19] । कौशिकहृदयपूर्णसिंधूसी[20] । प्रेमभरतें[21] दाटलें. ॥ ८६ ॥ प्रतिज्ञा[22] लंघुनी वल्लरी । नयनीं[22] लोटल्या अश्रुलहरी[23] । उदित[24] होतें वरिच्यावरी । शस्त्र धांवोनि धरियेलें[25]. ॥ ८७ ॥ कौशिककृपेच्या[26] वरदवातें । डोलती विबुधपारिजातें[27] ।

१. 'जे इच्छा असेल उदरीं' असा पाठभेद. २. पद्मासन=योगाभ्यास करण्याचे वेळीं विशेष प्रकारची कमलाकार बैठक. ३. ऊर्ध्व किंवा अर्धोन्मीलित दृष्टि. ४. 'नयनीं' असें पाठांतर. ५. 'सरावा' असें पाठांतर. ६. 'प्रारब्धें भोगविलें या जीवा' असा पाठभेद. ७. पति, भ्रतार. ८. वशिष्ठ. ९. प्रतिब्रह्मदेव. १०. प्रखर सूर्य. ११. या ओंवीचा अन्यपाठ:—तोची जन्मोजन्मीं मागता । याचक कौशिक असो पुरता । जन्मोजन्मीं जननी ताता । हेंचि विधात्या ! असों दे. ॥ १२. राजपत्नी (तारामती). १३. पुढें ओढी, पुढें करी. 'वोपिला निज मूर्ध्नी' असा अन्यपाठ. १४. मस्तक. १५. पाठभेद:—तत्. १६. भस्म. 'तप्तहाटकतनु साजिरी' असा अन्यपाठ. १७. 'सुंदर' 'शोभला' अशीं पाठांतरें. १८. (हरिश्चंद्राचें) शुद्धसत्व ह्याच (चंद्राच्या) षोडश कळा त्यांनीं युक्त. १९. हरिश्चंद्ररूपी चंद्र.—ह्या ओंवीत सुरेख रूपकालंकार आहे. २०. विश्वामित्राचें हृदय हाच समुद्र. 'सिंधुवेळेसी' असें पाठांतर. २१. प्रेमाची भरती. 'मोहोभरतें' असा अन्यपाठ. समुद्र आणि चंद्र यांची मैत्री असून चंद्रोदय झाल्यामुळें आनंदानें समुद्र उचंबळतो—असा कविसंकेत आहे. २२. प्रतिज्ञारूपी वल्लरी (वेली) लंघुनी (दूर सारून) अश्रुलहरी नयनीं लोटल्या-असा अन्वय. नदीच्या कांठीं उगवणाऱ्या वेली, शेवाळ इत्यादि पाण्याच्या ओघास अडथळा आणितात; त्यावरून वरील रूपक घेतलें आहे. वल्लरी=वेला (मर्यादा) असा अर्थ 'नवनीतां'त आढळतो. २३. अश्रूंच्या लाटा. २४. वर हात करून. २५. 'जाऊनि वारिलें' असा पाठभेद. २६. विश्वामित्रऋषीची कृपा हाच वरदायक वायु, त्यानें. २७. देवरूपी कल्पवृक्ष. 'विबुद्ध पारिजातें' असा पाठभेद. विबुद्ध=(१) फुललेले. (२) चतुर, कुशल.

सुकृतसुमनें परागभरितें । राजमुकुटीं वर्षती. ॥ ८८ ॥ हरिश्चंद्रराजा तारामती । आवडी कौशिकें धरूनी हातीं; । मातृजनकाचिये पंक्तीं । रोहिदासा बैसविलें. ॥ ८९ ॥ त्रिवर्ग बैसवूनी निकटीं । मूर्ध्नी कवळोनी धरिलीं पोटीं; । सुधाकरें थापटी पाठी । धरुनी हनुवटी सप्रेमें. ॥ ९० ॥ निज तपाच्या मौक्तिकें । तिघां शेसे भरी कौतुकें; । जयजयकारें सृष्टिजनकें । हर्षे टाळी पीटिली. ॥ ९१ ॥ 'राजा, कुमर, कांता तिन्ही' । विबुध म्हणती, 'स्वर्गभुवनीं । विमानीं वाहुनी नेऊं.' तंव मुनी । म्हणे, 'ऐका देव! हो! ॥९२॥ स्वर्गसुखाचीं अचळ फळें । अंचळीं बांधिलीं तपोबळें । परी शरीरदुःखाच्या अनळें । देह जालें जर्जर. ॥ ९३ ॥ राजहानीची काळिमा । लागलीसे मज उत्तमा । ते क्षाळुनी स्वर्गधामा । आरूढवीन ययांतें. ॥ ९४ ॥ उमा रमा सावित्री सती । लोपामुद्रा अरुंधती । आपुलीं पुण्यें तारामती-। प्रति वोपिती चोळिया. ॥ ९५ ॥ विमानीं आरुढोनी सुरवर । गेले, करुनी जयजयकार । तिघां घेऊनि ऋषीश्वर । निघता झाला अयोध्ये. ॥ ९६ ॥ वीरबाहु येउनी पुढें । नृपा हांकी तोलोनि दंडें; । 'माझा दूतें नेतां, तोंड । हाणोनि फोडीन सर्वथा.' ॥ ९७ ॥ जाणोनि अंत्यजाची अटक । पातला देवर्षि-

---

१. पुण्यरूपी पुष्पें. ह्या ओवींतील **'रूपका'**लंकार फार बहारीचा आहे. २. हें 'सुमना'चें विशेषण. पराग=पुष्पांत जे बारीक सुवासिक रजःकण असतात ते. ३. देवांनीं हरिश्चंद्रावर पुष्पवृष्टि केली—हा इत्यर्थ.—'कौशिककृपेचा वरदवात । डोलतां विबुधपारिजात । सुकृतसुमनें परागभरित । राजमुकुटीं वर्षती. ॥' असा अन्यपाठ. ४. 'रोहिदास बैसविला' असें पाठांतर. ५. मस्तक. ६. अमृतयुक्त हस्तानें. 'शुद्धा करें' असा पाठभेद. ७. पाठ थापटणें=शाबासकी देणें, वाहवा करणें. ८. लग्नादि शुभकार्यांचे समयीं दध्यादि द्रवपदार्थ कपाळास लावून त्यावर तांदूळ लावितात ती. ९. ब्रह्मदेवानें. १०. देव. ११. 'विमानयानीं' असें पाठांतर. १२. 'म्हणतां' असें पाठांतर. १३. 'म्हणे ऐसें कां देव हो!' असा अन्यपाठ. १४. अक्षय, अविनाशी. १५. पदरांत. १६. 'शरीरक्लेशाच्या' 'क्लेशदुःखाचिया' अशीं पाठांतरें. १७. अग्नीनें. १८. हरिश्चंद्राचें राज्य हरण केलें, त्याबद्दल मला लागलेला डाग. काळिमा=डाग, अपकीर्ति. १९. नाहींशी करून. 'ते मारूनि, स्वकीय धामा' असा पाठभेद. २०. 'रूढ करीन' असें पाठांतर. २१. अगस्त्यऋषीची पत्नी. 'तारा पुलोमा अरुंधती' असा पाठभेद. २२. उमारमा वगैरे साध्वींनीं तारामतीस आपलीं पुण्यें दिलीं, असें नाहीं तर त्या त्यांनीं जणुं काय चोळ्याच (सौभाग्यवायनें) दिल्या—असा भावार्थ. हा **उत्प्रेक्षा** आहे. २३. 'प्रीति' असें पाठांतर. २४. पाठभेदः—कांचोलियें. २५. 'विमानें वाहोनी' असा पाठभेद. २६. उगारून. २७. पाठभेदः—भृत्य. २८. हें चांडाळाचें भाषण त्याला साजेसेंच आहे. 'फोडीन आतां निघातें' असा पाठभेद. २९. अटक=अडथळा, हरकत. 'ऋषी विचारी नावेक' असा पाठभेद.

नायक[1] । म्हणे, 'हा सवित्याचा बाळक । ऋषिशापें[2] अंत्यज. ॥ ९८ ॥
पातली शापपरिहारवेळा[3] । यालागीं धाविन्नला उतावळा[4] । मुक्त करुनी प्रेत-
पाळा । बोळवावें स्वधामा.[5]' ॥ ९९ ॥ नारदवचनें गाधिजमुनी । दिव्यदेही[6]
दंडपाणी[7] । करूनि, बैसवी विमानीं[8] । तपाचिया सामर्थ्यें. ॥ १०० ॥ निमिष[9]
न लागतां सत्वर । नृप, कांता, सहितकुमर । तिघां घेउनी ऋषीश्वर । अयो-
ध्यापुरा पातला. ॥ १०१ ॥ प्रजां जाणविली मात । ऐकूनि सकळां आंल्हाद[10]
बहुत । जेंवी का मृतालागीं अमृत-। पान घडलें प्रारब्धें. ॥ १०२ ॥ नगर
शृंगारिलें मनोहर । वाद्यनादें गर्जे अंबर । नाना वहनीं नारी नर । वेळघोनी[11]
येती सामोरे. ॥ १०३ ॥ वसनें भूषणें दिव्य सुमनें । छत्र चामर शिबिको[12]-
यानें । अश्वकुंजररथादि वाहनें । शृंगारुनि आणिलीं. ॥ १०४ ॥ मुकुट
कुंडलें कटिमेखला[13] । रत्नकंकणें[14] दिव्येंदुकळा[15] । वोहोनियां[16] नृपाळा । कुमरदार[17]
ऋषिसमवेत. ॥ १०५ ॥ मंगळ वाद्यें वाजती[18] पुढें । वेष्टित चालिले वीर गाढे[19]।
भाट[20] गर्जती पुढें पवाडे[21] । वाडेंकोडें[22] नृपाचे. ॥ १०६ ॥ नगरद्वारप्रवेशकाळीं ।
द्विजीं[23] वोपिल्या द्रव्यांजली[24] । पुढें चालतां राजमौळीं[25] । सुमनें वर्षती जनजाया[26].

---

१. नारद. २. यमाला कोणत्या ऋषीनें व कां शाप दिला होता—ही कथा प्रसिद्ध नाहीं. देवीभागवतांत असें सांगितलें आहे कीं हरिश्चंद्रास क्लेश देऊन, त्याची धर्माविषयीं परीक्षा करण्याकरितां स्वत: यमधर्म आपल्या मायेनें चांडाल झाला होता. (स्कंध ७, अध्याय २७।१८ पहा.) ३. 'शापहरणवेळा' व 'शापापहारवेळ' असे पाठभेद. ४. 'धांवलासे दयाळ' असाही पाठभेद आहे. ५. 'स्वर्गासी' 'स्वर्गस्था' अशीं पाठांतरें. ६. दिव्य देह धारण केलेला. ७. यम. दंड हें यमाचें आयुध असल्यामुळें त्यास 'दंडपाणि' असें नांव आहे. ८. 'करूनि धाडिला स्वर्गभुवनीं' 'करोनि धाडी स्वर्गासनीं' असे पाठभेद. ९. निमिष=डोळ्यांच्या पापण्या उघडण्यास किंवा मिटण्यास जो काळ लागतो तो, अत्यंत अल्पकाल. १०. 'सकळ आनंदभरित' असा अन्यपाठ. ११. चढून, बसून. १२. पालख्या. 'शिबिकासनें' असा पाठभेद. १३. कंबरपट्टा. 'मेखळामाळा' असा पाठभेद. १४. रत्नजडित हस्तभूषणें. १५. चंद्रप्रभेप्रमाणें देदीप्यमान. 'केयूर कंकणें दिव्य दुकुळा (क्वचित् 'माळा')' असा अन्यपाठ. १६. 'वोपोनिया' असें पाठांतर. १७. 'कुमरदारा ऋषींसीं' असा पाठभेद. १८. 'गर्जती' असा अन्यपाठ. १९. बलाढ्य. २०. स्तुतिपाठक. [मुक्तेश्वर—सभापर्व (काव्यसंग्रह) पृ० १७ टीप २ पहा.] भाटलोकांविषयीं माहिती रा० रा० सरदेसाई यांनीं 'हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास'—मुसलमानी रियासत ह्या पुस्तकांत पृ० ५१–५२ येथें दिली आहे, तीही पाहण्यालायक आहे. २१. स्तुतिपाठ, कीर्ति. २२. कौतुकानें, मोठ्या आवडीनें. २३. 'याचकां' असें पाठांतर. २४. 'दिव्यांजली' असा पाठ आढळतो, पण तो लेखकप्रमादजन्य असावा. २५. राजाच्या मस्तकावर. २६. नरनारी; पुरुष व स्त्रिया.

॥ १०७ ॥ मंगल आरतिया घेउनी करीं । पुढें धांवलिया नगरनारी । रायें[1] सुमनांचे संभारीं[2] । मेघ केला कनकाचा[3]. ॥१०८॥ शरत्काळींच्या[4] निशारमणें[5] । शोभा दाविजे उडुगणें[6] । तेंवी तारानाथ[7], पुरजनें । वेष्टित, आला मंदिरा. ॥ १०९ ॥ राजमंदिराची शोभा । काय वर्णू ? भूवल्लभा[8] ! । सौंदर्यगिरीचिया गर्भा । कोरूनि जैसें निर्मिलें[9]. ॥ ११० ॥ सर्व संपदाभरित । आज्ञें रक्षिलें अंचुबित[10] । तया मंदिरीं नृपनाथ । विश्वामित्रें आणिला. ॥ १११ ॥ छप्पन्न[11] देशींचे राजेश्वर । शोण्णव[12] कुळींचे राजकुमर । आले आणि[13] ऋषीश्वर । विश्वामित्रें आणिले. ॥ ११२ ॥ वर्षाकाळीं[14] सरिताओघ । सागरा येती[15] करीत वेग । तेंवी संपदा घेउनी जग । भेटों आलें गुणाब्धी[16]. ॥ ११३ ॥ कौशिककोप राजोत्तमा[17] । मिळणी झाली तेचि अमा[18] । अंतर बीजेचा[19] महिमा । सखोल[20] शशिदर्शनें[21]. ॥ ११४ ॥ तेंवी तो नरनाथशशी[22] । पाहावया[23] हेतु सर्वांसीं । अयोध्यापुरप्रदेशीं । अष्टौ दिशा रोधिल्या. ॥ ११५ ॥ रथकुंजरांचे थाट[24] । पुढें वाद्यांचे बोभाट[25] । उंच स्वरें गर्जती भाट । वर्णिती यश रायाचें.

---

१. पाठभेद:—आल्या. २. संभार=समुदाय, समूह (वर्षाव). ३. सुवर्णाचा. 'वोघ केला हाटकाचा' असें पाठांतर. सर्व नागरिक राजावर पुष्पवृष्टि करीत होते व राजा याचकांवर द्रव्यवृष्टि करीत होता—असा भावार्थ. ४. शरदृतूंतील. आश्विन व कार्तिक या दोन महिन्यांचे काळास 'शरदृतु' म्हणतात. वर्षाकाळानंतर शरदृतु येत असल्यामुळें चंद्र मेघमंडलाच्या आच्छादनापासून मुक्त होऊन देदीप्यमान होतो म्हणून शरदिंदूची **उपमा.** ५. चंद्रानें. रात्र ही चंद्राची भार्या व चंद्र हा तिचा पति ही समजूत फार जुनी आहे. ६. उडुगणांनीं (तान्यांनीं) युक्त होत्साता. ७. तारामतीपति (हरिश्चंद्र). ८. धरित्रीनाथा, राजा (धर्मराजा). ९. ह्याचें कर्म 'राजमंदिर' होय. 'कोरोनि कीजे ज्यापरी' असा पाठभेद. १०. बिनचूक, परिपूर्ण, संपूर्ण. हा शब्द ज्ञानेश्वरींत आढळतो. [अध्याय ४।२१४ व अध्याय ५।७ पहा]. ११. मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रह) पृ० १५२ टी० २।३ पहा. १२. मुक्तेश्वर—सभापर्व (काव्यसंग्रह) पृ० १८, टी० ११ पहा. १३. 'आणिक कित्येक' असें पाठांतर. १४. पर्जन्यकाळीं. १५. 'येतां करिती वेग' असा पाठभेद. १६. गुणसागरास (हरिश्चंद्रास). ह्या ओवींत **'वाक्योपमा'** आहे, कारण हींत दोन निरनिराळीं वाक्यें उपमावाचक शब्दानें जोडलेलीं आहेत. १७. कौशिकऋषीचा कोप व नृपश्रेष्ठ हरिश्चंद्र यांची भेट झाली, ती भेट नव्हे तर (कवि उत्प्रेक्षा करितात) ती अमावास्या (काळोखी रात्र) होय. १८. अमावास्या. 'नेत्रीं आम्हां' असा पाठभेद. १९. (शुद्ध पक्षांतील) द्वितीयेचा. २०. अत्यंत गूढ, गंभीर. २१. चंद्रदर्शनानें. असेंच वर्णन रघुवंशादि संस्कृत काव्यांत व सुभाषितादि ग्रंथांत आढळतें. [रघुवंश—सर्ग २ श्लोक ७३ व मुक्तेश्वरकृत आदिपर्व—अध्याय ११।१०७ पहा]. 'सुखोल्हास दर्शनीं' असें पाठांतर. २२. हरिश्चंद्र राजा हाच चंद्र. २३. 'पाहावा हा हेत' असा अन्यपाठ. २४. यथायोग्य रचना, मांडणी. २५. 'घडघडाट' व 'कडकडाट' असे पाठभेद.

॥ ११६ ॥ ऐशिया परी राजनृपति[1] । देखोनी आल्हाद सर्वांप्रती[2] । राजा,[3] कुमार, तारामती । राज्यपदीं[4] स्थापिलीं. ॥ ११७ ॥

**उपसंहार.**

राज्यीं स्थापूनि तारारमणा, कौशिक गेला स्वर्गभुवना. ।
ऐसे क्लेश कुरुनंदना![7] कोणें भोगिले सांग पां? ॥ १
धनंजयासारिखा बंधु, द्रौपदी ऐसी पवित्र वधू[8] ।
भीम तरी धैर्यसिंधु, जाऊं नेदी सत्वासी. ॥ २
धर्मराज[9] स्वधर्मपाळ,[10] लागों नेदी [11]दरिद्राचळ ।
सारथी[12] तरी वैकुंठपाळ, काय क्लेश तुम्हांतें? ॥ ३

---

१. राजन् (राजे) आणि नृ (नर) यांचा पति, सार्वभौम राजा. २. 'सर्वां चित्तीं' असें पाठांतर. ३. पाठभेदः—सहजायासुत नृपती. ४. 'दिव्य पीठीं' 'राज्यपट्टीं' असे पाठभेद. ५. 'पदीं' 'पट्टीं' अशीं पाठांतरें. ६. अध्याय पांचवा हा बहुतेक मुक्तेश्वरानें आपल्या उज्ज्वल प्रतिभेनेंच निर्माण केला आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. हा अध्याय मूळाशीं ताडून पाहिला असतां ठिकठिकाणीं पुष्कळच फेरफार आढळतो. [मार्कंडेयपुराण—अ० ८ व देवीभागवत—स्कंध, अध्याय २५—२७. पहा]. हें पाहणें असल्यास जिज्ञासु वाचकांनीं पंतकृत हरिश्चंद्राख्यान अध्याय ३, गीति ३६—८५ व अध्याय ४ था पाहावा. विश्वामित्राच्या 'आज्ञेनें' रोहिदासास सर्प चावला, असें मूळांत नाहीं. फक्त 'सर्प चावला' इतकेंच आहे. तसेंच विश्वामित्रानें तारामतीला स्मशानाजवळील शिवालयांत बसावयास सांगून, तिला 'घोर निद्रा लाविली' व तिच्या गळ्यांत आंतडीं बांधलीं; आणि आपण 'माझ्या पाठीस लांव लागली' अशी बोंब ठोकिली. राजसेवकांनीं तिला बांधून नेली व धिंड काढली. वीरबाहूनें तिचा शिरश्छेद करावयास आपला सेवक 'मसणखांबा' (हरिश्चंद्र) यास पाठविलें. हरिश्चंद्रानें तारामतीस ओळखिलें परंतु स्वामीची आज्ञा शिरसा मान्य करून तिचा शिरश्छेद करावयास तयार झाला. तारामतीनें ईश्वराजवळ मागितलेलें मागणें (ओंव्या ८१—८३). हरिश्चंद्रानें तारामतीचा शिरश्छेद करण्याकरितां शस्त्र उभारतांच विश्वामित्रानें वरच्यावर त्याचा हात धरिला. विश्वामित्र हरिश्चंद्राची राज्यासनावर स्थापना करण्याकरितां त्यास अयोध्येस घेऊन जाऊं लागल्यामुळें त्याचा स्वामी वीरबाहू यानें केलेली हरकत इत्यादि चित्तवेधक प्रसंग वरील पुराणांत नाहींत. ७. पाठभेदः=कुरुभूषणा. ८. 'सर्वे द्रौपदी सकुमार वधू' असा पाठभेद. ९. पाठभेदः—यादवराज. १०. स्वधर्माचें रक्षण करणारा. 'सत्वपाळ' असें पाठांतर. ११. दारिद्र्यरूपी डोंगर. 'दरिद्राचळ' असा पाठभेद. १२. मसलत देणारा व साह्य करणारा. भीमार्जुनांसारखे पराक्रमी बंधु, द्रौपदीसारखी पतिव्रता भार्या, श्रीकृष्णासारखा सारथी—इतकी मंडळी तुझ्या सेवेला तत्पर असतानां तुला दुःख कसलें? अर्थात् तूं सुखी आहेस—हा भावार्थ.

ऐकूनि बृहदश्वाचें उत्तर, चमत्कारला युधिष्ठिर, ।
म्हणे, 'धन्य! धन्य! त्रिशंकुकुमर, कीर्ति अपार तयाची'. ॥ ४
असो हरिश्चंद्राचें आख्यान, श्रवणीं ऐकावें चित्त देऊन ।
ऋषी म्हणे, 'सावधान, कथा ऐकें गुणज्ञा!' ॥ ५
इति श्रीवनपर्व भारत, मुक्तेश्वरकविविरचित ।
सर्व दोष दवडोनि देतें, सुखसायुज्य श्रोतयां. ॥ ६

१. ऋषिविशेष. यानें धर्माकडून अनेक इतिहास ऐकविले व अक्षविद्या व अश्वहृदयविद्या ह्या त्यास सांगितल्या. २. विस्मित झाला. ३. धर्मराज. ४. हरिश्चंद्रराजा. 'जन्मले कुमर' असा पाठभेद. ५. 'रायांची' 'तयांची' असे पाठभेद. ६. 'पुढारीं' असें पाठांतर. या ओवीचीं अशीं पाठान्तरें आढळतात: (१) असो हरिश्चन्द्राचें कथन । पुढें **'तीर्थयात्रा'** निरोपण । वैशंपायन म्हणे सावधान । कथा ऐकें गुणज्ञा! ॥ (२) असो हरिश्चन्द्राचें कथन । पुढें **'यक्षाचें'** निरोपण । ऋषी म्हणे सावधान । कथा एक गुणज्ञा! ॥ ७. ओव्या ५–६ यांच्या मध्यें एका पोथींत पुढील ओवी आढळते:—'यावरी नळोपाख्यान । बृहदश्वा सांगेल आपण । ते कथेसीं निजावधान । सज्जनीं दिधलें पाहिजे. ॥ १ ॥' ८. 'शांतिपर्व' असा पाठभेद आहे. परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं महाभारताच्या कोणत्याही पर्वांत 'हरिश्चंद्राख्यान' नाहीं. मुक्तेश्वरानें 'हरिश्चंद्राख्यान' प्रथम निराळें रचून नंतर तें आपणच (किंवा त्याच्या एखाद्या भक्तानें) वनपर्वांत सामील केलें असावें, असें वाटतें. यासाठीं तें आम्हीं वनपर्वांत सामील न करितां स्वतंत्र छापिलें आहे. [मुक्तेश्वर—वनपर्व (काव्यसंग्रह) पृ० १२५ टीप ५ पहा]. ९. 'श्रोते होवोनि सावचित्त । श्रवण केलें पाहिजे ॥' असा अन्यपाठ. १०. सुख आणि सायुज्य (मोक्ष). ११. ह्या आख्यानाच्या आम्हास पांच पोथ्या मिळाल्या. त्यांपैकीं (१) एकीच्या शेवटीं 'इति श्रीमन्महाभारते **वनपर्वणि** हरिश्चंद्रकथनो नाम पंचमोध्यायः । संपूर्ण । श्रीसीताकांतार्पणमस्तु' असा अंतिम लेख आहे. (२) दुसऱ्या पोथीच्या शेवटीं 'इति श्रीमन्महाभारते महापुराणे शतसहस्रसंहितायां श्री**शांतिपर्वणि** हरिश्चंद्रोपाख्यान नाम सप्त (?) प्रसंग पंचमोध्यायः ॥ हस्ताक्षर गणेशभट्टसे (स्य) सुनु काशीनाथ शर्मणेन लिख्यते । स्वार्थपरमार्थकार्यार्थ लिखितं । श्रीकृष्णार्पणमस्तु । शुभं भवतु । शके १७०४ श्रीशुभकृत नाम संवत्सरे याम्यायने आषाढकृष्ण चतुर्दशी सौम्यवासरे तद्दिने सायान्हवेलायां तस्मिन् समये आमनेरग्रामे वशिष्टातीरे सोमेश्वरलिंगसह वाराहखंडे श्रीमदाचार्य श्रीसहवर्तमाने समाप्तमस्तु । श्रीकृष्णार्पणमस्तु । श्रीरामलक्ष्मणार्पणमस्तु । श्रीलक्ष्मीनृसिंहार्पणमस्तु । शुभंभवतु ।' असा समाप्तिलेख असून अखेरीस पुन्हां 'इदं पुस्तकं गणेशभट्टस्य सुनु काशीनाथ ब्राह्मणस्य । स्वहस्तेन लिखितम्' असा शेरा आहे. (३) तिसरीच्या शेवटीं असा लेख आहे:—शके १६८२ विक्रमनामसंवत्सरे । शके सोळाशें [ब्यायशी] विक्रमीं । श्रावण शुद्ध सप्तमी । जंजिरेचे मुक्कामीं । ग्रंथसदनीं संप-

# ११. शतमुखरावणवधाख्यान.

(ओव्या.)

सद्गुरुकृपावसंतकाळ । मनआरामीं माजतां प्रबळ । श्रीरामकथा जिव्हाकोकिळें । मधुरस्वरें आलापे. ॥ १ ॥ रावणवधाचिये आधीं । युद्धसमयप्राप्त-

---

विला ॥ लिहिणार अंताजी रामनाईक बांदिवडेकर, हल्ली मुक्काम पेठ जंजिरे देवदुर्ग, तरफ साळसी. (४) चवथी पोथी संबंध वनपर्वाची आहे व तींत हें आख्यान नलोपाख्यानानंतर आलें आहे. तींतील समाप्तिलेख असा आहे—शके सत्राशें अठ्ठेचाळीस । व्ययनाम संवत्सरस । मासोत्तममास भाद्रपदमास । गुरुवासर ते दिनीं, ॥ १ ॥ वट्वषष्ठी(?) ते दिवसी । लेखन संपविलें वनपर्वासी । हस्तदोष जरी असलयासी । क्षमा केली पाहिजे. ॥ २ ॥ या ग्रंथाचा संरक्षिता । तयाचें नाम आतां । लेखन करितों विगुता । या ग्रंथान्तरीं. ॥ ३ ॥ सूर्यवंशीं रामसिंग । तयाचा पुत्र मानसिंग । ज्या जन्म यथा सांग । धन्य मातापितरें. ॥ ४ ॥ तुळसीराम ज्येष्ठ कुमर । सर्व संतांचा किंकर । त्याचे आशीर्वादें निरंतर । यथासुखें वर्ततसें. ॥ ५ ॥ संतसाधुदेवब्राह्मणांचे पायीं । निष्ठा असे अत्यंत पाहीं । सदासर्वकाळ श्रीगुरुपायीं । लक्ष असे जयाचा. ॥ ६ ॥ ग्रंथ संरक्षिता पाहीं । हल्लीं बस्ती क्षेत्र मुंबई । माता आणि त्रिबंधु पाहीं । कुटुंबसह वर्तमान असे. ॥ ७ ॥ जो कोणी ग्रंथ अभिलाषील । तयासी अध:पात घडेल । घोर नरकीं पडेल । संदेह नसे जाण पां. ॥ ८ ॥ जोंवरी चंद्रसूर्य असती । तोंवरी सुटका नसे कल्पांतीं । ऐसा दोष जाणो निश्चिती । चतुरीं सर्वथा न किजे. ॥ ९ ॥ कोणी असत्य मानील झणीं । संतवचनें आहेत पुराणीं । त्याच वनाचे आधारें करुनी । बोलिलों ऐसें जाण पां. ॥ १० ॥ श्रोतीं पहावें सावचित । अनुभव घेइजे मनांत । तेणें-करूनीया भ्रांत । निरसे तत्काळ. ॥ ११ ॥ श्री सद्गुरुतुळसीराम । तयाचीं पाउलें उत्तम । रात्रं-दिवस संप्रेम । ध्यात आपुले अंतरीं. ॥ १२ ॥ ह्या पोथ्यांपैकीं पहिली कै० **वा० दा० ओक** यांच्या व दुसरी कै० नारायणराव केळकर यांच्या हस्तलिखित ग्रंथसंग्रहांतून अम्हांस मिळाली. तिसरी कोठून मिळाली हें कळण्यास मार्ग नाहीं. चवथी पोथी रा० बाळकृष्ण सीताराम जोशी (मुरूड—जंजिरा) यांचे मार्फत हातीं आली. पांचवी पोथी कै० तुकाराम तात्यांच्या वाडांतील आहे.

१. हें आख्यान मुक्तेश्वरानें 'हनुमंतनाटका'च्या आधारानें लिहिलें आहे, असा उल्लेख ह्या प्रकरणाच्या शेवटीं (ओवी १३३ पहा) आहे परंतु सध्या विद्यमान असलेल्या 'हनुमन्नाटक' ऊर्फ 'महानाटक' या ग्रंथांत (कलकत्ताप्रतींत) हा कथाभाग आढळत नाहीं. यावरून सध्या कलकत्त्याकडे प्रचलित असलेल्या 'हनुमन्नाटका'च्या प्रतीहून मुक्तेश्वराची प्रत निराळी असावी, असें वाटतें. ह्या कथानकावर फारशी कविता आढळत नाहीं. फक्त नरहरी (३ कटिबंध) व अमृतराव ओक (१३१ गीति) ह्या दोन कवींचींच दोन लहानशीं काव्यें उपलब्ध आहेत. २. सद्गुरुकृपारूपी वसंतऋतु. ३. मनरूपी आराम (बाग) त्यांत. ४. 'माजला' असें पाठांतर. ५. जिव्हा (रूपी) कोकिळ मधुरस्वरें श्रीरामकथा आलापे—असा अन्वय. ह्या पद्यांत सुरेख रूपक आहे. ६. युद्ध-समय प्राप्त झाला त्या वेळेस, युद्ध सुरू होण्याचे वेळेस.

संधीं । कुंभकर्णाचे वंशवृद्धी । कारण जालें अवचट. ॥ २ ॥ कुंभनिकुंभ या उभय कुमरां-। माजी निकुंभाची दारा । जाली देखोनि गरोदरा । पितृ-भुवना पाठविली. ॥ ३ ॥ ते लंघोनी द्वीपांतरा । सगर्भा पातली माहेरा । नव मास भरतां सुंदरा । दुष्ट कुमारा प्रसवली. ॥ ४ ॥ पौंड्रिक ठेवूनी नामाभिधान । सुखें क्रमीत असतां दिन । तंव कुलक्षयवृत्तांतबाण । श्रवणमर्मी खडतरला. ॥ ५ ॥ रावणबंधुप्रधानकुमार । रामें वधिले सहपरिवार । बिभीषणासी राज्याधिकार । देऊनि केला अक्षयी. ॥ ६ ॥ हें ऐकोनी निशाचरी । वाहावली शोकसरितापूरीं । कुमारदृष्टी रक्षण करी । वोढोनी आणी तटाका. ॥ ७ ॥ परी बिभीषणऊर्जिताची व्याधी । लागली तेये दुर्बुद्धी । पुत्रप्रौढत्वदिव्य-औषधी । अवधीमात्रा लक्षिती. ॥ ८ ॥ बाल्यकौमारस्वप्नसुषुप्ती । सरतां आली तारुण्यजागृती । तव तो राक्षस दुष्कर्म जगतीं । कुबुद्धिदृष्टी देखत. ॥ ९ ॥ माउलीलागीं पुसे वृत्तांत । 'पूर्वजांची काय मात । तूतें वैधव्यअंधकूपांत । कोणें सूदलें? सांग पां.' ॥ १० ॥ 'श्रीरामकुठार अतिप्रचंड । तयाशीं पिता-

---

१. वंशवृद्धि होण्यास. 'वंशजवृद्धी' असें पाठांतर. २. आकस्मिक, अचानक. 'परियसा असा अन्यपाठ. ३. स्त्री, भार्या. ४. मातृगृह=माअघर=मायघर=माय्हर=माहर=माहेर. ५. 'कुपुत्रा' असा पाठभेद. ६. 'तों' असें पाठांतर. ७. श्रवण (कान) रूपी मर्मस्थानांत. येथें **रूपक** आहे. ८. आदळला, घुसला. 'हृदयवर्मी खडतरला' असा अन्यपाठ. ९. राक्षसी. १०. शोकरूपी नदीच्या पूरांत. **रूपका**लंकार. पूर=नदीचा लोंढा. ११. कुमाराचें दर्शन. सर्व कुळाचा नाश झाल्यामुळें राक्षसीस फार दुःख होत असे, तथापि ती आपला पुत्र आपले पांग फेडील, ह्या आशेवर आयुष्याचे दिवस कंठीत होती—हा इत्यर्थ. 'मग कुमरें आशेचिया करीं' असा पाठभेद. १२. 'आणिली' असें पाठांतर. १३. (नदीच्या) कांठावर. १४. ऊर्जित=ऊर्जितकाल, भरभराट. १५. 'तव' असें पाठांतर. १६. पुत्रप्रौढत्वरूपी दिव्य औषधी. 'पुत्रप्रौढत्व दिव्य आधी । औषधीमंत्रा अक्षयी' असा अन्यपाठ. १७. योग्य संधी, अनुकूळ समय हीच मात्रा. १८. बाल्यावस्था व कुमारावस्था ह्याच अनुक्रमें स्वप्नावस्था व सुषुप्त्यवस्था (गाढ झोंप). १९. 'सरला पावला जागृती' असा पाठभेद. २०.'कुबुद्धि भ्रष्ट' असें पाठांतर. ह्या ओंवीपुढें आमच्या जवळील हस्तलिखित प्रतींत पुढील ओंवी आढळते:—'तो जाला तारुण्यमूर्ति । तैं तो राक्षस दुष्कर्म जगतीं । कुबुद्ध दुष्ट वर्तताती । सहज स्थिति राक्षस. ॥' २१. पितरांची, वाडवडीलांची. २२. हकिकत, वर्तमान. २३. वैधव्यरूपी अंधकूपांत. मुक्तेश्वरानें 'अंधकूप' हा शब्द मोठ्या खुबीनें योजिला आहे. अंधकूपांत प्रकाशाचा लवलेशही आढळावयाचा नाहीं त्याप्रमाणेंच वैधव्यांत सुखप्राप्ति यत्किंचितही व्हावयाची नाहीं—असें कवीनें सुचविलें आहे. २४. घातलें, टाकिलें. २५. कुठार=कुऱ्हाड, लांकडें तोडायाचें हत्यार. 'श्रीरामबाणकुठार अति प्रसिद्ध' असा पाठभेद.

महबंधु मिनला दंडे[1] । समूळेंसीं[2] करून खंडखंड । तव कुळतरू छेदिला.' ॥ ११ ॥ परिसतां हे मातृगिरा[3] । क्रोध नावरे[4] निशाचरा । म्हणे, 'गोत्रवध-पापाचारा[5] । प्रायश्चित्त मी जाणें. ॥ १२ ॥ न करूनियां प्राणनाशा[6] । बिभीषण लंघवीन[7] दश दिशा । तरीच कुंभकर्णाची स्नुषा[8] । पुत्रवंती ऐकली[9]. ॥ १३ ॥ ऐसें वदोनियां[10] त्या अवसरा[11] । सवेग[12] भरला गगनोदरा । क्षीरसिंधूच्या पैलतीरा । मायापुरा पातला. ॥ १४ ॥ तेथें नसती चंद्रसूर[13] । निबिड दारुण अंधकार । माजी असंख्य निशाचर । पर्वतप्राय एक एक. ॥ १५ ॥ येउनी शोणितपुरा[14] । नित्य त्राशिती दिनकरा[15] । तयां सकळांमध्यें धुरा[16] । नाम[17] रावण शतमुख. ॥ १६ ॥ त्याचे वंदुनीयां[18] चरण । पौंड्रिक रिघता[19] जाला शरण । पूर्ववृत्तांत करूनी श्रवण[20] । पुढें विनंती निवेदिली[21]. ॥ १७ ॥ जेणें राक्षसकुळधाम[22] । रामाग्नि लाऊनियां केलें भस्म । तो मम पूर्वजांमाजी अधम । निर्भयपणें नांदतसे. ॥ १८ ॥ त्यातें करूनी पदच्युत । म्यांची होणें[23] लंकानाथ । हा मज याचकाचा मनोरथ । पूर्ण करिजे[24]; दातारा ! ॥ १९ ॥ 'अवश्य' म्हणोनी शतमौळ[25] । सवें[26] घेउनी अपार दळ[27] । गगनपंथें[28] उतावेळ ।

---

१. दांडा. समानार्थक पद्य:—'जंव दुर्योधनकुबुद्धिकुठार । त्यांत सांपडला दंड धृतराष्ट्र । तंव पांडवसुखतरुवर । छेदोनि वनीं हिंडविलें. ॥ २४ ॥' (शुभानंदकृत उद्योगपर्व-अध्याय १७) मिनला=मिळाला. 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' ह्या म्हणीची येथें आठवण होते. 'तयाशीं बिभीषण बंधु मिळाला द्वंद्व' असा पाठभेद. २.मूळापासून. 'समुळेसीं केला निखंड' असा अन्यपाठ. ३. आईचें भाषण. गिरा=वाणी. 'वृत्तांत परिसोनी मातृगिरा' असा अन्यपाठ. ४. 'न सांवरे' असें पाठांतर. ५. कुळक्षयरूपी पापकर्मास. 'गोत्रबंधु पाचारा' (?) असा पाठभेद. ६. बिभीषणास ठार न मारितां, दाही दिशा भटकावयास लावीन—हा इत्यर्थ. 'न करितां' 'देहनाशा' असा पाठभेद. ७. 'लंघोनि दिग्दिशा' असें पाठांतर. ८. कुंभकर्णपुत्र निकुंभाची पत्नी. स्नुषा=सून, मुलाची बायको. ९. 'इह लोकीं' असा अन्यपाठ. १०. 'ऐसें बोलोनी प्रतिज्ञोत्तर' 'इया बोलोनियां प्रतिज्ञोत्तरा' असे पाठभेद. ११. प्रसंगीं, समयीं. १२. वेगानें, मोठ्या त्वरेनें. १३. सूर=सूर्य. 'सूर्यकिरा' असें पाठांतर. १४. 'श्रोनी नदीतीरा' पाठांतर. १५. सूर्यास. १६. श्रेष्ठ, मुख्य. 'सकळां मुख्यधरा' असा अन्यपाठ. १७. 'मुख्य' पाठांतर. १८. 'नमस्कारोनी' पाठभेद. १९. शरण गेला. 'निघाला' असें पाठांतर. २०. श्रवण करवून, सांगून. २१. 'पुढील इच्छित निवेदी' असा अन्यपाठ. २२. येथें एकदम 'बिभीषण' असें न म्हणतां 'ज्यानें राक्षसकुळरूपी घरास रामरूपी अग्नी लावून राक्षसकुळ भस्म केलें तो' असें वळसा घेऊन म्हटलें आहे म्हणून हा सुरेख—**'पर्यायोक्ता'**लंकार होय. २३. 'व्हावें' असें पाठांतर. २४. 'कीजे' अन्यपाठ. २५. शतमुखरावण. मौळ=डोकें, शिर. २६. 'संगें' असें पाठांतर. २७. सैन्य, फौज. २८. आकाशमार्गानें. 'व्योमपंथें' असा पाठभेद.

मेघाकृती[1] चालिला. ॥ २० ॥ सर्वेही उतरून[2] लंकापुरा । वेढोनी[3] वर्षती शस्त्रधारा । बिभीषण होउनी घाबरा । थोर झुंजार[4] वीरां पाचारी. ॥ २१ ॥ सज्ज[5] करोनी सकळ दळ[6] । युद्ध केलें अतितुंबळ । परंतु तें परचक्रदळ[8] । असंभाव्य आगळें[9]. ॥ २२ ॥ बिभीषणसैन्यभद्रजाती[10] । शत्रुशस्त्रें सिंहाकृती[11] । झगटतां[12] प्राणयशकीर्ति । एकही तेव्हां न लाहे[13]. ॥ २३ ॥ जाणोनी तें अलोट विघ्न । चौघां प्रधानांसहवर्तमान । रावणानुज[14] पलायमान । उत्तरदिशे संचरलें[15]. ॥ २४ ॥ पळतां[16] बिभीषणसद्भावो[17] । दुर्जनीं[18] मांडिला विजयउत्सवो । राज्यीं स्थापूनी पौंड्रिकरावो । शतशीर्ष गेला स्वस्थाना. ॥ २५ ॥ येरीकडे लंकानाथ । जाला[19] फार चिंताग्रस्त । अयोध्ये येऊनियां त्वरित । राजालयीं[20] प्रवेशला. ॥ २६ ॥ तों राम[21] बैसले सिंहासनीं । भोंवत्या विबुधांच्या[22] श्रेणी[23] । दाटल्या असतां तेच क्षणीं[24] । राक्षसराज पातला. ॥ २७ ॥ श्रीरामचरण[25] देखतां दिठी । रावणानुजें घातली मिठी । रामें[26] आलिंगुनी कंठीं । अति सन्मानें बैसविला. ॥ २८ ॥ श्रीरामपदाब्जपराग[27] । सेविती लंकेशनयनभृंग[28] । मंदहास्य[29] जानकीरंग । निजभक्तासीं अनुवादे[30]. ॥ २९ ॥ म्हणे

---

१. मेघाकृति=मेघसमुदायाप्रमाणें ज्या सैन्याचा अफाट विस्तार होता आणि जो आकाशमार्गानें जात असतां मेघसमूहाप्रमाणें विस्तृत, घनदाट, भयानक व सभोंवार उद्विग्नतेची छाया पसरविणारा असा. 'मेघाकृति' हा शब्द योजण्यांत मुक्तेश्वरानें फार चातुर्य दाखविलें आहे. 'मेघपुरा चालिला' 'मेघापरी चालला' असे अन्यपाठ. २. 'येऊनी' असें पाठांतर. ३. 'दोनी वर्षती शस्त्रभार' असा अन्यपाठ. ४. झुंजार वीर=योद्धे, लढवय्ये. 'झुंझार वोरा' असा चुकीचा पाठ 'काव्येतिहाससंग्रहां'तील छापील प्रतींत होता. ५. 'सिद्ध' असा अन्यपाठ. ६. सैन्य. ७. घनघोर. ८. शत्रूचें (शतमुखाचें) सैन्य. ९. पराक्रमी, मोठें. १०. बिभीषणाचें सैन्यरूपी हत्ती. (भद्रजाती=हत्ती). ११. सिंहासारखीं भयंकर, उग्र. १२. 'प्रगटतां' असें पाठांतर. १३. मिळवी, लाभे. याचा कर्ता °भद्रजाती. 'जाणा (किंवा 'जाणों') न लाहे' असा अन्यपाठ. १४. बिभीषण. अनुज=कनिष्ठबंधु. 'रावणानुजें यः पलायन' असा पाठभेद. १५. जाता झाला. १६. 'निघतां' असें पाठांतर. १७. बिभीषण हाच सद्भाव. १८. राक्षसांनीं १९. येथें छापील प्रतींत 'राजा' असा चुकीचा पाठ होता. २०. (रामाच्या) राजवाड्यांत. राजा+आलय (घर)=राजाचें निवासस्थान. 'राजांगणीं' असें पाठांतर. २१. 'श्रीराम बैसला सिंहासनीं । भोंवत्या बंधूंच्या श्रेणी' असा पाठभेद. २२. देवांच्या. २३. पंक्ती, ओळी. २४. येथें छापील प्रतींत 'ते श्रवणीं' असा चुकीचा पाठ होता. 'सभा दाटली असतां तेच क्षणीं' असा अन्यपाठ आहे. २५. 'रघुनाथचरण देखतां दृष्टी' असा अन्यपाठ. दिठी=दृष्टीनें. २६. 'श्रीवरें' पाठांतर. २७. श्रीरामाचे चरण(पाय)रूपी कमळांतील पराग (रज). २८. बिभीषणाचे नयन (डोळे) रूपी भृंग (भ्रमर, भुंगे). येथें सुरेख रूपक आहे. २९. 'मंदहास्यें' असें पाठांतर. ३०. भाषण करी.

'सोडोनी रा[1]ज्यासन। दुरी केलें आगमनें[2] । व[3]दनचंद्रीं लांच्छन । घ[4]न चिंतेचें दि[5]सतसे. ॥ ३० ॥ सांग पां या[6]सि कारण कोण?' । येरू बोले वंदुनी चरण । 'तुवां दि[7]धलें लंकाधन । तें शताननें हरि[8]तलें. ॥ ३१ ॥ श[9]तमुखशृगालदुराचरण । ऐकोनी श्रीरा[10]मपंचानन । क्षोभला जैसा हु[11]ताशन। शु[12]ष्मे इंधनीं स्पर्शतां. ॥ ३२ ॥ ते दिवशीं एकादशी । श्रीराम होते उ[13]पवासी । लोटली अ[14]सतां प्रहर निशी । तेव्हां वदतसे प्रतिज्ञा. ॥ ३३ ॥ 'उदया न येतां त[15]मारी । शतशीर्षासी मारूनी रात्रीं । तुतें स्थापुनी लंका[16]पुरीं । पा[17]रणें करीन अयोध्ये. ॥ ३४ ॥ हें साच न करीं जरी बोलणें । तरी माझ्या पूर्वजां '[18]उणें'. । ऐसें व[19]दुनी रघुनंदनें । पूशिलें 'वास्तव्य त्याचें कोठें?' ॥ ३५ ॥ रावणानुज सांगे गोष्टी । 'क्षीरसिंधूच्या पैलतटीं । [20]शोणितेचे निकटीं । मायापुरीं वसतसे.' ॥ ३६ ॥ आ[21]णोनी ते अ[22]साध्य मात । चिंता करी अ[23]योध्यानाथ । म्हणे, 'आमचें नेम[24]व्रत । केवीं पावे सिद्धीतें?' ॥ ३७ ॥ पश्चात्तापनदीआंत । श्रीराम वा[25]हात वा[25]हात जात । नारदागमन अकस्मात । विशाळ ता[26]रू लो[27]धला.

---

१. 'सांडोन राज्यासन। दूरी जालें आगमन' असा पाठभेद. २. 'दूरूनि झालें आगमन' असा अन्यपाठ. ३. मुखचंद्राचे ठायीं. ४. वदनचंद्रीं चिंतेचें घन (दाट) लांच्छन (डाग) दिसतसे–असा अन्वय. ५. 'भासतसे' पाठांतर. ६. 'यावयासी' असें पाठांतर. ७. 'जी तुम्ही दिधलें लंकाधन । शतमुखरावणें हिरतलें' असा पाठभेद. ८. हरण केलें. 'शतमुखरावणें हरियेलें' असा अन्यपाठ आहे. ९. शतमुखरूपी शृगालाचें (कोल्ह्याचें) दुराचरण. ही ओंवी लिहितानां 'जोंवरी देखिलें नाहीं पंचानना, तोंवरी जंबुक करी गर्जना' ही प्रचारांतील म्हण मुक्तेश्वराच्या डोक्यांत घोळत होती, असें दिसतें. १०. रामरूपी सिंह. येथें रूपकालंकार आहे. ११. अग्नि, विस्तव. १२. पेटे, प्रज्वलित होई. 'शुष्क इंधनीं' असें पाठांतर, इंधन=सर्पण, जळाऊ लांकडें. १३. भोजनरहित. १४. 'क्रमिली असतां' असें पाठांतर. निशी=रात्र. १५. तम (अंधकार)+अरी (शत्रू)=सूर्य. 'उदय न होतां क्षणमात्रीं' असा अन्यपाठ. १६. 'लंकाक्षेत्रीं' असें पाठांतर. १७. उपवासानंतर दुसरे दिवशीं भोजन करितात तें. १८. कमीपणा, अपकीर्ति. १९. 'बोलोनि' पाठांतर. २०. 'श्रोणानदीच्या पैलतरीं' 'श्रोणनदीचे कांठीं' असे पाठभेद. २१. 'ऐकतां हे' पाठांतर. २२. साध्य होण्यास कठीण, अशक्य. २३. 'ऐकतांचि दूर पंथ । विस्मित राहे अयोध्यानाथ' असा अन्यपाठ. २४. प्रतिज्ञाः 'मनवृत्त' असा पाठ छापील प्रतींत होता. मनवृत्त=मनोवृत्त, मनोरथ. २५. 'चिंता वाहात' असा पाठभेद. २६. नारदाचें आगमनरूपी तारूं (जहाज). लाधला=प्राप्त झाला. 'विशाळ तारूं लागलें' असा पाठभेद. २७. 'तारू लाधला' 'तारूं भेटलें' असे पाठभेद.

॥ ३८ ॥ नमस्कारूनी[1] देवमुनी । बैसविला हेमपीठासनीं[2] । ऋषि संतोषोनी सुधावचनीं । श्रीरामासीं[3] अनुवादे. ॥ ३९ ॥ 'तव चित्त[4]निर्मळगंगाजळ । चिंताकर्दमीं[5] दिसतसे खडूळ[6] । कोणत्या[7] दुःखाचा विटाळ । पडला तूतें राघवा!' ॥ ४० ॥ भक्तकैवारा[8]लागून । दुर्जनाचें कीजे हनन[9] । यांलागीं युद्धीं पण । म्यां आजी केला; सर्वज्ञा! ॥ ४१ ॥ तया प्रतिज्ञापर्वतातें । न उचलवे सामर्थ्यहस्तें । म्हणोनीयां[10] माझ्या चित्तें । चिंतार्णवीं[11] हिंडिजे.' ॥ ४२ ॥ ऐकोनि हांसे ब्रह्मतनयें[12] । 'देखिलें हें महदाश्चर्य[13] । मृगांबुसरितापूरभयें[14] । अगस्ति[15] कांपे थरथरां. ॥ ४३ ॥ तेवीं तूं गा! सर्वेश्वर । आचरतोसी लौकिकाचार. । असो, आतां[16] हा विचार । सांगतों तो आकर्णी[17]. ॥ ४४ ॥ जवळ हनुमंत असतां सुधा[18] । कायशी चिंताक्षयरोगबाधा[19]?' । ह्या ऐकुनी युक्तिशब्दा[20] । रघुराज स्तवी[21] कपीतें. ॥ ४५ ॥ म्हणे, 'सप्ताब्धिगर्ता[22]! प्रबळा! । उलंघवीं आम्हां पांगुळां । मायापुरीं राक्षसमेळा । शीघ्र दावीं लोचनीं.' ॥ ४६ ॥ आज्ञा करितां त्रैलोक्यपाळ । कपी वाढविला[23] द्रुम विशाळ[24] । सत्यलोका[25] लाउनी मौळें[26] । ठाकला मेरूसारिखा. ॥ ४७ ॥ गर्जोनि बोले, 'विश्रेयधामा[27]! ।

---

१. 'तंव नमस्कारिलें' असें पाठांतर. देवमुनी=देवर्षि, नारद. २. सोन्याच्या पीठासनावर. 'कनकासनीं' असें पाठांतर. ३. 'श्रीराम तो' पाठांतर. ४. (रामाचें) चित्त (मन) हेंच पवित्र गंगाजळ. ५. चितारूपी चिखलांत. येथें व ओवी ३८ हींत **रूपक** आहे. ६. 'गढुळ' असें पाठांतर. ७. 'काय संशयाचा विचार प्रबळ । झाला तूतें राघवा' असा पाठभेद. ८. भक्तांचें संरक्षण व्हावें म्हणून. 'कैवारीं लागून' असें पाठांतर. ९. नाश. १०. 'म्हणोनियां' पाठांतर. पण=प्रतिज्ञा. ११. चिंतारूपी समुद्रांत, चिंतासागरांत. १२. 'हासोनि बोले विरंचितनय' असा अन्यपाठ. १३. 'देखिलें हें परमाश्चर्य' असा अन्यपाठ. १४. मृगजळाच्या नदीच्या पुराच्या भयानें. १५. ह्या ऋषींनीं एकदां सर्व समुद्र पिऊन शुष्क केला होता—ह्या कथेवर कटाक्ष आहे. [अगस्त्य=अग (पर्वत, विंध्याचल)+स्त्य (स्तंभन करणारा). ह्याचा विग्रह:-(१) विंध्याख्यं अगं अस्यति (२) अगं विंध्याचलं-स्त्यायति स्तभ्नाति. (३) अगः कुंभः तत्र स्त्यानः संहतः इत्यगस्त्यः ।]. १६. 'असोनी येक विचार' 'असो मी एक विचार' असे अन्यपाठ. १७. ऐक. 'सांगतों तें अनुर्मी' असें पाठांतर. १८. अमृत. १९. 'राक्षस क्षयरोगबाधा' असा पाठभेद. २०. 'परिसोनि मुनिच्या युक्त शब्दा' असा अन्यपाठ. २१. 'प्रार्थी' पाठांतर. २२. सप्तसमुद्र ज्याला एखाद्या गर्ते (खळग्या) प्रमाणें आहेत अशा (मारुति!) 'म्हणे बळाब्धि कार्या प्रबळा । लंघूनियां समुद्रजळा' असा अन्यपाठ. २३. 'वाढे जळा' असा पाठ आदर्शप्रतींत होता. २४. 'अति विशाळ' असा अन्यपाठ. २५. सत्यलोक=सप्तलोकांपैकीं अगदीं वरचा लोक. सप्तलोकः=भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनोलोक, तपोलोक आणि सत्यलोक. 'सत्यलोकाहूनी मौळ' असा पाठभेद. 'सप्तलोकां' असा पाठ छापील प्रतींत होता. २६. मस्तक डोकें. २७. विश्रेय (विशेष श्रेय, मुक्ती)+धाम (स्थान)=मोक्षप्राप्तीचें स्थान (राम). 'विश्रामधाम' असा पाठभेद.

[1]वोळंघिजे माझ्या शरीर[2]द्रुमा । परिवारेंशीं [3]शतमुखग्रामा । आतांचि [4]नेईन क्षणार्धे. ॥ ४८ ॥ मग बिभीषण आणि ब्रह्मकुमर । बंधुसहित श्रीरामचंद्र । [5]सवें घेउनी अपार वीर । कपि[6]तनुपर्वतीं वळघले. ॥ ४९ ॥ अंजनी[7]तनयकायांबरीं । वीरनक्षत्रांचिया [8]हारी । [9]अवयवसंधिपर्वतागारीं । बैसते जाले समस्त. ॥ ५० ॥ कपी [10]वामचरण शरयूतीरीं । सव्य ठेवी मायापुरीं । समस्त उतरोनियां भूमीवरी । [11]कंदनगोंधळा [12]घोलिती. ॥ ५१ ॥ श्रीरामजगज्जननीचे [13]भुते । पाजळोनी दीपि[14]कापोत । वीरश्रीप्रेमेंकरूनी [15]तृप्त । पट्टणचौका भोंवतें. ॥ ५२ ॥ झुंझारवीर अनेकी । सिंहनादाचे [16]चौडकीं । गर्जोनीयां [17]बोलती मुखीं । '[18]उदो' 'उदो' श्रीअंबेचा. ॥ ५३ ॥ कपिभुभुः[19]कारसमेळ । [20]आंहटितां कांपिन्नला भूगोळ । तो [21]महाशब्दव्याळ । शतशीर्षकर्णी [22]झोंबिलें. ॥ ५४ ॥ सावध होउनी निशाचर । पाचारूनियां समस्त वीर । म्हणे, '[23]शत्रुभूतसंचार । नगरा वेष्टित [24]दिसेंत आहे. ॥ ५५ ॥ 'शीघ्र हरावयातें [25]बाधा । तुम्हीं गेलें पाहिजे युद्धा' । [26]म्हणे, [27]काळकेतु प्रबुद्धा । प्रधानातें आज्ञापी. ॥ ५६ ॥

---

१. चढावें. 'लंघवीजे' असा अन्यपाठ. २. शरीररूपी वृक्षावर. [द्रुम=द्रवंति ऊर्ध्वं गच्छंतीति द्रवः शाखास्ताः संत्यस्यासौ द्रुमः । 'द्रु' धातूपासून 'द्रुम' किंवा 'द्रु' शब्द झाला आहे. रघुवंश–सर्ग ५।५२ चारित्रवर्धनकृत टीका पहा]. ३. शतमुखाची पुरी (मायापुरी). ग्राम=गांव. 'शतमुखधाम' असें पाठांतर. धाम=गृह, घर. ४. 'दावीन' असें पाठांतर. ५. बरोबर. 'संगें घेऊनि असंख्य वीर' असा अन्यपाठ. ६. मारुतीच्या शरीररूपी पर्वतावर. 'कपीश्वरपर्वता वळंघले' असा पाठभेद. ७. मारुतीच्या काया (शरीर) रूपी अंबरीं (आकाशांत). ८. वीर (योद्धे) रूपी नक्षत्रांच्या हारी (पंक्ति, ओळी). येथील **रूपक** मोठें बहारीचें आहे. ९. 'अवयवसंधीं पवनचक्रीं' असा अन्यपाठ. १०. डावा पाय. ११. युद्धरूपी गोंधळ. १२. 'मिसळले' असें पाठांतर. १३. भुते=तुळजापुरच्या भवानीचे पुजारी. 'भृत्य' असें पाठांतर. १४. कांकडे. १५. वीरश्रीविषयीं, वीरांचें तें अप्रतिम प्रेम त्याचे योगानें ते आनंदांत दंग झाले–हा इत्यर्थ. 'विरीं श्रीप्रेमेंकरूनि नृत्य पाटणचौका भोंवती' असा पाठभेद. १६. गोंधळ्याचें तुणतुणें, चोंडकें. १७. 'वाजवोनियां गर्जिजे मुखीं' असें पाठांतर. १८. उदय होवो. १९. समेळ=वाद्यविशेष. समेळ व चोंडकें हीं वाद्यें गोंधळांत वाजवितात. २०. वाजवितां. 'दुमदुमिला ब्रह्मांडगोळ । तो मायाशब्दनादव्याळ ।' असा पाठभेद. २१. व्याळ=सर्प. 'व्यालो दुष्टगजे सर्पे' इति मेदिनी. २२. रामाच्या सेनेची गडबड शतमुखाच्या कानीं पडली (समजली). हा इत्यर्थ. २३. शत्रुरूपी भूताचा संचार (अंगांत येणें). 'म्हणती शत्रुभूतसंचार । नरां वेष्टित जालासे' असा अन्यपाठ. २४. 'झालासे' असें पाठांतर. २५. भूतबाधा. 'ते बाधा' असें पाठांतर. २६. ह्याचा कर्ता 'शतमुख'. २७. हा शतमुखाचा प्रधान. ह्याचें नांव 'कालिकेय' असेंही अन्यत्र आढळतें. 'त्या काळिका अतिप्रबुद्धा' असा अन्यपाठ.

शूर दाक्षरी कालिक । अंगबळें[2] तो मांत्रिक[1] । घेउनी महावीरांचें कटक[3] । वैरियांउजू[4] लोटला. ॥ ५७ ॥ देखोनी श्रीरामसैन्यभूता । टाकिती श्रीबाणा-त्रमंत्र[5] । येरीं न गणून[6] निर्भयैता[7] । राक्षसांसीं झुंजती. ॥ ५८ ॥ हनुमंत-सहाद्भुताकार[8] । देखोनी भ्याले निशाचर । काळकेतें धरुनियां धीर । युद्ध केलें संत्राणें[9]. ॥ ५९ ॥ त्यांतें[10] श्रीराममहाकाळें । घालोनियां बाणजाळें । तनुजळा-हूनी वेगळे । प्राणमत्स्य[11] काढिले. ॥ ६० ॥ काळकेतक[12] पावतां मृत्य । अंग-लंग[13] पळोन जात । शतशीर्षमुख्यालागीं[14] मात । सांग[15] सांगती[16] युद्धाची. ॥ ६१ ॥ म्हणती 'आम्ही वीर त्रिखारी[17] । बाणरदें[18] शत्रुजिव्हारीं[19] । डंखिलें[20] परी ते धन्वंतरी[21] । शस्त्रविष बाधूं नेदिती.[22]' ॥ ६२ ॥ हें देखोनी महानेटें । उसळिजे कालेयकालकूटें[23] । तें श्रीरामनीलकंठें । घोटोनि[24] केलें निर्विष[25]. ॥ ६३ ॥ वृत्तांतघृत श्रवणकुंडीं । पडतां क्रोधाग्नि धडाडी । कुशब्दज्वाला वमितां[26] तोंडीं । रणांगणीं पातला. ॥ ६४ ॥ देखोनी[27] मानवांचे वृंदें[28] । शतमुखें केला सिंह-नाद । मग दुर्मति अतिकुशब्द[29] । राघवउजू जल्पत[30]. ॥ ६५ ॥ 'शीघ्रें[31] भक्षा-वया मृत्युफळें । जाले तुम्हांसी डोहळे । कीं पाश घालोनी मृत्युकाळें । भेटा-वैया[32] आणिलें. ॥ ६६ ॥ तुटली आयुष्याची दोरी । मृगें शिरती[33] शबराघरीं[34] ।

---

१. मांत्रिक, भूतबाधा हरण करणारे. २. स्वपराक्रमानें. 'अपार मेळवुनियां कटक । आणिक मेळवुनियां मंत्रिक । वैरियां सन्मुख चालिले ॥' असा अन्यपाठ. ३. सैन्य. ४. समोर, साम-न्यास. ५. 'बाणमंत्राक्षता' असें पाठांतर. ६. पर्वा न करितां. ७. निर्भयतः बिनधोक. ८. मारुतीचें अत्यंत आश्चर्यकारक रूप. 'महाभूताकार' असें पाठांतर. ९. नेटानें, ईर्ष्येनें. १०. काळकेतु नामक प्रधानातें. 'त्यांत' पाठांतर. ११. पंच प्राण हेच शरीररूपी पाण्यांतील मासे. ह्या ओवींतील **रूपक** फार चेतोहर आहे. 'टाकिले' असा पाठभेद. १२. 'कालिक कुर्कुट' असें पाठांतर. १३. 'अगलंग पिलीं' अन्यपाठ. १४. त्यांचा स्वामी जो शतमुख त्यास. मात=वार्ता, हकिकत. १५. सविस्तर. १६. 'सांगितली' असें पाठांतर. १७. सर्पासारखे. विखार=साप. १८. बाणरूप दातांनीं. 'बाणवदनें' पाठांतर. १९. शत्रूच्या मर्मस्थानीं. २०. दंश केला. 'खंडिलें' 'दंशिलें' अशीं पाठांतरें. २१. देवांचा वैद्य. २२. 'शस्त्रविषबाधा न गणिती' असा अन्यपाठ. २३. यमुनेंत राहणाऱ्या कालिय नाम सर्पाच्या विषानें. 'उसळे जें कालेयकूटें' 'उसळती कालिया-कुर्कुटें' असे पाठभेद आहेत. २४. पिऊन. 'त्यांत श्रीराम नीलकंठ । कोठोनी केलें निर्माण' असा अन्यपाठ. २५. 'निर्नाम' असें पाठांतर. २६. वमणें=ओकणें. ह्या पद्यांत सुरेख **रूपकालंकार** आहे. 'मिती तोंडीं' असा पाठ आदर्शपुस्तकांत होता. २७. 'लक्षुनी' पाठांतर. २८. समूह, समुदाय. २९. 'मग अति दुर्बोध दुर्मदें । राघवाउजू तळपत' असा पाठभेद. ३०. बडबड करी. ३१. 'शीघ्र भक्षावीं मृत्युफळें । म्हणोनि तुम्हासि जाहले डोहळे' असा पाठभेद. ३२. 'भविष्य गे' 'भविष्य पुरलें' असे अन्यपाठ. ३३. 'तित्तीर प्रवेशे' असा अन्यपाठ. ३४. पारध्याचे घरांत.

सिंह वसे त्या कांतारीं[1] । गजभार[2] येती चरावया. ॥ ६७ ॥ राम नाहे हे लंकापुरी । प्रत्यक्ष काळव्याघ्राची दरी[3] । येथें तुम्हीं मानववीरीं । दुजे हें अपूर्व वाटे. ॥ ६८ ॥ दवडावया[4] प्राणदैन्या । मागों आलेती मरणधना । तरी स्वहस्तकीं[5] मृत्युदाना । देतसें तुम्हां सकळांतें.' ॥ ६९ ॥ ऐसें बोलोनी दुरा-चारी । वर्षला बाणखदिरांगारीं[6] । ते लागोनी सर्व शरीरीं । रामसेना पोळली. ॥ ७० ॥ घायें परिवार जाला भस्म[7] । अरिवर्म[8] देखोनी मेघश्याम । शरधारांचे अपार स्तोम[9] । शतमुखक्षिती[10] रिचवीत[11]. ॥ ७१ ॥ श्रीरामबाण असंख्य बिंदू । शतमुख गिळी राक्षससिंधू । कोपोनियां जगद्बंधू । संधान[12] करी पुन-रपि. ॥ ७२ ॥ बाणसर्प सोडी[13] उदंड । तितुके खंडी[14] निशाचरगरुड । राम शरें वर्षला प्रचंड[15] । प्रळयरुद्रासारिखा. ॥ ७३ ॥ राम प्रेरी वज्रांतराच्या[16] हारी । परी त्या पडती वदनागारीं । शतमुखवन्हिकुंडीं[17]माझारी । सायकतृणें[18] भस्मती[19]. ॥ ७४ ॥ आश्चर्य करती अंगलंग । विश्वंतश्चक्षु[20] जाला दंग । तों नारद म्हणे, 'प्रयोग । असे याचा निराळा. ॥ ७५ ॥ तुजसारिखे जगजीवना ! । जेथुनी अवतार निघती[21] नाना । अनंत ब्रह्मांडांची रचना । संकल्पमात्रें[22] संभवे. ॥ ७६ ॥ ते आदिशक्ति चिरंज्योती । जाळील शतमुखकर्पूराप्रती.' । राघव म्हणे, 'तये वस्तीं[23] । आकाश[24] येणें अघटित.' ॥ ७७ ॥ 'वर्म[25] नेणसी रघुपती ! । ते चिज्ज्योती जानकीसती । तितें आणोनी शीघ्रगती । नमस्कारूनी प्रार्थी

---

१. अरण्यांत. 'सिंहवसति तयाभीतरी' असें पाठांतर. २. हत्तींचे कळप. ३. गुहा. 'काळांत व्याघ्रवल्लींची दरी' अन्यपाठ. ४. 'दंडावया' पाठांतर. ५. आपल्या हातांनीं. 'स्वहस्तकें जाणा' असा अन्यपाठ. ६. बाणरूपी अग्नि. खदिरांगार=खैराच्या लांकडाचा निखारा. 'वर्षो लागला' असें पाठांतर. ७. 'अक्षम' पाठांतर. ८. शत्रूचें (शतमुखाचें) वर्म (कवच, मर्मस्थान.) ९. समूह, जमाव. १०. शतमुखरूपी पृथ्वीवर. ११. रिचविणें=टाकणें, ओतणें. १२. शरसंधान. १३. ह्याचा कर्ता 'राम'. उदंड=पुष्कळ. १४. 'प्राशी' 'ग्रासी' अशीं पाठांतरें. गरुड व सर्प ह्यांचें हाडवैर आहे–हें प्रसिद्धच आहे. १५. 'शर वर्षला उदंड' असें पाठांतर. १६. निरनि-राळ्या वज्रांच्या हारी (ओळी, पंक्ती). 'परीवर्जताराची हारी । पास्ते पाडती (?) वदनागारीं ।' असा पाठ छापील प्रतींत होता. १७. शतमुखरूपी अग्निकुंडांत. १८. बाणरूपी गवत. १९. 'पतं-गप्राय भस्म होती' असें पाठांतर. २०. सर्वसाक्षी (राम). २१. 'होती' 'अवतरती' अशीं पाठां-तरें. २२. इच्छामात्रें. २३. 'व्यक्ती' असें पाठांतर. २४. या अर्धाचा अन्वयार्थ:–'तये वस्तीं (त्या ठिकाणीं) आकाश (शून्यस्वरूपी, निर्गुण आदिशक्ति) येणें (=स्फुरणें) अघटित (=अशक्य होय). 'आकारावया अघटित' असें पाठांतर. २५. रहस्य. 'वर्म नेणे' असें पाठांतर.

कां.' ॥ ७८ ॥ मुनिवचनोक्तिपीयूषपान[1] । घडतां तोषला राजीवनयन[2] । कपी- द्रातें कर जोडून । विनयशब्दें[3] अनुवादे. ॥ ७९ ॥ 'आम्हांसहित परिवारा[4] । अपेशशक्तीनें केले घुरा । तरी आतां जीववावया[5] त्वरा । तुवां केली पाहिजे. ॥ ८० ॥ अयोध्ये जाउनी पवनबाळा ! । आणीं जानकीद्रोणाचळा.'[6] । आज्ञा होतां चरणकमळा । आकर्णिलें[7] माघारें. ॥ ८१ ॥ शतमुख मांडूनीयां[8] ठाण । अपार करी शरसंधान । तें वारीत रघुनंदन । रणांगणीं उभा असे. ॥ ८२ ॥ तंव येरीकडे अयोध्यापुरीं । सीता निद्रिस्त निजमंदिरीं । देखोनी, कपी मनसागरीं[9] । युक्तिमुक्ता धुंडीत. ॥ ८३ ॥ म्हणे 'करितां शब्दघोष[10] । निद्राभंगाचा घडेल दोष । स्वामिकांतेतें करतां स्पर्श । कामा[11] नये सर्वथा. ॥ ८४ ॥ म्हणोन उर्वीतें[12] उकरोन । मग तो हनुमंतश्रीकृष्ण । जनकात्मजा-[13] गोवर्धन । उचलोनी घेतला कराग्रीं. ॥ ८५ ॥ कपिहस्त ते भागीरथी । वरी[14] सदननाव[15] सीता सती । कीं कर[16]आकाशीं गृह[17]इंदुदीप्ती- । माजी जानकी सतरावी[18]. ॥ ८६ ॥ असो. तो कपींद्रसुपर्ण । करपृष्ठीं क्षितिजानारायण । घेउनी रण-सरोवरस्थान[19] । एकेची पाउलें पातला. ॥ ८७ ॥ घाबरा रघुनाथगजेंद्र[20] । जा-

---

१. नारदाचें भाषणरूपी अमृतपान. २. कमलनयन (राम). 'होऊनि तोषला शेषश-यन' असा अन्यपाठ आहे. ३. 'विनयवेशें विनवित' असा पाठभेद. ४. ह्या ओंवीचा अन्यपाठः-'आम्हांसहित वानरा । आपे शक्तीनें खेळापुरा । तरी जीव वांचवावे त्वरा । त्वां केली पाहिजे. ॥'. घुरा=ज्याचे अंगांत देवीचा संचार झाला आहे तो. ५. 'यश वांच-वावया' असा पाठभेद. ६. सीतारूपी द्रोणागिरी. रावणाशीं युद्ध करीत असतां रावणानें सोडिलेली शक्ति लक्ष्मणास लागली, त्या वेळीं मारुतीनें द्रोणाद्रि आणून त्यावरील संजीवनी नामक औषधीचे योगानें लक्ष्मणास उठविलें; अशी कथा आहे. [अध्यात्मरामायणयुद्धकांड-सर्ग ६ पहा]. 'गुणवेल्हाळा' असें पाठांतर. ७. ह्याचा कर्ता 'मारुती'. ८. सैन्याची रचना. 'शतवदन त्रासुनी बाण । अपार करी रणकंदन । तव वरीं रघुनंदन ।' असा अन्यपाठ. ९. मन-रूपी समुद्रांत युक्ति (सीतेस मायापुरास नेण्याविषयीं उपाय) रूपी मोतीं. रूपकालंकार. १०. आवाज, गोंगाट. 'म्हणे केल्या शब्दघोष । निद्राभंग केल्याचा दोष' असा पाठभेद. ११. कामा नये=योग्य नाहीं, चांगलें नाहीं. 'करूं नये' पाठांतर. १२. पृथ्वीतें, जमिनीतें. 'उपरी आदिकरोन' पाठांतर. उपरी=माडी. 'तळीं' असा अन्यपाठ. १३. 'उचलों जातां' पाठांतर. १४. 'धरी' पाठांतर. १५. (सीतेचें) सदन (गृह) रूपी नाव (तारूं). 'वरी धुरी पुण्यश्लोकाची संगती' असा पाठभेद. १६. कर (हात) रूपी आकाशांत. १७. गृह (सीतेचें मंदिर) रूपी चंद्राच्या तेजांत. १८. चंद्राच्या सोळा कळा प्रसिद्धच आहेत पण सीता ही सतरावी कळा-असा भावार्थ. १९. रणांगण हेंच सरोवर. 'क्षण न लागतां त्वरा करून' असा पाठभेद. २०. येथें गजेंद्रमो-क्षकथेवर कटाक्ष आहे. [मागें पृ० १७२-१७४ पहा].

चीतसे शतमुखनक्र । ते काळीं सीताश्रीधर । भक्तधावण्या[1] धाविनला. ॥ ८८ ॥ धाम[2] ठेउनीयां अवनी[3] । हनुमंत म्हणे, 'कोदंडपाणी[4]! । निद्रिस्त देखोनी जगज्जननी । मंदिरासहित आणिली.' ॥ ८९ ॥ ऐकोनी श्रीराम उताविळा । प्रवेशला सदनदेऊळा[5] । वोवरीगर्भी[6] चिद्रत्नकळा । देखता जाला लोचनीं. ॥ ९० ॥ स्वप्नजागृती उपाधी[7] । निरसुनी, सुषुप्तिसमाधी[8] । सेवीत ते जगदानंदी[9] । तूलिकापीठीं[10] लयस्थ[11]. ॥ ९१ ॥ जाणोनी श्रीराम महेश्वरें । करटाळीच्या महामंत्रें[12] । श्रवणानिकटीं बीजोच्चारें[13] । पुरश्चरण[14] मांडिलें. ॥ ९२ ॥ आत्मा नेउनी ब्रह्मांडकमळीं । सीतायोगिनी पहुडली[15] । जाणोनी रामटा-[16]ळिया वल्ली । श्रोत्रमस्तकीं चर्चित. ॥ ९३ ॥ साचळ[17] सजळघन गर्जतां । झळकली जागृतीविद्युल्लता । मग मूळपीठींची देवता । खडबडोनी उठिली. ॥ ९४ ॥ सन्मुख[18] पाहुनी रघुनंदन । म्हणे, 'मी देखतें काय स्वप्न? । मायापुरा गेले रमण[19] । अयोध्येमाजी मी असें. ॥ ९५ ॥ केवढी हे दुर्धर भ्रांती[20] । साचचि[21] दिसे रघुनाथमूर्ती । किंवा संकटें[22] पडलें पती । म्हणोनी स्वप्नीं दिसत[23] आहे.' ॥ ९६ ॥ रघुनाथ म्हणे, 'हें मायापुर । मीं साच[24] कौशल्याकुमर । युद्धीं संकट पडलें[25] थोर । म्हणोनी तुम्हांसी आणिलें. ॥ ९७ ॥ असंख्य माझे बाण-भार । गिळीत शतमुखअजगर । विर्जयजळचरा[26] राक्षसढिवर । उचलों नेदी

---

१. भक्तांच्या संरक्षणार्थ. 'भक्तकैवारा पातला' असा पाठभेद. २. घर, (सीतेचें) मंदिर. ३. जमिनीवर. ४. कोदंड (धनुष्य) आहे पाणी (हाताच्या) ठायीं ज्याच्या तो (राम). ५. घररूपी देऊळ. ६. वोवरी (=खोली) हाच [देवळाचा] गाभारा, त्यांत. 'वोवरीचि तूं रक्तकोळ' असें पाठांतर. ७. स्वप्नावस्था व जागृतावस्था (जागेपणा) ह्या उपाधि (उपसर्ग, त्रास). ८. निद्रारूपी समाधि (परमात्म्याचे ठिकाणीं मनाचा लय होणें). ९. जगतास आनंद देणारी (सीता). १०. कापसाच्या आसनावर (बिछान्यावर). 'स्थूळीं कपाटीं' असा पाठभेद. ११. ध्यानस्थ. 'सेवितसे जगदानंदीं । मुखीं कां पिटील हस्त' असा चुकीचा पाठ छापील प्रतींत होता. १२. 'करतळींच्या हस्तमंत्रें' पाठांतर. १३. मंत्राच्या रहस्याचा उच्चार करून. १४. मंत्राचा पाठ. १५. निजली. १६. 'म्हणोनि रघुनाथ टाळियावळी' 'रामटाळी पावली' असे अन्यपाठ. १७. साचळ=चाहूल, चालतांना पायांचा आवाज होतो तो. साचळ (चाहूल) हाच कोणी सजल घन, त्याची गर्जना होतांच जागृति हीच विद्युल्लता झळकली—हा स्पष्टार्थ. **रूपकालंकार**. सजळघन=जलयुक्त मेघ. १८. 'संमिथ पाहतां' असें पाठांतर. १९. पति, भ्रतार (राम). २०. भ्रम, मोह. २१. 'साचचि भासली' असा अन्यपाठ. २२. 'सांकडें' पाठांतर. २३. 'म्हणोनी स्वप्नामाजी आले कीं' अन्यपाठ. २४. खरोखर, भ्रम नव्हे. २५. 'संकट महाथोर' पाठांतर. २६. विजय हाच मत्स्य त्यास. 'जैसा' पाठांतर.

मस्तक. ॥ ९८ ॥ निशाचर[2]म्हैसा येई क्षितीं[3] । जिंणोनी[4] गांजिल्या सैन्यपंक्ती । तयातें तुवां परंज्योती ! । सामर्थ्यमूळ[5] निवटावें. ॥ ९९ ॥ आतां न लाउनी उशिरा । निधनमद्य[6] शतशीर्षअसुरा । कीं अमृतपान आम्हां सुरां[7] । जगन्मो- हनी ! वाढीं कां.' ॥ १०० ॥ यापरी वृत्तांतश्रवणस्नान[8] । करूनियां स्तुतिपूजन । वर्णोपचार[9] मेळवून । सांगोपांगें[10] मांडिलें. ॥ १०१ ॥ 'हरिहराची ध्यानमूर्ती[11] ! । जय जय चिद्रूप[12]मूळशक्ती ! । जय जय[13] अनादिशक्ती ! । परात्परे ! तूज नमो. ॥ १०२ ॥ ब्रह्मांडघट प्रसवती[14] धरे । जय जय अरूपलावण्य त्रिपुरे ! । जय जय निर्गु- णबीजोंकारे[15] ! । अजरामरे ! तुज नमो.' ॥ १०३ ॥ समाप्त होतां स्तुतिपूजन[16] । नैवेद्य अर्पिलें[17] धनुष्यबाण । साष्टांग घालोनी लोटांगण । 'कृपा करीं[18]' म्हणतसे. ॥ १०४ ॥ ते देखोनी भक्तिअनन्यता[19] । संतुष्ट जाली[20] जगन्माता । म्हणे, 'प्रकटोनी[21] सामर्थ्यसविता । निशाचरतमा निर्दाळीन.' ॥ १०५ ॥ ऐसे बोले[22] बोले महाशक्ती । आली रणभूमिकेआंतौती[23] । चौभुजांची आकृती । धरती जाली भ्यासुर. ॥ १०६ ॥ पाशांकुश धनुष्यबाण । करीं वेसवी[24] तों रणस्फुरण ।

---

१. 'उठूंच नेदी हो ! यशा' 'उरों नेदी सर्वथा' असे पाठभेद. २. राक्षस (शतमुख) हाच टोणगा. (महिषासुर). ३. पृथ्वीवर. ह्या ओवींचा अन्यपाठः—'महिषासुर यशकीर्ति । जिणोनि गांजी सैन्यसंपत्ति । तयातें तूं परंज्योति । शार्ङ्गशूळें निवटावें. ॥ ९९ ॥' ४. जिंकून. 'जाण गांजी सैन्यसुरपती' असा पाठभेद. ५. हे परंज्योति [सैन्यास त्रास देणारें जें] सामर्थ्यमूळ (सामर्थ्याचें उत्पत्तिस्थान, शतमुखरावण) तयातें तुवां निवटावें—असा स्पष्टार्थ. 'समु- सळें' असा अन्यपाठ. निवंटणें=मारणें, नाश करणें. ६. मरणरूप मद्य. 'निर्दळी' पाठभेद. ७. देवानां. येथें अमृतमथनकथेवर कटाक्ष आहे. [मुक्तेश्वर आदिपर्व अध्याय ४ ओव्या ११५–१८५ पहा]. ८. वृत्तांताचें श्रवणरूपी स्नान. 'श्रवणस्तवन' असें पाठांतर. ९. वर्ण(शब्द)रूपी उपचार (पूजेचें साहित्य). 'वर्णोच्चारें' 'वर्णसावर्ण्ये' असे पाठभेद. १०. यथासांग, विध्युक्त. 'मांडिलें' ह्याचें कर्म 'स्तुतिपूजन'. 'यथासांग मांडीन' असा पाठभेद. ११. 'ध्येयमूर्ति' पाठांतर. १२. 'सदये स्वानुभूति' पाठभेद. १३. ह्या ओंवीचा अन्यपाठः—'हरिहराची संध्येय मूर्ति ! । जयजय सदय स्वानुभक्ति ! । जयजय आनंदीं अव्यक्ति ! । परात्परे ! तुज नमो ॥ १०२ ॥.' १४. पृथ्वीवर ब्रह्मांडरूपी घटास प्रसवणारे (उत्पन्न करणारे) देवी. ब्रह्मांड=ईश्वरनिर्मित चतुर्दश- भुवनात्मक अंडाकार जो प्रदेश तो, ब्रह्मगोल. १५. 'लावण्यबीजाक्षरे' पाठभेद. १६. 'स्तवनार्चन' असें पाठांतर. १७. 'नैवेद्या वोपिलें' असा पाठभेद. १८. 'किजे' पाठांतर. १९. अनन्यता= एकाग्रता. 'अन्योन्नता' पाठांतर. २०. 'तुष्टली ते' पाठांतर. २१. 'उगऊं नेदीं सामर्थ्यसविता । निशाचर तमनाशिनी ॥' व 'म्हणे प्रकटोनी सामर्थ्यसविता । निशाचर मारीतसें ।' असे पाठभेद. २२. 'ऐसें बोलोनि महाशक्ती' 'वदोनि ऐसें आदिशक्ती' असे अन्यपाठ आहेत. २३. रणांगणावर. 'रणभूमी–मौंवली' पाठभेद. २४. घेतांच. 'करीं वसवितां आलें स्फुरण । मांडोनियां वज्रठाण । रणीं उभी ठाकली ॥' असा अन्यपाठ.

पातलें, ते वज्रठाण । मांडोनियां ठाकली. ॥ १०७ ॥ मग संहारवन्हीची ज्वाळा । दीर्घ वाढली अंतराळा[1] । राक्षसकुळप्रळयजळा[2] । शोषावयालागोनी[3]. ॥ १०८ ॥ ब्रह्मांडासीं[4] महदाकाश । गिळी ऐसा अद्भुत वेश । देखोनी त्रास[5] पावे शेष । सुरवर[6] चळचळां कांपती ॥ १०९ ॥ शतमुख लक्षुनीयां सन्मुख । कार्मुकीं[7] एकची सायक[8] । लाउनी सोडितां एक एक । प्रसवुनी जाले शतवरी[9]. ॥ ११० ॥ तिहीं झगटोनी शतकंधरीं[10] । शिरें उडविलीं गगनोदरीं । गरगरां भोवोनी अंबरीं[11] । उलथोनी[12] पडिला[13] अवनिये[14]. ॥ १११ ॥ चापीं मंत्रोनी यंत्रगोळें[15] । उसळोनी एकें एक मौळें[16] । उडवितां, राक्षसप्राणजळें[17] । आटोनी गेलें निःशेषें[18]. ॥ ११२ ॥ मातला राक्षसजोंधळा । म्हणोनी स्वकर्माचा ईळा[19] । घेवोनि शक्तीनें एकचि वेळां । शतही कणसें[20] खंडिलीं. ॥ ११३ ॥ भ्यासुर राक्षसकलेवर[21] । अंकुशें केलें क्षतजर्जर । अंगलंग निशाचर । मारूनी केले निर्बीज. ॥ ११४ ॥ मायापुरीं अक्षोभजळें[22] । पोशिलीं होतीं शतमुखकमळें । तीं चापशरकरांगुळें[23] । सीतादेवीनें खंडिलीं[24]. ॥ ११५ ॥ राक्षसमृत्युलग्न-[25]सिद्धी । जालियावरी सीता निजानंदीं । आणि श्रीराम सैन्यमांदी[26] । विजयधेंडा[27]

---

१. आकाशास पोचेल अशी. 'दीर्घ वोढवी विशाळा' असा पाठभेद. २. 'प्राणजळा' पाठांतर. ३. 'ग्रासावया' असें पाठांतर. ४. ब्रह्मांडासह. वेश=रूप. ५. भय, भीती. (त्रस्=भिणें). ६. ह्या ओंवीचा अन्यपाठः—'ब्रह्मांडेंशीं महदाकाश । गिळिलें ऐसा अति आवेश । दावितांचि पन्नगवेश । सुरनर चळीं कांप ॥ १०९ ॥.' ७. धनुष्यास. ८. बाण. 'घेऊनि अभंग कार्मुक । लाऊनि बाण सोडितां येक येक ।' असा अन्यपाठ. ९. शेकडों, असंख्य. 'प्रसवोनि होती शतावरीं' असा अन्यपाठ. १०. शतमुखरावणाच्या अंगावर. कंधर=मान, गळा. ११. आकाशांत. 'भ्रमती चक्राकारी' पाठांतर. १२. 'पुनरपी' अन्यपाठ. १३. 'अधोगती पडियेलीं' असा अन्यपाठ. १४. पृथ्वीवर. १५. तोफेचा गोळा (?). १६. मस्तक, डोकें. 'चाप मंत्रोनी शातमुखगोळ । उलटोनी केलें येक मौळ । पडतां शतशीर्षप्राणजळ ।' असा पाठभेद. १७. ह्या ओंवीचा पाठभेदः—बाण मंत्रोनी शतमुखगोळा । उसळोनियां एकैक मौळ । उडवितां शतशीर्षपंचप्राण-मेळ । प्रयाण केलें निःशेष. ॥ १११ ॥.' १८. शेषरहित, संपूर्ण. १९. विळा, कोयता. २०. येथें मस्तकांस कणसांची उपमा दिली आहे. २१. राक्षसाचें शरीर. कलेवर=शरीर. 'भ्यासुर देंठ कळिवर' असें पाठांतर. २२. शांततारूप जळें (पाण्यानें). २३. चाप (धनुष्य) रूपी करानें (हातानें) व शर (बाण) रूपी अंगुळें (बोटांनीं). २४. तोडिलीं. 'धुंडाळी' पाठांतर. २५. राक्षसाचा मृत्यु हेंच लग्न त्याची सिद्धि (सफलता). २६. मांदी=समुदाय. २७. विजयरूपी धेंडा. 'झेंडा' असें पाठांतर. मध्यप्रदेश व वऱ्हाड यांतील देशस्थ महाराष्ट्रियांत धेंड्याचा उपनयनविवाहादि मंगलकार्यांत मांडवपरतणीच्या दिवशीं एक कुलाचार करीत असतात. ज्याचें कार्य होईल त्या मुलाला (मौंजीसमयीं) किंवा नववधूवरास (विवाहप्रसंगीं) न्हावी (म्हाली) कडेवर किंवा दोहों कडांवर घेऊन नाचतो. यालाच धेंडा किंवा झेंडा नाचविणें असें म्हणतात. कोंकणस्थांत जसा बोडणाचा किंवा गोंधळाचा कुळाचार आहे, तसाच हा देशस्थांत आहे. धेंडा=नाचणारा पुरुष.

नाचत. ॥ ११६ ॥ अंबरीं तोषोनी सुरवर । भूतळीं सांडिती पुष्पभार । सकळां मुखीं जयजयकार । घोषें झाला ते काळीं. ॥ ११७ ॥ मग जनकजा परब्रह्मशक्ती । परिमार्जुनी दीर्घाकृती । येउनीयां पूर्वस्थितीं । रघुनाथअंकीं आरूढली. ॥ ११८ ॥ भूरमागंगाविशाळरूप । उगमा येतां दिसे स्वल्प । योगमायेची लीला अमूप । ब्रह्मादिकां नानुमाने. ॥ ११९ ॥ विशाळरूप-नग अनेक । आटोनी पूर्वाकृतिकनक । सीता होतां, रविकुळटिळक । लंकापुरीं चालिले. ॥ १२० ॥ कपितनुजाहाजीं सहपरिवार । बैसोनि, जलाब्धीचा वांवर । आज्ञावातेंकरूनी शीघ्र । मार्गअर्बुधी लंघिला. ॥ १२१ ॥ हनुमंतें चरणमंदरगिरी । वंदुनी श्रीरामआज्ञा शिरीं । लंकाक्षीराब्धीच्या तीरीं । उचलोनियां ठेविला. ॥ १२२ ॥ एका पदें लंकाद्वारीं । कपी प्रविष्ट जालिया-वरी । तळीं उतरोनी समस्त वीरीं । पौंड्रिक आणिला धरोनी. ॥ १२३ ॥ त्याचा करावा जों घात । तंव तो म्हणे, 'मी शरणागत' । हें ऐकोनी जनक-जाकांत । राक्षसातें रक्षीत. ॥ १२४ ॥ 'पितामहानुजाआधीन । होऊनि

---

१. देवश्रेष्ठ. 'खेचर । वर्षले सुमनांचे भार ।' 'निर्जर । सुमनें वर्षती अपार' असे अन्यपाठ. २. 'हर्षे' असें पाठांतर. ३. राक्षसवधाकरितां धारण केलेलें उग्ररूप टाकून. 'विसर्जोनी' असें पाठांतर. ४. पूर्वीचें रूप धारण करून. ५. अंक=मांडी. ६. बसली. 'शोभली' असा अन्यपाठ. ७. पृथ्वीवरील रमा हीच गंगानदी, तिचें विशाळरूप. नदी उत्पन्न होते तेव्हां ती फारच लहान असते परंतु ह्या पृथ्वीवरील रमा (सीता)रूपी गंगेनें एकदम विशाळरूप (विराट्स्वरूप) धारण केलें. हा चमत्कार कसा घडला, हें ब्रह्मदेवास सुद्धां अतर्क्य आहे–असा स्पष्टार्थ. भूरमा=पृथ्वीवरील रमा (लक्ष्मी). सीता ही पृथ्वीवर अवतीर्ण झालेला लक्ष्मीचा अंश होती, हें प्रसिद्धच आहे. ८. उगम=नदीचें उत्पत्तिस्थान. 'उपमा' असें पाठांतर. ९. लहान, थोडें. १०. 'योगसिद्धीची' असें पाठांतर. ११. न+अनुमाने=अनुमान (अंदाज) करितां येईना. 'नेणवे' 'नकळेचि' असे पाठभेद. १२. विकराळ स्वरूप हेच दागिने, अलंकार. 'विशाळ रूपाकार देख' असा अन्यपाठ. १३. सीता पूर्वीचें सौम्य व लघु आकृतिरूपी सोनें झाली असतां; सीतेनें पहिलें शांत रूप धरिलें असतां. १४. सूर्यवंशश्रेष्ठ (राम). १५. मारुतीचें शरीररूप नौका तींत. १६. संचार, फिरणें. (समुद्रांतील प्रवास.) 'बैसतां जलधिजावर । आज्ञावंत वेगें शीघ्र । मार्गाब्धि अंबु लंघिला ॥' असा अन्यपाठ. १७. 'बैसोनियां जलधीवर । हर्षयुक्त अति सत्वर' असा अन्यपाठ. १८. मार्गरूपी समुद्र. रूपकालंकार. १९. (आपला) पायरूपी मंदरगिरी. २०. श्रीरामाची आज्ञा शिरसा मान्य करून. 'उचलोनि आत्माराम आज्ञेवरी' असें पाठांतर. २१. 'उतरोनियां ठेविला,' 'ठेविता झाला तात्काळीं' असे अन्यपाठ आढळतात. २२. नाश. 'जीवघात' 'प्राणघात' अशीं पाठांतरें. २३. 'शरणागता रक्षिलें' अन्यपाठ. २४. पितामह (आजोबा, कुंभकर्ण) त्याचा अनुज (कनिष्ठ बंधु, बिभीषण) त्याचे आधीन.

पाळीं आज्ञापन[1]. । 'निकें'[2] म्हणोनि श्रीरामचरण । पौंड्रिक नमी[3] सद्भावें. ॥ १२५ ॥ अवलोकोनी कृपादृष्टी । बिभीषण[4] स्थापिला राज्यपीठीं[5] । येरीं जोडिल्या करसंपुटीं । राघवा नमिलें साष्टांगीं. ॥ १२६ ॥ मग परिवारेशीं कौशल्यातनय । वळंघे[6] कपिकायाहय[7] । अयोध्यापुरीं वेगीं[8] जाय । निमिषार्ध[9] न लागतां. ॥ १२७ ॥ कपिचरणउभयसरिता[10] । शरयूतीरीं संगम होतां । अवलोकोनी त्रिवेणीतीर्था[11] । रामसेना[12] उतरली. ॥ १२८ ॥ जिरउनी[13] ब्रह्मद्रोही[14] सर्व । हनुमंत जाला[15] यथापूर्व । आज्ञा घेउनीयां सर्व[16] । जाते जाले स्वस्थळा[17]. ॥ १२९ ॥ श्रीराम प्रवेशतां राउळ[18] । होता जाला प्रातःकाळ[19] । स्नान करूनी उतावेळ । संध्याजपनेम[20] सारिले. ॥ १३० ॥ पंक्ती घेउनी द्विजोत्तमांसी[21] । साधनी[22] साधली द्वादशी । भोजन[23] करूनी सुखैकराशी । सिंहासनीं[24] बैसले. ॥ १३१ ॥ श्रीरामप्रतिज्ञाद्राक्षावल्ली[25] । कपितनुमंडपीं[26] विस्तारली । शक्तिसाम[27]-

---

१. 'आज्ञावचन' असें पाठांतर. आज्ञापन=आज्ञा, हुकूम. 'पितामहबंधु अनुदिन । होऊनि पाळीं आमुच्या वचना । हें ऐकोनी रघुनंदना । पौंड्रिक वंदी सद्भावें ॥' असा अन्यपाठ. २. बरें आहे, मान्य आहे. ३. 'वंदी' असें पाठांतर. ४. 'बिभीषणातें कृपादृष्टी । लक्षोनि स्थापिला राज्यपटीं ॥' पाठभेद. ५. राज्यासनावर. ६. चढे, आरूढे. 'वळघला' पाठांतर. ७. मारुतीची काया (शरीर) रूपी हया (घोड्या)वर. हें **रूपक** आहे. ८. 'त्वरित' असा पाठभेद. ९. निमिष=डोळ्याची पापणी लवण्यास जो काळ लागतो तो. 'क्षणार्धही' असा अन्यपाठ. १०. मारुतीचे चरण (पाय) रूपी दोन नद्या. 'कपिद्वयचरणसरिता । शरयूतीरा संगम होतां ।' असा पाठभेद. ११. तीन नद्यांचा संगम जेथें होतो तें तीर्थ. प्रयाग येथें गंगा, यमुना व सरस्वती ह्या तीन नद्यांचा संगम होतो म्हणून त्या स्थळास 'त्रिवेणी' असें म्हणतात. ह्या नद्यांपैकीं तिसरी गुप्त आहे. 'त्रिवेणीसरिता' पाठांतर. १२.'रामसैन्य उतरलें' असा अन्यपाठ. १३. जिरवणें=खोड मोडणें, रग जिरविणें. १४. परब्रह्म असा जो राम त्याचा द्वेष करणारे. १५. 'आला' पाठभेद. १६. 'वीर सर्व' पाठांतर. १७. 'स्वगेहा' 'स्वगृहा' अशीं पाठांतरें. १८. राउळ=राजालय (राजवाडा), (रामाचें) निवासस्थान. 'प्रवेशले' पाठांतर. १९. 'उषःकाळ' असें पाठांतर. २०. 'जपजाप्यकर्म स्थापिलें' असा पाठभेद. २१. ब्राह्मणश्रेष्ठांस. २२. साधनी द्वादशी—ह्या व्रताचा साधारण नियम असा आहे कीं दशमीस एक वेळ हविष्यान्नभक्षण, एकादशी निश्चक्र व द्वादशीस सूर्योदयकाळीं भोजन. 'साधन साधावया द्वादशी' असा पाठभेद. २३. 'पारणें होतां गुणैकराशी' पाठभेद. २४. 'भद्रासनीं' असा अन्यपाठ. २५. श्रीरामाची प्रतिज्ञा हीच द्राक्षवल्ली. 'द्राक्षवेली' असें पाठांतर. २६. मारुतीचें शरीर हाच (द्राक्षवल्लीचा) मांडव. 'कपींद्रमंडपीं' असा अन्यपाठ. २७. शक्ति (सीता) सामर्थ्यरूपी अमृतफळांनीं युक्त.

र्थ्यपीयूषफळीं । सत्कीर्तिघोंस प्रसवली. ॥ १३२ ॥ हे हनुमंतनाटकींची कथा । महाराष्ट्रभाषा यथार्थ उलथा । विश्वंभर जाला वक्ता । मुक्तेश्वर अनुवादे. ॥ १३३ ॥

---

# ५. संतचरित्रें, पदें, आरत्या वगैरे.

## १२. एकनाथचरित्र.

(ओंव्या.)

ॐ नमो जी ! विश्वंभरू । तो देव दत्तात्रय जगद्गुरू । जनार्दना अभयकरू । कटाक्षेंशीं बाणला. ॥ १ ॥ त्योचे चरणीं एकनाथें । सुमन ठेविलें पुरु-

---

१. सत्कीर्तिरूप घोंस (द्राक्षांचे घड). ह्या ओंवींतील रूपक फारच बहारीचें आहे. २. 'महाराष्ट्रशोभा' असें पाठांतर. ३. भाषांतर, तर्जुमा. ४. 'विश्वतोमुखीं जाला वक्ता । मुक्तेश्वर गुरुप्रसादें ।' असा अन्यपाठ. ५. आम्हांस मिळालेल्या एका पोथीच्या शेवटीं पुढील समाप्तिलेख आहे:—'इति श्रीहनुमंतनाटकीं शतशीर्षवधो नाम [आख्यानं] समाप्तं । संपूर्णमस्तु ॥ शके १६९२ विकृतिनाम संवत्सरे माहे श्रावण वद्य ३० ते दिने संपूर्ण केलें । हस्ताक्षर शिवजी माधवजी प्रभु कायस्थशाती माहिमकर यांहीं लिहिलें असे । पठणार्थ. ॥' ही पोथी आम्हांस आमचे मित्र कै० नारायणराव केळकर यानीं मिळवून ठेवलेल्या हस्तलिखित पोथ्यांचे संग्रहांत सांपडली. ह्या प्रकरणाची दुसरी प्रत रा. रा. भगवंत बाळकृष्ण पै, रायकर (होडावडें) यानीं मोठ्या आस्थेनें, आमच्या विनंतीस मान देऊन, आपल्या संग्रहीं असलेली पाठविली. ६. ह्या प्रकरणास 'श्रीखंड्याकृष्णाख्यान' असें दुसरें नांव आहे. हा कथाभाग केशवकृत एकनाथचरित्राच्या १९ व्या अध्यायांत व भक्तिविजयाच्या ४० व्या अध्यायांत (ओ० १२९–१८०) आला आहे. ७. आमचे जवळील हस्तलिखित प्रतींत पहिल्या चार ओंव्या मुळींच नसून त्यांचे ऐवजीं पुढील ओंवी आढळते:—'प्रतिष्ठानीं एकनाथ । अवतार मूर्तिमंत । ज्याचे गृहीं श्रीभगवंत । सेवा करी निजांगें. ॥ १ ॥' ८. सर्व ब्रह्मांडाचा भार वाहणारा (परमात्मा). विश्वं भरति धारयतीति विश्वंभरः. ९. जनार्दनस्वामी हे एकनाथाचे गुरू. हे दौलताबाद येथील बादशाहाचे पदरीं मुत्सद्दी होते. जनार्दनस्वामींची अध्यात्मज्ञानांत इतकी प्रवीणता असे, व त्यांचें आचरण इतकें शुद्ध असे कीं ब्रह्मस्वरूपीं लय लागून दत्तात्रयाच्या प्रत्यक्ष दर्शनाचाही लाभ ह्या सत्पुरुषास होत असे. १०. वरदहस्त. 'अभयंकरू' असा पोथींतील पाठ. ११. एकाग्रदृष्टियुक्त होऊन मन तदाकार झालें. बाणणें=बिंबणें, मन वेधणें. १२. जनार्दनस्वामींचे. १३. एकनाथ हा मुक्तेश्वराचा मातामह व गुरु होय. [ह्या थोर विभूतीविषयीं सविस्तर माहिती पाहिजे असल्यास रा. रा. धों. बा. सहस्रबुद्धेकृत 'एकनाथमहाराजांचें चरित्र' हें पुस्तक पाहावें].१४. सद्भावयुक्त अंतःकरण.

पार्थे, । सेवा आरंभिली भावार्थें[1] । 'जनीं जनार्दन' म्हणवुनी. ॥ २ ॥ एका-जनार्दनाचा महिमा । गूढार्थ वाटे पुराणागमा[2], । शमदमकरुणेची[3] सीमा । पूर्ण गरिमा[4] वाढली. ॥ ३ ॥ जो स्वयें जगद्गुरू । नेणें[5] विधीचा अवतारू, । किंवा ऐसे परीचे हरिहरू । धरिती अवतारू भक्तीलागीं. ॥ ४ ॥ गंगातीरीं[6] अतिपावन, । विख्यात जगीं प्रतिष्ठान, । तेथें एकनाथ राहून । ब्राह्मणपूजन करितसे[7]. ॥ ५ ॥ पूर्ण गुरुभक्तीचा सागर, । भक्तीनें तोषविला रमावर, । सदा वसवी[8] त्याचें घर; । गोदातीर अतिपावन. ॥ ६ ॥ अवलंबिलें सदावर्त[9] । समयीं[10] आलिया अभ्यागत[11], । भोजन देऊन इच्छातृप्त, । पूजा करी मनोभावें[12]. ॥ ७ ॥ ऐसी जाणोनि तयाची स्थिती, । रमारमणें मांडिली ख्याती, । ब्राह्मण-[13]वेशें श्रीपती । द्वारकेहुनी पातले. ॥ ८ ॥ भक्तसाह्यार्थी धाविन्नला, । येउनी अंगणीं उभा ठेला, । एकनाथें दृष्टीं देखिला, । सकृप[14] जाला तत्काळ. ॥ ९ ॥ ब्राह्मण बोले मंजुळ वचन, । 'दर्शनें तृप्त जालों तुमचेन, । कांहीं काळ सेवा करीन, । तुमची स्वामी आदरें. ॥ १० ॥ ऐक बापा ! एकनाथा ! । तुझिया सेवेसी रहावें आतां । ऐसी आवडी असे चित्ता, । अनुग्रह[15] आतां[16] मज कीजे. ॥ ११ ॥ मज नलगे सर्वथा वेतन[17], । उदरापुरतें[18] पाहिजे अन्न, । वस्त्रें द्यावीं जीर्णजीर्ण[19] । सेवा करीन निशिदिनीं.' ॥ १२ ॥ मग एकनाथ बोलिले, । 'नाम सांगिजे आपुलें;' । 'परिग्रह[20] काय ?' पुसियेलें[21] । 'येणें जालें कोठोनी ?' ॥ १३ ॥ येरू म्हणे, 'जी ! ऐका, । माझा परिग्रह मीचि इतुका, । कृष्ण नाम ऐसें देखा, । आहें ठाउका[22] मी जनासी. ॥ १४ ॥ तुझी कीर्ति आयकोनी श्रवणीं । या

---

१. भक्तीनें. २. पुराणें व आगम (वेद) यांस. ३. शम=शांति; दम=आत्मसंयमन, इंद्रियनिग्रह. ४. थोरवी, मोठेपणा. ५. न जाणों. ६. गंगा=गोदावरी. 'गंगातीर' असें पाठांतर. ७. 'एकनाथ अभिधान जाण । ब्राह्मणभजन करीतसे. ॥' असा अन्यपाठ. ८. घर वसवी=घरांत वास करी. 'वसवी' ह्याचा कर्ता 'रमावर'. ९. अन्नछत्र, फुकट भोजन घालणें. १०. कोणत्याही वेळीं. ११. अतिथी, पाहुणा. १२. 'भोजन द्यावें इच्छाभूत । प्रीति बहुत अनाथीं. ॥' असा अन्यपाठ आहे. १३. 'ऐसी जाणोनि तद्वृत्ति । द्वारकेहूनि आले श्रीपति । ब्राह्मणवेशें सेवेप्रती । भक्तसाह्यार्थी पावला. ॥' असा अन्यपाठ आहे. १४. दयार्द्र. ह्या ओंवीचा अन्यपाठ:—'येरू उभा असे आंगणीं । ब्राह्मणभक्त शार्ङ्गपाणी । बोल बोलविती त्याचे वचनीं । नम्र होउनीयां पैं देखा. ॥' १५. कृपा, प्रसाद. १६. 'तत्वता' असें पाठांतर. १७. रोजमुरा, पगार. १८. 'उदराप्रती' असें पाठांतर. १९. जुनींपुराणीं (किंवा) अत्यंत जीर्ण. 'वस्त्र मात्र निर्वाहा जाण । केलिया आपण सेवेसी राहूं ।' असा अन्यपाठ. २०. परिवार, मुलेंबाळें वगैरे. २१. (एकनाथानें) विचारिलें. २२. मी जनासी (सर्व लोकांस) ठाऊका (माहीत) आहें—असा अन्वय.

स्थळा आलों धावोनी । तुझिये सेवेलागोनी । निष्काम बुद्धी करूनियां.' ॥ १५ ॥ ऐसें बोलोनि तये वेळां । श्रीहरि सेवेसी लागला, । कावडी भरूनि गंगाजळा । आपण आंगें पैं आणी. ॥ १६ ॥ जीवेंन वाहे जगज्जीवन, । संपूर्ण भरी रांजण, । ब्राह्मणालागीं सुचंदन । उगाळुनी ठेवितसे. ॥ १७ ॥ धोत्रेंपात्रें धूतसे पाहीं, । सेवेसी सादर सर्वा ठायीं, । देवपूजेचे समयीं । समीप लैवलाहीं तिष्ठत. ॥ १८ ॥ घागरी भरूनिया गंगाजळ । सुशीतळ आणि निर्मळ । ब्राह्मणाप्रती एक वेळ । पात्रें सकळ दे भरूनी. ॥१९॥ ऐसा तत्पर सर्वा ठायीं,। आंग चोरूं नेणे कांहीं, । देहधर्माची वार्ता नाहीं, । आनंद पाही सर्वदा. ॥ २० ॥ ऐसें द्वादश वर्षेंपर्यंत । अवलंबें सेवा करीत, । भक्तसाहाकारी भगवंत । रांहटत असे निशिदिनीं. ॥ २१ ॥ येरीकडे द्वारकेसी । ब्राह्मण आला सद्भावेंसी, । तप आचरावें सायासी । म्हणोनि पाहे सिद्धस्थान. ॥ २२ ॥ कृष्णकृपेची आनंदलहरी, । मोक्षसिद्धि वैकुंठास दुसरी, । नगर रचिलें गोमतीतीरीं । अतिउत्तम द्वारका. ॥ २३ ॥ गोमतीतीरीं तुळसीवन । श्रीवृक्षातळीं घालुनी आसन, । सुमनीं पुजूनि श्रीचरण, । मनीं ध्यान कृष्णाचें. ॥ २४ ॥ आहारनेम अनुष्ठान, । मुखें स्मरे 'कृष्ण कृष्ण,' । हरिच्छंदें परिपूर्ण । नि-

१. स्वतः, जातीनें. 'कावडी घेऊनियां वहिला । चक्रपाणी जळ आणीतसे ।' असा अन्यपाठ. २. पाणी. 'श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो । स्वकरें चंदन घांसी, गंगेचें पाणि कावडी भरितो. ॥' ही आर्या प्रसिद्धच आहे. 'स्वयें वाहातसे जीवन' असा पाठभेद. ३. त्वरेनें. ४. आंग चोरणें=मनापासून काम न करणें, काम करण्याची टाळाटाळ करणें. हा शब्दसमूह कोशकारांस उपयोगीं पडण्यासारखा आहे. ५. मलमूत्रविसर्जनादि शरीराचे स्वाभाविक धर्म त्यांची. 'देहश्रमाची' असें पाठांतर. ६. (एकनाथाच्या) आश्रयास राहून. 'आश्रमें' असें पाठांतर. ७. वागत असे. ८. कोणी एक ब्राह्मण. 'ब्राह्मण येक तापसी । गोतमीसंगमीं करी तपासी । आर्त मानसीं भेटीचें ।' असा अन्यपाठ. ९. आयासयुक्त, कठिण. १०. भक्तियुक्त मनानें (किंवा) पुष्पांनीं. ह्या ओंवीचा अन्यपाठः—'भावें करितां अनुष्ठान । गोमतीतीरीं घातलें आसन । आवडी हेचि पूर्ण । कृष्णदर्शन मज देई. ॥' ११. ओंव्या २५—२९ यांचे बद्दल आमच्या जवळील प्रतींत पुढील ओंव्या आढळतातः—'तया थोर दर्शनाचें आर्त । आवडी लागली जीवांत । केव्हां भेटेल श्रीकृष्णनाथ । तप करी पूर्ण निष्ठा. ॥ २६ ॥ बारा वर्षें तप जाण । भावें करितां अनुष्ठान । अवचित जालें स्वप्न । सांगे ब्राह्मण निद्रेमाजी. ॥ २७ ॥ जयालागीं श्रम करिसी । आणूनि ध्यानीं उपवासी । तो तंव नाहीं द्वारकेसी । दर्शन मागसी कोणाचें? ॥ २८ ॥ गंगातीरीं प्रतिष्ठान । तेथें एकनाथ जनार्दन । महासाधु ज्ञानसंपन्न । अन्नदान सर्वां भूतीं. ॥ २९ ॥ त्याचिये निज साह्यार्थी । भावें राहिलों तयापाशीं । सेवा करीं दिवानिशी । भक्तप्रेमासी भूललों. ॥ ३० ॥ निरंतर असें तयाजवळी । ऐसी सेवा असे लाविली । बारा वर्षें पैं लोटिलीं । तया स्थळीं राहिलों. ॥ ३१ ॥'.

जध्यास ब्राह्मणा. ॥२५॥ एकाग्र करूनियां मन, । आणि शीत उष्ण साहून । हृदयीं धरितां भगवान, । जगज्जीवन कळवळिला. ॥ २६ ॥ ऐसें द्वादशवर्षें-पर्यंत । भावें भजतां भगवंत, । प्रसन्न होऊनी, स्वप्नांत । मात[1] सांगे ब्राह्मणा. ॥ २७ ॥ 'तूं जयालागीं तप करिसी, । तो येथें नाहीं द्वारकेशी; । प्रतिष्ठानीं सुखवासी[2] । भक्तापाशीं राहिला. ॥ २८ ॥ प्रतिष्ठानीं एकनाथ । अवतार स्वयें मूर्तिमंत, । त्याचे घरीं मी निर्भ्रांत[3] । सेवेलागीं तिष्ठलों.' ॥ २९ ॥ नामें 'श्रीखंड्याकृष्ण,' । सांगितली निजखूण, । जागृत होऊनी ब्राह्मण । स्वप्न क्षणक्षणा आठवी. ॥ ३० ॥ 'नवल देखिलें स्वप्नांत, । कैसा भक्त एकनाथ !' । मनीं होतसे विस्मित, । 'श्रीभगवंत करी सेवा.' ॥ ३१ ॥ उठोनी बैसे आसनीं । 'कृष्ण कृष्ण' गर्जे वाणी, । आनंद न समाये गगनीं, । जाला मनीं विस्मित. ॥ ३२ ॥ 'धन्य! धन्य! एकनाथ, । सर्वांभूतीं भगवंत. । ऐसें आचरतां रमाकांत । सुखावलों ते ठायीं.' ॥ ३३ ॥ म्हणवून चालिला त्वरेन, । 'केव्हां पाहीन पैठण ? । केव्हां देखेन एकाजनार्दन ?' । तांतडी मोठी दर्शनाची. ॥ ३४ ॥ मार्गीं चालिला अतित्वरा, । सवेग[4] पावला गंगातीरा, । तंव कावडी घेउनी सामोरा । देखिला सोयरा जगाचा. ॥ ३५ ॥ तापसी पाहे न्याहाळून,। जीवना आला जगज्जीवन, । अज्ञानयोगें[5] जालें दर्शन—। समाधान तापसा. ॥ ३६ ॥ देवें तापसासी देखिलें, । "याचें आगमन नव्हे भलें, । येथुनी गमन पाहिजे केलें, । प्रगट करील तापसी." ॥ ३७ ॥ तंव ब्राह्मण तापसी । पुसता झाला आदरेंसीं,। 'काय नाम जी ! तुम्हांसी ? । एकनाथासी जाणतां ?' ॥ ३८ ॥ आयकोनी अवश्य चालिला । कावडी भरोनियां जळा । कांहीं न बोले, उगाच राहिला । जंव बोलिला तापसी. ॥ ३९ ॥ देव म्हणे, 'कोण। पुससी ? । मोठा अनुष्ठानी आलासी ! । शोधोनि पाहें नगरासी[6]'. । म्हणोनी कावडेसीं चालिला. ॥ ४० ॥ 'या गा ! प्रतिष्ठानाआंत । ज्यासी म्हणती एकनाथ । तयाचा आश्रम निश्चित । सांगें त्वरित मजपाशीं' ॥ ४१ ॥ कावडी घेवोनियां त्वरित । देव चालिला त्वरें बहुत । मग तपस्वी विचारीत । 'मी येथें आलों दर्शना. ॥ ४२ ॥ तरी वेगें जाऊनियां आपण । आधीं घेऊं कृष्ण-दर्शन, । मग करूं गंगास्नान;' । म्हणोनी वंदन पैं केलें. ॥ ४३ ॥ वंदुनियां

---

१. गोष्ट, बातमी. २. सुखांत राहाणारा, सुखवस्तू. ३. निःसंशय. ४. वेगानें, त्वरेनें. ५. हा प्रत्यक्ष भगवान् आहे, हें न समजतांही त्या तपस्व्याला त्याच्या दर्शनापासून समाधान अनुभवास आलें. 'ज्ञानयोगें' असें पाठांतर. ६. हें उत्तर सभ्यपणाशीं ओळख नसणाऱ्या पाणक्यास शोभण्यासारखेंच आहे !

गंगाजळा । नगरामाजी उतावेळा । पातला एकनाथाच्या राउळा । विश्रांति सकळां जे ठायीं. ॥ ४४ ॥ आंगणीं येतां तापसी । एकनाथें देखिलें त्यासी । मग उठोनियां आदरेंसी । नमन तयासी पैं केलें. ॥ ४५ ॥ म्हणे तो, 'अहो! जी ! तपोनिधि ! ब्राह्मणा ! । बसा करूं द्या पूजना' । येरू म्हणे 'आहे विज्ञापना । श्रीकृष्णदर्शन मज करीं. ॥ ४६ ॥ मी आलों द्वारकेहुनी, । गोमतीसंगमीं अनुष्ठानी, । मनीं आवडी धरूनी । कृष्ण भेटवीं लवकरीं.' ॥ ४७॥ मग बोलिजे एकनाथें । 'त्याविण काय आहे रितें । सर्वत्र व्यापिलें जेथिंचे तेथें । पाहा, पाहा लक्षुनी. ॥ ४८ ॥ अरे! या विश्वामाजीं पाहीं, । विश्वीं विश्वामाजीं भेद नाहीं, । विश्वामाजीं असे तोही, । जो का विश्व आपणची. ॥ ४९ ॥ तेथें वेगळेपणें कैंचा । भेद कल्पिसी दर्शनाचा ? । दर्शन द्रैष्टा मालविली वाचा, । मग दृश्याचा विचार करी.' ॥ ५० ॥ तापसी बोलतसे, "पाहीं । हें आत्मज्ञान सांगसी काई ? । आवडी धरूनियां जीवीं । आलों पाहीं या ठायीं. ॥ ५१ ॥ 'प्रत्यक्ष होईल दर्शन' । स्वप्नीं सांगितली हे खूण, । कृष्णश्रीखंड्या जाण कवण । आहे तुमच्या घरीं ? ॥ ५२ ॥ वेगीं करीं दर्शन, । नाहीं तरी त्यजीन प्राण." । ऐसें वचन ऐकोनि निर्वांणे । ब्राह्मण आसनीं बैसविला. ॥ ५३ ॥ एकनाथ म्हणती शिष्यासी, । 'वेगीं पाचारा कृष्णासी, । आतां भरूनी कावडीसी । गंगाजळासी आणिलें. ॥ ५४ ॥ पहा असेल देवघरीं, । किंवा पाकशाळेभीतरीं, । अथवा उंपरीवरी, । चारी स्थळें शोधावीं.' ॥ ५५ ॥ शिष्य पाहती त्वरित, । तंव अदृश्य जाला जेथचा तेथ, । ऐसें जाणोनी एकनाथ । आलापीत कृष्णासी. ॥ ५६ ॥ 'जयजयाजी! जगज्जीवना! । जगव्यापका! जनार्दना! । जगपाळका! जगनयना! । जगतारणा! सद्गुरू! ॥ ५७ ॥ कृष्णा! कान्हा! कमलनयना! । वासुदेवा! मधुसूदना! । धावें, पावें मनमोहना! । तपोनिधि तिष्ठतसे. ॥ ५८ ॥ विश्वव्यापका! अनंता! । दीनानाथा! कृपावंता! । करुणाघना! भगवंता! । धांव, पाव ये काळीं. ॥ ५९ ॥ श्रीवत्सलांच्छना! वनमाळी! । ब्रीद आपुलें सांभाळीं, । तूंच वत्सातें न्याहाळीं, । करुणा द्विजावरी करावी. ॥ ६० ॥ तूं तरी करुणेचा सागर, । नांदसी हृदयीं निरंतर, । तापसी तुझ्या दर्शनासी आतुर । होऊनि आं-

---

१. येथें छापील प्रतींत 'नाहीं करुणा' असा पाठ होता. २. अनुष्ठान (तप) करणारा. ३. दर्शन घेणारा, पहाणारा. 'मावळे ठायींचा' असा पाठ आदर्शप्रतींत होता. ४. अखेरचें, आणीबाणीचें. हें 'वचनाचें' विशेषण. ५. बोलावा. ६. माडीवर. ७. कृष्णस्तुति गाई, कृष्णाला आळवी. ८. व्रत, प्रतिज्ञा. ९. दर्शनासाठीं उत्सुक.

गणीं तिष्ठतसे. ॥ ६१ ॥ तूं जरी न देशील दर्शन, । तापसी त्यजील आपुला प्राण, । हें शरीरही त्याकारण । मी त्यजीन निर्धारें. ॥ ६२ ॥ सत्वर यावें जगन्नाथा ! । भक्तजनासी तूं मातापिता, । तापसासी दर्शन देईं आतां । गुणातीता ! गुणालया ! ॥ ६३ ॥ आजी ! गेलासी कवण्या ठाया ? । ब्राह्मण बैसला जीव द्यावया, । दर्शन न होतां, काया । जाईल विलया जाण पां.' ॥ ६४ ॥ ऐकोनी एकाजनार्दनाची वाणी, । हृदयीं द्रवला चक्रपाणी; । दोन्ही कर माखिले सुचंदनीं । देवघरांतूनि निघाला. ॥ ६५ ॥ कंठ सद्गदित, सजल नयन, । श्रीकृष्ण बोले मंजुळ वचन, । 'हा तापसी आला कोठून ? । मज येणें प्रगट केलें.' ॥ ६६ ॥ दर्शन जालें ब्राह्मणा, । जयजयकारें करी गर्जना, । हर्षें बोले, 'स्वामी ! श्रीकृष्णा ! । सनाथ तुझेनी मी जालों. ॥ ६७ ॥ सरला मनींचा मनोरथ, । दर्शनें जालों कृतकृत्य, । दृढ चरणीं ठेवुनी भावार्थ । स्वानंदसुख ओसंडलों.' ॥ ६८ ॥ समाधि लागली एकनाथा, । पतितपावन अनाथनाथा । ध्याना आणुनी आत्मस्था । स्वानंदसुखें सेवीत. ॥ ६९ ॥ तंव बोले हृषीकेशी । 'येउनी तुझ्या आश्रमासी । जालीं द्वादश वर्षांशी । होतों विश्रांतीसी जाण पां. ॥ ७० ॥ पुरला नाहीं मनींचा सोसें । तुजपासीं असावें सावकाश.' । ऐसें बोलोनी जगन्निवास । अदृश्य जाला तत्काळ. ॥ ७१ ॥ समाधि उतरोनी एकनाथ, । आधीं वंदिला अभ्यागत, । 'तुझेनि मी कृतकृतार्थ । मोठा समर्थ तूं तपस्वी.' ॥ ७२ ॥ ऐसा देवभक्ताचा सोहळा । नरनारी पाहतां डोळां, । आश्चर्य करी वेळोवेळां । देवही सकळ स्वर्गींचे. ॥ ७३ ॥ भक्तिभावार्थें विकिला, । दास्यकामीं विनटला, । ऐसी अपार प्रेमकळा । कमळापतीची. ॥ ७४ ॥ अंतरीं आणि दिगंतरीं । व्यापकपणें रक्षी हरी, । भक्तसाहाकारी मुरारी । रक्षी सर्व काळीं. ॥ ७५ ॥ ऐसें ऐकोनी ते समयीं । तापसी बोलतसे काई, । 'तारिलें, तारिलें निश्चयीं; । श्रीकृष्णपाय दाखविले. ॥ ७६ ॥ काय वर्णूं महिमान ? । ऐसें न देखों ब्रह्मज्ञान, । सनाथ तुझेनी पैठण । गंगातीर देखिलें. ॥ ७७ ॥ माझेनी न वर्णवे महिमान, । तूं स्वयें अवतार संपूर्ण, । पूर्व पुण्यफळ साचें जाण । म्हणोनी श्रीचरण देखिले.' ॥ ७८ ॥ तापसी आणि एकनाथ । हर्षनांदें संवादत, । परस्परें सुधाब्धींत । जाणोनी मार्जन करिताती. ॥ ७९ ॥ ऐसा देवभक्ताचा संभ्रम । आपण आ-

१. 'तबाची' असें पाठांतर. २. अश्रुयुक्त. ३. ओसंडणें (उत्=बाहेर, सांडणें=बाहणें)=ऊत येणें, भरती येणें. ४. इच्छा, हौस. ५. तल्लीन, तत्पर झाला. ६. वर्णन करूं. ७. येथें कदाचित 'हर्षानंदें' असा पाठ असेल. ८. प्रोक्षण. ९. सन्मान, सत्कार.

ठवी पुरुषोत्तम, । 'जनीं जनार्दन' म्हणवुनी नेम । सेवा करिती निजभावें. ॥ ८० ॥ पुजूनियां अभ्यागत, । भोजन देउनी केला तृप्त, । जाणे हाचि भगवंत । म्हणोनी प्रार्थना करितसे. ॥ ८१ ॥ 'कायावाचाधनमनें । श्रीसहित तुमचीं [पाऊलें] जाणें, । कृपा करावी जगज्जीवनें । मज दीनावरी समर्थे'. ॥ ८२ ॥ तंव द्विज बोले मंजुळ वचन, । 'जन्मवरी न विसरें तुमचे चरण'. । आज्ञा घेउनी ब्राह्मण । जाता झाला संतोषें. ॥ ८३ ॥ कर्ता भोक्ता जनार्दन । सर्वदा ज्याचें अंतःकरण, । त्याचें कोडें पुरवी श्रीकृष्ण । नानारूपेंकरूनी. ॥ ८४ ॥ कृष्णचरित्र अतिगहन, । निगमांही न कळे महिमान, । द्वापारीचें महिमान । कलियुगीं दावितसे. ॥ ८५ ॥ सगुणीं आवड गोपिकांची, । निर्गुणीं अव्यक्तीं तों देवांची, । करोनी भेटी दोघांची, । समानत्व पावले. ॥ ८६ ॥ हेही पाहतां तैसीच गोष्टी, । एकाजनार्दनब्राह्मणभेटी । करूनियां जगजेठी । चरित्र करी भक्ताचें. ॥ ८७ ॥ उच्छिष्टें काढिलीं धर्माघरीं, । हें प्रसिद्ध पुराणांतरीं, । येथ पाहतां तेच परी । एकनाथाघरीं भगवंत. ॥ ८८ ॥ कृष्णकृपाक्षतारू, । भक्तभावार्थाचा दृढ दोरू । धरूनि तरती संसारू । अतिप्रेमळ भक्तीचे. ॥ ८९ ॥ न कळे, न कळे हरिचरित्र; । भावार्थाचा परम मित्र, । जीवीं ध्याउनी तारक मंत्र । उद्धरिले महानुभाव. ॥ ९० ॥ एकाजनार्दनीं स्वार्थ । मुक्तेश्वराचा मुख्य परमार्थ, । धरूनि मूळचें सूत्र । लीलाविश्वंभर म्हणविलें.' ॥ ९१ ॥ मुक्तेश्वरीं कथिली कथा । वदतां धरूनि भावार्था, । ते पावती पुण्य पुरुषार्था, । यशस्वी होती तिहीं लोकीं. ॥ ९२ ॥ ऐसी हे कथा परम पावन, । वाढविलें भक्ताचें महिमान, । धन्य! धन्य! एकाजनार्दन, । आपली महिमा आपण दावी. ॥ ९३ ॥ चरित्र देखोनी मुक्तेश्वर । बोलिले देवभक्ताचा विचार, । सर्वही लीलाविश्वंभर । त्याचा पार तो जाणे. ॥ ९४ ॥

---

१. कौतुक. २. वेदांसही. ३. श्रीकृष्णानें राजसूययज्ञांत उष्टीं काढण्याचें काम आपलेकडे घेतलें होतें, अशी कथा आहे. [मुक्तेश्वर–सभापर्व, अध्याय ९ ओंव्या ५०–५३ पहा.] ४. कृष्णाची दयाळू दृष्टी हेंच तारूं. ५. थोर पुरुष. ६. '॥ श्रीखंड्याकृष्णाख्यान संपूर्ण ॥' असा अंतिम लेख आहे. ह्या प्रकरणाची एक हस्तलिखित प्रत कै० नारायणराव केळकर यांनीं जमवून ठेविलेल्या पोथ्यांत आढळली व दुसरी एक त्रुटित प्रत आम्हांस नागपुर येथें एका वाण्याचे दुकानांतील रद्दींत सांपडली.

## १३. पदसंग्रह.

### पद १ लें.

रघुवर मुक्त[1]मनीं । प्रकटे ॥ ध्रुवपद ॥
मित्रो[2]न्वयनिधि कौसल्योदर[3]–। शुक्तिकेंत जनी[4]. ॥ रघु० ॥ १ ॥
नग[5]कन्याधव भूषण मिरवी । हृत्पदकीं जडुनी. ॥ रघु० ॥ २ ॥
मुक्तेश्वर करि बद्धां[6] मुक्तचि । मुक्तपणा हरुनी. ॥ रघु० ॥ ३ ॥

### पद[7] २ रें.

पुरुष म्हणे, 'मज करकर न सोसवे, होइन अरण्यवासी ।
देवाचेनी धर्में मांडिला संसार[8], मध्येंचि उठिली विवेशी[9] ।
वित्त वेंचूनि या लोकांचीं[10] लेंकुरें[10] आंणिलीं बहु सायासीं ।
फाडुनि वस्त्रें, तोडुनि जानवें, होइन मी संन्यासी ।
आतां संसार पुरे पुरे । आतां घरचार पुरे पुरे. ॥ १ ॥
सासू म्हणे, 'सून तोंडाळ[11] भांडे,' सून म्हणे, 'उगी रांडे ! ।
हाणोनियां लात पाडीन उताणी, मोडीन तुझीं[12] हाडें' ।
पुरुष आला तेणें घातला डोळा, निष्ठुर भांडण भांडे ।
सासुस मारुनी शंखनाद करी, उबगोनि[13] संसारचाडे ।
'आतां विष घेइन वो ! बाई ! । जीव मी देईन गे ! ॥ २ ॥
घेईन विख, देइन प्राण, आग लागो ह्या जिणियासी ।
मज मेलियामागें बाइल होऊनि, हेचि नांदो का यासीं'. ।
सून म्हणे, 'येई शेजारिणीबाई ! हस्तकीं धरीं हें तूं नाणें ।
पैसाऱ्याचें विख आणुनी देई, फजीतीचें काय जिणें ? ।
बारिक तांदुळ, सोलींव[15] दाळीवरी हिंग, जिरें, मिरें, धणे ।
तूप निथळत घेइन पोटीं, मग कैसिया[16] वांचेन प्राणें ?' ॥ ३ ॥

---

१. जीवन्मुक्त पुरुषाच्या (योग्याच्या) मनांत. २. मित्र+अन्वय+निधी=सूर्यवंशाचें भांडार. ३. कौशल्येचें उदर ( पोट ) हाच मोत्यांचा शिंपला, त्यांत. ४. जन्म. ५. पर्वतकन्या (पार्वतीचा) पति (शंकर). ६. मायापाशांत गुरफटलेल्या लोकांस. ७. हें पद बरेंच अशुद्ध आहे. कांहीं भाग गाहाळ झाला असावा असेंही मधून मधून वाटतें. ८. 'संपत्ति जोडिली' असें पाठांतर. ९.जखीण. १०.'लोकांचें लेकरूं जोडिलें' असा पाठभेद. ११.भांडखोर, प्रत्युत्तर देणारी. 'ओढाळ' असें पाठांतर. १२.'माजीचीं' असा अन्यपाठ. माज=कंबर. १३. कंटाळून, त्रासून. १४. पसारा=मायेचा पसारा (?). १५. निसलेली, निवडलेली. १६. 'मग काय वांचेल प्राण' असा पाठभेद.

सोजीच्या पोळ्या, साठीव साय, घृतशर्करेच्या मेळें ।
वडे तेल वर, या [1]आरवारी [2]घारियावरी लोणियाचे गोळे ।
पुरण पोळिया थिजल्या तूपें, सेवितां काळिज पोळे ।
हें विख दारुण घेईन, तरी उन्हांत बैसती बाळें. ॥ ४ ॥
आंबियाचे रसें घोळियले मांडे, घेतला [3]न्याहार पोटीं ।
उतारालागीं सोलींव केळें, गिळिलीं शंभर साठी ।
दादुला आतां होईल [4]पोरटा, घालुं मी कोणाचे [5]ओटीं ।
दुधाचें [6]दुधाणें लावोनियां होटीं, काळकूट ऐसें [7]घोटीं. ॥ ५ ॥
कोहळे, भोपळे, [8]पडवळें, दोडके, कारलीं तळिलीं तूपें ।
[9]वृंतांकें सुंदर सोलींव नानापरी [10]बघारिलीं तप्त तूपें ।
चाकवतामाजी हिरवा हिंग, हें काय म्हणावें सोपें? ।
जावया प्राण फर्फरां घेतलें सासुचेनी संतापें. ॥ ६ ॥
सेवया, सरोळे, बोटवे; देठवे, दुधांत आळिल्या खिरी ।
लोणकढें तूप, मेळ उन्ह उन्ह दूध, मेळविली [11]रायपुरी ।
पुरणाची पोळी घातली ताटीं, त्यावरी सायेची वाटी ।
अफू आणि तेल सोमल, हें ऐसें झोंबेल माझिये कंठीं. ॥ ७ ॥
भरीतें रोटी तिळेल तेल, सोलीले पातीचे कांदे ।
नपती आलें बेलें सालफळें दहींभाताचे मांदे ।
ढोकळे, धीरडीं, पापड, फेणिया, सेवितां काळीज भेदे ।
दह्याची दुधाणी लावुनी होटीं गरळदाहा ऐसें घोटीं. ॥ ८ ॥
तीन तीनदां सात [12]सातरी हें विख सेविन बाई ! ।
चालवेना ऐसा भरंवसा जाला, आळसें नुठवे कांहीं ।
दादुल्यासी म्हणे, 'चुरीं का पाउलें, आंगाला [13]भोरण्या देई ।
मज मेलिया मागें दारोदारीं हींडसी, आहें तों [14]लाहो घेई.' ॥ ९ ॥

---

१. आरवारी=अरवारी. अरवार=खुसखुशीत, ज्यामध्यें वातडपणा व टणकपणा नाहीं असें पचनास हलकें पक्वान्न. २. घाऱ्या=वडे किंवा घारगे. ३. न्याहारी, अल्पाहार. ४. आईबाप ज्यास नाहींत असा, पोरका. ५. ओटींत घालणें=स्वाधीन करणें, पालनपोषण करण्यासाठीं दुसऱ्यास देणें. ६. दूध तापविण्याचें भांडें. ७. पितें, गिळितें. ८. 'कोवळीं वाळकें' असें पाठांतर. ९. वांगीं. 'पडोळीं तोंडोळीं नाना परी, वरी फोडणी दिली तूपें' असा अन्यपाठ. १०. तळिली, फोडणी दिली. ११. साखर. १२. सातरी=सप्तक, सात दिवस. १३. भोरण्या=आळे पिळे (?). १४. लाभ.

ऐसें हें विख सेवितां जीचें अंग सुजलें अरुवार ।
घरांतुनी सये! बाहेर निघतां चालतां हादरे हें घर ।
टेंकावयालागीं मुसळ घेउनियां करी त्याचा चाराचूर ।
लीलाविश्वंभरा हें विख देसील तरी फुकाचें राखिन घर. ॥ १० ॥

## पद ३ रें.

भूतदयादिक हरिगुरुभजनीं नित्य प्रेमा नसतां ।
चंबु, उटीनें मुद्रा लावुनी, वेष दाविती वैरता. ॥ १ ॥
चतुर्थ आश्रम संपादुनियां दंडकमंडलु त्यजिती ।
देहआकृती गेली नसतां परमहंस म्हणवीती. ॥ २ ॥
कानामध्यें बोट घालुनी, दडपुनि डोळे धरिती ।
हिरवे पिंवळे रंग पाहुनी स्वरूपमुद्रा म्हणती. ॥ ३ ॥
टाळमृदंगीं सुस्वर गायन पोटासाठीं करिती ।
हरिचे भजनीं प्रेमा नसतां हरिचे दास म्हणविती. ॥ ४ ॥
मुक्तेश्वरकवि शिकवी सुजनां भजनाविणही न तरे ।
या कलियूगीं व्यासें कथिलें, सांगतसें तुज हित रे! ॥ ५ ॥

## पद ४ थें.

अंतरीं वासना खोटी रे! । कायसा 'रामराम' वोठीं रे! ॥ ध्रुवपद ॥
हरिदास मी, एक लोकांत आगळा । सुरस माझें गाणें रे! ।
थीतमात संगीत गाणें नाचणें । निरुपणीं अर्थ जाणें रे! ।
पुढें निघे त्यासीं मागेंचि लोटी । माजला मत्सरमानें रे! ॥ अंतरीं० १
अंतरिं काम, क्रोध बाहेरि । देवचि भजना हांसे रे! ।
दासांचिये पायीं पदरज होणें। हरिहर म्हणिजे वाचे रे! ।

---

१. 'दारीं न माये, घरांत चालतां तेणें हे मोडित घर' असा अन्यपाठ. २. 'ठेंगणें मुसळ' असें पाठांतर. ३. 'मुसळ घेतलें, मोडुनि जालें चूर' असा अन्यपाठ. ४. 'मुक्तेश्वर म्हणे हें विख देईल त्याचें' असा पाठभेद. ५. दांभिक. ६. संन्यास. चार आश्रमः—ब्रह्मचर्य, गृहस्थाश्रम, वानप्रस्थ आणि संन्यास. ७. देहाभिमान. ८. दहा प्रकारच्या संन्याशांहून श्रेष्ठ पुरुष (परम पुरुष). [निवृत्तिनाथकृत—परमप्रकाश, ओंव्या ६५–७६, अनेक कविकृत लघु-काव्यमाला—भाग १, पृ० १२९–१३० पहा.] ९. 'कलौ तु हरिकीर्तनम्' असें वचन आहे. १०. श्रेष्ठ, थोर. ११. मंत्रतंत्र किंवा यंत्रतंत्र. येथें 'थाटमाट' असाही पाठ असूं शकेल.

लीलाविश्वंभर भावासि भुलला । द्वारहि राखे त्याचें रे ! ।
खांदीं बैसवुनि नेउनि वैकुंठा । आपुले पदरज साचे रे ! ॥ अंतरीं० २

## पद ५ वें.

सांग पां वैराग्य कोठें रे ! सर्व विडंबिलें पोटें रे ! ॥ ध्रुवपद ॥
बोइल सांडुनि शिष्यिण मेळविली । घर सांडुनि मठमाया रे ! ।
सोदर त्यागुनि शिष्यचि भोंवते । [3]जीविकेसि घातला पाया रे ! ।
उदिम सांडुनि भिक्षेसी हिंडणें । देशाउरीं दंड कां या रे ! ॥ सांग० ॥
साबण सांडुनि गेरूसि नाशिलें । संन्यास घेतला कोंचा रे ! ।
मिष्टान्नभिक्षेलागुनि धांवती । जिव्हा वेधली लांचा रे ! ।
करूं नये तें झांकूनि करिती । 'सर्व ब्रह्म' म्हणती वाचा रे ! ।
लीलाविश्वंभर नेणवे जंववरी । मोक्ष तों पावेल कैंचा? रे ! ॥ सांग०

## पद ६ वें.

गुरु गुरुपणें गाजे रे ! शिष्य शिष्यपणें लाजे रे ! ॥ ध्रुवपद ॥
मंत्रतंत्र देउनि शिष्यासि गोविलें । नेमुनि बांधिली पूजा रे ! ।
न पावतां कैसा गरु मांडी । शिष्य तो नवजेचि काजा रे ! ।
सप्रेमभाव तो कुभाव जाला । विकल्प चढला भाजा रे ! ।
गुरुशिष्य हा शब्दचि वाउगा । लटिकाचि लौकिक गाजारे ! गुरु० १
तनुमनधन तिनि गुरूसि वोपी । तोचि एक शिष्य जनीं रे ! ।
शिर्ष्यमुद्रा हे तयासिच साजे । येर तो बाहिर मुद्रा नाणी रे ! ।
खरा तो अर्जुन उद्धव गोरख । निवृत्ति ज्ञानदेव गुणी रे ! ।
सोपान मुक्ताबाई एकनाथ संत । वाउगी येर ते काहाणी रे ! ॥ गुरु०
जीवत्व दवडुनि शिष्यत्व प्रगटवी । तोचि एक सद्गुरुरावो रे ! ।
जयाचेनि स्मरणें [12]भवबंध निरसे । निवळे अनुभव भावो रे ! ।

---

१. वामनावतारीं विष्णूनें बळीस पाताळांत घातलें व त्याच्यावर प्रसन्न होऊन, विष्णु बळिराजाच्या घरीं द्वारपाळ होऊन राहिला—अशी कथा आहे. २. ह्या पदावरून मुक्तेश्वराच्या सामाजिक व धार्मिक मतांविषयीं बराच प्रकाश पडतो. (मागें मूर्खांचीं लक्षणें—ओंवी ६२ पहा.) ३. उदरनिर्वाहास. ४. सुमारें २५०।३०० वर्षांपासून आमच्या लोकांस साबण माहीत आहे. मुक्तेश्वराचे समकालीन तुकोबाराय यांच्या अभंगांतही साबणाचा उल्लेख आढळतो. 'नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ।' हा चरण प्रसिद्धच आहे. मात्र या साबणाला कोणतीं द्रव्यें लागत किंवा हा रिठ्यांपासूनच बनवित असत, हें समजत नाहीं. ५. कच्चा, वरवर. ६. वाढला, वृद्धिंगत झाला. ७. व्यर्थ, अर्थरहित. ८. शिष्यत्वाविषयीं खूण. ९. गुह्य, रहस्य. १०. येथें कांहीं अपपाठ असावा, कारण येथें अर्जुनादि आठ नांवांचा उल्लेख आहे. ११. संसारबंध, मायापाश. १२. नाहींसा होतो.

लीलाविश्वंभर त्रिभुवनतारक । तयासि शरण जावो रे! ।
घरोघरिं गुरुशिष्यचि अवघे । तयां हें दंडवत पावो रे! ॥ गुरु० ॥३॥

**पद ७ वें.**

भजा हो! भजा माझ्या [2]ऐकनाथासी ।
त्रिकाळीं श्रीदत्तात्रेयदर्शन ज्यासी ।
[3]प्रतिष्ठान [4]अधिष्ठान मान्य सर्वांसी ।
प्रकट परब्रह्म [5]भानुदासाचे वंशीं. ॥ ध्रुवपद ॥

एकनाथा शरण जातां चुकलें भवभय ।
एकावांचुनि कांहीं न दिसे, अवघें अद्वय ।
एका नामें जपतां त्याची लागे निजसोये ।
एवढा महिमा ज्याचा वाचे वर्णितां नये. ॥ भजा० ॥ १ ॥
करुणेचा अवतार तो हा विश्वतारक ।
कळेना स्वामीचें सहजासहज कौतुक ।
कर्ज त्याचे [6]घरचें फेडी कमलानायक ।
करी देव [7]दास्य, ज्याचा आज्ञाधारक. ॥ भजा० ॥ २ ॥
नाम एकोबाचें गोड आवडे मना ।
नावडे आणीक मज कांहीं त्यावीना ।
नामामृत सेवितां भेटी झाल्या चिद्धना ।
नाठवे देहभाव प्रेमें करितां कीर्तना. ॥ भजा० ॥ ३ ॥
थरथर कांपे काळ स्मरतां स्वामी समर्थ ।
थकित होउनि जन हे पाहती हर्षे परमार्थ ।
थकलें माझें चित्त पुरले मनिंचे मनोरथ ।
थयथय नाचे मुक्तेश्वर म्हणे, 'मी झालों कृतार्थ.' ॥ भजा० ॥ ४ ॥

---

१. ह्या पदाच्या प्रत्येक चरणाच्या आरंभीं व शेवटीं 'एकनाथ' ह्यापैकीं एक एक अक्षर सांभून रचना केली आहे. यावरून मुक्तेश्वरास चित्रकाव्याची थोडी बहुत गोडी होती असें दिसतें. २. हा मुक्तेश्वराचा मातामह (आजोबा) व गुरू होय. ३. पैठण. ४. राहण्याचें ठिकाण. ५. भानुदास हा एकनाथस्वामीचा पणजा. ६. एकनाथास कर्ज झालें होतें तें देवानें फेडिलें—अशी दंतकथा आहे. ७. 'श्रीएकनाथसदनीं माधवजी सर्व काम हें करितो । स्वकरें चंदन घांसी, गंगेचें पाणि कावडी भरितो ॥' ही मोरोपंतांचे पुतणे आप्पा यांची आर्या प्रसिद्धच आहे. (मागें एकनाथचरित्र पहा.) ८. ह्या पदांपैकीं पहिलीं तीन ती. कै. बा. दा. ओक यांच्या संग्रहांतील पोथ्यांत आम्हांस आढळलीं व पुढील चार रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर (पंढरपुर) यांच्या कृपेनें आम्हांस मिळालीं.

# १४. आरतिसंग्रह.

## १. गणपतीची आरति.

जय देव! जय देव! जय वक्रतुंडा! ।
सिंदुरमंडित विशाळ सुरवर भुजदंडा. ॥ ध्रुवपद ॥
उंदिरवाहन दोंदिल नाचसि बहु लीला ।
प्रसन्नभाळा! कमळा करिं घेउनि विमळा ॥
रुणझुण रुणझुण पायीं घागरिया घोळा ।
सताल सुस्वर गायन, शोभति अवलीळा. ॥ जय देव० ॥ १ ॥
सारीगमपधनि सगरि सप्तस्वर भेदा ।
धिमि धिमि धिमिकिट मृदंग वाजति गति छंदा ॥
ताथै ताथै तूं तैं करिसी आनन्दा ।
ब्रह्मादिक अवलोकिति तव पदारविंदा. ॥ जय देव० ॥ २ ॥
अभया वरदा! सुखदा! राजिवदलनयना! ।
फरशांकुशधर लाडूशोभित शुभरदना ॥
ऊर्ध्व दोंदिल उंदिर कार्तिकेश्वर रचना ।
मुक्तेश्वर चरणांबुजिं अलिपरि करि भ्रमणा. ॥ जय देव० ॥ ३ ॥

## २. बहिरोबाची आरति.

जय देव जय देव! जय भैरवनाथा! ।
सुंदर पदयुग तूझें वंदिन निजमाथां. ॥ ध्रुवपद ॥
भैरवराया! गौरव दे मज भजनाचें, ।
रौरवसंकट नाशीं जनना निधनाचें, ॥

---

१. ज्याचें कपाळ विशाळ आहे अशा देवा! २. शुभ्र. हें 'कमला'चें विशेषण. ३. 'करि' असें पाठांतर. ४. पाठभेदः—सत्ता सुरवर. ५. षड्ज, ऋषभ, गांधार, मध्यम, पंचम, धैवत, निषाद—सप्तस्वर. ६. चरणकमला. ७. कमलपत्रनेत्रा. ८. रदन=दांत. ९. भ्रमराप्रमाणें. १०. बहिरोबा हा मुक्तेश्वराचा कुलस्वामी होय. 'करविर लक्ष्मी विष्णुभाजा । भैरव सुवर्णपुरीचा राजा । उभय कुळदैवतीं माझा । मस्तक पायीं स्पर्शला ॥ (आदिपर्व, उपसंहार ८) या संबंधें सभापर्व १।५, व वनपर्व १।३ पहा. ह्याचें देवालय सोनारी नामक गांवीं बार्शीपासून २० मैलांवर व करमाळ्यापासून १५ मैलांवर आहे. देवाचे पुजारी ब्राह्मण आहेत. या गांवीं दरसाल चैत्रांत वद्य पक्षांत मोठी यात्रा भरते. देवस्थानास श्री० निंबाळकरांकडून ७०० रुपये इनाम आहे. बहिरोबा हा मोरोपंतकवीचाही कुलस्वामी होता.

निशिदिनिं देवा! दे मज गुणकीर्तन वाचे, ।
कैरव[1] पदनखचंद्रीं करिं मन मम सांचें[2]. ॥ जय देव० ॥ १ ॥
भव[3]भयभंजन! सज्जनरंजन! गुरुदेवा! ।
पद[4]रजअंजन लेतां, प्रकटे निजठेवा; ॥
जेव्हां दर्शन देशी, भाग्योदय तेव्हां; ।
अनन्त पुण्यें साधे, लाधे तव सेवा. ॥ जय देव० ॥ २ ॥
कलिमलशमना दमना दानव दे पाणी ।
डमरूरव अमरांतें निर्भय सुखदानी ॥
काशीरक्षक तक्षकमालाधर चरणीं[5] ।
तोडर मिरवी अरि[6]गण, मस्तकिं मनकर्णी. ॥ जय देव० ॥ ३ ॥
लक्षी करुणाचक्षीं[7] अनुचर[8] निजपक्षीं ।
भक्षी दुष्टांनष्टां, सुष्टां संरक्षी[9], ॥
साक्षी कर्माकर्मी[10], जगदंतरकुक्षी, ।
मुमुक्षु[11]पक्षी वसती तवपदसुरवृक्षीं. ॥ जय देव० ॥ ४ ॥
सोनारीपुरधामीं भैरव कुळस्वामी ।
स्मरतां, सत्वर पावसि संकटहर नामीं ॥
इच्छित देशी दासां जो जो जें कामी ।
मुक्तेश्वरीं हेतू निश्चळ[12] कुळधर्मी. ॥ जय देव० ॥ ५ ॥

### ३. महालक्ष्मीची[13] आरति[14].

जय देवी! जय देवी! जय महालक्ष्मी! ।
वसती व्यापकरूपें स्थूल हा स्थूलसूक्ष्मीं ॥ ध्रुवपद ॥

---

१. चंद्रविकासी कमळ. २. 'कलिमल मनसाचें' असें पाठांतर. अर्थसादृश्यः—वंदूं सोनारीभैरव । तेणें दिधला हा गौरव । प्रेमें झालें कैरव मन । पदनखचंद्रीं जयाच्या. ॥ (सभापर्व १।५.) ३. पाठभेदः—भवभवभंजन. ४. पायांची धूळ हेंच एक विशेष प्रकारचें अंजन. अंजन डोळ्यांत घातलें असतां, भूमिगत द्रव्य दृष्टीस पडतें—अशी समजूत आहे. [मुक्तेश्वर—आदिपर्व—अध्याय २२।७९; अध्याय १६।२; अध्याय १।४० पहा.] ५. अरिगण चरणीं तोडर मिरविणें=शत्रूचे समुदाय हेच पायीं पुतळे बांधणें, त्यांना दासानुदास बनविणें. (हनुमंताख्यान—ओंवी ६, मागें पृ० १७५ पहा.) ६. 'अरिगण' ऐवजीं 'अरिवर' असा पाठभेद. ७. करुणायुक्त नेत्रांनीं. ८. दास, भक्त. ९. 'भक्षी करुणा दुष्टां सुष्टां सम रक्षीं' असा अन्यपाठ. १०. बरीं वाईट कर्में पाहणारा. ११. मुक्तीची इच्छा धरणारे मनुष्य हेच पक्षी. १२. पाठभेदः—निश्चय. १३. कोल्हापुरची महालक्ष्मी ही मुक्तेश्वराची कुलस्वामिनी (कुळदेवता) होय. १४. या आरतींत ऱ्हस्वदीर्घांची व मात्रागणांची बरीच धांदल आहे.

करवीरपुरवासिनी सुरवरमुनिमाता ।
पुरहरवरदायिनी मुरहरप्रियकांता ।
कमलाकारें जठरीं जन्मविला धाता ।
सहस्रवदनीं भूधर न पुरे गुण गातां. ॥ जय देवी० ॥ १ ॥
मातुलिंगे गदा खेटक रविकिरणीं ।
झळके हाटकवाटी पीयुषरसपाणी ।
माणिकरसना, सुरंगवसना, मृगनयनी ।
शशिधरवदना, राजस मदनाची जननी. ॥ जय देवी० ॥ २ ॥
तारा, शक्ति अगम्या, शिवभजकां गौरी ।
सांख्य म्हणती प्रकृती निर्गुण निर्धारीं ।
गायत्री निजबीजा निगमागम सारी ।
प्रगटे पद्मावती निजधर्माचारीं. ॥ जय देवी० ॥ ३ ॥
अमृतभरिते सरिते! अघदुरितें वारीं ।
मारीं दुर्घट असुरा, भव दुस्तर तारीं ।
वारीं मायापटला, प्रणमत परिवारीं ।
हें रूप चिद्रूप तद्रूप दावीं निर्धारीं. ॥ जय देवी० ॥ ४ ॥
चतुराननें कुश्चितकर्माच्या वोळी ।
लिहिल्या असतिल माते! माझे निजभाळीं ।
पुसोनि चरणातळीं, पदसुमनें क्षाळीं ।
मुक्तेश्वर नागर क्षीरसागरबाळी. ॥ जय देवी० ॥ ५ ॥

### ४. तुळसीची आरति.

(प्रथम.)

जय देवी! जय देवी! जय तुळसी! माते! ।
पौदपरूपें तुजला धरिलें भगवंतें. ॥ ध्रुवपद ॥
सकळहि तीर्थें वसती तूझीये मूळीं ।
मध्यभागीं देव राहाती सकळीं ।
अग्नी वेद शास्त्रें सुखरूप राहीलीं ।
ऐसी तूं तुळसी सकळां माऊली. ॥ जय देवी० ॥ १ ॥

---

१. शेष. २. 'तूतें प्रकटे निर्धारीं' असें पाठांतर. ३. 'निगमश्रुति' असें पाठांतर. ४. सुंदर.
५. वृक्षरूपानें.

दृष्टी तुज देखील्या अघें तीं पळती ।
स्पर्शनमात्रें वपु या पावन होती ।
नमनें करितां रोग सकळही शमती ।
उदकें सिंपीलीया अंतक नाशी ती. ॥ जय देवी० ॥ २ ॥
नामस्मरणीं तुझिया उपजे सद्भावो ।
एकों तुळसीदळें संतुष्टे देवो ।
कांहीं सेवा घडल्या चूके रौरवो ।
मुक्तेश्वरीं सद्गुरुमुखें अनुभवो. ॥ जय देवी० ॥ ३ ॥

## ५. तुळसीची आरति.

( द्वितीय. )

जय देवी! जय देवी! जय माये! तुळसी! ।
अक्षय मोक्षाचेनीं फळभारें फळसी. ॥ ध्रुवपद ॥
कमळा सांडुनि हृदयीं कोमळदळमाळा ।
धरितां प्रेमभावें साजे गोपाळा ।
साधनपंथीं साधक गोवुनि भ्रमचाळा ।
प्रगटे आपण विष्णु श्रीतुळसीजवळा. ॥ जयदेवी० ॥ १ ॥
तुळसीमूळमृत्तिका जो चर्ची भाळीं ।
तुळसीतीर्थें अनुदिन करितां आंघोळी ।
तुळसीकाष्ठें ग्रीवा मंडित मणिमाळीं ।
तीसंगें क्रीडतो अखंड वनमाळी. ॥ जय देवी० ॥ २ ॥
मंजुरीया दिसती जैशा वज्राच्या धारा ।
पापाचे पर्वत करिती संहारा ।
पळती यमकिंकर म्हणती रविकुमरा ।
'तुळसीभूतळवासीं न दिसे अघथारा.' ॥ जय देवी० ॥ ३ ॥
तुझेन एके दळें सोडविला देवें ।
म्हणुनी तूझे ठायीं जडला दृढभाव ।

१. पापें. २. फळ देसी. ३. 'मध्यें नटवर शोभा गोपाळा । वामांकीं सुंदर जांबुवंतीबाळा' असा पाठभेद. ४. 'तुळसीतीर्थें वंदन' असें पाठांतर. ५. मान, गळा. ६. 'वनमाळी' असें पाठांतर. ७. 'त्यजिती तनुधारा' असा अन्यपाठ. ८. पापाला थारा (आश्रयस्थान). ९. एकदां सत्यभामेनें नारदास श्रीकृष्णाचें दान दिलें व नारद कृष्णास आपल्याबरोबर घेऊन जाऊं लागला, तेव्हां बाकीच्या सर्व कृष्णस्त्रियांनीं कृष्णाच्या भारंभार सुवर्ण नारदास देऊन त्याची सुटका करण्याचा विचार केला. सर्वांनीं आपले दागदागिने व सर्व संपत्ति गोळा करून एका पार-

वृंदावनीं देई वस्तीसी ठाव।
सहज संगें भेटे वैकुंठराव. ॥ जय देवी० ॥ ४ ॥
मन हें तुळसीदळ हरिगुरुच्या पायीं ।
अर्पी तया पुढती भवसंकट नाहीं ।
अंतर वृंदावनीं निज निश्चळ राहीं ।
मुक्तेश्वरस्वामी विश्वंभर पाहीं. ॥ जय देवी० ॥ ५ ॥

### ६. ज्ञानदेवाची आरति.

जय देव! जय देव! जय ज्ञानदेवा! ।
जीवा शिवा आदि, परब्रह्मठेवा. ॥ ध्रुव० ॥
इंद्रायणिच्या तटीं धरिला रहिवास ।
विश्व तारावया लक्ष्मीनिवास ॥
ज्ञानेश्वररूपें धरिला निजवेष ।
अनुभव जाणे तया सद्गुरुउपदेश. ॥ जय देव० ॥ १ ॥
कृष्ण एकादशी कार्तिकमासीं ।
पंढरिनाथ आपण सनकादिकांसीं ॥
यात्रेसी येताती स्वानंदराशी ।
दर्शन घडे तया निजमुक्ती दासी. ॥ जय देव० ॥ २ ॥
सकळ सिद्धगणांमाजी तूं श्रेष्ठ ।
ज्ञानदेवीं अनुभव ज्ञानावरिष्ट ॥
अनुतापदीप विश्वीं घनदाट ।
मुक्तेश्वरीं न धरे प्रेमाचा लोट. ॥ जय देव० ॥ ३ ॥

### ७. श्रीएकनाथस्वामीची आरति.

( पहिली. )

जय देव! जय देव! जय एकनाथा! ।
सज्जनवृंदामाजी देखों आधिकता. ॥ ध्रुवपद ॥

---

ड्यांत टाकिली व दुसऱ्या पारड्यांत कृष्णास बसविलें तरी कृष्णाच्या भारंभार सुवर्ण होईना, तेव्हां रुक्मिणीनें एक तुळसीपत्र सुवर्णाच्या पारड्यांत टाकिलें व त्यामुळें एकदम दोन्ही पारडीं सारखीं झालीं. अशा रीतीनें कृष्णाची सुटका झाली—अशी कथा आहे. [अनेककविकृत लघुकाव्यमाला-भाग १, रामात्मजकृत कृष्णदानकथा, पृष्ठें १४९–१५५ पहा.]

१. 'आतां' असें पाठांतर. २. ज्ञानेश्वर हा विष्णूचा अकरावा अवतार होय, असें मोरोपंत म्हणतात. (सन्मणिमाला गीति २ पहा). ३. ज्ञानेश्वर शके १२१८ कार्तिक वद्य ८ रोजीं आळंदी येथें समाधिस्थ झाले. ४. मान, प्रतिष्ठा.

बाळपणीं कोणा डंखों आला काळ ।
तो काळचि कोणा झाला कृपाळ ।
जन्मारंभीं कोणाचें वैराग्य प्रबळ ।
कोणाचें वैराग्य राहीलें अढळ[1]. ॥ जय देव० ॥ १ ॥
क्षालन सद्गुरुपदपंकजिंचें नीर ।
कोण त्याला मानुनि साराहुनि सार ।
कोण गुरुभक्तीसी जाहला तत्पर[2] ।
सर्वा गुरुभक्तीसी एक आधार. ॥ जय देव० ॥ २ ॥
करतळामळ कोणीं 'एकादश'[3] केला ।
विश्वव्यापक ग्रंथ कोणाचा झाला ।
अनंत कोटी ब्रह्मांड ज्यासी अवलीला ।
त्यासी 'अनुभवसार' कोणा पैं वदला. ॥ जय देव० ॥ ३ ॥
भूसुरमहिमा[4] कोणीं वाढविला ।
षट्कर्मांचा[5] महिमा आंगीं दाखविला ।
........................ ।
........................॥ जय देव ॥ ४ ॥
कोणाचें ऋण जाउनि कमलापति फेडी ।
कोणाचें हरिदास स्वयें अंगण झाडी ।
अनंत ब्रह्मांडांच्या करितो घडामोडी ।
कोणाचे घरीं खांद्या वाहे कावडी. ॥ जय देव० ॥ ५ ॥
कोणे मुक्या[6] हातीं रामायण[7] वदवी ।
समुद्रवलयांकित श्री[8] कोणाची झाली? ।

---

१. निश्चळ. २. एकनाथस्वामींची, त्यांचे गुरू जे जनार्दनस्वामी, त्यांचे ठायीं अत्यंत भक्ति असे. ३. नाथांनीं भागवताच्या एकादशस्कंधावर टीका केली आहे. हा ग्रंथ 'एकनाथी भागवत' ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. ४. ब्राह्मणांचें माहात्म्य. ५. यजन (स्वतः यज्ञ करणें), याजन (दुसऱ्याकडून यज्ञ करविणें), अध्ययन (शिकणें), अध्यापन (दुसऱ्यास शिकविणें), दान (दान देणें) व प्रतिग्रह (दान घेणें)—हीं षट्कर्में. हीं करण्याचा फक्त ब्राह्मणांसच अधिकार होता. ६. मुक्तेश्वर कवि पहिल्यानें मुका होता, पण नाथांच्या कृपेनें त्यास वाचा फुटली, अशी दंतकथा आहे, ती ह्या उल्लेखावरून विश्वसनीय दिसते. ७. मुक्तेश्वरानें रामायण इतर सर्व ग्रंथांच्या आधीं रचिलें असावें, असें दिसतें. ८. कीर्ति, वैभव.

ऐसा अगम्य महिमा जाणति अनुभवी ।
भावें मुक्तेश्वर वांच्छित पदपदवी. ॥ जय देव० ॥ ६ ॥

## ८. श्रीएकनाथस्वामीची आरति.

(दुसरी.)

जय देव! जय देव! जय एकनाथा! ।
निर्विकार ब्रह्म तूंचि तत्वता ।
नामें भवकुंजर[1] ताडूनी लाथा ।
भक्तप्रतिपाळक कळिकाळमाथा ॥ ध्रुवपद ॥
नानारूपीं चालक व्यापक तूं एक, ।
म्हणुनी 'एका' नामें पाचारिति लोक ।
ज्याचेनि नामें न चले विषयाचा पंकें[2] ।
जनार्दनाजवळी कीर्तीचा जनक. ॥ जयदेव० ॥ १ ॥
निर्मळ गोदातटीं मुनिराजहंस ।
निर्गुण प्रतिष्ठानीं केला रहिवास; ।
लोकत्रयीं मिरवी कीर्तीचा घोष, ।
आचार विचार निर्मल निर्दोष. ॥ जय देव० ॥ २ ॥
अपर भानुकुळीं[3] उगवला भानू[4], ।
सूर्याचाही सूर्य देदीप्यमानू[5], ।
काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, मानू ।
कृपादृष्टी करुनी तारिसि रजरेणू. ॥ जय देव० ॥ ३ ॥
भगवद्भावें करुनी सकळांसी मैत्री, ।
म्हणुनी जन्म विश्वामित्राचे गोत्रीं, ।
विश्व तरलें हरिहरनामाचे मंत्रीं ।
पाहूं न शके जवळ कळिकाळ नेत्रीं. ॥ जय देव० ॥ ४ ॥
ब्राम्हणतीर्थीं पूजा, नामाचा महिमा, ।
सत्कर्मे लोटली मोक्षाची सीमा; ।
नाना मतांचिया वंदूनी गरिमा ।
मुक्तेश्वरें तेथें धरियेला प्रेमा. ॥ जय देव० ॥ ५ ॥

---

१. संसाररूप हत्ती. २. चिखल. ३. भानुदासाच्या वंशांत. भानुदास हा एकनाथाचा पणजा होय. ४. सूर्य. ५. तेजःपुंज. 'दैदीप्यभानू' असें पाठांतर.

### ९. विश्वंभराची आरति.

आरती विश्वंभरा ! । पूर्णसाक्षी ॐकारा ! ।
सदया ! ने व्यापुनीयां योगिवृंदमाहेरा. ॥ ध्रुवपद ॥
निर्गुणा ! निरामया ! । निर्विकारा ! अद्वया ! ।
सच्चिदानंदरूपा ! निरंजन अद्वया ! ॥ १ ॥
अचळा ! शाश्वता ! । निर्मळा ! अच्युता ! ।
सोज्ज्वळा ! शुद्धबुद्धी ! नित्य सत्य अनंता ! ॥ २ ॥
ब्रह्मादिदेववंद्या ! । परमा वेदांतविद्या ।
अपार रूप तूझें शंकरासहित आद्या ! ॥ ३ ॥
सहस्रमुखीं शेषें । वर्णियेला विशेषें ।
न कळे परिवार गाती नारदादि घोषें. ॥ ४ ॥
..............पी तीर । जयासन्निध अवतार ।
प्रगटोनी धर्मासी तूं पापी तारियले थोर. ॥ ५ ॥
शरण मी तूज आतां । पायीं ठेवीयेला माथा ।
संतोषें सुत[2] रक्षीं, गुरु विश्वंभरनाथा ! ॥ ६ ॥[3]

---

१. विश्वंभरबुवा हे मुक्तेश्वराचे वडील व गुरू होते. ह्यांच्या नांवाचा उल्लेख मुक्तेश्वरानें ठिकठिकाणीं केला आहे. २. पुत्र (मुक्तेश्वर). ३. ह्या आरत्यांपैकीं कांहीं आम्हांस रा. रा. लक्ष्मणराव पांगारकर, बी. ए., व रा. गोविंदराव श्रीखंडे (हुशंगाबाद), यांच्या कृपेनें मिळाल्या, आणि बाकीच्या कै० बा. दा. ओक यांच्या संग्रहांतील अनेक हस्तलिखित पोथ्या धुंडाळतांना आम्हांस आढळल्या.

## गोपाळाची भूपाळी.[1]

उठिं रे! गोपाळा![2] उघडीं स्वरूपलोचना ।
सरलि अविद्याराती[3] उदय झाला रविकिरणा[4] ॥
इंद्रियेंगोधनें[5] नेईं निर्गुणकानना ।
सुटलीं[6] मानसवत्सें[7] तुजविण नाकळती[8] कोणा. ॥ ध्रु० ॥
प्रबोध[9] पहांट झाली सरले तिमिर तमरज
गुरूकृपेचा अरूण दावी सुरंगसम तेज ॥
आत्मा दिनकर[10] पाठी प्रगटे तात्काळिक सहज ।
जिवचंद्राचें मंडळ तेणें झालें निस्तेज. ॥ १ ॥
दृश्यभास चांदणिया असते ठायींच[11] लोपलिया ।
लिंगदेहकमळींचे[12] मधुकर[13] सुटले आपसया[14] ॥
बुद्धिबोधचक्रवाकें[15] मिनलीं[16] आपणियां ।
देहबुद्धिकुमुदिनी[17] सुकोनी गेलीसे विलया. ॥ २ ॥
योगविद्येच्या पंथें साधकवृंदें चालियलीं ।
उपनिषद्रागार्थ[18] शब्द केला कोकिळीं ॥
वाग्वादाचे उलूक[19] निघती मौनाचे ढोलीं[20] ।
विकल्पअटवी[21] सोही[22] चोरीं सांडियली. ॥ ३ ॥

---

१. भूपाळी=भूप नामक रागांतील पद्यांची पंक्ति. पहांटेस गावयाच्या अनेक रागांपैकीं हा एक आहे. २. इंद्रियचालका. मुक्तेश्वराच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें ह्या भूपाळींत फार बहारीचें रूपक साधलें आहे. ३. अज्ञानरूपी रात्र. ४. 'असंग ब्रह्मैवाहमस्मि' अशा ज्ञानरूपी सूर्याचे किरण. ५. इंद्रियें हींच ओढाळ गुरें. ६. भडकलीं, बोकळलीं. ७. विषयेंद्रियसंयोगानें पुष्ट होणारीं मानसरूपी वत्सें (वांसरें). ८. आंवरून धरितां येत नाहींत. ९. 'मी आत्मा आहें' ह्या बोधाचा उदय. १०. गुरुकृपेचा अरुणोदय होतांच पाठोपाठ आत्मस्वरूप सूर्याचा प्रकाश होतो, व जीवाचें जीवपण मावळतें—हा इत्यर्थ. ११. जेथेंच्या तेथेंच. १२. सूक्ष्मदेहरूपी कमळांतील. देह चार प्रकारचे आहेत:—स्थूलदेह, लिंगदेह, कारणदेह व महाकारणदेह. १३. भ्रमर. १४. सहज, आपोआप. १५. बुद्धि व बोध हेंच चक्रवाक नामक पक्ष्यांचें जोडपें. 'बुद्धिबोधा होय मिळणी । चित्तचैतन्य बुझावणी । ३०' पहा. (शुकरंभासंवाद ओं० ३११, मागें पृ० १५८.) १६. मिळालीं, भेटलीं. बुद्धि व बोध यांची अहंकारानें तटातूट केली होती, पण सुदैवानें त्यांचें ऐक्य झालें—हा इत्यर्थ. १७. आत्मबुद्धीचा उदय होतांच देहबुद्धी लय पावते—हा इत्यर्थ. १८. उपनिषदांनीं गायिलेल्या आत्मस्वरूपाचा बोध हाच शब्द कोकिळ गाऊं लागला आहे. १९. वितंडवादरूपी घुबडें, दिवाभीतें. २०. 'ढाळीं' असें पाठांतर. ढाळी=झाडाची खांदी. २१. संशयरूपी अरण्य. २२. काम, क्रोध, मोह, मद, मत्सर व लोभ—हे सहा चोर.

वि[1]रागरश्मी जवळी धरितां चि[2]त्तरविकांत ।
आत्मावन्हि प्रगटे विषयवन हें जाळीत ॥
तृ[3]ष्णेच्या श्वापदावरी प्रळय अ[3]द्भुत ।
विश्व हें लटिकें मूढां मृ[4]गजळवत. ॥ ४ ॥
जारव्यसनी जिव हा झाला उदमीं सुविचार ।
वासना कुंटिणिचा सहजें खुंटला व्या[5]पार ॥
लीलाविश्वं[6]भरस्वामी उठिला सत्वर ।
चाले मुक्ते[7]श्वर संगीं धरूनियां क[8]र. ॥ ५ ॥

---

१. वैराग्यरूपी सूर्यकिरणांसमोर. २. आपले मनरूपी सूर्यकांतमणि. ३. आत्मतृप्तीमुळें तृष्णा लय पावते—हा इत्यर्थ. ४. पाठभेद:—मृगजळहेत. ५. जन्ममरणाच्या येरझारा घाल-णारी वासनारूपी कुंटीण तिला धंदा राहिला नाहीं—हा भावार्थ. ६. हीच भूपाळी 'काव्यसंग्रह' ग्रंथमालेंतील अनेककविकृत पदसंग्रहांत (भाग २ रा, पद १५) प्रसिद्ध झालेली आहे व या शेवटच्या दोन ओळींचा त्या ठिकाणीं असा पाठ आहे:—'म्हणे ज्ञानदेव योगी झालासे स्थीर । निवृत्तीप्रसादें समाधि सवेग सार ॥'. आतां ज्ञानेश्वर व मुक्तेश्वर या दोघांचीही काव्यप्रतिभा श्रेष्ठ दर्जाची असल्यामुळें, ही भूपाळी दोघांच्याही नांवाला साजण्यासारखी आहे. तेव्हां ही नक्की कोणाची हें ठरणें फार बिकट दिसतें. ७. 'मुक्तीश्वर' असा पाठभेद. ८. रा. रा. ल. रा. पांगारकर, बी. ए. हे पंढरपुर येथील बडव्यांचीं दप्तरें चाळीत असतां, त्यांत त्यांस येथें छापलेली या भूपाळीची मुक्तेश्वरनामांकित पाठाची प्रत मिळाली.